# एक सुवर्णांकित भविष्य

[पृष्ठ २७]



" हा वासुदेव खरे
पुढें खचित मोठा माणूस होणार
व
तो खात्रीनें नशीव काढणार
हें पक्कें समजा. "

गुहागर येथील
माधवराव गाडगीळ वकील
यांचें हें भविष्य अखेर खरें ठरलें.

कारण,

वासुदेवशास्त्री खरे हे

अर्थः सुखं कीर्तिरपीह माऽभूत् ।
अनर्थ एवास्तु तथापि धीराः ॥
निजप्रतिज्ञां अनुरुध्यमानाः ।
महोद्यमाः कर्म समारभन्ते ॥

या कोटींतील पुरुष होते.

भारत-इतिहास-संशोधक-मंडळ पुणें, पुरस्कृत ग्रंथमाला-क्रमांक २१.

प्रसिद्ध इतिहाससंशोधक

# गुरुवर्य वासुदेव वामन शास्त्री खरे
# चरित्र व ग्रंथपरिचय

पूर्वार्ध आणि उत्तरार्ध

लेखक

दामोदर मोरेश्वर भट

खरे शास्त्रीबुवांचा एक नम्र विद्यार्थी

शके १८५१, सन १९२९

किंमत २॥ रुपये

# पुरस्कार



कै. वासुदेवशास्त्री खरे याचें चरित्र त्यांचे एक शिष्य रा. दामोदरपंत भट यांनीं मोठ्या परिश्रमानें जुळवून ते आज छापून प्रसिद्ध करण्याचा सुप्रसंग साधला, याबद्दल कोणीहि त्यांचें कौतुकच करील. हा चरित्रग्रंथ बराच मोठा आहे आणि कै. खरेशास्त्री यांच्या अधिक आठवणींचा व आख्यायिकांचा मनोरंजक भरणा होता आला तर तो याहूनहि वाढेल

थोर पुरुषांचीं चरित्रें अलीकडे बरींच प्रसिद्ध होऊं लागलीं आहेत गोखले, टिळक, रानडे, विजापूरकर, राजवाडे, हरिभाऊ आपटे, मंडलिक, लोकहितवादी, तेलंग, भांडारकर इत्यादि प्रख्यात पुरुषांचीं चरित्रें अलीकडेच प्रसिद्ध झालीं आहेत. थोरामोठ्यांची चरित्रे हा एक राष्ट्राचा ठेवा आहे, ही गोष्ट आतां आमच्याकडे लोकांस पटत चालल्याचें हें स्पष्ट चिन्ह आहे. मरणावर स्मरण हा बेमालूम तोडगा आहे हे स्मरण जिवंत ठेवण्याच्या उपायांत चरित्रलेखन हा सर्वोत्तम उपाय होय.

कै. वासुदेवशास्त्री खरे यांची कामगिरी अनेक दृष्टींनी संस्मरणीय झालेली आहे. पाढिक शास्त्री, कळकळीचे शिक्षक, विनोदी कथाकथक, प्रासादिक कवि, लोकप्रिय नाटककार आणि विद्वन्मान्य इतिहाससंशोधक इत्यादि अनेक दृष्टींनीं त्यांची कामगिरी व योग्यता महाराष्ट्राच्या प्रतीतीस उत्तम प्रकारें आलेली होती मूळ जरी काव्यनाटकांतच त्यांचें चित्त रंगून गेलेलें होतें व तो रसिकपणाचा झरा अखेरपर्यंत जरी आटला नाहीं तरी रुक्ष समजलें गेलेलें इतिहाससंशोधन हाच त्यांच्या जिव्हाळ्याचा विषय होता म्हणजे काव्यनाटकादिकांच्या लौकिक रसापेक्षां इतिहाससंशोधनाचा अलौकिक रसच त्यास अधिक प्रिय होता, असा निष्कर्ष त्यांच्या चरित्रापासून निघतो. खरे यांची खरी कीर्ति '**खरा इतिहाससंशोधक**' म्हणूनच अधिक आहे.

असें आहे म्हणूनच हा ग्रंथ भा. इ. सं मंडळाच्या पुरस्कृत ग्रंथमालेंत दाखल करण्याची रा. भट यांची विनंती मंडळानें मान्य केली मंडळाच्या उद्देशाचे दोन भाग आहेत:—एक प्रमुख उद्देश, आणि दुसरा आनुषंगिक उद्देश. पैकीं साक्षात् इतिहाससाधनग्रंथादि प्रसिद्ध करणे हे प्रथम उद्देशाचें

फल समजावें, आणि इतिहासविषयक जागृतीला पोषक अशा खरेचरित्रासारखा ग्रथ पुरस्कृत करणें हे आनुषंगिक उद्देशाचें कार्य होय.

हा चरित्र ग्रथ आहे. अर्थात् अनेक विषयांवरील माहिती व अभिप्राय यांत आलेले आहेत. ही माहिती व अभिप्राय ही रा. भट यांची जबाबदारी, आणि स्थूल मानाने एकंदरीने ती पुरस्कार्य आहे असें ठरविणे ही मडळाची जबाबदारी होय. हा पुरस्कार करिताना खरे यांच्या काव्यनाटकादि कृतींचा विचार साहजिकच केला नाहीं. इतिहासविषयापुरते पाहिले तरी अनेक वादग्रस्त विषयासबधीं खरेशास्त्री यांचे अभिप्राय किंवा रा भट यांचें त्यासबधींचे म्हणणें हें सर्वसमतच होईल, असे कोणी समजणार नाहीं. किंबहुना अशी समति देणे किंवा असमति दाखविणें ही दृष्टिच पुरस्करणांत ठेवावयाची नसते रा भट याची क्वचित् अपुरी किंवा सदिग्ध राहिलेली माहितीहि पुरी व निश्चित करितां येण्यासारखी आहे. ही उणीव किंवा आणखी कांहीं उणीवा कोणास आढळल्यास त्या सर्व लक्ष्यांत घेतल्या तरी, दुसऱ्या बाजूनें पाहिलें असतां रा. भट यांनीं आपलें कार्य किती श्रम करून, काळजीनें व सावधपणानें केलें आहे हें ग्रथ वाचला असतां सहजच दिसून येईल. आणि अनेक अडचणींशीं झगडून रा भट यांनीं ही चारित्रलेखनाची अवघड कामगिरी इतक्या उत्तम तऱ्हेने पार पाडली, याबद्दल त्यांस कोणीहि धन्यवादच समर्पील यात सशय नाहीं. असो

महाराष्ट्र–इतिहाससशोधनाचा इतिहास फार स्फूर्तिदायक आहे. आणि त्यांत खरेशास्त्री यांची कामगिरी फार भरीव व सदैव सस्मरणीय अशी झालेली आहे, रा. भट यांच्या या चरित्रानें कोणी **सवाईखरे** निर्माण व्हावा ही आशा आहे

मार्गशीर्ष शु ६।१८५१
पुणे

मडळाचे आज्ञेवरून
**दत्तो वामन पोतदार,**
चिटणीस, भा इ स मडळ.

---

¹ मडळाने ह्या ग्रथाचा पुरस्कार केल्याबद्दल मी मडळाचा फार आभारी आहें.

चरित्रलेखक

# चरित्र-लेखकाचे दोन शब्द

मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ॥
यत्कृपा तमहं वंदे परमानंदमाधवम् ॥

नमुनि ज्ञानद, वत्सल, शीलश्रीमंत पूर्वजां भावे ॥
स्थापूं प्रयत्नवादा शास्त्रिखरे-चरित योजिलें गावे ॥

आपल्या प्रिय महाराष्ट्र देशांत गेल्या शें पाऊणशें वर्षांत जे थोर पुरुष जन्मास आले, त्यांमध्येच प्रसिद्ध इतिहाससंशोधक कै. **वासुदेव वामन शास्त्री खरे** यांची गणना केली पाहिजे. मराठी वाङ्मयांत इतिहास, काव्य, नाटक, या तीनहि शाखांत त्यांनीं आपलें नांव चिरंतन करून ठेविलें आहे, आणि इतिहास-संशोधन-कार्याच्या क्षेत्रांतील त्यांची कीर्ति तर आजरामर राहील ह्यांत लवमात्र संशय नाहीं. महाराष्ट्रीय ' इतिहास-संशोधक-पंचायतन ' असें ज्यांस म्हणतात त्या स्मृतिशेष संशोधकापैकीं कै. राजवाडे यांच्याखेरीज इतर कोणाचें चरित्र अद्यापि छापून प्रसिद्ध झालेलें नाहीं. खुद्द गुरुवर्य वासुदेवशास्त्री खरे यांस कैलासवास घडून पांच वर्षें पूर्ण होऊन गेलीं! या अवधींत सन १९२६ च्या जूनमध्यें 'मिरज-विद्यार्थी-संघ' या संस्थेनें सहा महिन्याची मुदत ठेवून केसरी-ज्ञानप्रकाशादिकांत प्रसिद्धि-पत्रे देऊन खरे यांच्या चरित्रावर अखिल महाराष्ट्रामधून निबंध मागविले. त्यासाठीं सामग्री जुळविण्याचा प्रयत्न करून प्रस्तुत लेखकानेंहि एक विस्तृत निबंध लिहून मि. वि. सं. या संस्थेकडे मुदतशीर पाठविला. सदर संस्थेने निबंधाचे परीक्षण, दे. भ. तात्यासाहेब केळकर, संपादक 'केसरी' व रा. सा. महाबळ, न्यायाधीश संस्थान जमखिंडी यांजकडून करविलें. आणि सुदैवानें माझा निबंध त्यांना पसंत पडून त्यांनीं त्यावर उत्साह-जनक उत्कृष्ठ अभिप्राय लिहून दिले. तथापि छापण्यास लागणाऱ्या आर्थिक अनुकूलतेच्या अभावीं हा चरित्रपर निबंध दोन वर्षें नुसता घरांत ठेवून स्वस्थ बसणें मला भाग पडलें ! !

अशा स्थितींत अनुकूल काळ येईल त्या वेळीं, हे चरित्र सर्वांग परिपूर्ण होऊन लोकांपुढें यावें या दृष्टीनें मग, खरेशास्त्री यांच्या स्नेह्यांसोबत्यांस, त्यांच्या व त्यांच्या ग्रथांच्या विद्वान् चाहात्यांस व त्यांच्या अनेक प्रिय विद्यार्थ्यांस पत्रें पाठवून किंवा शक्य तेथे समक्ष भेटून मीं अधिक माहिती मिळविण्याचा उपक्रम चालू केला. तसेच खरे यांचे मूळ गांव गुहागर तेंहि मी प्रत्यक्ष जाऊन पाहून आलों गतवर्षी, पुणें येथे भारत इतिहास–संशोधक–मंडळात खरे यांच्या भव्य तैलचित्राचा अनावरण समारभ झाला. त्या सुप्रसगीं श्रीमंत राजश्री बाबासाहेब इचलकरंजीकर यांची भेट अनायासें होऊन चारित्रप्रकाशनाच्या कामीं फिरून तकवा धरावा अशी परिस्थिति श्रीमताच्या आश्वासनामुळें उत्पन्न झाली. अथापि तेवढ्याने सर्व कार्यभाग उरकण्यासारखा नव्हता. कारण, हा सुधारून वाढविलेला चरित्र–ग्रथ छापविण्यास पुष्कळच खर्च येईल असें शोधा अंती समजले तरी पण, आतां हे काम मागे न टाकिता कसेहि करून एकदा हातानिराळे करावयाचेच असा निश्चय करून चरित्राची पक्की प्रत लिहून काढण्यास मी गेल्या जानेवारींत प्रारम केला. आणि सकल्प असा कीं, शास्त्रीबुवांच्या ५ व्या पुण्यतिथीस–गेल्या ता. १५ जूनच्या सुमारास–पुस्तक प्रसिद्ध करावे. परतु ईशसत्तेने तो योग सहा महिने उशीरां यावयाचा होता ! !

केसरींतील प्रसिद्धिपत्रक व खाजगी विनती–पत्रे याच्या द्वारे माहिती मिळविणाच्या उद्योगांत, लो. टिळकांचे आठवणी–संपादक, श्री. सदाशिवराव बापट यांचाच अनुभव अल्प प्रमाणात मलाहि आला ! शास्त्रीबुवांचे कार्य सर्वत्रोपयोगी असलें तरी त्यानीं ते एके जागीं बसून केलें असल्यानें पर-ठिकाणाहून विशेषशी माहिती न आल्याबद्दल मला फारसा खेद वाटला नाहीं. परतु सर्व महाराष्ट्रभर पसरलेल्या त्यांच्या विद्यार्थ्यानीं (काही अदवाद वगळून) या कामीं उदासीनपणे मौन स्वीकारावे हे मला बरे वाटलें नाही असो.

मला माहिती पुरविणारांत प्रथम शास्त्रीबुवांच्या घरच्या मडळीचा उल्लेख केला पाहिजे मित्र रा. यशवतराव–शास्त्रीबुवांचे चिरजीव, श्रीमती मातुःश्री सत्यभामाबाई–शास्त्रीबुवाच्या पत्नी, आणि त्यांचे गुहागर व इदूर येथील पुतणे या सर्वांनी, मीं त्यांस वारवार विचारिलेली विविध माहिती मोकळ्या मनानें मला पुरविली. रा. यशवतराव यानीं घरचीं पुस्तकें, १।२ हस्तलिखित टिपणें व

हस्ताक्षरें इत्यादींचा उपयोग करून घेण्यास मला परवानगी देऊन तीं मजकडे लागतील तितके दिवस राहू दिलीं इंदूर येथील पुतणे रा. पुरुषोत्तमराव खरे, यांनीं बरीच माहिती लिहून पाठविली व गुहागरास गेलों असतां तेथील माहिती रा. रामशास्त्री व रघुनाथराव यांनीं परिश्रमपूर्वक करून दिली. सातारा येथील अनेक गोष्टी श्री. बाबा कोल्हटकर, वे. शा. व्यंकटाचार्य उपाध्ये–माजी संस्कृताध्यापक बडोदा कॉलेज् व वे. शा. शंकरशास्त्री महाजन ( रहिमतपूर ) यांनीं सांगितल्या. शिवाय, रा. सा. माधवराव केळकर (रि. डे. कलेक्टर धुळे) व श्री. रा नारायण मोरेश्वर सोमण, वकील (जळगांव–बुलढाणा), यांनीं कांहीं गोष्टी लिहून कळविल्या. प्रो आण्णासाहेब कर्वे व श्री. वाग्भटराव देशपांडे सं. 'ऐक्य' सातारा, यांनीं कृपा करून १।२ महत्त्वाच्या बाबतींचा खुलासा लिहून पाठविला. खुद्द मिरज येथें रा. सा गोगटे ( पेन्शनर हेडमास्तर, मिरज हायस्कूल). यांचा शास्त्रीबुवांशीं चांगला चाळीस वर्षांचा परिचय, त्यांनी पूर्वीच्या हकिकती पुष्कळच सांगितल्या गु. रा गोविंदराव साठे मास्तर यांनींहि कांहीं माहिती दिली. निबंधपरीक्षक दे भ. तात्यासाहेब केळकर यांच्या सूचनांचा व रा सा. महाबळ, यांनीं सुचविलेल्या कित्येक गोष्टींचा मला उपयोग झाला प्रो. लिमये (वु. कॉ. सांगली) प्रो. बनहट्टी (मॉ कॉ नागपूर) यांनीं मूळ निबंध वाचून केलेल्या सूचना व दिलेले उत्तेजनपर अभिप्राय आणि प्रो भानु, प्रो. पोतदार श्री. सरदेसाई याजकडून पत्रद्वारां मिळालेलें प्रोत्साहन व रा. ब. साने यांचा शुभ आशीर्वाद ह्या सर्वांमुळें हें चरित्र प्रकाशित करण्यास मला चांगलाच धीर आला. यास्तव या सर्व थोर व्यक्तींच्या विविधोपकृतींबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें.

इ. स १९०५ पासून मी शास्त्रीबुवांचा विद्यार्थी व स. १९१० पासून चार वर्षे सतत व पुढें मधून मधून त्यांचा लेखक होतों. ह्याखेरीज ते व त्यांच्या घरची मंडळी आमच्या घराण्यावर अकारण अकृत्रिम लोभ करीत, यामुळे त्यांच्या घरीं माझे जाणें येणें नेहमीं असे तरी पण, लिहिण्याच्या वेळेव्यतिरिक्त एऱ्हवीं शास्त्रीबुवापुढे बसून मी फारसें कधीं बोलत नसे, कां कीं, त्यांच्यासंबधीं मनांत उगीच भय वागत असे. तसा प्रकार, मित्र रा. वि. गो. साठे अगर माझे बंधु चि. रा. त्र्यंबकराव भट यांचा नव्हता, व लेखक या नात्यानें शास्त्रीबुवांशीं त्या दोघांचा संबंध अतिशय आलेला होता. तात्पर्य मला घरातून अधिक माहिती घेता आली तर, रा. त्र्यंबकरावांच्या लक्ष्यांत

त्यांचें स्वभाववैशिष्ट्य जास्त भरलें. प्रस्तुत चरित्र सजवितांना रा. त्र्यंबकराव ( एम. ए हेडमास्तर चिंतामणराव हायस्कूल शहापूर स सांगली ) यांचें परोपरीचें सहाय्य मला झालें आहे केवळ गुरुवर्यांचें कार्य या भक्तिपूर्ण भावनेनें आपलीं महत्त्वाचीं अनेक कामें सभाळून हे चरित्र लिहून होत असतां त्यांनीं त्यासबंधीं पडेल तें काम मोठया तत्परतेनें करून आपलें उत्कट बंधुप्रेम प्रकट केले. तसेंच, परप्रांतीयासहि खरेशास्त्रीबुवांच्या चरित्राचा थोडा तरी परिचय व्हावा व पर्यायानें ह्या चरित्रग्रथाचीहि प्रसिद्धि व्हावी या सद्बुद्धीनें त्यांनीं ह्याच्यावरून इग्रजींत संक्षिप्त असें सुंदर चरित्र लिहून तें ' मॉडर्न्-रिव्ह्यू ' या बंगालमधील इग्रजी मासिकात प्रसिद्धीसाठीं पाठविलें परंतु, प्रो. यदुनाथ सरकार यांनीं तो मूळ लेख मागें टाकून त्याच्याच आधारें आपल्या नांवावर त्यांतील अगदीं त्रोटक हकीकत 'खरे चरित्र' म्हणून प्रसिद्ध केली ! ! (मॉडर्न् रिव्ह्यू जुलै स. १९२७ चा अंक पृ. ६५ ते ६७ पाहा ) असो. ह्याच प्रमाणें मित्र रा. कुलेंकर, चिटणीस ( मि त्रि. स.) मित्र, रा.गुडोपंत कंपली, इत्यादिकांकडूनहि मित्रभावाचें बरेंच सहाय्य मला झालें.

केसरी, ज्ञानप्रकाश वगैरे पत्राच्या जुन्या फायली व अनेक मासिकांचे जुने पुराणे अंक आणि अनेक लहान मोठीं पुस्तकें, ज्यांचा हे चरित्र ठाकठीक करण्यास अगर अनेक स्थळीं प्रत्यतर-प्रमाणें पाहण्यास बहुत उपयोग झाला, त्या सर्वांचा प्रस्तुत पुस्तकांत बहुतेक जेथल्या तेथें टिपांत निर्देश करून ' ज्याचा द्रव्यांश त्याचा पुण्यांश ' या न्यायानें श्रेयाचा वांटा ज्याचा त्याच्या पदरीं टाकिला आहे. पुस्तकें सामान्यतः कोठेंहि मिळतात. परतु वर्तमानपत्रांचे व मासिकांचे जुने अंक बरेच दुर्मिळ असतात. परतु मिरज येथील 'लोकमान्य फुकट वाचनालया'चे चालक याजकडून मला असलें अवश्य ते साहित्य भरपूर मिळालें. उपर्युक्त सर्व मित्रमंडळींस प्रकट स्तुतीचा करभार मी येथें सतोषानें समर्पण करितो.

असो, या पुस्तकांत व्यक्तिगत चरित्र व ग्रंथपरिचय असे दोन भाग मीं कल्पिले आहेत. पहिल्या भागांत शास्त्रीबुवांचें आमूलाग्र घरगुती वृत्तान्त आणि काव्य, इतिहास व नाटक यांसबंधीं त्यांचे इत्थंभूत परिश्रम, त्यांच्या चरित्रापैकीं सार्वजनिक महत्त्वाचा भाग, त्यांच्या चरित्राचें रहस्य व त्यांचा बंधुवर्ग इतके विषय मुख्यतः आलेले असून दुसऱ्या भागांत त्यांच्या काव्येतिहास-नाटकादि त्रिविध ग्रंथकृतींचा वाचकांस पृथक् पृथक् परिचय करून दिला

आहे. आणि शेवटीं शास्त्रीबुवांच्या कामगिरीबद्दल व विशेषतः त्यांच्या इतिहास-संशोधन–कार्यासंबंधें विद्वान् लोकांचे ८।१० निवडक अभिप्राय दिलेले आहेत.

व्यक्तिगत चरित्रांत यावच्छक्य ज्या गोष्टी अनेक प्रमाणांनीं सत्य अशा वाटल्या त्याच दिल्या आहेत. लग्न होण्याच्या वयापर्यंत बहुतेक ठिकाणीं वासुदेवशास्त्री यांच्या नांवाचा एकवचनी उल्लेख केवळ अनुरूपतेसाठीं केला आहे, व माझ्यामते त्या वयांत असाच शब्दप्रयोग गोड दिसतो. पुस्तकांतील बहुतेक अवतरणे कोठून तरी जशींच्या तशींच घेतलेलीं आहेत. परंतु, त्यांचे कित्येक संवाद होतां होईल तों त्यांच्या बोलण्याच्या पद्धतीस अनुलक्षून प्रसंगानुरोधानें मीं रचून घातले आहेत. मधून मधून येणाऱ्या संस्कृत वा इंग्रजी उताऱ्यांचें कांहीं जागीं शब्दशः भाषांतर तर क्वचित् कोठे गोळाबेरीज अर्थच दिलेला आहे हे वाचकांच्या सहज ध्यानीं येईल. त्यांची जन्मपत्रिका आमच्या येथील विद्वान् जोतिषी वे. शा. दत्तभटनाथ जोशी यांनीं मोठ्या आनंदानें निव्वळ सार्वजनिक हितबुद्धीने वर्तवून दिली, याबद्दल ते स्तुतीस पात्र आहेत व माझ्यावर त्यांचे हे स्मरणीय उपकार झाले आहेत

चरित्राच्या उत्तरार्धास ग्रंथपरिचय असे मुद्दामच म्हटले आहे. कारण, मराठी वाङ्मयाच्या काव्य, इतिहास, नाटक, अशा तीनहि शाखांमधील ग्रंथांचें परीक्षण अथवा तौलनिक विवेचन करणारावरची जबाबदारी मोठी आहे असें वाटून आणि तें काम अल्पावधींत न होणारे व या लहानशा चरित्रांत न सामावणारेहि असल्याकारणानें मी ती जबाबदारी बुद्धिपुरस्सर टाळली आहे हें येथें प्रारंभींच वाचकांस प्रांजलपणें सांगून ठेवितो. म्हणजे या भागाकडे नेहमींच्या सवयीप्रमाणे ते तर्ककर्कश दृष्टीनें न पाहतां परिचयाच्या सौम्य-दृष्टीने पाहतील, असो. या भागाच्या सजावटीसंबधीं पुष्कळ मतांतरे असण्याचा संभव आहे. माझा हा प्रयत्न कांहीसा इंग्रजींतल्या ‘ Men of Letters ’ वाङ्मयसेवक–मालेमधील पुस्तकांच्या धर्तीवर गेलेला आहे. एकाद्या ग्रंथ-काराचें चरित्र, त्याच्या ग्रंथांचें स्वरूप लोकांपुढें पुरतेपणी नीट मांडिल्या-वांचून केवळ त्याच्या खाजगी गोष्टी सांगून आटोपितां येतें असे मला खरो-खरच वाटत नाहीं, किंबहुना, हा दुसरा भागच अशा चरित्रांत महत्त्वाचा ठरतो. मला अशीहि जाणीव आहे कीं, हा भाग दुसरा कोणी उत्तम लेखक यापेक्षां अधिक चांगला लिहू शकेल. अथापि, माझें कर्तव्य मला जसें साधलें तसें

प्रामाणिकपणें मी सुज्ञ महाराष्ट्रीयांपुढें ठेविले आहे. उत्तरार्धांतील काव्यभागापैकीं ' यशवंतराय महाकाव्यां 'चे विस्तृत विवेचन कॉलेज्मधील मराठी विषयाच्या अभ्यासकांस अंशतः उपयुक्त होईल असें वाटतें. नाटकांचे विवेचन याहून जरा निराळ्या प्रकारे व अधिक विस्तारानें करावयास पाहिजे होते, परंतु तीं जनतेच्या डोळ्यांसमोर नित्य असल्यानें विस्ताराची तादृश जरूरी भासली नाहीं त्यांच्या ऐतिहासिक-लेखसंग्रहाच्या बारा भागांसबधीं जितकें लिहावें तितकें थोडेंच होणार आहे तथापि मी मात्र ह्या भागांतील अत्यंत महत्त्वाच्या गोष्टी व व्यक्ती यांच्याविषयीं अवश्य तेवढें बहुतेक लिहून बाकीच्याबद्दल वाचकांची जिज्ञासा वाढविण्यापुरती माहिती त्यास खात्रीनें मिळेल एवढी तरतूद या उत्तरार्ध–भागांत केली आहे. शास्त्रीबुवांच्या तीनहि प्रकारच्या ग्रंथांच्या ह्या अल्प परिचयाने देखील वाचकास स्वाभिमानाचे व स्वदेशाभिमानाचे स्फुरण खचित मिळेल मात्र तो सारा शास्त्रीबुवांच्या लेखणीचा पराक्रम होय त्यांत माझे कांहीं नाहीं.

असो ही सेवा महाराष्ट्रीय वाचकांनीं आहे तशी गोड करून घेतल्यास मला या प्रकारचें अधिक चांगले काम करण्यास उत्तेजन व संधि आणून दिल्याचे श्रेय त्यास लाभणार आहे. विशेषतः ज्यांच्या हातीं हे चरित्र ग्रंथारंभीं मी देत आहें त्या माझ्या तरुण महाराष्ट्रीय मित्रांस ह्याच्या वाचनाने 'प्रयत्नवादाचा चांगला धडा' मिळाला तरी माझ्या श्रमाचें मी साफल्य मानीन.

ज्यांच्या आर्थिक सहाय्यामुळे हे चरित्र आज प्रसिद्ध होऊं शकलें त्या उदारधी सज्जनांचा कृतज्ञतापूर्ण अंतःकरणानें नामनिर्देश करून ' मी त्यांचा सदैव ऋणाईत आहें ' हे नम्रभावाने त्यांस व साऱ्या जनतेसहि येथे प्रसिद्धपणें निवेदन करितो

१ श्रीमंत सर आप्पासाहेब जमखिंडीकर रुपये १५१

१ श्रीमंत राजश्री बाबासाहेब इचलकरंजीकर रुपये १५०

१ श्रीमंत राजश्री रावसाहेब भावे रामदुर्गकर रुपये ५०

१ श्रीमंत राजश्री भाऊसाहेब ब्याकुडकर इनामदार रुपये ५१

१ रा. सा. ल. पां. कुलकर्णी पो. मा ज न्यू दिल्ली रुपये ५०

१ श्री. रा. वि. रा. वेलणकर, मालक, गजनन मिल्स, सांगली, रुपये ५०

ह्याखेरीज प्रो. कानेटकर, डॉ. आगाशे, प्रो. गोखले वगैरे शास्त्रिबुवांच्या विद्यार्थ्यांनीं व चाहात्यांनीं दिलेल्या देणग्यांची बेरीज रु. १५० पर्यंत आहे. श्री. दादासाहेब वेलणकर यांनीं रु. २५० व आणखी एका सद्गृहस्थांनीं रु. १०० मिळून रु. ३५० कर्जाऊ देण्याची कृपा, केवळ उत्तम वाङ्मयाचें प्रकाशन होत आहे या बुद्धीने केली व मला एक हजार प्रती जास्त काढण्यास प्रोत्साहन दिलें हें कर्जाचें सहाय्य मिळवून देण्याची खटपट गुरुवर्य डॉ. पटवर्धनबुवा यांनी केली, व आणखी लागली ती हरएक प्रकारची मदत पितृमातृवत् प्रेमाने डॉ. गोपाळराव पळसुले (पुणे) यांनीं केली. त्यांचे उपकार-ऋण येथे आभार मानून फिटणारे नाहीं. ते मस्तकी धारण करण्यातच खरी कृतज्ञता व्यक्त होणार आहे देणगीदाराना मी सांगितल्यापेक्षां सहा महिने उशीरां पुस्तक देत आहे, याबद्दल मला त्यांनीं क्षमा करावी

प्रस्तावनाकार प्रो. चिंतामण गंगाधर भानु यानीं माझ्या विनतीवरून या पुस्तकास प्रस्तावना लिहून दिली. प्रस्तावनेच्या प्रारभीं त्यानीच योजिलेली उपमा घेऊन मला असें म्हणतां येईल कीं, मला गरीबाला कन्यादान करावयाचे होते, साक्षात् वरदक्षिणा—हुडा—राहो पण जुन्या समजुतीप्रमाणें सालकृत कन्यादान तर खरे ! ! परतु माझ्याजवळ अलकारहि बेताचेच. तेव्हां निदान एकादा तरी ठसठशीतसा दागिना तिच्या अगावर घालणारा भाषाशास्त्री सावकार मला हवा होता त्यांत शोध घेतां प्रो भानूसारखे शास्त्री-बुवांचे स्नेही आनदानें माझ्या विनतीस वळले व त्यांनी आपल्या प्रस्तावनारूप अलकारानें हें चरित्र सुशोभित केले हा त्यांचा मजवर मोठा अनुग्रह होय. माझ्या बोबड्या शब्दानीं रेखाटलेले शास्त्रीबुवांचे चित्र प्रो भानु यांच्या सहज विविध-रगी प्रस्तावनेच्या पार्श्वभूमिकेनें वाचकांस विशेष आदरणीय वाटेल. असो या उपकृतीबद्दल प्रो. भानु ह्यांचा मी अत्यत ऋणी आहे

हें चरित्र लिहविण्यास ‘ मिरज विद्यार्थी सघ ’ या सस्थेस ज्यांनीं प्रेरणा दिली, त्या सद्गृहस्थाचा या ठिकाणीं उल्लेख केल्याखेरीज माझ्याच्याने राहावत नाहीं मित्र रा. तात्याबुवा सहस्त्रबुद्धे या गरीब पण सत्त्वशील गृहस्थांनीं एक लहानशी देणगी या चरित्रपर निबधाच्या बक्षिसासाठीं सघाजवळ दिली. तिचें व्यावहारिक मोल कांहींहि असो, नैतिक दृष्ट्या मात्र तिचे मोल शतपट अधिक आहे यांत सदेह नाहीं. या प्रेरक गृहस्थाचा येथे उल्लेख करणें माझें पवित्र

कर्तव्य आहे असें मी समजतों. त्याचप्रमाणें, कै. रा. ब. गणेश कृष्ण आगाशे ( माजी स्टे. का. मिरज ) ह्यांच्या मनांत खरेशास्त्री यांचे चरित्र लिहिलें जावें असें फार होतें. चरित्राच्या परीक्षक-मंडळांतहि त्यांचें नांव होतें. परंतु या चरित्राची लेखी प्रत त्यांच्या हातीं जाण्यापूर्वी एकाएकीं ते स्वर्गवासी झाले ही दुःखाची गोष्ट होय. आज येथें पूज्य बुद्धीनें मी त्यांचेंहि स्मरण करितों.

रा. गजानन सदाशिव छत्रे यांनीं खरे मंदिराचें छायाचित्र महत्प्रयासानें काढून दिलें, रा. दत्तात्रय रामचंद्र फडके (पुणे) यांनीं पुस्तकांतील सर्व चित्रांचे फलक ( ब्लॉक्स् ) आपलेपणानें मेहनत घेऊन तयार करून दिले, व आणखी ज्या कोणाची लहान मोठी मदत ह्या कामीं मला झाली त्या सर्वांचा मी फार आभारी आहे. हस्तलेखांत हस्तदोष, दृष्टिदोष इ. सुधारण्यासाठीं जसें काकपद व हरताळ अवश्य असतें तसेंच छापील पुस्तकांतील हे दोष व तिसरा मुद्रण-दोष टाळण्यासाठीं ‘ शुद्धिपत्र ’ अगदीं अवश्य होऊन बसलें आहे. प्रस्तुत पुस्तकांतील ठळक ठळक अशा चुका पुढें शुद्धिपत्रांत दाखविल्या आहेत त्याप्रमाणे शुद्ध करून घेऊन पुस्तक वाचावे अशी वाचकांस विनंती आहे.

पुस्तकाच्या छपाई–खर्चाचा बोजा अजून थोडाबहुत शिल्लक आहे. त्यांतून महाराष्ट्रीय वाचक मला लवकर मुक्त करितील अशी आशा आहे असो. ‘ समर्थभारत ’ छापखान्याचे व्यवस्थापक यांनीं अनेक बाबतींत ज्या सोयी–सवलती मला दिल्या त्यांबद्दल त्यांचेंहि येथे आभार मानणे जरूर आहे.

श्रीगीताजयंती

मार्गशीर्ष शु. ११ शके १८५१ }
ता. १२ डिसेंबर स. १९२९ }  दामोदर मोरेश्वर भट.

* **विशेष सूचना** –समर्पणाच्या संस्कृत श्लोकांतील ४।५ शब्दांचे अर्थ पुढीलप्रमाणे समजावे १ **श्रीहरीशेन** = हरि + ईश म्हणजे हर त्यानें = तुंग-भद्रातीरनिवासी श्रीहरिहरेश्वरानें २, ‘ **खरे ’ऽन्वयं** = ‘ खरे आहे अन्वय म्ह० वंश ज्याचा त्याला ३ **प्राचीन** = जुना = ऐतिहासिक ४ **गुणभानुभि** = गुणरूपी किरणांनीं ५. **वसुवेदपुराणाब्दे** = (संस्कृतांत अंक उलटे सांगतात.) पुराणें १८, वेद ४, वसु ८, शके १८४८ सालीं. ( मूळ निबंध लिहिला ते वर्ष.)

# अनुक्रमणिका



## चरित्र-( पूर्वार्ध )

## ग्रंथपरिचय–( उत्तरार्ध )

### प्रकरण १ लें काव्यें

## प्रकरण २ रे नाटकें



## प्रकरण ३ रें इतिहासग्रंथ

## कै. वासुदेव वामन शास्त्री खरे




जन्म शके १७८०      मिरज      मृत्यु शक १८४६

सन १८५८      सन १९२४

# समर्पणम्

श्रीमद्देशविशेषेषु महाराष्ट्रेषु दक्षिणे ॥
कृष्णाभीमरथीतुंगभद्राभिश्च समावृते ॥ १ ॥
श्रीदत्तपांडुरंगाभ्यां श्रीगणेशेन पालिते ॥
रामदासादिसाधूनाम प्रियेऽस्मिन् भाग उत्तमे ॥ २ ॥
षष्ठ्युत्तरशताब्दानि राज्यम् भुक्तवताम् किल ॥
पटवर्धनवीराणाम बलबुद्धिप्रकाशिनाम ॥ ३ ॥
तथाऽन्यवंशसंभूतपुरुषाणाम् महात्मनाम ॥
दिष्ट्याऽद्यवर्धमानानाम श्रीमताम् देवशालिनाम् ॥४॥
पयोदधिं समालोड्य नानाचित्रकथामयम ॥
'ऐतिहासिक-लेखानाम् संग्रहम' सारदर्शकम् ॥ ५ ॥
कृतवंतम गुरुं पूज्यं वासुदेवम् 'खरे'ऽन्वयम ॥
वामनिं कौशिकं विप्रं विद्योद्योगरतम् सदा ॥ ६ ॥
शाखां हिरण्यकेशी च धारयन्तम महामतिम् ॥
नानाशास्त्रविदम् धीरम नित्यं संतुष्टमानसम् ॥ ७ ॥
प्राचीनलेखसंशोध-काव्य-नाटक-पाटवम ॥
दर्शयन्तम् विराजन्तम् सहजैर्गुणभानुभिः ॥ ८ ॥
प्रार्थित्वा तत्कथाहारं नत्वा तं छात्रवत्सलम ॥
वसुवेदपुराणाब्दे शाके श्रीशालिवाहने ॥ ९ ॥
दामोदरो मयूरेश-तनयो भक्तिनम्रधी ॥
काश्यपो 'भट'वंशीयो प्रीत्या तस्मै समर्पये ॥ १० ॥

---

पठन्तु पुस्तकं सर्वे युवानो देशबांधवा ॥
महोद्यमं समाश्रित्य भव्यभाजो भवन्तु ते ॥ ११ ॥

# समर्पणम्



श्रीमद्देशविशेषेषु महाराष्ट्रेषु दक्षिणे ॥
कृष्णाभीमरथीतुंगभद्राभिश्च समावृते ॥ १ ॥
श्रीदत्तपांडुरंगाभ्यां श्रीगणेशेन पालिते ॥
रामदासादिसाधूनाम प्रियेऽस्मिन् भाग उत्तमे ॥ २ ॥
षष्ठ्युत्तरशताब्दानि राज्यम भुक्तवताम् किल ॥
पटवर्धनवीराणाम बलबुद्धिप्रकाशिनाम ॥ ३ ॥
तथाऽन्यवंशसंभूतपुरुषाणाम् महात्मनाम ॥
दिष्ट्याऽद्यवर्धमानानाम श्रीमताम् देवशालिनाम् ॥ ४ ॥
पयोदाधिं समालोड्य नानाचित्रकथामयम ॥
'ऐतिहासिक-लेखानाम् संग्रहम' सारदर्शकम् ॥ ५ ॥
कृतवंतम गुरुं पूज्यं वासुदेवम् 'खरे'ऽन्वयम ॥
वामनिं कौशिकं विप्रं विद्योद्योगरतम् सदा ॥ ६ ॥
शाखां हिरण्यकेशीं च धारयन्तम् महामतिम् ॥
नानाशास्त्रविदम् धीरम् नित्यं संतुष्टमानसम् ॥ ७ ॥
प्राचीनलेखसंशोध-काव्य-नाटक-पाटवम ॥
दर्शयन्तम विराजन्तम् सहजैर्गुणभानुभिः ॥ ८ ॥
प्रार्थित्वा तत्कथाहारं नत्वा तं छात्रवत्सलम ॥
वसुवेदपुराणाब्दे शाके श्रीशालिवाहने ॥ ९ ॥
दामोदरो मयूरेश-तनयो भक्तिनम्रधीः ॥
काश्यपो 'भट'वंशीयो प्रीत्या तस्मै समर्पये ॥ १० ॥

---

पठन्तु पुस्तकं सर्वे युवानो देशबांधवा ॥
महोद्यमं समाश्रित्य भव्यभाजो भवन्तु ते ॥ ११ ॥

॥ श्री ॥

विद्वत्त्वं च नृपत्वं च नैव तुल्यं कदाचन ॥

स्वदेशे पूज्यते राजा विद्वान् सर्वत्र पूज्यते ॥

अशा सर्वत्र पूजनीय

श्री गुरुवर्यांच्या चरणीं

त्याचीच

कथा-कुसुमें

प्रेमादरभरानें नम्रतापूर्वक

समर्पण करितों.

 आणि 

राष्ट्रोन्नतीसाठीं

स्वार्थनिरपेक्ष अविरत दीर्घपरिश्रम

करण्यास

धैर्य, उत्साह व प्राप्तस्थितींत संतोष

हे गुण

अंगीं बाणलेले असले पाहिजेत

या सिद्धान्ताचें निदर्शक असें हें चरित्र

माझ्या

महाराष्ट्रीय

तरुण मित्रांच्या हातीं

प्रेमानें देतों

चरित्र-लेखक.

# प्रस्तावना



आपल्या सौभाग्याकांक्षिणी मुलीचें यथास्थित संगोपन करून तिच्या लग्नाची अथपासून इतिपर्यंत हौसेने तयारी करावयाची आणि आयत्या वेळी लग्नाचे देवदेवक दुसऱ्याकडून बसवावयाचे ही पद्धति जशी रमणीय नाही व स्पृहणीय नाही, त्याचप्रमाणे आपण स्वतः वर्षानुवर्षे खपून एखादा ग्रंथ लिहावयाचा आणि त्याची प्रस्तावना लिहिण्याचें काम एखाद्या 'शिष्ट गृहस्था'कडून करवावयाचे ही रूढ होत जाणारी पद्धतिहि फारशी रमणीय व आदरणीय आहे असे नाहीं. तथापि, कै. वासुदेव अण्णाशास्त्री खरे यांचे पट्टशिष्य श्री. दामोदरपंत यानी दिलेले आमंत्रण माझ्या भिडस्त स्वभावामुळे मला नाकारवेना. अर्थात् प्रस्तावना लिहिण्याचे मी कबूल केले

असो, श्री. भट यांनीं आपल्या प्रिय व वंद्य गुरूंची माहिती फार श्रमाने मिळविली आहे. तसेच, ती माहिती व्यवस्थित रीतीनें मांडण्याची खबरदारी त्यांनीं घेतली आहे. श्री दामोदरपंत भट रसाळ, रसिक व रसज्ञ भक्त आहेत. याची भाषा बालबोध असूनहि केव्हा केव्हां म्हणजे प्रसगविशेषी ती स्वयंसिद्ध सौंदर्याने काव्योद्यानात प्रवेश करून तेथे रमताना व केव्हा केव्हा राजकीयासारख्या गभीर अरण्यात शिरून तेथेहि अस्खलित पदविन्यास करतांना दृष्टीस पडते प्रसंग वर्णीत असता किंवा टीका करीत असतां श्री. भटाचे विचार सात्विक स्वरूपाने प्रकट होतात. कोठे कोठे 'जशास तसें' या श्रीकृष्णसंप्रदायाचें कौतुक त्यानी केले आहे, ते वर्ण्य विषयाच्या दृष्टीनें अनुरूप असेंच आहे. या पुस्तकांतील पूर्वार्ध, चरित्रनायकाच्या गंभीर पण विनोदी, वेदान्ती पण ललितकलाप्रिय, कष्टाळु पण आनंदी चारित्र्याने आपाद-

मस्तक विखुरलेला आहे आणि म्हणून वाचनीय व अभ्यसनीय झाला आहे, उत्तरार्धांत तर शास्त्रीबोआर्जींचे समग्र अंत:करणच केव्हा काव्य-रूपानें, केव्हां नाटकरूपाने आणि केव्हा इतिहासरूपाने उघडें झालें आहे; म्हणूनच या उत्तरार्धाची जितकीं पारायणे आमचे राष्ट्र-प्रेमी तरुण बंधुबांधव करतील तितकीसुद्धा थोडीच होणार ! अर्थात् त्याचें पांक्त अध्ययन अत्यंत अवश्य आहे; असो. पूर्वार्ध वाचीत असता ज्या एक दोन गोष्टी माझ्या मनांत चागल्या ठसल्या त्याचा अवतार माझ्या उत्साही तरुणास बोधप्रद होईल अशी अपेक्षा आहे.

## चरित्रभाग

(अ) लहानपणीं 'वासूअण्णा' उनाड, खोडकर, स्वैरवृत्तीचे असल्या-मुळें ते खऱ्याच्या बाळबोध कुलाला कलंक लावणार की काय अशी भीति त्यांच्या आजोबास व वडिलांस होती. परंतु, श्रीशिवप्रभूसारखा किंवा क्लाइव्ह्‌सारखा स्वावलंबी 'पोर' उनाड व स्वच्छंद असतो तरी–नव्हे, असतो म्हणूनच–तो पुढे, सत्संगतीने म्हणा, स्वयं–विचाराने म्हणा, मोठा कुलदीपक होतो, असा अनुभव आहे. **स्वावलंबी वृत्तीला तीव्र ग्राहकतेची, यौगिक एकाग्रतेची मुंगळ्याच्या चिकाटीची जोड मिळाली म्हणजे मग 'किं अशक्यं महात्मनां ?'** शिवाय, वासूअण्णाला स्वयंस्फूर्तीचें साह्य होतेच. याप्रमाणे 'टाकाऊ' म्हणून घरच्या मंडळींनीं नाद सोडलेला स्वावलबी तरुण 'वासू' प्रथम साताऱ्यास सुप्रसिद्ध गजेंद्रगडकरांचा अंतेवासी असतांहि चार ओळी खरडून त्याच्या मोलावर गुजरण करीत करीत व्याकरण-तर्कादि शिकला, भंड्यांत विजयी होऊन पुण्यास 'स्वदेशी काका'च्या तालमींत कीर्तनकार झाला, कै. टिळक, अगरकर, चिपळूणकर, नाम-जोशांच्या शाळेंत संस्कृताध्यापक झाला आणि शेवटीं 'वासुदेवशास्त्री'

होऊन मिरजेस कायमचा राहिला. मिरजेच्या शाळेत काव्यनाटकादिकांतील गोड गोड रसांचें पेय विद्यार्थ्यांस प्रेमभराने पाजीत असतांच या बहाद्दराने 'विशी विद्या' म्हणतात, त्या वयाच्या पुष्कळ पुढे इंग्लिश भाषेचें असे चोख ज्ञान स्वत च्या बळानें संपादिलें की मोठमोठ्या बी. ए., एम्. ए. नीहि 'आम्ही चुकलों, शास्त्रीबावा, तुमचाच अर्थ जास्त सरस व जास्त मार्मिक आहे' असें खाली माना घालून म्हणावे !! हें कशाचे फळ ? चिकाटीचे, अव्यभिचारी एकाग्रतेचें, ज्ञानलालसेचे, स्पृहणीय स्पर्धेचे हें फळ. 'राम्या शिष्याचा' 'रामशास्त्री' झाला तसाच 'उनाड वासूचा' आंग्लभाषापंडित 'वासुदेशास्त्री' झाला. तात्पर्य, '**नर करनी करे तो नरका नारायन होय**' ही कबीरमहाराजाची उक्ति सार्थ करणारे वासुदेशास्त्री झाले, हें माझ्या तरुण पण निरुत्साही, तरुण पण हताश, तरुण पण रडव्या बंधुभगिनींनी लक्ष्यात ठेवावें.

(आ) सामान्य गरीबी स्थितीत वेदान्ती आनंद अखड ठेवून प्रचड उद्योग-लटपटणाऱ्या तक्क्याच्या व मिणमिण जळणाऱ्या समईच्या साह्याने-करणे संभाव्यच नव्हे, तर शक्य आहे, असे आमच्या आत्मश्रद्ध चरित्रनायकाने सिद्ध केले. मंडळीत शास्त्रीबुवा आहेत आणि विनोदाच्या गंभीर चमत्कारांनी सात्त्विक हास्यरस पिकला नाही, असे झालेच नाही. "**राहाणी तर साधी पण उच्च विचारांची परमावधि**" हें या चरित्राचें परमरहस्य आहे. मला पुष्कळ वेळा वाटते कीं, नित्य उत्साही महाराष्ट्राची सद्यःकालीन विपत्ति आणखी काही वर्षे राहिली तर भांडारकर, रानडे, टिळक, गोखले, अगरकर, कर्वे, कीर्तने, साने, खरे प्रभृति कर्त्या पुरुषांनी चालूं केलेल्या प्रचंड उद्योगांच्या राशी प्रसृत करणारी कर्तृत्वसपन्न माणसे आमच्या येथे अजूनहि खास अवतीर्ण होत राहातील. मी नेहमी प्रार्थना कारितों, " देवा ! रावबाजी, मल्हारजी निर्मिणारी संतति आम्हांस धर्मास नको !

आम्हांला तुकाराम हवे, रामेश्वर भटजी नकोत ! एकनाथ हवेत, हरिशास्त्री नकोत, विष्णु शास्त्री पंडित हवेत, प्रतिगामी पंतविठ्ठल नकोत; गुंजाळ ठीक पण–XXX नको !! "

शास्त्रीबावाच्या राष्ट्रप्रेमाची ज्योति त्याच्या तरुणपणातच पेटली. त्यांची भाषणे, त्याचे स्नेही, त्यांची काव्यें, त्याची नाटकें, त्याचे इतिहाससंशोधन, ही सर्व एकमुखाने ' त्यांचे मायभूमीवरील प्रेम निस्सीम होते ' अशी साक्ष देतात " हे पुळिणा ! तुझ्या मांडीवर सुखाने आराम घेण्याचे भाग्य मला लाभो ! " या ' जन्मभूमि ' काव्यांतील प्रार्थनेपासून तों " डॉ. वाटवे ! वसईच्या तहाचे अशुभ वर्तमान लिहीपर्यंत तरी मला जगू दे रे ! " या शेवटच्या आकांक्षेपर्यंत येणारे शास्त्रीबुवाच्या मुखातलें प्रत्येक वाक्य, प्रत्येक शब्द, मायभूमीवरील प्रेमाने ओथबलेला आहे मात्र हे प्रेम नाटकी नव्हते, टाळयाच्या कडकडाटात प्रकट होणारे नव्हते, कच्चें, पोकळ नव्हते. तें भरीव असे. मराठ्यांचे दोष शास्त्रीबुवा दाखवीत, मराठेशाही मराठ्याच्या अज्ञानाने, यादवीनें, लघुचेतसी वृत्तीने, ' अहं विशेषः ' या बुद्धीने बुडाली, असें शास्त्रीबावा अधिकारवाणीनें सांगत. पण मराठ्याची चिकाटी, त्याची आत्मश्रद्धा, त्याचा साधा रुआब, त्याची उद्योगप्रियता, त्यांची धर्मबुद्धि त्यांचा नेमस्तपणा आणि विशेषत: ' सर्व भारतवर्षभर सर्वत्र स्वराज्याचा भगवा झेंडा रोवण्याची त्याची शिष्टवंदनीय आकांक्षा ' इ. मराठ्यांच्या गुणाबद्दल त्यास आदरपूर्ण अभिमान वाटे. शास्त्रीबावांचे लेख म्हणजे निःपक्षपाती न्यायाधीशाचे ठरावच होत. त्याची बुद्धि तीव्र, स्मरणशक्ति चिवट आणि भावना उत्कट असत. हे गुण त्यास निसर्गानें दिले म्हणा, आनुवंशिक संस्काराने प्राप्त झाले म्हणा, त्याच्या पूर्वसंचिताने त्यांस मिळाले म्हणा, ही गोष्ट सोडा, पण **त्यांच्या जबरदस्त उद्योगानें त्यांची बुद्धि प्रफुल्लित झाली, त्यांच्या**

**सात्त्विक शीलानें त्यांच्या भावना जास्त तेजस्वी झाल्या, त्यांच्या अखंड निदिध्यासनानें त्यांची स्मरणशक्ति त्यांची दासी झाली, हे विसरूं नका.** त्यानी श्रम केले आणि हे फल त्यास मिळाले तुम्हीं आम्ही असेच विचारपूर्वक श्रम केले तर, आपण सर्वजण शास्त्रीबावा का नाही होणार? त्याचा स्वार्थत्याग ध्यानात धरूं या. 'तारामंडळ,' 'उग्रमगल' सारखीं अनेक नाटकेंच त्यानी लिहिली असतीं तर त्याच्या सेवेला लक्ष्मीमातुःश्री उभ्या राहिल्या असत्या! पण, त्यानीं नाटकें लिहिली कशाकरिता? ऐतिहासिकलेखसंग्रहाचे काम जोरानें चालविता यावे, म्हणून! तात्पर्य, लक्ष्मीचा हव्यास हे त्याचे ध्येय नव्हतें. ऐतिहासिक साधनाच्या प्रकाशनाने, महाराष्ट्रांतील मराठ्याचे महाराष्ट्रप्रेम 'अंगाई' करून खुशाल घोरत पडले आहे ते खडबडून जागे करावे म्हणून शास्त्रीबावानी ऐ. ले. संग्रहाचे यज्ञकंकण हातात बांधिलें आणि ४०।४५ वर्षें सरस्वतीची अखंड सेवा केली!!

अशा सत्पुरुषाचे चरित्र रा. भट यानी भक्तिपूर्ण रसाळपणाने गाइले आहे. शास्त्रीबावांच्या कुलाचा वंशवृक्ष देऊन बहुतेकाची हकीकतहि त्यांनी थोडक्यात सांगितली आहे, त्यावरून हे कुटुंब द्रव्याने गरीब पण शीलाने श्रीमंत असावें असें दिसते. तसेच पूर्वार्धांतील वर्णनावरून शास्त्रीबावानी प्रपंचाचा बहुतेक सर्व भार आपल्या सुशील व साध्वी पत्नीवर टाकिला व त्यानीहि पतिसेवा उत्तमोत्तम केली हे उभयतांसहि भूषणास्पद होय, असो. आता आपण उत्तरार्धांतील शास्त्रीबावाकडे वळू.

## ग्रंथपरिचयभाग

**काव्यें व नाटकें**--शास्त्री खरे कवि होते, ते शीघ्र कवि होते. गम्मत ही की, ते शास्त्री असूनहि नामांकित कवि होते! मिल्टन्‌ची किंवा भवभूतीची गहन गंभीरता त्याच्या काव्यांत

झळकत नाही, टेनिसन्‌चा किवा कालिदासाचा आनंदी प्रसादहि तुम्हास सर्वत्रच मिळावयाचा नाहीं हें खरें, पण विश्रांतीचे वेळी, चार सुभाषितप्रिय मंडळी बसली असता ‘ यशवंतराय ’ किंवा ‘ समुद्र ’ काव्यांतील एखादे प्रकरण वाचावयास ध्या, म्हणजे शास्त्री-बावाची करामत आधुनिक कवीपेक्षां किती श्रेष्ठ दर्जाची आहे हे तुम्हां रसिकाना सहज कळेल. मार्मिक विचार, समर्पक पदयोजना, स्थायी-भावाला अनुरूप असणारा छंद व अलंकार, कुतूहल उत्पन्न करणारा नाजुक विनोद तुम्हास ठायी ठायी आढळेल मात्र तो तोंडी लावण्या-पुरता—विनोदच तो, वर्ण्यविषय नव्हे. ‘यशवंतराय महाकाव्या’त वीररस तर आहेच आणि त्याला उपकारक म्हणून शृंगार व करुण हे सहचर घेतले आहेत. यशवंतरायाचे कथानक कल्पितच पण निसर्गालाहि लाजविणारे आहे. मी स्वत: किंवा परत हि कवि नाही, नाटककर्ताहि नव्हे, तेव्हा, या ललित वाङ्मयासंबंधे श्री. दामोदरपंत भट यांनी जे विचार प्रकट केले आहेत त्यासच मी अनुमोदन देतो आणि काव्यांतील जे उतारे घेतले आहेत, ते बहुतेक सर्व चागले आहेत असें म्हणतों. शास्त्रीबोवाची काव्ये सरकारी शिक्षणक्रमांत आली हेंच त्या त्या काव्याच्या गभीरतेचे व बोधकतेचे मुख्य गमक होय.

शास्त्रीबोआंच्या गुणोत्कर्षादि सर्व नाटकाची संविधानके शास्त्री खरे याच्या भाषेतच ‘लॅम्ब्रस् टेल्स्’च्या धर्तीवर प्रसिद्ध झाली, तर मोठ्या बहारीची गोष्ट होईल. मुलाबाळास पुष्टिकारक वाङ्मयाचे खाद्य मिळेल आणि गंभीर विचारात ‘ मस्करीची कुस्करी न करणारा ’ विनोद मिश्र केला तर रूक्ष गाभीर्याला ललितत्व कसे प्राप्त होते हे होतकरू लेखकास चांगलें कळेल. श्री. यशवंतराव खरे अगर प्रस्तुत चरित्र-लेखक रा. भट यांस ही सूचना मानवेल अशी मला उमेद आहे.

**ऐतिहासिक ग्रंथ**—(अ) **मालोजी व शहाजी**—हा निबंध मराठ्यांचें कार्यक्षमत्व, त्यांचा धाडसीपणा, त्यांचे उच्च राष्ट्रीय ध्येय, परवशतेंतून स्वतंत्रतेचा मार्ग काढण्याची त्यांची हांव, त्यांची शूरता, त्यांचे संघटना-चातुर्य, त्यांची मुत्सद्देगिरी ह्या गुणांचे उत्कृष्ट प्रदर्शन करितो. मराठ्यांमध्ये पुष्कळ सात्त्विक व सत्त्वमिश्रित राजसी गुण आहेत. **परंतु यादवीचे भयंकर व्यसन सुटेल तेव्हां या पूर्वोक्त गुणांचा उपयोग** ! आजला मात्र हे सारे गुण मातीमोल झाले आहेत. कारण, हल्लीची मत्सरप्रेरित यादवी परमेश्वरा ! या यादवींची मगरमिठी सुटेल काय ? सुटेल. केव्हां ? अद्वैती विचारांनी "समता, बंधुता, कर्तव्यतत्परता, ईश्वरभक्ति इत्यादि" सात्त्विक गुण परिस्थितीच्या ज्ञानविज्ञानासह महाराष्ट्रांत संचार करूं लागतील तेव्हां महाराष्ट्राचा जन्मसिद्ध तेजस्वीपणा येथे स्वरूपतः अखंड वास्तव्य करील असो; या दृष्टीनें हा शास्त्रीबोवांचा निबंध अभ्यसनीय आहे.

(आ) रा. ब कीर्तने, साने, राजवाडे याच्या परिश्रमाने डफसाहेबांच्या 'अगणित' चुक्याचे माप डफूच्या पदरी पडूं लागलें, त्यांतच शास्त्रीबावानीहि भर घातली आहे. डफसाहेब उदार खरे, मराठ्यांविषयी सहानुभूति बाळगणारे खरे, मोठे मन करून त्यांचा 'बखरवजा' इतिहास लिहिणारे खरे, मेहेनती खरे, तरी पण, त्याच्या लहानशा ग्रंथातसुद्धां कार्यकारणभावनेचा अनादर, अज्ञान, दुराग्रह इत्यादि कारणानी हजारो नव्हे लाखो चुक्या दृष्टीस पडतात ! मराठे म्हणजे अस्मानी, सुलतानीचा अवतार ही जेथे मूळ कल्पना तेथें चुक्यानीं—आगंतुक व आमंत्रित चुक्यानी—प्रवेश केला नाही, तर ग्रंथाची उभारणी तरी होणार कशी ! असो. हें चुक्यारूपी सर्पिणीचे सत्र चालविणारे जनमेजय अद्यापि पुष्कळसे निर्माण झाले पाहिजेत. ही किरकोळ प्रकरणे झाली. आता

'नाना फडनविसांचें चरित्र' व 'ऐतिहासिकलेखसंग्रह माला' या शास्त्रीबुवाच्या मुख्य ग्रंथाकडे वळूं.

(इ) त्यांनीं **नाना फडणविसांस** (नानांच्या चरित्रास) स. १८९२ मध्ये जन्म दिला ती वेळ पेशवाईला फार चांगली होती. निबधमाला, काव्येतिहास वगैरेमुळे १८७० ते १९१० पर्यंतचा कालरूपी शनि पेशवाईच्या उदरी आला होता! याच अमदानीत शास्त्रीबोआनीं नानांचे चरित्र प्रसिद्ध केले. विषय गोड, भाषा ओजस्वी व पोक्त, माहिती भरपूर, विचारसरणी प्रमाणशुद्ध इत्यादि अनेक कारणे एकवट झालीं व नानाचा बोलबाला झाला. 'खुब शर्तीने राज्य राखणाऱ्या' नानाची 'मनसोबीची तलवार' चागलीच गाजली या दृष्टीनें शास्त्री-बोआंचे महाराष्ट्रावर फार उपकार आहेत. असो, पुढे मिरजदप्तर चाळून, निवडून प्रसिद्ध केल्यानंतर नानांचे चरित्र सुधारून लिहावें अशी शास्त्रीबोआची इच्छा होती, ती सफल झाली नाही, याचे वाईट वाटतें. शास्त्रीबोआच्या चिरजिवानी पुष्कळ मेहेनत घेऊन 'नाना फडनवीस'ची सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति काढिली हें ठीक झालें परंतु याच आवृत्तीवर आपला पितृवत्सलतेचा शिक्का जर शास्त्रीबावास मारिता आला असता, तर आज ज्या साडेसातीने नानास घेरल्याचे दिसत आहे व यापुढें दिसणार आहे, ती साडेसाती कमी जोरदार झाली असती. आज, 'शिवाजीमहाराजाची चलती आहे,' हा तर उत्तमोत्तम योग होय. पण, याच योगात 'ब्राह्मण–ब्राह्मणेतर यादवीचे गालभर पसरलेले गालबोट' लागत आहे हे सुचिन्ह नव्हे. "ब्राह्मणी राज्य कैदवार" या शिष्टसंमत मताला 'खो' मिळून 'सशस्त्र मूठ' शिरजोरीचा हक्क सांगूं लागली आहे. आज सामान्यतः राष्ट्रीय शांतीचे दिवस आहेत ना? पण, या शांततेंत संतोष नाही. लॉर्ड् ऑक्स्फर्ड् आणि लॉर्ड् किचनेर यांचा खटका उडाला, तसाच खटका स. १७९२–९३ सालीं

नाना व महाराज माधवराव शिंदे यांत झाला, हे महशूर आहे. यासंबंधें इतिहासज्ञ म्हणतातः—" नानांच्या कारभारांत ढवळाढवळ करण्याचा अधिकार ' हिंदुस्थान काबीज करून परत आलेल्या जगद्विजयी महाराज माधवराव शिंदे अलिजाबहादर ' यानी कां न वहिवाटला पाहिजे होता ? " आज, काठी-लाठीचे दिवस आहेत, लेखणीचे नाहींत ! आज आम्हांला तानाजीची भूक आहे, निलकंठ सोनदेवाची नाहीं. आज आम्हांला संभाजी कावर्जी हवा, समर्थ रामदास नकोत ! असो, आजचा हा असा योगायोग आहे. या योगाला 'तोड' म्हणून जर शास्त्रीबावांस लेखणी चालविण्याची संधि मिळाली असती, तर निदान बरोबरीचा डाव झाला असता. शास्त्रीबोआ गेले ! आता खुले मैदान आहे. धर्माच्या व जातिभेदाच्या नांवावर हवा तसा धुडगूस घालण्याचा महजर निघाला आहे. मला वाईट वाटते असे मी म्हटलें, त्याचें कारण हेच होय.

(ई) शास्त्रीबावांचा '**अधिकार योग**' म्हणजे-शिष्टमान्य गृहस्थानी प्रत्यक्ष पाहून जमविलेल्या साधनसामग्रीचा यथार्थ उपयोग कुशलतेनें करून सिद्ध केलेले अपूर्व पक्वान्न होय. हें राजकारणी पक्वान्न सिद्ध केलें नानांनीं आणि वाढिले शास्त्रीबावानी ! काय चमत्कार आहे ! भर शनवारच्या वाड्यात ' पेशवीण' म्हणून नांदणारी गंगाबाई पतीचा खून होतांक्षणीं बिचारी अनाथ विधवा झाली ! पण सत्याचा वाली परमेश्वर. त्यानें पेशवाईच्या निमकहलाल सेवकात प्रेरणा करून दिवसां ढवळ्या आपल्या पुतण्याच्या खुनाला निदान परोक्ष तरी संमति देणाऱ्या राघोबाविरुद्ध उभारणी केली; राघोबा पळाला, गंगाबाईच्या पोटीं सवाई माधवराव जन्मताच राघोबा 'बंडाचें खूळ' करणारा झाला. शूर बापाचा शूर बच्चा खरा, परंतु मायेच्या पाशांत पडतांक्षणीं ' बिल्ली ' झाला. व मदतीसाठीं, द्रव्यासाठीं, अन्नासाठी दारोदार भिक्षा मागूं लागला ! !

इंग्रज धूर्त, राजकारणी, त्यांनी पाहिले की, अभेद्य मराठी साम्राज्याला पडलेल्या या खिंडाराचा फायदा घ्यावा अशी ही सोन्याची संधि आहे! मग काय? प्लासीच्या चंचुप्रवेशाने बंगाल्यांत मुसलप्रवेश करून सारा बंगालचा बंगाल हबकणाऱ्या इंग्रजांच्या तोंडास पाणी सुटलें. त्यांनी प्रयत्नास सुरुवात केली इंग्रजाचा प्रयत्न म्हणजे सिंहाची झाप! पण यावेळी हुकले! त्यांच्या सिंही झापेवर तोंड करणारा 'शरभ' पेशवाईत जिवंत होता. त्याने मिरजकर पटवर्धन, हरिपंत फडके, महादजी शिंदे, तुकोजी होळकर याच्या साह्याने इंग्रजी सिंहास 'चीत्' केले आणि पेशवाई सावरली. राघोबा पेन्शनर झाले त्यानी लवकरच गोदातीरी आपला 'कंसासुरी' अवतार संपविला. तोतयाचे बंड याच वेळीं मोडले. पूर्ण शहाण्या बापूंस कारागृहात देह सोडावा लागला! नानांस सर्वाध्यक्षत्व मिळाले हाच अधिकारयोग होय. इमानी एकनिष्ठेनें योग्य प्रयत्नाची अखंडता कायम ठेविली असता प्रत्यक्ष अचेतन पाषाणहि पारदर्शक होतो; मग जगन्नायक भक्तवत्सल परमेश्वर भक्ताचे सर्व मनोरथ पूर्ण करितो, यात आश्चर्य काय? यास्तव हरिपाठाच्या भक्तीने हा अधिकारयोग अवश्य वाचावा यशस्वी राष्ट्राभिमान हे फळ मिळेल.

(उ) शास्त्रीबोआच्या प्रचंड उद्योगाचा महामेरु म्हणजे पटवर्धनांच्या दप्तराचे संशोधन, संग्रहण आणि प्रकाशन होय उत्तर पेशवाईची ६०।६५ वर्षे मिरज हे महाराष्ट्रीय साम्राज्याचे दक्षिणेकडील राजकीय केंद्रच होते. स. १७५० पासूनच 'दक्षिण निर्वेध करावी' हा वेध पेशवाईनें लावून घेतला आणि उत्तरेकडील प्रांतांतील लष्करी ठाण्यांचा कारभार सरदारावर सोंपवून पेशव्यानीं कर्नाटकच्या मोहिमांस सुरुवात केली. हरभटाच्या चिरंजिवानी, नातवांनी, पणत्वंडांनीं या दक्षिण मोहिमांत प्रामुख्याने भाग घेऊन १५।२० पुरुष सरकारकामीं खर्च केले. मिरज हें पटवर्धनांच्या ताब्यात आल्यापासून तो १८१८

पर्यंतचा पटवर्धनांचा बहुतेक पत्रव्यवहार काही अकल्पित (परंतु ईश्वर-संकल्पित) योगाने शास्त्रीबोआंच्या नजरेस पडला. नाना फडनविसाच्या चरित्रलेखकाची नजर ती ! ती या दप्तरांत खिळली व रमली, हे वाक्य लिहावयास सोपें, पण दप्तर चाळणे, निवड करणें, तारीखवार लावणे, विषयाची जंत्री करणे, नकला स्वतः करणे, शब्दांच्या, वाक्यांच्या, संदर्भांच्या स्पष्टीकरणासाठीं टिपा देणे, ( ह्यासाठी अनेक ग्रंथ वाचणें ), ग्रंथ छापविणें, मुद्रितें शुद्ध करणे, पुस्तकें बांधविणे, खपविणें, वगैरे कामे किती त्रासाची, दगदगीचीं, खर्चाची, काळजीची असतात हे फक्त राजवाडे व खरे यासच पूर्ण माहीत झाले होतें. रा. ब. साने इतिहास-साधनास एकत्रा करणारे आद्य 'व्यास' खरे, रा. ब. पारसनीस आद्य 'सूत' खरे, पण त्यास राजवाडयाइतके किंवा खरेशास्त्र्याइतके आयास पडले नाहीत. आणि आम्ही 'आयतोबा' वाचक ! यास तर या जिकिरीचा गधहि ठावा नाही; असो. ही जिकीर देखील सह्य झाली असती. केव्हा ? वाचकानी, इतिहासभक्तानीं, सरकारने, पटवर्धनी जहागिरदारानी जर या जिकिरीचे—राजवाडे व खरेशास्त्री याच्या श्रमाचे—चीज केले असतें, तर ही संकटप्रचुर तीन तपी तपश्चर्याहि सुखद झाली असती !

असो, सतत तीस पंचतीस वर्षें अहोरात्र खपून आमच्या चरित्र-नायकाने जे कागदरूपी समुद्राचे मंथन केले व त्यांतून जीं कित्येक सामाजिक, राजकीय, धार्मिक, व आर्थिक रत्ने बाहेर काढिली, ते मंथन व ती रत्ने विश्वमोली आहेत यात शंका नाही. थोरले माधवराव-साहेब, विजवटे राघोबा, मातुःश्री गोपिकाबाई, त्र्यंबकराव मामा, गोविंद-हरिप्रभृति पटवर्धनी सरदार, गोविंद हरीच्या डोळ्यात सलणारे सखा-रामबापू, नारायणरावसाहेब, नानाफडनवीस, मोरोबा दादा, नारो शंकर, मल्हारराव सुभेदार, देवी अहल्याबाई, महाराज माधवराव शिंदे, तुकोजी होळकर, सवाई माधवराव, रावबाजी अनूबाई इचलकरंजीकर

इ. बहुनेक तत्कालीन विद्यमान स्त्रीपुरुषाचे स्वभाव ( अर्थात् पटवर्धनीं लेखकांस दिसलेले ), पानिपतादि घोर प्रसंग, हैदरविरुद्ध स्वाऱ्या, निझामाचीं कारस्थानें, थोरले माधवरावांचा मृत्यु, नारायणरावाचा खून, बारभाईप्रकरण, इंग्रजांशीं लढाया, खर्ड्योची लढाई, काशीयात्रावर्णन, दिवाणी–फौजदारी अंमलाच्या वहिवाटी, महादजी (पाटीलबावा), हरिपंत तात्या, सवाई माधवराव याचे मृत्यू, दुसऱ्या बाजीरावांचे अपेशी आगमन, दौलतराव शिंद्याचा अव्यवस्थित कारभार, महाडचें कारस्थान, नानांची कैद व मृत्यु, इत्यादि अनेक कडोविकडीचे प्रसंग, या दप्तरांत तत्कालीन पुरुषांनी केलेल्या वर्णनासह आपणास शास्त्रीबोआंच्या प्रसादानें पहावयास, चर्चावयास मिळतात; स्वाभिमान, स्वामिभक्ति, राष्ट्राभिमान, यांचें मोजमाप घेतां येते आणि ऐतिहासिक सत्यें प्रकट होतात. बसल्या बसल्या हें आम्हास प्राप्त होतें. पण ज्या खरेपुराणिककुलोत्पन्न पुरुषानें हाडाची काडे केली, रात्रीचा दिवस केला, पैशाची माती केली, हेलपाटे घातले, पायपिटी केली, भूक तहान पाहिली नाही, आणि पुन सर्व काळ टिकणारें प्रामाणिक सारस्वत निर्माण केले त्या विधातातुल्य शास्त्रीबोआंचे मराठी इतिहासावर किती उपकार झाले आहेत, हे एखादा ग्रोट, एखादा गिब्बन्, एखादा लॉर्ड् अॅस्टन् किंवा एखादा राजवाडेच सागूं शकेल. शास्त्रीबोआनी ‘ समुद्र ’ लिहिला ‘ यशवंतराय ’ निर्मिला, तारामंडळादि इतिहासगर्भ नाटके लिहिलीं, नानाफडनवीस, अधिकारयोग, मालोजी व शहाजी, वगैरे ग्रंथ लिहिले, ठीक. परंतु शास्त्रीबोवांची खरी योग्यता जर प्रमाणबद्ध पद्धतीने अजमावावयाची असेल तर ती, त्यानी जे बारा खंड प्रसिद्ध केले, तेरावा लिहून ठेविला, त्यावरून व त्यातील प्रस्तावनांवरूनच अजमाविली पाहिजे. साहित्य तयार असेल तर एखादा पारसनिसासारखा कुशल कारागीर उत्तमोत्तम रसोई तयार करितो हें आपल्यास दिसतें व आपण त्याची तारीफहि करितो. परंतु

साहित्याची जमवाजमव करण्यातच ज्याचा निम्मा अधिक वेळ गेला, त्यानेंच आपल्या निर्माणचतुरतेने जर खमंग, खुसखुशीत, स्निग्ध, स्वादिष्ट असें मधुर व पथ्यकर पक्वान्न तयार करून तें वाढिलें, तर ते खाणाऱ्या वाचकांनी, सरकारनें, गोविंद हरि प्रभृति पूर्वजांनीं हातावर शिर घेऊन जी जहागीर मिळविली, तिचा उपयोग घेणाऱ्या पटवर्धन-संस्थानिकानी तरी निदान त्यांची योग्य ती संभावना केली पाहिजे होती! शास्त्रीबुवाच्या दैवीं हे सुखसोहळे नव्हते ना? अरेरे!!!

आता लवकरच 'कोटा' येथील कागदाचा संग्रह प्रसिद्ध होणार आहे. फार चागली गोष्ट आहे. हाहि संग्रह महाराष्ट्रीय साम्राज्याच्या शेवटच्या ७०।८० वर्षांच्या हकीकतीने भरला आहे, असें ऐकतो. दाताराचा, हिंगण्याचा, सदाशिव दिनकर, नारो शिवदेव, गोविंद कृष्ण, अली-बहाद्दर याचा बराचसा पत्रव्यवहार इतिहासज्ञास उपलब्ध झाला आहे. त्यालाच जर प्रतिदिवशीचा वृत्तान्त असलेल्या 'कोटा' सग्रहाची भर पडली, तर खरोखरच बहार होणार आहे. पुण्यांत राहून पटवर्धनाचा कारकून दरबारचे वर्तमान मिरजेस कळवी, त्याचप्रमाणें शिद्यांच्या पदरचा एक विश्वासुक कारकून कोट्यास पुणे दरबारची दररोजची हकी कत कळवी. हा सग्रह म्हणजे महा लाभ आहे, ते यासाठींच असो, हा सग्रह प्रसिद्ध होऊन इतिहासकार जेव्हा मिरज व कोटा येथील पत्राची छाननी करितील, लेखकाच्या स्वाभाविक रागद्वेषादि वृत्तींची वजावाट करितील, तेव्हा या मीमासेवरून सिद्ध होणारे सिद्धान्त शास्त्रीबावांच्या सिद्धान्ताशी जुळतात कोठपर्यंत, विरोध कोठें, किती, वगैरेंचा उलगडा होईल. आणि मग, शास्त्री खरे याच्या बुद्धिवैभवाचे व प्रतिभेचे हिशेबी मोजमाप होईल. उत्तम शुभवार्ता ही. देव करो आणि हा संग्रह प्रसिद्ध होवो. परंतु तोपर्यंत व त्यानंतरहि शास्त्रीबोवांच्या तपश्चर्येचे विश्वमोली महत्त्व निराबाध राहील. विश्वसिद्धान्त सागणाऱ्या उपनिषत्कारांचे श्रम,

धर्मशास्त्रांचें साहित्य जुळवून धर्मसिद्धान्त काढणाऱ्या मनुप्रभृतीचे श्रम आणि राजवाडे, खरे, यांचे श्रम एकाच मोलाचे होत. ' नेपोलियन्‌ची एकच चुकी त्याचें वीराग्रणित्व काढून घेण्यास समर्थ नसते,' त्याप्रमाणें शास्त्री खरे यांची एखाददुसरी चुकी त्यांच्या तप सामर्थ्याचा भंग करूं शकत नाही. असो, तेव्हां या दृष्टीने म्हणजे महाराष्ट्राच्या मोठेपणाची साधने शास्त्रीबावांनी प्रकट केलीं या दृष्टीने त्याचे महाराष्ट्र—जनतेवर अनंत उपकार आहेत.

वाचक मित्र! माझी ' विस्तीर्ण ' प्रस्तावना संपली आता, माझे नूतनपरिचित श्री. दा. मो भट यांनीं भगीरथ प्रयत्न करून सामग्री मिळविली, एकत्रित केली, वर्गीकृत केली, आणि याप्रमाणे अनेक सरस व सुरस पक्वान्नांनी भरलेलें ताट आपणा सर्व वाचकास अर्पण केलें आहे, म्हणून श्री. भट याचे आभार मानून आणि शास्त्रीबावाजीचे मित्र, चाहाते, शिष्य आणि वाङ्मयप्रेमी वाचक यांनी या चिरपौष्टिक पक्वान्नाचा आस्वाद प्रेमभरानें घ्यावा असें त्यांस प्रार्थून मी रजा घेतो.

**शुभं भवतु.**

विजयादशमी
शके १८५१.
पुणे
सदाशिव ९९१.

शास्त्रीबोवांचे
मित्र

# 'खरे' कुलाचा वंशवृक्ष

मूळ पुरुष **रघुनाथ भट खरे**




गोत्र—कौशिक. १ विश्वामित्र, २ अघमर्षण, ३ कौशिक, असे तीन प्रवर. 'कृष्णयजुर्वेदस्य तैत्तिरीयशाखातर्गत-हिरण्यकेशिशाखाध्यायी'- कोंकणस्थ ब्राह्मण.

कुलस्वामी :—श्रीगणपति ( गुहागर ), व श्रीमहालक्ष्मी ( पाल्शेत ). पण खऱ्यांकडे भाद्रपद--पार्थिव--गणपति—पूजन व आश्विनांतले देवीचे नवरात्र नाहीं.

वरील वंशवृक्षांत चरित्रनायक वासुदेवशास्त्री यांच्यासंबंधी एक एक पूर्वजाच्या पुत्रसंततीचीं सारी नांवे देऊन जरूर त्यांचा पुढील विस्तार दाखविला आहे. खरे–पुराणिक असे उपनांव बहुतकरून लक्ष्मणशास्त्री यांच्या वेळेपासून पडलें असावें.

# वासुदेवशास्त्री खरे यांची
## जन्मपत्रिका

अथ । स्वस्ति । पलभा ३।४० अक्षांश १९° शके १७८० कालयुक्तनामसंवत्सरे दक्षिणायने ग्रीष्मऋतौ आषाढमासे वदि पक्षे ११ गुरौ घ ३४।४० मृगनक्षत्रं ५०।४३ व्याघातयोगः (तदुत्तरतः हर्षण) दिनमान ३१।५६ तदर्धं १५।५८ पश्चिमनत ३।५२—पश्चिमोन्नत २६।८ अनुमानत' दिवा इष्ट घ. १९ प. ५० तदा जन्म. वृषराशिः। [रविः ३।२०।३२।३४, चंद्रः १।२६।४४।१७, भौम ७।०।९।३०; बुधः ४।१३।३३।१४, गुरुः १।२४।२।१७, शुक्रः ४।२९।५६।११, शनिः ३।१४।४।४२, राहुः १०।१८।१४।१९, केतुः ४।१८-१४।१९, इति स्पष्टग्रहाः । ] अयनांशाः २२°।१६" (ग्रहलाघवीया)

॥ जन्मलग्नकुंडलि ॥




॥ नवांशकुंडलि ॥




लेखक—दत्तशास्त्रीनाथ ज्योतिषी, मिरज[१]

शास्त्रीबुवांचे गतार्थ झालेलें चरित्र या पत्रिकेवरून येणारा फलादेश याचा मेळ बसतो किंवा नाही हे तज्ज्ञांनी पाहावें.

---

१. वे. शा. सं. दत्तभटनाथ जोशी हे ग्रहलाघवीय, टिळकमत इ. शास्त्रार्थांत प्रवीण असून त्यानीं अत्यंत परिश्रमपूर्वक विस्तृत पत्रिका तयार करून दिली आहे, पण स्थलसंकोचास्तव ह्या ठिकाणीं त्यानीं केलेल्या पत्रिकेपैकीं अवश्य तेवढाच भाग घेतला आहे.

## प्रसिद्ध इतिहाससंशोधक

# वासुदेव वामनशास्त्री खरे

# चरित्र—( पूर्वार्ध )

## जन्मस्थान—गुहागर

**नांवाची उपपत्ति**—सांप्रतच्या इंग्रजी अमलाखालील हिंदुस्थान देशाच्या राज्यविभागानुसार मुंबई इलाख्यातील रत्नागिरी जिल्ह्यापैकी चिपळूण तालुक्यात पेटा गुहागरपैकीं, कसबे गुहागर हें लहानसें गाव '**खरे**' याचे मूळ वास्तव्यस्थान होय. आज देशावर पुणें, मुंबई, नाशिक व वऱ्हाड प्रांतीं किंवा इंदूर वगैरे भागीं जे 'खरे' उपनामक हिरण्यकेशी शाखेचे कौशिक गोत्री कोकणस्थ ब्राह्मण नोकरी अगर इतर कोणत्याहि धंद्याच्या पेशाने पसरलेले दिसतात ते सर्व मूळचे गुहागरचे होत पेशवाईच्या उत्तर कालीं **नाना फडनवीस** व **हरिपंत फडके** या दोन राजकार्यधुरंधर पुरुषाच्या सहवासात राहून बुद्धीचीं व पराक्रमाचीं आणि प्रसंगीं अनेक प्रकारें साहसाचीं कामे करणारे (१) **त्रिंबक नारायण परचुरे**, (२) **आप्पाजीपंत गोंधळेकर**, (३) **शिवभट खरे** इत्यादि पुरुष जेथे जन्मले, **त्रिंबकराव मामा पेठे**, स्वतः **हरिपंत फडके**, **ओक** घराण्यातील मुलगी—पुढे प्रसिद्ध उलाढाली राजकारणी स्त्री—**आनंदीबाई पेशवे**, अशा व्यक्तींची प्रभावी व कर्तृत्वशाली बुद्धि

---

१ खऱ्याचे दुसरें एक घराणें वेळणेश्वरचें आहे. उभयताचें गोत्र एक आहे पण कुल एक असल्याचें यापेक्षा दुसरें निश्चित प्रमाण काहीं मिळालेलें नाहीं.

जेथील जलमृत्तिकेतून सिद्ध झाली ती भूमि-ते बुद्धीचे आगर-**गुहागर**-होय. गुहाचे आगर या अर्थानेंहि हें नाव पडलें असण्याचा सभव आहे. वस्तुस्थिति मात्र अशी आहे कीं, येथे **गुहाचें** म्हणजे कार्तिकस्वामीचें प्राचीन देवस्थान आहे व त्यामुळे त्याचे-त्याने सरक्षिलेलें-आगर म्हणून **गुहागर** अशी या नावाची उपपत्ति लागते. रत्नागिरी, चिपळूण-चितिपुलिन-( राजवाडे 'शिवपुलिन' म्हणतात ) वगैरेप्रमाणे गुहागर-सुद्धा **भगवान् परशुरामाने** पुनीत केलेले क्षेत्र आहे

**वसतीचा काल**—गुहागर गावाच्या स्थापनेच्या कालासंबंधें पुराणां[२]तील वर्णनावरून काय निर्णय ठरत असेल तो असो. मराठी इतिहासात त्याचा संबंध **श्रीमंत राघोबादादा** पेशवे व **श्री सौ. आनदीबाई** याच्या विवाहामुळे विशेष आला. तरी त्या वेळी गाव वसलेलाच होता. त्याच्या पूर्वी गाव केव्हा वसला हे जरी न समजले तरी '[३]**मुरुड गांवच्या बखरी**'त गुहागर गाव कोणीं वसविला याचा उल्लेख सापडतो. "गंगाधरभट्ट सिद्धपुरुष नावाच्या कोणी सिद्धाने, पद्माकरभट्ट सिद्धाकडून या गावाची रचना करविली. स्वत गगाधरभट्ट व शिष्य वैशपायन यानी मुरुड गांव वसविला व कर्नाटकातून गंडकी शिळेच्या देवीच्या तीन मूर्ति आणून एक मुरुडास, एक गुहागरास व एक हबसाणात 'दिवे बोर्ली' येथे स्थापिली." मुरुड व गुहागर या दोन गावाची रचना एका धर्ती-वर [४]आहे. मुरुडच्या देवीच्या रथोत्सवाच्या वेळी गुहागरच्या देवीस धूपार्ति दाखवावी, असें या बखरीतच मुरुडग्रामस्थांस-विशेषतः पुजारी यास-

---

१ बुद्धि या अर्थी गुहा शब्दाचा उपयोग होतो. ( शब्दकल्पद्रुम, खड १ ला, पृ. ३४६ पहा. ) २. सह्याद्रिखंड-गुहागरमाहात्म्य, हें ब्रह्मांड किंवा स्कंद पुराणात आहे असें समजलें म्हणून शोध पुष्कळ केला, पण मिळालें नाहीं. ३. प्रो. धों के. कर्वे याच्या आत्मवृत्तात शेवटीं ही बखर आहे. वरील मजकूर तिच्यावरून पाहून अवश्य तेवढा घेतला आहे. ४. प्रो. अण्णासाहेब कर्वे यांची माहिती.

आज्ञापिले आहे. बखरीचीं पहिलीं १।२ पृष्ठे फाटून गेलीं आहेत. त्यात गांवाच्या स्थापनेचा शक असल्यास न कळे. पण आतां तो कायमचाच नष्ट झाला! उर्वरित बखरीच्या मजकुरात शक सापडत नाहीं.

**गांवाची रचना**—दक्षिण हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावरील एकीकडे उत्तरेस दाभोळ व दुसरीकडे दक्षिणेस बोऱ्याचें बंदर या दोन बंदरापासून साधारणतः सारख्याच अंतरावर उत्तर व दक्षिण बाजूंच्या दोन डोंगरामध्यें गुहागर गांव लांबच लांब वसले आहे. गांवाची रुंदी पराकाष्ठा हजार दीडहजार फूट असेल. परंतु लांबी मात्र कमीत कमी ३।४ मैल असून गांवाच्या मध्यातून **'सतीचा पाट'** नांवाचा पाण्याचा एक लहानसा ओहोळ आडवा वहात गेला आहे, त्यामुळे वरला पाट व खालला पाट असे गांवाचे दोन विभाग झाले आहेत. गांवातील सर्व घरें, देवळें, बहुतेक सर्व पूर्वाभिमुख, समोर पूर्वेस पुनः डोंगर, त्यावर सुमारे हजारबाराशें फूट उंचीवर साधारणपणे ईशान्येस '**अष्टवण्याचा झरा**' नांवाचा मधुर पाण्याचा सतत वाहणारा लहानसा झरा आणि त्याच्या आजूबाजूस हिरवीगार झाडी आहे. ह्या झऱ्याच्या वर सुमारे शें दोनशें फूट गेल्यावर तेथून सर्व गांवचागांव व चोहोबाजूचा दूरवरचा प्रदेश एकदम दृष्टीस पडतो. येथें शिलातलावर बसलें म्हणजे डोंगराच्या पायथ्याशीं **श्रीदुर्गादेवीचे** देवालय व त्याच आवारातील इतर देवालयें, देवीच्या देवळापुढे डाव्या अंगास एक छोटेसें पाण्याने भरलेलें बांधीव तळें, त्यापुढे दोहों बाजूंस भाताची खाचरे व मधून मधून दाट झाडी—आंबे, फणस व इतर उपयोगी वृक्षाच्या राई—नंतर चिपळूणकडून दाभोळाकडे जाणारा सडकेचा दक्षिणोत्तर आडवा रस्ता, मग घरें, त्या मागे नारळी-पोफळींचीं आगरें आणि त्यांपलीकडे अफाट पसरलेला पश्चिम ( आरबी ) समुद्र इतका देखावा एकदम दृष्टिपथात येतो. नारळी, पोफळी व इतर गेंदासारखीं गरकेदार झाडें, वरून पाहताना इतकीं दाट

दिसतात कीं, त्याच्या संधीमधून फक्त घरांचे कौंबळयानें झाकलेले माथे अगर त्यांवरील कौलारें व देवळाचीं शिखरें डोकावून आपले अस्तित्व व्यक्त करीत असतात; किंवा गांवावर पसरलेला हा एक हरितवर्ण मंडप असून जीर्ण झाल्यामुळे तेवढ्या तेवढया जागीं तो विदीर्ण झाला आहेसें वाटतें.

**भोंवतालची परिस्थिति**—उत्तर, पूर्व व दक्षिण अशा तीनहि बाजूंस असलेल्या एकाच अर्धचंद्राकृति डोंगराच्या पोटांत गुहागर गांव दोन्ही टोंकास जोडणाऱ्या लंबरेषेप्रमाणे वसलेला आहे, व डोंगराचीं उत्तरदक्षिण टोकें निमुळतीं होत जाऊन पश्चिमेकडील समुद्रांत घुसलीं आहेत. त्यामुळे पाहणारास सहजच असें वाटतें कीं, गांवाच्या पश्चिम बाजूच्या किनाऱ्यावर एकसारखा धाडधाड आदळणारा समुद्र जणू काय गुहागारास गिळण्यास उद्युक्त झाला असून पूर्वेकडे वसलेल्या डोंगरानें पितृप्रेमानें किंवा मातेच्या वात्सल्यभावाने आपले दीर्घ बाहू पुढें पसरून आपल्या अंकावर खेळणाऱ्या या ग्रामरूप बालकास,ते समुद्राच्या मुखांत न पडावें म्हणून दक्षतेनें आवरून धरिलें आहे; अगर समुद्रास तरी कायमचें दूर सारिलें आहे. असो या डोंगरावर गांवाच्या समोर-पूर्व बाजूस-बरीच दाट काळी हिरवी झाडी आहे. तींत खेळणाऱ्या वाऱ्याचा सों, सों, असा ध्वनि आणि किनाऱ्यावर धों, धों, आपटून रोरावणारा घनगंभीर जलविरव यापैकीं कोण कोणावर वरचढ करितो हें समजणें कठीण असतें. वारा निस्तब्ध असला तरी समुद्राचा हा आक्रोश कधींच थांबत नाहीं व जगाच्या आरंभापासून अविरतपणे गर्जना करीत असलेला हा प्रचंड सामर्थ्यवान् देवदूत असून तो सृष्टिकर्त्या विधात्याचा व स्वतःच्या निर्मात्याचा हा स्तोत्रपाठच म्हणत आहे. आणि त्याच्या स्वतःच्या मानानें अल्पशक्ति मानवजीवांना हा ईशभक्तीचा व कर्तव्यपरायणतेचा धडा जगाच्या अंतापर्यंत पढवींत राहण्याचा त्यानें जसा काहीं संकल्पच सोडिला आहे असें त्याच्या अखंड घों, घों, ध्वनीनें वाटावयास लागतें.

**गांवाचे दोन भाग**—गुहागर गावास उत्तरेकडून दक्षिणेकडे एकसारखा पण सौम्य उतार आहे. त्यामुळेंच वरला पाट व खालला पाट अशी नावे गावाच्या विभागांस पडलीं असावीं. उत्तरेकडून दक्षिणेकडे जाणाऱ्या दाभोळ-चिपळूण सडकेच्या रस्त्याच्या उजव्या हातास-पश्चिमेस-बहुतेक घरे व पूर्वेस सर्व देवालयें आहेत. तीं बहुतकरून पूर्वाभिमुख आहेत. **गुहाचे-कार्तिकेयाचें**-व खालल्या पाटास **श्रीगणपतीचें** देवालय पश्चिमाभिमुख आहे. आख्यायिका अशी सांगतात कीं, ह्या गणपतीनेंच समुद्र मार्गे हटवून गुहागरची वसती त्याच्या भयापासून मुक्त केली आहे! ह्या सर्व देवळाकडे जाणाऱ्या वाटा दगडी बांधीव, सुमारें तीन ते पांच व क्वचित् सहा फूट रुंदीच्या आहेत. वरील मोठा सडकेचा रस्ता देखील दगडी बांधींवच आहे. तो आता पी. डब्ल्यू. खात्याने अधिक रुंद केला असल्यानें निम्मा बांधींव व निम्मा साधा आहे. काही ठिकाणीं दगडी फरशी बुजून गेली आहे. देवळाच्या आवारात व गांवातहि जागजागीं जुनाट पिंपळ व वटवृक्ष असून ते बहुतेक अर्चा झालेले व त्याच्या भोवती पार बांधिलेले आहेत, बहुतेक देवळापुढे तळेंहि आहेच. ह्या सर्व चिन्हांवरून कोठे पुराणात वर्णन केल्याप्रमाणें गुहागर हें एके काळीं क्षेत्रस्थानच असले पाहिजे असा मनाचा निश्चय होतो. पेशव्याचें ह्या स्थानावर प्रेम असल्यामुळें पेशवाईंत गावाची चांगली भरभराट असावी. हल्लीं येथील भंडारी जातीचे लोक मुंबईस जाऊन विशेषतः दारूच्या धंद्यावर चांगलीच कमाई करितात! व त्यामुळें आज त्यांची स्थिति संपन्न अशी दिसते. त्यांचीं घरें कित्येक दुमजली असून त्यावर मंगलोरी कौलें घातलीं आहेत हीं घरे सुंदर व बळकटहि दिसतात. हीं वरल्या पाटात अगदीं उत्तर टोंकास आहेत. व त्यानंतर पुढे बहुतेक ब्राह्मणवसती आहे. गांवाच्या दोन्ही विभागामध्यें सरासरी अर्धा पाव मैल भातशेतींची रानें अगर गवताचीं कुरणे आहेत.

**पेशव्यांचें महाबळेश्वर**—खालला पाट वरल्या पाटापेक्षां कांहीसा मोठा आहे. त्याच्या अगदी दक्षिणेस खारवी लोकांची घरे आहेत. व त्याअलीकडे ब्राह्मण व इतर पांढरपेशे लोक राहतात. बरींचशी देवळे, धर्मशाळा, इंग्रजी शाळा, मुलांमुलींच्या मराठी शाळा, पोष्ट व महालकरी यांची कचेरी हीं सर्व खालल्या पाटास आहेत. मराठी भागशाळा, पोष्टाच्या १।२ पेट्या व थोडी देवळे वरल्या पाटास आहेत. वरल्या पाटाला नारायणाचे देवालय, गुहाचे स्थान, देवीचा खाव व **श्री-दुर्गादेवीचे** देवालय व त्याच्या आवारात रामकृष्णेश्वर, लक्ष्मीनारायण, व गणपति ह्यांची लहान देवालयें आणि रामकृष्णेश्वरापुढें देवीच्या समोर डाव्या बाजूस तळे अशी रचना आहे. खालल्या पाटास **व्याघ्रांबरी देवी** ( दक्षिणमुख ), **श्रीगणपतीचे देवालय** ( पश्चिममुख ), महापुरुषस्थान व **श्रीव्याडीश्वराचें ( वाडेश्वर ) देवालय** व त्या सभोंवती सशास्त्र मांडणीप्रमाणे गणपति, देवी, सूर्य, विष्णु, या चार पंचायतनस्थ देवांचीं देवळे अशी रचना आहे याखेरीज दत्तात्रेय, गणपति, आणि गावा-पासून दूर अंतरावर दक्षिणेकडील डोंगराच्या पायथ्यास **श्रीवालुकेश्वर**, यांची देवळे आहेत हल्ली वालुकेश्वरासमोर लहानशा घुमटींत लो. टिळक यांचा बस्ट रा. कनगुटकर आडनांवाच्या भंडारी गृहस्थांनी बसविला आहे. वालुकेश्वराच्या डाव्या अंगास **अरुणावरुणा** ही तीर्थें आहेत. पैकी अरुणा-तीर्थ हे बरेच मोठे तळे असून त्यांत कमळवेली आहेत. विशेष आश्चर्य **हें** कीं, अरुणावरुणामध्ये अवघे दीड दोन फुटाचे दगडी बांधकाम आहे; परंतु अरुणतीर्थाचे पाणी अतिमधुर व वरुणतीर्थाचें पाणी खारट आहे ! ! वालुकेश्वराच्या पलीकडे डोंगरावर दुसऱ्या बाजीरावसाहेबाच्या पडक्या वाड्याचा भाग दिसतो ह्याचे सामान रत्नागिरीस हल्लीं सरकारी कचे-रीस वापरले आहे असे म्हणतात गुहागर हे **पेशव्यांचे महाबळेश्वर** ( Summer House ) होतें असे सांगतात, व हल्लीच्या महालकरी

यान्या कचेरीच्या मार्गे अजमासें आठदहा खणाचा चौरस दिवाणखाना असून त्यास सुरूचे खांब व त्यावर कमानी वगैरे लाकडी बाधकाम पेशवाई थाटाचे आहे. ह्या इमारतीस कोणी देवघर असेहि म्हणतात. ह्या ठिकाणी पश्चिम समुद्रावरील स्वच्छंद वारा अव्याहतपणे येत असतो. या स्थानावरून '**पेशव्यांचे महाबळेश्वर**' ही ऐकीव माहिती खरी असावी असे अनुमान होतें. आजच्या गुहागरांत सागण्यासारखी ठळक सुधारणा म्हटली म्हणजे रेल्वेपासून बऱ्याच लाब असलेल्या या कोंकणी खेड्यात तादूळ सडण्याची गिरणी आली आहे.

**उद्भिज संपत्ति**—गुहागरच्या डोंगरात सागवान, अईन, किंजळ, खैर, आंबा, फणस, बिबा, अडुळसा व इतर वनस्पति, कोल्ह्या-कुत्र्याच्या विषावर व इतर विषारावर चालणाऱ्या औषधी व इतर झाडपाला विपुल आहे. तथापि, दिवसेंदिवस त्याची माहिती असलेले लोक कमी कमी होत आहेत गेल्या ५०।६० वर्षांत झाडीहि पुष्कळ तुटली आहे गांवठाणात काजू, अमसुले, (आडगावात जास्त) व कळकीची बेटे आणि घरोघर केळी, माड व पोफळी, तसेच घरावर बऱ्याच प्रकारच्या फळभाजांचे वेल सोडलेले अशी उद्भिज संपत्ति विपुल आहे. वालुकेश्वराच्या बाजूस केवड्याचे मोठे बन आहे. घरोघरच्या विहिरीस जरी सामान्यतः खारें किंवा मचूळ पाणी असले तरी अष्टवण्याच्या झऱ्याखेरीज सोमेश्वरविहीर, नारायणाच्या व वाडेश्वराच्या देवळातील विहिरी, बेत्राड नावाची विहीर, अरुणतीर्थ व भंडारवाडयाच्या उत्तरेस गायमुख इ. मिळून गोडया पाण्याचीहि सुबत्ता आहे. गुहागरच्या जवळपास वाघासारखीं हिंस्र श्वापदे नाहींत, पण अनेक जातीचे विषारी सर्प, अजगर व प्रखर विषधारी नाग फार आहेत. अस्तमानानंतर कोणीहि मनुष्य सहसा कदील व काठी हातात घेतल्यावाचून घराबाहेर जात नाही.

**सृष्टिसौन्दर्य**—प्रभातसमयीं, हळूं हळूं लहानमोठ्या पक्ष्याचे समुदाय किलबिलाट करीत त्या झाडींतील आपलीं घरटीं सोडून चरावयास बाहेर पडूं लागतात, भुकेलेलीं वासरें व पान्हवलेल्या[1] गाई याचीं उत्तरप्रत्युत्तरादाखल हंबरणीं सुरू होतात, धारा काढलेली गुरे धावत बागडत व स्वभावधर्मानुसार हर्षामर्ष विकाराचे शब्द करीत कुरणाकडे जात असतात, अशा वेळीं भगवान् सहस्ररश्मि सूर्यनारायण उदयगिरीवर आरोहण करून गुहागरच्या खोऱ्यांत आपले तेज ओतीत असतो, किंवा दिवसभर आकाशमार्गं आक्रमण करून थकलाभागलेला तोच दिनराज अस्ताचलावरून समुद्रस्नानासाठीं खालीं खालीं उतरत असतो, आणि त्याच्या मावळऱ्या किरणानीं समुद्राचा पृष्ठभाग जरतारी किनखाबाप्रमाणें चमकूं लागतो व अस्तमान-समय समीप आला असें जाणून पक्ष्याचे बहुतेक निःशब्द थवे झाडीमधील आपल्या घरट्याकडे माघारे मुरडतात. गुरेंहि सोनेरी रजःकण उडवीत शेपटया उभारून झपाटयानें घरें गाठीत असतात व दिवसभर शेतात राबून केलेली कमाई डोक्यावर अगर खाद्यावर घेऊन शेतकरी बाया व त्यांचे बापई साजचा बाजार साधावा म्हणून झपाझप पावलें उचलीत आपली वाट आटोपीत असतात अगर चादण्या रात्री डोंगरावरून खालीं येणारे व चादीच्या रसासारखे चमकणारे स्वच्छ पाण्याचे झरे नागमोडी वळणें घेत धावत असलेले दिसतात, किंवा भर अमावास्येच्या काळोखांत वर्षाऋतूंत सर्वत्र व एरव्हीं फक्त दलदलीच्या जागीं चमकणारे काजवे भित्र्या मनुष्यास वेताळबुवाच्या स्वारीतील दिवट्यांचा भयानक नाच भासवून भेडसावीत असतात; अशा कोणत्याहि वेळी पहा, तीन त्रिकाळ पहाणाऱ्याच्या नेत्रास नवी नवलाई दाखविण्यास या प्रदेशात सृष्टिसुंदरी सदासर्वदा सिद्ध असते.

**साधी राहाणी**—अशा निसर्गरमणीय भूभागांत देशावरील शहराशेजारीं मुद्दाम वसविण्यात आलेल्या नूतन वसतीप्रमाणे गुहागरची घरें स्वाभाविकच एकमेकापासून दूरदूर बांधिलेलीं आहेत सर्वच घरापुढील आंगणें अत्यंत निर्मळ राखिलेलीं असतात. मुबलक, स्वच्छ व गोड पाणी, भरपूर प्रकाश, सुपुष्पित वन्य वृक्षवेलींवरून वाहणारा सुगंध वायु, भात, नारळाचें दूध घालून केलेलें अमसुलाचे सार, अगर कढवे, कुळीथ ( हुलगे ) वगैरेंचें कढण, असा साधा आहार. आंबे, फणस, इत्यादि फळें किंवा फणसपोळी, काजू, पोहे, हा जेथील मेवा, वरघाटीं रूढ असलेल्या शिष्टसंमत वस्त्रसंभाराचे प्रयोजन फारसे जेथें नाहीं—नेसूं पांघरू वस्त्रोपवस्त्राची जोडी आंगावर असली कीं पुरे—अशी साधी व आरोग्यकारक राहाणी, शाळा, पोष्ट, कचेरी, एवढ्याच काय त्या नवीन सरकारी संस्था, यांनीं युक्त असें गुहागर हें टुमदार कोंकणी गाव आहे. येथील लोकसंख्या सरासरीं ५।४ हजार असून ब्राह्मणवस्ती बरीच मोठी आहे व तींपैकीं पन्नास पाऊणशें उंबरा एकट्या **खऱ्यांचा** आहे. उपर्युक्त इतिहासप्रसिद्ध घराण्याखेरीज विंझे, दातार, मोडक, ओंकार, दामले, जोशी, ( पेंडसे? ) इत्यादि घराणींहि **श्रीदुर्गा-वाडेश्वरांच्या** कृपाछत्राखालीं अद्यापि येथे सुखाने नांदत आहेत चांचेगिरी करणारा राणे आडनावाचा एक क्षत्रिय गुहागरच्या इतिहासात प्रसिद्ध आहे. **वासुदेवशास्त्री** यांचें पूर्वजाच्या वेळेपासूनचें घर वरल्या पाटास अगदी दक्षिणेस आहे. तेथून वर वर्णिलेले बहुतेक सर्व सृष्टिचमत्कार अनुभवास येतात. पुढच्या दारी डोंगर व परसात गेले कीं समुद्र व त्याचें विस्तीर्ण वाळवट आहे. हवें तेथें बसून सृष्टिशोभेची यथेच्छ मौज लुटावी !

———

# ‘ खरे ’ कुलाची पूर्वपीठिका



**बुद्धिमत्ता व महाराष्ट्रीय ब्राह्मण**—कोंकणस्थाच्या बुद्धिमत्तेविषयीं, “ **सृष्टिसौंदर्याबरोबरच कोकणप्रांतांतील लोकांना बुद्धिमत्तेची देणगी उच्च प्रतीची असते.** ” “ **कोकण आणि बुद्धिमत्ता यांची सांगड मनांत कायमची पडलेली असते** ” “**रत्नागिरी हें जसें कोंकण प्रांताचे केंद्र तसेंच तें बुद्धिमत्तेचेहि केंद्र मानिले गेले आहे.**” अशा अर्थाची वचनें आपण वारंवार ऐकतो व केव्हा केव्हा आपसांत बोलतोहि. तुलना करितांना, कोंकणस्थ बुद्धिवान् व तुटकपणें वागणारा, देशस्थ उदार, जिव्हाळ्याचें प्रेम करणारा पण अव्यवस्थित; कऱ्हाडा आदरशील व टापटिपीनें वागणारा, किंवा कोंकणस्थाला राजकारणी उलाढाल आवडते तर देशस्थाला परमार्थ-विचार जास्त सुचतात व रुचतात, असें परोपरीचे गुणदोषांचे मिश्रण जो तो स्वेतरपक्षाच्या पदरीं बांधीत असतो. तरी पण, ऐतिहासिक-मराठी इतिहासामधून-दाखले काढून दाखवून उलटसुलट बाजूनें ही तुलना सदोष आहे असेंहि ठरवितां येईल. महाराष्ट्रीय ब्राह्मणांमधील देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे, इत्यादि पोटजातींच्या गुणावगुणांची ही चर्चा गमतीची असली तरी आज मितीस तिच्यापासून तादृश लाभ कांहीं नाही, असेच सर्व विचारवान् पुरुषास वाटत असले पाहिजे केवळ बुद्धिमत्तेचीच गोष्ट घेतली तर उभ्या भरतखंडांत द्विजसंज्ञक त्रैवर्णिकांत-ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, यामध्यें-तिची चमक पूर्वी वेळोवेळी दृग्गोचर झाली आहे व हल्ली होत आहे. तशीच ती वरील महाराष्ट्रीय ब्राह्मणाच्या तीनहि समाजांत कमी अधिक प्रमाणांत आजहि प्रतिष्ठितपणें वावरत असलेली आढळेल.

---

१. केळकरकृत टिळकचरित्र.

सांगावयाचा मुद्दा हा कीं, देशस्थ, कोंकणस्थ, कऱ्हाडे हे भेद मुळांत चिरस्थायी स्वरूपाचे नसावे. कारण, पटवर्धन, काळे, घैसास, दातार[1], ठोसर[2], देव[3] इत्यादि आडनावें देशस्थ-कोकणस्थ, कोकणस्थ-कऱ्हाडे, स्मार्त-वैष्णव, ऋग्वेदी-यजुर्वेदी अशा दोन दोन व कांहीं तीनहि वर्गांत आढळतात ! कित्येक कोकणस्थाच्या कुलदैवतांत **श्री-जोगेश्वरी देवी** आहे हे कसें असे कोडे पडते ! तेव्हा ही आडनावें, कुलदेवता, कुलधर्म, कुलाचार, असा छडा लावीत लावीत मागे गोत्रापर्यंत गेल्यास एतद्भेदमूलक व प्रांतविशिष्ट भेदाची कृत्रिमता वजा पडून आपण आज मानितो तितका दूरीभाव या पोटजातींत मानण्याचें मुदलींच कारण उरणार नाहीं. बाकी, परिस्थितीचा सवाई सोटा ही भेदाचीं समविषम टेकाडें व ढेकळे सारींच ठेचून जमीनदोस्त करीत आहे ! या सोटेशाहीपेक्षा शास्त्रीय पद्धतीचे समताकरण हितपरिणामी होईल यांत शंका नाहीं.

थोडे विषयांतर करून प्रस्तुत प्रश्नासंबंधीं इतकें विस्तारानें लिहावेसें वाटण्याचें कारण, **खरे यांचे द्रविडदेशांतून कोंकणप्रांतीं आगमन** हा विषय डोळ्यापुढे आहे हेंच होय. कांहीं वर्षांपूर्वी **मंडलिक** उपनामक कुंभकोणम्‌कडील एक शास्त्री सातान्यास आले होते. त्यांनीं स्वतः सांगितल्यावरून ते कोकणस्थ आहेत असे कळले. एऱ्हवीं आडनावा-वांचून त्यांच्यांत कोकणस्थपणा अंतर्बाह्य कांहीच दिसून येत नव्हता.

---

१. यासंबंधी पुष्कळ मनोरंजक माहिती भा. इ. मं., पुणें, शके १८३८ चे वार्षिक इतिवृत्त, पृ. १४१ ते १४४ वर दिली आहे (श्री. कृ. वि. आचार्य याचा लेख पहा). २. यासंबधीं खुद्द आम्हास माहिती आहे, वाचकांपैकीहि अनेकांस असेल. ३. या देवीचें मूळस्थान मोंगलाईत आहे. त्यास '**जोगाईचे आंबे**' असें म्हणतात. याचे दुसरें नाव '**मोमिनाबाद**' आहे. (महाराष्ट्र सारस्वत, पृ. ३३, पहा).

हें खऱ्यांच्या अगदी उलट उदाहरण आहे. तंजावरकडे मराठी राज्य स्थापन झाल्यावेळेपासून जीं कित्येक महाराष्ट्रीय ब्राह्मण कुटुंबें तिकडे गेली तीं आज पूर्णपणें त्या प्रातांतील लोकासारखीं बनली आहेत. तात्पर्य, **खरेशास्त्रीबुवा प्रथम कोंकणस्थ-कोंकणांत राहणारे-असून आतां इतर कोंकणस्थ बंधूंप्रमाणें ते देशस्थ-देशांत राहणारे-झाले असल्यामुळें त्यांच्या थोर चरित्रावर, अलोट बुद्धि-सामर्थ्यावर व त्यामुळें घडून आलेल्या उपयुक्त इतिहास-संशोधन कार्यावर महाराष्ट्रीयत्वाच्या समानभूमिकेवरून स्वाभिमान-पूर्वक कोणीहि वारसा सांगावा.**

**खरे मूळचे द्रविड देशचे**—स्वत वासुदेवशास्त्री याच्या बोलण्यांत केव्हा केव्हा असा उल्लेख या संबंधात येत असे कीं, "**विजयानगरचें** साम्राज्य उध्वस्त झाल्यावर ( स. १५६५ ) जीं कित्येक घराणी देशोधडीस लागली त्यापैकी हे एक घराणे गुहागरास आले " "वर्ण काळा, भाषा दुसरी, ह्यामुळे आम्हीं ब्राह्मण आहोंत असें हरप्रकारें सुचवींत परतु त्यावर कोणाचा विश्वास बसेना. मग वेदपठण करू लागले, तेव्हां हे ब्राह्मग खरे-खरे बोलणारे-व हे खरेच-खरोखरच- ब्राह्मण आहेत अशी सर्वांची खात्री झाली." तथापि, शास्त्रीबुवांचे अनुमान प्रमाण मानिले तर ह्या गोष्टीस आज ३५० वर्षें होऊन गेली आहेत. परंतु तिची आठवण लोकाना पुढें बरेच दिवस होती. **गणपति पुळयास** समाराधनादि प्रसंगीं ह्यांस जेवावयास वेगळे बसवीत ! **श्री. ज. गु. शंकराचार्य** याच्या एका जुन्या आज्ञापत्रात—"खरे-द्रविड (द्रविड देशातले) ब्राह्मण"

---

१. ह्या अवतरणातली वाक्यें श्री. सौ. इरावतीबाई कर्वे याचीं आहेत. 'खरे' बाहेरून आले, व त्यास कोंकणात जरा निराळे लेखीत, अशी माहिती शास्त्रीबुवाचे मातुलघराण्याकडील आप्त रा. रा. यज्ञेश्वर गोपाळ दीक्षित, मुक्काम पुणें, हेहि सागतात.

अशी नोंद आहे म्हणतात. खरे यांची कालांतरानें, खरे-पुराणिक, खरे-शारंगपाणी, खरे-दीक्षित, खरे-खानदेशे, खरे-बेळदुरे, खरे-धोपावकर अशीं कित्येक पोट उपनावे झालीं आहेत. हीं कां व कशीं पडलीं हें जरी सोपपत्तिक सांगण्याचे येथे प्रयोजन नाहीं तरी व्यावहारिक कारण जुन्या समजुतीच्या लोकाच्या दृष्टीनें इतकेंच दिसते कीं, कुलविस्तार फार झाल्यावर पिढ्या तोडून त्यात आटोपशीरपणा आणणें सोयीचें होतें. ह्या सर्वांचीं निदान आगरें तरी गुहागरास अद्यापि आहेतच. वासुदेवशास्त्री हे **खरे-पुराणिक** घराण्यापैकीं होत ह्यांना **पुराणिक** उपनाव कसे प्राप्त झाले याचा इतिहास थोडक्यात पुढीलप्रमाणें आहे:-

**खरे पुराणिक कसे झाले?**—मूळ खरे बाहेरून येऊन गुहागरास स्थिर झाल्यानतर हळू हळू येथील लोकाशीं त्याचे स्नेहसंबध कमी-अधिक मानानें जडत चालले. त्यात **परचुरे-पुराणिक**[1] याचा घरोबा जास्त झाला. गुहागर येथील मुख्य दैवतें **श्रीदुर्गादेवी** व **श्रीवाडेश्वर** होत त्यात श्रीदुर्गादेवीच्या देवालयात परचुरे हे मुख्य मानकरी असत गुहागरच्या दक्षिणेकडील डोंगराच्या पलीकडे पालशेत गाव आहे. तेथील **श्रीमहालक्ष्मी देवी** खऱ्यांच्या कुलदैवतांत आहे या देवीस पूर्वी उत्पन्न असे. आता उत्पन्न नाहीं. तेथील धर्माधिकारीपणाचा मान खऱ्याकडे असे परचुरे-पुराणिक घराण्यावर खरे याचा काहीं मोठा उपकार झाला[2]. आमच्या एका स्नेह्याने असे सांगितलें की, "**नारोपंत परचुरे** नावाचे कोणी गृहस्थ पेशव्याचे पक्षपाती होते. ह्याच्यावर निजामाचा काहीं निमित्तानें अत्यत रोष झाला. तो इतका की, 'परचुऱ्याचें नावसुद्धा भूतलावर उरूं द्यावयाचें नाहीं!' असा निजामाने बेत केला. (या वेळीं परचुरे निजामाच्या राज्यात कोठे राहात

१. परचुरे-पुराणिक व परचुरे-महाजन अशीं दोन वेगळी घराणीं असावीं.

२. श्री. सौ. इरावतीबाई कर्वे याच्या माहितीवरून.

होते की काय न कळे!) निजामाच्या कोपास नारोपंत परचुरे त्याचे इतर भाऊबंद बळी पडले. तेव्हा परचुऱ्याच्या घराण्यातील एक गरोदर स्त्री खरे याजकडे आश्रयार्थ येऊन राहिली. त्यानी तिचे व तिच्या बालकाचे पालनपोषण केले. (परचुरे-पुराणिक घराण्यावरील खरे याचा उपकार तो हाच कदाचित् असावा. ) मागे ज्याचे नाव आलें आहे ते **त्रिबक नारायण परचुरे**, या वशातलेच पुरुप होत " ह्या उपकाराच्या फेडीकरितां कृतज्ञताबुद्धीनें परचुरे यानीं आपले सर्व मान व गुहागरचे धर्माधिकारित्वाचे अधिकार वंशपरंपरा उपभोगण्यासाठी खरे यास दिले. तेव्हापासून **खरेपुराणिक** असे आडनाव चालू झाले व आजपावेतो हे खरेच **श्रीदुर्गेच्या** देवालयांत वंशपरंपरा पुराण सागत आले आहेत.

**खरे-पुराणिकांची महती**—एकदर खरे घराण्यावर विद्यादेवीचा कृपाप्रसाद विपुल दिसतो. **कै. ना. दाजीसाहेब खरे** (मुंबई), **रा सा. शारंगपाणी** (बडोदा), जंत्रीकार **रा. सा खरे,** एजिनियर (पुणे), इत्यादि नांवें खरे घराण्यावरील विद्यादेवीच्या कृपाप्रसादाचे उपलक्षण म्हणून पुरेशीं आहेत. आज गुहागरास रा. शारंगधर सखाराम खरे नावाचे एक गृहस्थ मोठे संपन्न सुखवस्तु आहेत. ह्याच्या कुळात कोणी पूर्वजाने रौप्यतुला केली होती. पण आमच्या चरित्रनायकाचा जन्म ज्या कुळात झाला त्या खरे-पुराणिक कुळाची महती या सर्वांहून कांहीशी निराळ्या प्रकारची आहे.

---

१. आमच्या मतें, परचुरे याजवर ही आपत्ति तुळाजी आंग्रे, अगर जंजिऱ्याचे शिद्दी याजकडून ओढवली असेल हें जास्त संभवनीय दिसते. ही हकीकत आख्यायिका स्वरूपाची आहे असें वाटतें.

हे पुराणिक धर्माधिकारीपणाचा पूज्य बहुमान आज दीडशें वर्षे उपभोगीत आहेत. गुहागरच्या आसपास पचक्रोशींत कसलाहि शास्त्रार्थ, ग्रामण्य, धार्मिक वाद, कोणतेंहि धर्मप्रकरण निघाल्यास ते निकालाला लागण्यासाठीं गुहागरास या **खरे-पुराणिकां**कडे येतें तसेंच पंचक्रोशी-तील धार्मिक मानाच्या दक्षिणा याच्या घरीं चालत येतात. या कोंकण-पट्टयाला या खरे-पुराणिक घराण्याची पिढीजाद विद्वत्तेबद्दल ख्याति आहे व त्याबाबत "त्याच्या एका मूळ पूर्वजाला पुराण सागत असता प्रत्यक्ष **श्रीमारुतिरायाचें** दर्शन घडून वर मिळाला होता," अशी आख्यायिका सागण्यात येते. ते कसेहि असले तरी एवढे मात्र खरे आहे कीं, पिढयानुपिढया या घराण्यात वेदघोष आणि शास्त्राध्ययन अखंड चालूं होतें. अध्ययन व अध्यापन निःशेष बंद असा दिवस क्वचितच गेला असेल. हा क्रम गेल्या पिढीपर्यंत चाललाच होता. आता विद्याध्ययनाची दिशाच बदलली असल्यानें व तऱ्हाहि भिन्न असल्यामुळें तो क्रम जवळजवळ बदच पडला आहे वेगानें बदलणाऱ्या कालाच्या ओघात हें असे व्हावयाचेच म्हणावे, दुसरे काय ?

**शास्त्रीबुवांचे पणजे**—आधीं कोंकणांतील खेड्यातून ब्राह्मणवस्ती आहे ती एका प्रकारें ऋषींच्या आश्रमासारखी आहे. घरे साधी—जरूर तेवढा थडीवाऱ्यापासून निवारा झाला कीं बस्स—भात पिकविण्याकापण्याचे काम होईल तितके घरच्याघरीं करावयाचें. नारळी-पोफळी इत्यादींस पाणी द्यावयाचें. साराश, स्वतः राबून खावयाचें व अध्ययनाध्यापन करावयाचें. संतोषवृत्ति हें जणूं ब्रीदवाक्यच ! त्यांतून गुहागरसारख्या क्षेत्रात वास्तव्य व विद्या हेंच व्यसन, विद्वत्तेसाठीं मिळणारा मान हेंच धन, मग त्यापुढें लौकिकी गरीबीची पर्वा मुळींच करावयाची नाहीं असें असिधाराव्रत चालविणारे **लक्ष्मणशास्त्री** व त्यांच्यामागून त्याचे तीन पिढयांचे वंशज याचा हा स्वभावविशेष ध्यानात ठेवण्याजोगा आहे.

वासुदेवशास्त्री यांचे पणजोबा **लक्ष्मणशास्त्री** यांच्यासंबंधीं, त्यांच्या अंगच्या विलक्षण निःस्पृहपणाच्या एका ठळक गोष्टीखेरीज इतर कोण-तीच माहिती उपलब्ध झाली नाहीं लक्ष्मणशास्त्री खरे यास पेशव्या-कडून सालीना बाराशें रुपये नेमणूक मिळणार होती. परंतु त्यांस मग नेहमीं श्रीमंताच्या सान्निध राहावें लागलें असते. प्रपंचभार मोठा असून सुद्धा घरच्या अठराविश्वे दारिद्र्यात एवढी मोठी नेमणूक केवळ **बधन नको** म्हणून त्यानीं नाकारिली हा केवढा स्वार्थत्याग ! ! व ही स्वातंत्र्य-प्रीति किती कौतुकास्पद मानिली पाहिजे बरें ! ! !

**आजोबा**—लक्ष्मणशास्त्र्याचे चिरंजीव-शास्त्रीबुवांचे आजे-**महादेव आप्पा**-याच्या विषयीं लोकाच्या मनात मोठा आदरभाव वसत असे. वेदशास्त्रानुसार अत्यंत पवित्र आचरण या घराण्यांत परंपरागतच होतें. **महादेवआप्पा** यांचे ठिकाणी त्याचा प्रभाव व तेज इतके विलक्षण प्रत्ययास येई की, ते वाटेने जात असले म्हणजे मागून येणारा माणूस त्याना ओलाडून पुढे जात नसे. दबून मागेंच चाले आणि पुढून येणारी स्त्री-पुरुष कोणीहि व्यक्ति आप्पांना पाहून अदबीनें बाजूच्या वळचणीस उभी राही व आप्पा निघून गेल्यानतर पुढे चालू लागे. भावना ही कीं, त्याच्या अंगावरून जाण्यात त्याचा उपमर्द केल्यासारखें होईल ! अशीच कथा **श्रीरामकृष्ण परमहंस** यानीं आपल्या वडिलासंबंधीं सांगितल्याचें त्याच्या चरित्रात[1] लिहिले आहे. वेदाध्ययन, पवित्र आचरण आणि ब्राह्मण्य ह्याविषयीं जनतेच्या आदरबुद्धींत गेल्या साठ पाऊणशे वर्षांत केवढे मोठें स्थित्यतर झालें आहे हें पाहिलें म्हणजे मनास आश्चर्य वाटतें व थोडासा खेदहि झाल्यावाचून राहात नाही !

---

१. श्री. नरहर रामचद्र पराजपेकृत श्रीरामकृष्ण याचें चरित्र भाग १ ला, पृष्ठ ८.

**वडील वामनशास्त्री**—महादेवआप्पाना तीन मुलगे होते, **वामन, कोंडभट** व **परशुराम.** व **बया** नांवाची एक मुलगी होती, ती गोंधळें गांवीं दिलेली होती. पुढें चरित्रात 'बया—आत्याबाई' नांवाचा उल्लेख आलेला आहे, तो ह्याच मुलीचा होय मुलांपैकीं **वामनशास्त्री** सर्वांत वडील होते, व त्यांचाच वंशविस्तार झाला. इतर दोघांचे नांव ज्या अर्थी घरच्या हकीकतींत कोठें फारसे आढळत नाहीं त्या अर्थी ते अल्पवयातच वारले असावे निदान वामनशास्त्री वारले त्या वेळीं यापैकी एकहि जिवंत नव्हता असें दिसते. घराण्याच्या नांवलौकिलाला साजेशी बुद्धिमत्ता, वेदशास्त्राध्ययन व विद्येची आवड वामनशास्त्री याच्या ठायीं वसत होती. कुटुंब मोठे व निर्वाहाची साधने तुटपुंजीं असल्याकारणाने वामनशास्त्री यानीं स्वतः परसात मोठ-मोठे खड्डे खणून त्यात नारळीची रोपें लावून व बागेंत सर्वत्र पाट बाधून त्यायोगे पाणी खेळविले. त्यांनीं दुसरीहि सुपारीचीं वगैरे झाडें लाविलीं आणि एकंदर बाग चागला उर्जित दशेस आणिला. त्याचे फळ मात्र त्यानी स्वतः फार दिवस उपभोगिलें नाहीं. वामनशास्त्र्याचें कुटुंब **गंगाबाई**—माहेरचे नाव **मनूबाई**—या मर्यादशील, पतिसेवारत, कष्टाळु व संतुष्टवृत्ति असत. वामनशास्त्री याना गंगाबाईच्या पोटीं शके १७७६ ते शके १७९२ पर्यंत ८ मुले झालीं. त्यांत चार मुलगे व दोन मुली अशी सहा अपत्यें त्यांच्या पश्चात् जिवंत होती. **कृष्णशास्त्री** जन्म शके १७७६, **वासुदेव-शास्त्री** शके १७८०, **परशुरामशास्त्री** शके १७८४, **चिंतामण-शास्त्री** शके १७८८ व शेवटीं दोन मुली झाल्या. त्यांत **मथूताई** सर्वांत लहान. तिला गुहागरासच वरल्या पाटास **दामले** यांजकडे दिली. मथू-ताई आपले वृद्धापकाळाचे दिवस अद्यापि आपले घरीं कंठीत आहेत.

---

## जन्म व बाळपण

**बाळपणचा स्वभाव**—उपर्युक्त विद्वत्परंपरेच्या घराण्यांत **चरित्रनायक वासुदेवशास्त्री खरे** याचा जन्म ह्या **गंगा-वामनांच्या** उदरीं आषाढ वद्य ११ गुरुवार शके १७८० दिवेसां घ. १९ प. ५० तारीख ५ आगष्ट सन १८५८. इ. रोजीं तिसरे प्रहरीं आजमासे बारावर दोन वाजतां झाला. जन्मपत्रिका ग्रंथारंभीं दिली आहे, तिच्यावरून फलज्योतिषाच्या अभ्यासकानीं तिचा पुढील चरित्राशीं पडताळा घ्यावा शास्त्रीबुवांचा स्वभाव लहानपणीं अत्यंत हूड, धाडशी व दंगेखोर होता. त्यांचे वडील बंधु कृष्णशास्त्री हे वडिलाच्या व आजोबाच्या आज्ञेप्रमाणें अभ्यास करीत, परंतु यांना त्याचे वावडे असे. अभ्यास नको, स्वच्छंदपणें डोंगरांत अगर समुद्राच्या पुळणीवर[२] भटकावे, यथेच्छ खेळावें, समुद्रांत दोनदोन मैल पोहत जावें, तळ्याच्या गार पाण्यात तासचेतास डुंबावें व घटकाघटका त्यांत बुडून बसावें असले उनाडकीचे प्रकार करण्यात त्याचा सारा वेळ जात असे. खेळाच्या भरात दिवस रात्र, वेळवखत, काहीं लक्ष्यात यावयाचे नाहीं. एकदां, शिमग्याच्या दिवसांत रात्रीं खेळता खेळतां दोन अडीच प्रहर रात्र उलटून गेली. तेव्हा श्रीदुर्गादेवीच्या तळ्यांत स्नान करून मग निजावे असा विचार करून स्वारी तेथें गेली. तों तेथें एक प्रचंड भुजंग तळ्याच्या काठावर गारव्यांत फणा उभारून चंद्रबिंबाकडे न्याहाळीत, डुलत व तोंडानें शीळ घातल्याप्रमाणें चमत्कारिक आवाज करीत बसला होता! त्याच्या उग्र विषारी श्वासानें दूषित झालेल्या त्या

---

१. घरच्या चरित्रविषयक टांचणांत फक्त वर्ष, महिना, तिथि इतकाच उल्लेख होता. त्या दिवशींची जन्माची नक्की वेळ-घटका, पळें-वे. शा. दत्तंभटनाथ जोशी (मिरज) यानीं निश्चित केली. तीच येथें दिली आहे. २. पुळण-संस्कृत पुलिन=वाळवंट.

वातावरणांत जातांच त्यास गुंगी येऊन ते बेसावध होऊन तेथेंच पडले! माणसाची चाहूल लागताच ते सर्पराजहि तेथून निमूटपणें चालते झाले. ही ईशकृपा म्हटली पाहिजे. हा नाग देवीचा सेवक असून तो कोणास इजा करीत नसे व त्याची फणा सुपाएवढी होती असे शास्त्रीबोवानीच एकदां सांगितले होते. खेळाच्या पायी जेवायखायची देखील शुद्धि असावयाची नाही. घरच्या वडील माणसाना चोरून-न कळत-आईस त्याना जेवावयास घालावे लागे. आईचेच अंत:करण ते! पण, सासऱ्याची ताकीद असे की, "वाम्या खोड्या करितो, वेळेला-सगळ्यांबरोबर जेवायला न आला तर त्याला जेवायला घालू नको." पण, मग म्हणत, 'मने, घातलेस जेवायला? घालायचीसच तूं! आईच आहेस!" म्हातारा रागीट खरा! पण मनाचा कोमलहि तसाच!!

**गुहागरच्या शाळेंत शीघ्रकवित्व**—शास्त्रीबुवाना लहानपणी घरात आण्णा असे म्हणत. आण्णाची अशी स्वैरसचारी वृत्ति पाहून वडील वामनशास्त्री याना फार वाईट वाटे. वामनशास्त्र्याना विद्येची हौस खरी, पण, बदललेल्या परिस्थितीप्रमाणे देशातून कोकणात, इंग्रजी शिक्षणाने फायदा झाल्याच्या गोष्टी क्वचित् कानावर येत, त्या ऐकून किंवा दाजीसाहेब खरे, आप्पासाहेब शारंगपाणी, या आपल्याच गावच्या आपल्याच कुळातल्या मुलाच्या इंग्रजी शिक्षणामुळे होणाऱ्या भावी उत्कर्षाच्या कल्पना मनात येऊन म्हणा, त्याच्या मनात अनेक वेळा असा विचार येई की, आण्णाला इंग्रजी शिकवून 'ग्रॅज्युएट्' करावे. परंतु मुलगा क्षणभर अभ्यासाला ठरेल तर शपथ! अभ्यासासाठी डाबून बसणे त्याला मुळीच आवडत नसे. तथापि, वडिलांनी आपल्या पुढील बेतास अनुलक्षून आण्णाला गावातील मराठी शाळेत घातले. ह्या शाळेत शिकत असता शास्त्रीबुवाच्या अंगच्या उपजत कवित्व-शक्तीची साक्ष पटेल अशी एक गोष्ट एकदां घडली.

गुहागर येथील या मराठी शाळेचे त्या वेळचे हेडमास्तर रा. रा. गोविंद मार्तंड डोंगरे यांनी कोणा एका शीघ्रकवीच्या कविता त्याच्याकडून वर्गांत विद्यार्थ्यांपुढे म्हणविल्या व त्याचे प्रसंगोपात्त थोडे गुणवर्णन करून शाळेतील मुलांना त्याच्या गुणाचे अनुकरण करण्याचा उपदेश केला. वासूला थोडे वाचिता येऊं लागताच तो मोरोपंत, वामनपंडित इत्यादि मराठी कवीच्या कविता हौसेने वाचीत असे. आज सुट्टीत मुलांमध्ये त्याच्या बुद्धीप्रमाणे चर्चेचा विषय या शीघ्रकवीची कविता हाच झाला. त्या वेळी आमचा वासुदेव खरे म्हणाला, " त्यात काय आहे ? कोण वाटेल तो असल्या कविता करील ! " असे म्हणून त्याने लागलीच एक आर्या रचून फळ्यावर लिहून ठेविली; ती अशीः—

**मार्तंडाच्या पुत्रा, गोविंदा, ज्येष्ठ मास्तरा, अज्ञा ॥**
**कविता त्वा ऐकविली ती आम्हां मुळिच नावडे प्रज्ञां ॥१॥**

वरील आर्येंत उद्दामपणाचा दोष स्पष्ट दिसतो. पण कवीचे वय पुरते आठ-दहा वर्षांचे असेल नसेल ! व्यावहारिक तारतम्याचा पोच नसलेल्या इवलिशा मुलाकडे सुज्ञ वाचक क्षमाबुद्धीनेच पाहतील असे आम्हास वाटते. थोडा उच्च दृष्टांत घेऊन बोलावयाचे झाल्यास असे म्हणता येईल की, पुढे मोठा कवि व नाटककार होणारा हा लहानगा ' प्रज्ञ ' वासुदेव याची ही आर्या म्हणजे,

**' मा निषाद प्रतिष्ठां त्वमगमः शाश्वतीः समाः ॥**
**यत्क्रौंचमिथुनादेकमवधीः काममोहितम् ॥ '**

या श्रीवाल्मीकिमुनीच्या प्रथम श्लोक-प्रसवाची पुनरावृत्तिच होय. मात्र, श्रीवाल्मीकिमुनींना तेथल्या तेथे देवताप्रसाद व काव्यवर लाभला. परंतु आमच्या वासूआण्णाला ज्येष्ठ मास्तरांकडून यथास्थित खर्चायला मिळाले असे ऐकिवांत आहे ! तथापि ज्येष्ठ मास्तर कांही 'शापादपि' ब्राह्मण नव्हते. मग ते वासुदेवाची ईश्वरदत्त काव्यस्फूर्ति कशी काढून घेणार ?

**अभ्यास, मराठी वाचन**—वरील मराठी शाळेत वासुदेवानें वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत मराठी सहाव्या इयत्तेचा अभ्यास पुरा केला, व रत्नागिरीस तो मुलकी परीक्षेसाठी गेलाहि होता वय लहान म्हणून परीक्षेस त्यास बसूं देईनात हीच उलट अडचण तेथे उपस्थित झाली. शाळेतील अभ्यासाशिवाय, या वयापर्यंत आण्णाने **मोरोपंत, वामनपंडित, मुक्तेश्वर** इत्यादि प्राकृत कवींची कविता पुष्कळ वाचिली. पंतांचा '**बृहद्दशम**'—भागवत, दशमस्कंदावरील आर्या–(यास कोणी '**कृष्णविजय**' असे म्हणतात, याचे संपादन कै. शंकर पाडुरंग पंडित यानी केले आहे, व पंतकाव्यांतले हे क्लिष्ट काव्य आहे. हा ग्रंथहि शास्त्रीबुवांनी या वयातच वाचिला. केकावलीवर '**यशोदा पांडुरंगी**' नावाची टीका कै. दादोबा पाडुरंग यांनी लिहिली होती ती शास्त्रीबुवास फार आवडत असे. दादोबाच्या व्याकरणापेक्षा कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे मराठी व्याकरणावरचे निबध त्यानी आस्थापूर्वक वाचिले होते. पंतांची बरीच कविता त्यानी मुखोद्गत केली होती. एकदा ते **वडद** येथे रा. **सोमण** याजकडे गेले असतां मंडळीनी त्यास आपली ग्रामदेवता **व्याघ्रांबरी** हिच्या प्रार्थनेस्तव म्हणावयाजोगी कविता करण्यास सुचविले, ह्यानी कविता रचून म्हटली ती अशी:—

**व्याघ्रांबरीशललने ! महिषासुरचंडमुंडवधदक्षे ! ॥**

**आहे तुजला वंदन मज दीना पाहि तूं निजदयाऽक्षे ॥ १ ॥**

या आर्येवर पंतवाचनाची छाप पडलेली सहज दिसून येते. '**मराठ्यांची बखर**' हे ऐतिहासिक पुस्तकहि ह्याच वेळी त्यांच्या वाचनांत आले. ह्या नांवाची दोन वेगळी वेगळी पुस्तके आहेत, (१) मराठयाची बखर आवृत्ति ... केपन् (साने) स. १८२९ (दु. आ. स. १८४६) व (२) ग्रँटडफ्च्या[2] मराठ्याच्या बखरीवर कै. वा. नील-

१. प्रो. पोतदारकृत 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार,' उतारे, पृ. ९.
२. सदर ग्रंथ परिशिष्ट पृष्ठ १४ वरून ही माहिती घेतला.

कंठ जनार्दन कीर्तने याची टीका. प्रथम स. १८६७ साली कृष्णशास्त्री चिपळूणकर याच्या अध्यक्षतेखाली पुणे कॉलेजात कीर्तने यांनी निबध वाचिला तोच पुढे छापून प्रसिद्ध केला. त्यांत कीर्तने लिहितातः- " **आमच्या मराठी बखरीत वगैरे स्वराज्यप्रीति व धर्म यांच्या अभिमानानें जो एक प्रकारचा रंग उठला आहे तोहि साहेबांचे** ( ग्रॅट्डफ् इत्यादि ) **ग्रंथांत नाहीं** " ग्रॅट्डफ् साहेबाच्या लिखाणाविषयी शास्त्रीबुवाचे जे धोरण, जी दृष्टि व जी मते ठरली होती त्याचे बीजारोपण या लहान वयातच ह्या दोन अगर विशेषेकरून ह्या दुसऱ्याच पुस्तकाच्या वाचनाने पक्के झाले असावे असे वाटते

**एक धाडस**—ह्या शाळेत शिकत असता मधून मधून वासूआण्णाच्या खोडकर, धाडसी व तापट स्वभावाच्या लीला चालूच असत. एकदा घरात कोणी काही बोलले—रागे भरले—त्यामुळे रागाने पहाटे उठून तो घराबाहेर पडला. श्रावणाचा महिना होता पाऊस एकसारखा पडत होता. आण्णा जो निघाला तो गुहागरापासून १२।१४ मैलावर गोधळे गावी त्याच्या आत्याबाई होत्या त्याच्या घरी गेला कोकणातल्या नद्या लहान असल्या तरी पावसाळ्यात फार घातुक असतात. पाण्याला ओढ व खळखळ फार, पाणी डोगराच्या उतारावरून खडकाळ व लहानमोठे गोटे असलेल्या पात्रामधून अतिशय वेगाने वाहते, पाय ठरत नाहीत, शेवाळलेल्या गोट्यावरून तेव्हाच घसरतात, असली एक नदी वाटेत होती. वासूने नदीत उडी टाकिली. हे पाहून बाजूंच्या शेतांतील १।२ शेतकऱ्यानी " बामणाचा पोर बुडतोय् ना ! आता मरल !" असे म्हणत तोडावर हात घेतला इतक्यात वासू पोहून नदीपार झाला ! जिवाची खातर नाही—पर्वा नाही. आतेने विचारिले, " बाबा वासू, कसा आलास ? का आलास ? " त्यावर, " गाय सुटून पळाली आहे, तिला शोधायला गडी निघाला त्याबरोबर मीहि निघालो. वाटेत

नदी लागली, ( इतके शब्द ऐकताच बयाआत्या स्तंभित झाल्या आणि सभय व साश्चर्य होऊन ऐकूं लागल्या. ) तीत उडी टाकून मी पोहून आलो" असे ऐटीत सांगून टाकिले! आत्याबाईंनी मुलगा जिवंत आणि हातीपायी धडपणी घरी आला म्हणून परमेश्वराला अनंत धन्यवाद दिले. व मुलाला जेवूं खाऊ घालून स्वस्थ केले. सायंकाळी घराहून गडीमाणूस मुलाचा शोध करीत तेथे आला. त्याच्या तोडून वासूच्या येण्याचे खरे कारण बयाआत्यास समजले. मग त्यानी वासूची कशी-बशी समजूत घालून व त्यास जपण्याविषयी गुहागरच्या माणसांस कळकळीचा निरोप गड्यापाशी सागून त्यास वासूसह परत पाठविले. ह्या वेळी वासूचे वय सुमारे दहा वर्षांचे असेल! त्याच्या ह्या नदी पोहून जाण्याच्या धाडसाची आठवण कुटुंबात सर्वांना चागली राहिली.

**भूतचेष्टा**—वासूची लहानपणची धाडसाची व खोडकर स्वभावाची दुसरी गोष्ट अशी आहे:—५०।६० वर्षांपूर्वी कोकणातील लोकाचा भूतपिशाच्चादिकाच्या अस्तित्वावर विश्वास फार होता, व लोकांना त्यांची भीति फार वाटे आजसुद्धा, देशापेक्षां कोकणात भुताखेताचे बड बरेच आहे. गुहागरच्या स्मशानात एक थडगे आहे. त्याचे नाव 'राण्याचे थडगे' असे आहे त्याविषयी लोकात समजूत अशी की, "त्या थडग्याला एकाद्याने लाथ मारिली अगर त्या राण्याच्या नावाने शिव्या दिल्या व मग त्याला त्याने हात लाविला तर त्या माणसाचे हात थडग्याला चिकटून राहतात." ही थडग्यांतील भुताच्या अस्तित्वाची साक्ष होय. हे स्मशान शास्त्रीबुवांच्या घराला इतके नजीक आहे की, तेथे रात्री प्रेत जळत असल्यास त्याचा उजेड याच्या घराच्या मागील भागांत पडतो. ह्या स्वारीचा त्या थडग्यावर बसून कधीकधी पोहे वगैरे खाण्याचा प्रघात असे. भय ह्यांच्या गांवी होते, पण स्वतः ह्यांच्या कधी ते ध्यानीमनींहि शिवले नाही! एके दिवशी रात्री स्मशानात एक प्रेत जळत

असतां वासूची काय लहर लागली कोणास ठाऊक, स्वारीने तेथे जाऊन भाताच्या पेडीची चूड हातात पेटवून घेऊन उड्या मारायला व नाचायला सुरुवात केली. मधून मधून अक्राळविक्राळपणे ओरडत व शिव्या देत वासू त्या राण्याच्या थडग्याला लाथा मारीत राहिला. हे पाहून घरामागे वाळवंटात बाहेर गेलेले शेजारचे एक गृहस्थ या भूतचेष्टा समजून मूर्च्छा येऊन तेथेच पडले! बऱ्याच वेळाने त्यास वेळ कां लागला म्हणून शोध घेण्यास आलेल्या त्यांच्या घरच्या दुसऱ्या माणसानी त्यास उचलून घरात आणिले! त्या गृहस्थास सडकून ताप भरला व ते पुढे २।३ दिवस अजारीच होते. आळीत रातोरात भुताटकीच्या खरेपणाविषयी घरोघर गोष्टी चालूं झाल्या. वासूआण्णा घरी नसल्यामुळे त्याची आई बिचारी काळजीत चूर झाली. नंतर थोडया अवकाशाने वासूआण्णांची स्वारी मागील दाराने हळूंच घरी आली. काल्पनिक भुताच्या (वस्तुतः आपल्याच पराक्रमाच्या!) घरात चाललेल्या गोष्टी ऐकून वासू मनांतल्या मनांत हांसत होता. आई त्याला शेजारी घडलेला प्रकार भाविकपणे सांगून "बाळा, अपरात्री बाहेर हिंडत जाऊं नको रे!" असे मोठया काकुळतीने शिकवीत होती. जेवण होईतो वासू कांही बोलला नाही. जेवण आटोपल्यावर वासू सांगूं लागला, "आई, भूत कुठचे! मीच तो! त्या सर्व चेष्टा अस्मादिकांनी केल्या!!" हे ऐकून तर आई थक्कच झाली! व "बाबा आण्णा, आता बाहेर तरी कुठं हे सांगूं नको, नाही तर लोक तुला धरून ह्या फाजीलपणाबद्दल बडवतील!" असे तिला वासूस बजावावे लागले.

**वामनशास्त्र्यांचा अंत**—घरी चालत असलेल्या वेदशास्त्रादि अध्ययनाची वासूने टाळाटाळ केली तरी त्याने स्वेच्छेने, स्वतंत्रपणे व स्वावलंबनाने केलेले मराठी ग्रंथाचे दांडगे वाचन, मुखोद्गत केलेली मराठी कविता, त्याला साधलेली शीघ्रकवित्वाची हातवटी व वयाच्या

बाराव्या वर्षी त्याची मराठी सहाव्या इयत्तेच्या परीक्षेची तयारी ह्या गोष्टी पाहून वामनशास्त्री याना त्याच्या बुद्धीचे, धारणाशक्तीचे व स्मृतीचे सानंद कौतुक वाटणे अगदी स्वाभाविक होते. आपल्या मनोदयानुसार वासू ग्रॅज्युएट् होईल असा भरंवसा धरण्यास वामनशास्त्र्यांना शंका वाटण्याचे मुळीच कारण उरले नव्हते. वासू हूड, खोडकर व लहरी आहे हे खरे, पण, वयोमानाने हे दोष पुढेपुढे कमी होतील असेहि त्यांना खात्रीने वाटे. पण, याच सुमारास वामनशास्त्री एकाएकी अजारी पडले. ह्या दुखण्यांतून आपण वाचत नाही असे जेव्हा त्यास वाटूं लागले तेव्हा विशेष चिंता काय ती त्यास वासूआण्णासंबंधी वाटे. कारण, वडील चिरंजीव कृष्णशास्त्री व धाकटी दोन मुले परशुराम व चिंतामणि हे त्रिवर्ग बंधु स्वभावाने गरीब; त्यात कृष्णशास्त्री तर १६ वर्षांचे, थोडाबहुत प्रपंचव्यवसाय पाहूं लागलेले व त्यास ते पात्र असे होते. आपल्या पश्चात् घरच्या गरीबीमुळे वासूचे इंग्रजी शिकणे होणार नाही; तरी पण त्याने शास्त्राध्ययन करावे आणि घराण्याचा विद्वत्तेचा लौकिक संभाळावा असा अखेरचा उपदेश त्यास एकवार करावा असे मनांत योजून वामनशास्त्र्यानी वासूआण्णाला जवळ बोलावून घेतले, व मोठ्या प्रेमाने, खोड्या करण्याचे सोडून देऊन घरी सागतील तो अभ्यास करण्याविषयी आर्जवून ते त्यास बोध करूं लागले, व तसे अभिवचन ते त्याजपासून मागूं लागले. वडील बंधु कृष्णशास्त्री 'अभ्यास करीन' असा होकार देण्यास वासूस शिकवीत होते. पण आज 'अभ्यास करितो' अशी कबुली देऊन पुढे तसे न वागल्यास खोटेपणा पदरी येणार, अशा समजुतीने अगर वडिलाचा मृत्युकाल समीप आला—त्याचा आतां वियोग होणार—या अत्यंत दुःखदायक कल्पनेने कंठ दाटून येऊन म्हणा, वासूने कांही उत्तर दिले नाही इतके खरे. वामनशास्त्र्याना मात्र ह्यामुळे अंतकाळी असीम दुःख झाले. या वेळी त्याचे वय सुमारे ४०

वर्षांचे असावे. या दुखण्यांत पुढे लौकरच त्याचा अंत झाला आणि वासुदेव ग्रॅज्युएट् होण्याचे सुखस्वप्न त्याबरोबरच लयाला गेले ! मोठेपणी जेव्हा जेव्हा शास्त्रीबुवाना या प्रसगाचे स्मरण होई तेव्हा तेव्हां त्याना फार खेद वाटत असे व आपल्या हातून त्या वेळी 'ही मोठी चूक झाली' असे ते पश्चात्तापपूर्वक म्हणत



## आजोबांच्या शिस्तीखालचीं चार वर्षें



**कविता व नाटकें रचणें**—वडिलाच्या वियोगाचे दुःख दिवसांमासानी हल्के होत गेले पोरस्वभावामुळे जाणत्या माणसापेक्षा मुलाचे दुःख खेळ वगैरेच्या नादात जरा लौकरच विसरते. वडील वारल्यानंतर इंग्रजी शिकण्यासाठी वासूस रत्नागिरीस पाठविणे व तो खर्च सोसणे या दोन्ही गोष्टी घरच्या गरीबीमुळे अशक्यप्रायच होत्या. आजोबा महादेवशास्त्री त्यास संहिता घोकावयास बसवीत. एकसारखे बसून अभ्यास करण्याचा तर वासूस कंटाळा येई. कृष्णशास्त्री जाणतेच झाले होते. परशुराम व चितामणि आजोबा सागतील तसे मुकाट्याने वागत, व वयोमानाप्रमाणे अभ्यास करीत. वासूआण्णास अभ्यासाचे वेळी कोठून तरी शोधून आणावे लागे ! समुद्राच्या वाळवंटांत-पुळणीवर-तासचेतास खेळणे, समुद्रात पोहणे, डोगरात व रानावनांत भटकणे हे वासुदेवाचे आवडते व्यवसाय असत असे मागे लिहिलेच आहे. तथापि, लहर लागली म्हणजे जसा तो पंतादिकाच्या मराठी कविता वाची तसा तो स्वतः कित्येक कविता रचीत असे. हे काम त्याला मनापासून आवडे.

कविता करण्याचा नाद व कविता रचण्याची पात्रता त्याच्या अंगी इतक्या लहान वयांत अशी विलक्षण होती की, 'त्यास ह्या कामी कोणी देवता प्रसन्न आहे' असा समज गावातील सामान्य लोकात पसरला होता पण काही अशी अत स्फूर्ति, पुष्कळ काव्यवाचन व त्याच्या अनुकरणाची हौस, रचनेचा अभ्यास, सृष्टिनिरीक्षणाची संवय व संधि, इतक्या गोष्टीचा दैववशात् मेळ बसणे हाच खरोखर दैवी प्रसाद-योगायोग-होय. चरित्राचे सुरुवातीस दिलेले शास्त्रीबुवाच्या जन्मस्थानाचे वर्णन जरा विस्तृत झाले आहे हे खरे, परतु शास्त्रीबुवाच्या काव्यस्फूर्तीस त्याचे केवढे साहाय्य मिळाले आहे हे त्याच्या काव्यावरून ध्यानी आलें म्हणजे या विस्ताराचे महत्त्व वाचकास पटणारे आहे. असो काव्यरचने-प्रमाणे त्याचा आणखी एक आवडीचा विषय म्हणजे नाटके रचण्याचा व ती बसविण्याचा होता. त्या काळात देवादिकाच्या उत्सवात दशावतारी खेळ—रामरावणादिकाची किवा इतर पौराणिक प्रसगाची नाटके—कर-ण्याची वहिवाट होती. गुहागर व त्याच्या आसपास पंचक्रोशीत हा क्रम असेच असली नाटके कवितेसह रचून द्यावयाची आणि ती करणाराना अभिनय वगैरे शिकवून रंगभूमीवर ती यशस्वीपणे वठवून दाखवाव-याची या कामी वासुदेव अग्रेसर असे मौज ही की, मोठी माणसेसुद्धा त्याच्या सूचना अनुभवी नटाच्या सूचनाप्रमाणे ग्राह्य मानीत ! शास्त्री-बुवाच्या पुढील आयुष्यात त्याच्या नाट्यलेखनद्वारा केवळ अंकुरितच नव्हे तर विरूढ व फलित झालेल्या नाट्य-कलेची बीजे त्याच्या या बाल-वयातील नाट्यविषयक उद्योगात पहावयास सापडतात असे म्हणावे लागते.

**आजोबांच्या मनाची तळमळ**—इतक्या उद्योगातून चुकून वासु-देव अभ्यासासाठी आजोबाच्या केव्हा हाती लागेल तेव्हा लागेल ! तथापि, त्यांतच त्यानी मारूनमुटकून त्याजकडून थोडाबहुत काव्याचा अभ्यास करून घेतला. हेतु हा की, थोडे काव्य वगैरे म्हटले तर

निदान पुराण सांगण्यापुरती तरी व्युत्पत्ति होईल. काव्याच्या पाठाचे वेळीं एकदा गम्मत झाली. आजोबा वासूला काव्याचा पाठ घेण्यास सांगत होते, पण आज वासूआण्णाची मर्जी लागेना ! तो ओरडून म्हणाला, " आप्पा, ह्यांत काय शिकायचे आहे ? मला येते हे सगळे ! " आप्पानी लगेच **रघूचा** एक सर्ग काढून त्यातील एक श्लोक लावून दाखविण्यास वासूस आज्ञा केली. वासूने पाचचार पळांत तो श्लोक लावून दाखविला ! शास्त्रीबुवा नेहमी मोठ्या अभिमानाने म्हणत की, " **पतांच्या कवितेचें वाचन संस्कृत ज्ञानाच्या दृष्टीनें आपल्याला जन्मभर उपयोगीं पडलें !** " ह्या दिवशी आजोबांच्या पुढे त्यांना हेच ज्ञान उपयोगास आले असावे. शिवाय, त्याची स्मरणशक्ति अलौकिक होती. घरांत दुसऱ्याचे पाठ सुरू असलेले नुसते कानावरून गेले तरी ते वासुदेवाच्या चांगले लक्ष्यात राहात असत. ह्याप्रकारे वासूच्या तीव्र बुद्धीची साक्ष महादेव आप्पांना अनेकदा पटली होती. परंतु, त्याच्या उनाड व खोडकर स्वभावाचा आप्पांना मोठा राग येत असे. त्यांच्या मते, अशी चलाख बुद्धीची मुले, योग्य काळी आळा न बसल्यास, मोठेपणी बिघडण्याचा संभव फार असतो. व वासुदेवाच्या हूडपणापुढे तर त्याना अगदी हात टेकण्याची पाळी आली होती ! आजोबा कधी तरी खूप संतापले म्हणजे म्हणावयाचे, " दुष्टा, दुर्योधना ! तुझे लक्षण कांही ठीक दिसत नाही. घराण्याच्या विद्वत्तेचा लौकिक तुझ्या हातून राखणे होणार नाही. " तसेच सूनबाईस-वामनशास्त्र्यांच्या कुटुंबास-म्हणावे, " मने, काय करावे ? वासू कसा बुद्धिमान् ! पण विद्येचा उद्योग मुळीच करीत नाही !! काय त्याच्या नशिबी आहे कोणाला ठाऊक ? " सासरा व सून दोघेच काय ती घरांत वडील व पोक्त माणसे, व वामनशास्त्री यांच्या मृत्यूमुळे दोघेहि दुःखी कष्टी; दोघांनाहि रात्री झोप देखील यावयाची नाही ! अशा वेळी प्रापंचिक सुखदुःखाच्या गोष्टी बोलत

असतां त्यांत कधीकधी वरीलप्रमाणे वासुदेवासंबंधीहि तळमळीचे उद्गार निघत.

**पहिलें पलायन**—ह्या कावाकावीचा प्रकार एकादे वेळी असह्य झाला म्हणजे वासुदेव घरांतून एकाएकी कोठे तरी निघून जाई तो दोनतीन दिवस परतच येत नसे. एके प्रसंगी तो फार त्रासून घरातून निघून गेला तो त्यानें गुहागरपासून हेळवाक ४५ मैल व हेळवाकेहून पाटण १५ मैल असा प्रवास केला! हा प्रवास कुंभारली घाटातून करावा लागतो. वाटेत एके मुक्कामी वासुदेव रस्त्याच्या बाजूस टाकलेल्या खडीच्या ओट्यावरच निजला. चालून चालून थकलेले पोर, 'त्यास भुकेला कोंडा व निजेला धोंडा' म्हणतात तशी गत झाली. त्या काळांत मालाची ने आण करणाऱ्या बैलगाड्याची रहदारी त्या घाटात मोठी असे त्यापैकी एका गाडीवरील गाडीवानाने बैलाचाच आसूड गाडीवरच्या गाडीवरच जरा ह्या अंगास कलते होऊन वासूच्या पाठीवर असा जोरानें ओढला की, तो विवळतच उठला व पाठीवरील वळ चोळीत रडत रडत गाडीपाठीमागून चालूं लागला. तेथे उगे कोण करणार? समजूत कोण घालणार? व कोण मायेने कुरवाळणार? वासूला घरची निदान आईची तरी आठवण होऊन ब्रह्माड दु ख आठवले असेल! पण ही गोष्ट ते मोठेपणीं सागत तेव्हा म्हणत, "तो गाडीवान फार दयाळु, परोपकारी बरे! मला असे जागे न करिता तो निमूटपणे पुढे जाता तर रानावनांत वाघ, लांडगा, अस्वल कोणी मला फाडून मारून टाकिता. मग कसे झाले असते!"

याच प्रवासांत पाऊस पडत होता म्हणून हेळवाक येथे एका बाईच्या पडवीस निवाऱ्यासाठी वासुदेव गेला असता बाईनें त्यास तेथून हाकून लाविले. तेव्हां वळचणीचा आश्रय करून, बाई घरांत जाऊन निजल्यावर वासुदेव पुन्हां पडवींत जाऊन निजला. बाई पहांटेस दळण घालण्याकरिता पडवींत आली आणि यास पाहून "काय लोचट कोडगे पोर!

कुणाचे आहे हे ? " असें म्हणत तिने त्यास लाथ मारून घालवून दिले! ! पुढे पुष्कळ वर्षांनी चिपळुणास आपल्या एका मुलीच्या लग्नासाठी शास्त्री-बुवा गेले असता, आपण ज्यास लाथ मारिली तोच हा मुलगा इतका पराक्रमी निघाला व भाग्यास चढला आहे असे कळल्यावर ती बाई मुद्दाम त्यास पाहण्यास आली होती व आपल्या पूर्वकर्माचा पश्चात्तापपूर्वक उच्चार करून ती स्वतःस नानाप्रकारे दूषणे लावून घेत होती. ही गोष्ट ऐकून कोणी त्या बाईस कठोर, निष्ठुर, म्हटलें की, शास्त्रीबुवा त्याचा निषेध करून हासत हासत म्हणत, " छे, छे, निष्ठुर कशी ? तीसुद्धा दयाळुच ! " याचा अर्थ असा दिसतो की, जगात दुर्बलाला कोण विचारतो ?

**' सिहं नैव गजं नैव व्याघ्रं नैव च नैव च ।**
**अजापुत्रो बलिं दद्यात् देवो दुर्बलघातकः ॥ '**

तनु—मन—धनाचें—शारीरिक, बौद्धिक, आर्थिक, कसले तरी सामर्थ्य अंगी पाहिजे. नाही तर जिकडे जावे तिकडे अशीच सभावना व्हावयाची !

**पाटण येथील सत्कार**—प्रवासातील असले कटु अनुभव घेत व हाल खात वासुदेव पाटण येथे गेला. **पाटणचे आगाशे सावकार** म्हणजे मोठीच असामी होती. शेतीवाडी, वाडा-घोडा, गुरे, नोकर-चाकर, वगैरे पसारा फार मोठा होता. सावकारी बारदान देखील बडेच-लक्षावधि भाडवल पेरलेले होते. आल्यागेल्या अतिथि-अभ्यागताचे स्वागत, परामर्श, उत्तम करीत. वासू त्याच्याकडे गेल्यावर बोलता चालतां मुलाची चाल-चालणूक, भाषेचा सुसंस्कार, बहुश्रुतपणा इत्यादि गुण सहजच व्यक्त झाले. पुढे त्याच्या अंगचे कवित्व व बुद्धिवैभव पाहून वासुदेव खरे यास आगाशे आपल्याजवळ राहून अभ्यास करण्याचा आग्रह करीत होते, व विद्याभ्यासासाठी पडेल तो खर्च करण्यास तयार होते. परंतु त्याने ते नाकारिले. कां ते न कळे! कदाचित् परतंत्रपणा नको असा भाव त्याच्या मनांत असावा असा तर्क वाहतो. वासूचाच नकार पडल्यावर आगाशे

यांचा निरुपाय झाला. तथापि, पाटणाहून पुढे जाण्याच्या इरावाने हा छोटा प्रवासी निघाला त्या समयी आगाशे यानी त्यास काही रुपये वाटखर्चीस देऊन प्रवासाचे व्यर्थ हाल न काढण्याविषयी व व्यवस्थेशीर अभ्यास करण्याबद्दल प्रेमळ शब्दानी बोध करून त्यास निरोप दिला. पाटणाहून ते बहुतकरून गुहागरास परत गेले असावे.

**शिमग्यांतील चोरी**—यानंतर पुन फार करून शके १७९३ ( स. १८७१।७२ ) चा सुमार असावा, शिमग्याच्या सणातल्या चोरीचे निमित्त झाले. त्या काळचा विचार केला तर ही बाब य.कश्चित् ! शिमग्याच्या सणात लहान पोरानी रात्री उनाडक्या करावयाच्या, गोवऱ्या-लाकडे होळीसाठी चोरून जमवावयाची, असले प्रकार परवांपरवांपर्यंत आपल्या इकडे—देशावरसुद्धां—चालत आणि ते क्षम्यहि गणले जात कोकणात अजून हा प्रकार थोडाफार चालतो. पण, चोरी गोवऱ्या-लाकडाची न करिता, एकमेकाच्या बागातील माडाचे कोवळे नारळ-शहाळी–किंवा केळवंडी–केळीचे घड–काढून आणावयाचे व खावयाचे हा चोरीचा प्रकार असतो. अशाच एका प्रकारात समवयस्क सोबत्यांच्या टोळीत वासुदेव सामील झाला होता ही टोळी एका तोडाळ बाईच्या बागेत शिरली. बाई सावध होती. मुलाची चाहूल लागताच तिने खांकरून खोकरून आपण जागी असल्याचे मुलाना जाणवून दिले. त्यामुळे सर्व मुले भराभर पळाली पण, वासू शरीराने स्थूल असल्याने तो बाईच्या हाती लागला. तिने त्याला पाहून ओळखून सोडून दिले. तरीपण, दुसरे दिवशी महादेवआप्पा घरी देवपूजा करीत बसले होते, तेथे येऊन ती त्यांस एक हजार शब्द बोलली ! व त्यांच्या तोडापुढे हात ओवाळीत " अहाहा, पाहिलेत कां हे नातवाचे गुण ! मोठ्या शास्त्र्यांचा मुलगा ! ! काय पण दिवे लावतोय् ! अहो, शिमग्यांतली झाली म्हणून काय झाले ? चोरीच ती, ती कां तुमच्या

नातवाने करावी ?" इ. बडबड करून बाई तसाच तोंडाचा पट्टा चालवीत आप्पाच्या घरांतून चालती झाली. वस्तुत हा चोरीचा प्रकार दुर्लक्ष्य करण्याजोगा होता. परंतु ती बाई वयाने पोक्त असली तरी तिचे वागणे पोरकटपणाचे होते व या प्रसंगी मुलाच्या अपराधास्तव आप्पांसारख्या सन्मान्य व पूज्य धर्माधिकारीपदस्थ पुरुषास ती उद्दामपणे अगदी बेसुमार टाकून बोलली हा तर तिचा निव्वळ मूर्खपणाच झाला.

**देशावर येण्याचा निश्चय**—घराण्याची थोरवी व मान्यता लक्ष्यांत घेतां, महादेवशास्त्र्याना ह्या तोंडाळ बाईची ती दुरुत्तरे मुकाट्याने ऐकून घ्यावी लागली व तसल्या क्षुद्र व्यक्तीने केलेला उपमर्द खोडकर नातवासाठी निमूटपणे सहन करावा लागला. गुहागरच्या लोकात आप्पाची मान्यता केवढी होती ते मागे वर्णन केलेच आहे. मानी ब्राह्मण; त्यांच्यापुढे कोणाची एक अक्षर बोलावयाची छाती होत नसे, असा दरारा; त्यामुळे ह्या दिवशी झालेला प्रकार असह्य होऊन आप्पांनी आज अन्नग्रहणाहि केले नाही. काय असेल ते असो. ही हकीकत घडली त्या दिवशी वासुदेवहि जेवला नाही ! संध्याकाळपर्यंत बाहेर आपल्या आवडत्या समुद्रकाठी व नारळीपोफळीच्या बागांत तो भटकत राहिला ! पुढील आयुष्यातील गंभीर स्वभावाचे व गगनचुंबी उच्च विचाराचे धडे आजपर्यंत ज्यांनी दिले त्या समुद्राचा व उंचउंच वृक्षपर्वतादिकांचा कृतज्ञभावाने तो आज अखेरचा निरोप घेत असावा. शास्त्रीबुवांच्या '**जन्मभूमि**' नांवाच्या काव्यात प्रस्तुत प्रसंगाला साजेशा २।३ कविता आढळतात:—

**" पोटासाठीं भटकत जरी दूर देशीं फिरेन ।**
**मी राजाच्या सदनि अथवा घोर रानीं शिरेन ॥**
**नेवो नेते जड तनुस या दूर देशास दैव ।**
**राहे चित्तीं प्रिय मम परी जन्मभूमी सदैव ॥**

" होतो लहान बहु खेळुन तृप्त झालों ।
अंकीं तुझ्या तिथुन थोरपणी निघालो ॥
मातेसमीप असती परि थोर होती ।
तेव्हां पिले सहज सोडुन तीस जाती ॥
" लाटा आपटतां उठे ध्वनि शिरे तो ज्यांचिया कंदरी ।
ऐसे पर्वत दुर्ग शोभति अति प्राचीन ज्यांच्या शिरी ॥
' धो धो ' शब्द करीत त्यांतून झरे खाली कसे धांवती ! ।
पाणी तेच पिऊन बाग उठती शोभा तयाते किती ! ॥

असे आपल्या प्रिय निसर्गस्नेह्याचे चित्र हृदयात साठवून घेऊन अस्तमानी वासुदेव घरी आला व त्याने आजोबाना साष्टांग नमस्कार घातला, हे पाहून त्यानाहि आनंद झाला मुलाला कृतकर्माचा पश्चात्ताप झाला आहे असे आजोबाना वाटले व ते काही अंशी खरे होते. " आपण देशावर दूर कोठे तरी शिकावयास जाणार, " असा आपला निश्चित मनोदय वासूने त्यास कळविला. त्यानी परोपरीने समजून सांगण्याचा प्रयत्न केला की, " घरी चालते तेवढे शास्त्राध्ययन संपीव, म्हणजे पुढच्या अध्ययनास आम्ही होऊन तुला दूर पाठवू. " तथापि, आजपर्यंत वरचेवर घडलेल्या बोलून घेण्याच्या प्रसंगास कंटाळलेल्या मनावर त्याचा काही एक परिणाम होऊं शकला नाही

**पुनः प्रवास**—निघते वेळी वासुदेवानें आईस नमस्कार करून तिला निरोप विचारिला. तेव्हा पूर्वी अनेकदा गेला होता तसाच आजहि जात असेल असे समजून तिला त्याचे काही विशेष वाटले नाही. बरोबर सहा आण्याचे पैसे व आईने सांगितले म्हणून काही पसे पोहे पदरात बांधून घेऊन दुसरे दिवशीं एका सोबत्यासह स्वारी घराबाहेर पडली. वासूचा हा सोबती मोठा वस्ताद होता. त्याच्या क्लृप्त्या, त्याचे मार्ग केव्हा केव्हा मोठे विक्षिप्तपणाचे असत, पण माणूस कल्पक खरा!

त्याच्या संगतीचा वासूस फायदा इतकाच झाला की, ‘ हालमे ख्याल ’ म्हणतात त्यासारखे सोबत्याच्या गमती स्वभावामुळे वाटेत करमणूक होई शिवाय वासू स्वभावाने जरा भिडस्त व मानी असल्यामुळे प्रवासात त्याची कित्येकदा उपासमार होत असे ती ह्या सोबतीने टळली. सोबती गोड बोलून, आर्जवाने किंवा युक्तिप्रयुक्तीने अगर ‘ ब्राह्मणाची मुख्य दीक्षा । मागीतली पाहिजे भिक्षा ॥ ॐ भवति या पक्षा । रक्षिले पाहिजे ॥’ या समर्थांच्या आज्ञेचे ततोतंत पालन करून पोटाची सोय लावी मात्र, हा सोबती पुढे फारसा प्रसिद्धीस आला नाही.

**मलकापुरचें कवित्व**—हे दोघे मुलगे गुहागराहून रत्नागिरी ४५ मैल व रत्नागिरीहून मलकापूर ५३ मैल तेथे आले. वाटखर्ची संपलेली, दोनप्रहरची वेळ, भूक लागलेली, स्नाने वगैरे होत तोपर्यंत माधुकरीची वेळहि उलटून जाणार, अशा स्थितीत काय करावे हा विचार पडला हे दोन्ही प्रवासी **मलकापूर** गावालगत बाहेर एका देवालयात बसले होते. येथे दोन प्रहरच्या समयास **श्रीमंत मलकापूरकर** याच्या घराण्यांतील कोणी वृद्ध बाई देवपूजेस येत असतात असे या क्षुधित प्रवाशास कळले. तेव्हा आपल्या चतुर सोबत्याकडून ह्या घराण्याची काही माहिती गोळा करवून वासुदेवाने अल्पावकाशात निरनिराळ्या वृत्तात १०।२० कविता रचिल्या. **श्रीमंत बाईसाहेब** पूजा आटोपून परत जाण्याच्या संधीस कवितेचा कागद त्याच्या हाती देण्यास शागीर्दपेशाच्या १।२ माणसांची आर्जवे करून पाहिली. पण उपयोग झाला नाही. सबब वासुदेवाने स्वत पुढे होऊन नम्रपणे प्रार्थना केली की, “ माझा थोड मजकूर आपल्या कानावर घालावयाचा आहे तेवढा आपण कृपा करून ऐकावा. ” श्रीमंत बाईसाहेब कृपाळु होत्या त्यांनी उभे राहून कवित ऐकून घेतल्या. संतोष पावून व दोन प्रहरची वेळ, मुले लहान बिचाऱ्याचीं तोंडे उन्हानें काळवडून सुकून गेलेली पाहून बाईनीं जेवणा

खाणाची विचारपूस केली. वासुदेवाने '**त्याकारितांच या कविता !**' असें लीनतेने उत्तर केलें. झाले ! बाईंची आज्ञा होऊन वाड्यात वर्दी लागून दोघा मुलांची यथास्थित जेवणें झाली तिसरे प्रहरी श्रीमत बाईसाहेबानी वासूस बोलावून घेऊन अधिक विचारपूस केली. देवळात म्हटलेल्या कविता ह्या मुलानेच केल्या अशी त्याची खात्री झाली. मुलगा बुद्धिमान्, यास्तव बाईंची मर्जी सुप्रसन्न होऊन "आमच्या मुलांबरोबर विद्या शीक. पाहिजे तितकी विद्या कर मी तुझें सर्व कांही चालवित्यें," म्हणाल्या. परतु वासुदेवाचा मंत्र एकः—"**मी शास्त्र शिकणार आहे. व त्यासाठीं साताऱ्यास गजेंद्रगडकर आचार्य यांजकडे जाणार आहे.**" बाईंचा निरुपाय होऊन त्यानी वासूस पाच रुपये वाटखर्चास देऊन "पुन्हा वाटेल तेव्हा मजकडे ये. मी तुझ्या शिक्षणाची व्यवस्था करीन," असे आश्वासन देऊन ठेविले.

**श्रीमंत कागलकर यांची देणगी**—वरील सकल्पानुसार साताऱ्यास गजेंद्रगडकर याच्या सन्निध विद्याभ्यासास्तव जाण्याचा योग आणखी २।३ वर्षे आला नाही. कारण, मलकापुरापासून कोल्हापूर साताऱ्यापेक्षा जवळ असून तेथेहि परपरागत विद्वान् शास्त्री-घराणी बरीच होती त्यापैकी, **भारतचम्पूचे** टीकाकार वे. शा. सं. **बाबाजी बाजी श्रीखंडे** याचे घरी वासुदेव शास्त्र शिकण्यास राहिला ( शके १७९४, सन १८७२ ). या वेळी, **बाबाजीशास्त्री** याचे चिरंजीव **रा. रा. गोपाळराव श्रीखंडे**, खासगी कारभारी, सस्थान करवीर, हेहि चागले व्युत्पन्न होते. त्याजपाशी वासूने अध्ययन सुरू केले. कोल्हापुरास वासुदेव वर्षसहामहिनेच होता. येथे असता तो एकदा कागलास गेला. तेथे गुहागरचे राहणारे रा. रा. सखारामपत जोशी हे **श्रीमत आबासाहेब कागलकर** याचे कारभारी होते. त्यांनी वासूस आपणाकडे ठेवून घेतले. व त्याच्यामुळे वासूचा शीघ्रकवि या नात्याने **श्रीमंत कागल-**

**करांच्या** दरबारात प्रवेश झाला. त्या प्रसंगी, ' **श्रीमंत कागलकरांच्या दरबारचा थाट**' किंवा '**श्रीमंत आबासाहेबांची घोड्यावर बसून शिकारीस निघालेली स्वारी** ' असा कसला तरी विषय कवितेत वर्णावयाचा होता. कविता ऐकून **श्रीमंत आबासाहेबांनीं** संतुष्ट होऊन या शीघ्रकवीस महावस्त्र-शालजोडी-धोतरजोडा, दक्षिणा, इत्यादि देऊन त्याचा मोठा सन्मान केला. यानंतर लौकरच वासुदेव कोकणात गुहागरास परत गेला. घरी गेल्यावर श्रीमंत कागलकरानी दिलेली शालजोडी आजोबाच्या पायापुढें ठेवून जेव्हां वासूआण्णाने नमस्कार केला असेल तेव्हा त्याना उनाड नातवाने स्वतःच्या विद्यापराक्रमानें मिळविलेले ते महावस्त्रादि पाहून किती आनद झाला असेल बरे ! आज वामनशास्त्री असते तर त्यासहि मोठे कौतुक वाटले असते.

**लग्न**—पुढें म्हणजे शके १७९५ च्या मार्गशीर्ष मासीं ( स. १८७३ दिजबर) वासुदेवाचे लग्न झालें. गुहागरापासून ८।१० मैलावर '**वडद**' नावाचें एक गाव आहे. तेथील सावकार रा. रा. **दामोदर अनत सोमण**, गोत्र शाडिल्य, याची मुलगी **यमू**, वय वर्षें सात, ही वधू नेमस्त करण्यात आली. यमूचे वडील सोमण हे श्रीमंत सावकारी पेशाचे असता त्यानी यमूस खऱ्याकडे, ते सन्मान्य पण गरीब आणि भिक्षुक पेशाचे हे माहीत असून कशी दिली ह्याचे कदाचित् कोणास गूढ पडेल. परंतु तसे वाटण्याचे कांही कारण नाही. का की, त्या काळात पैशापेक्षा कुलवान्पणा व शीलसंपन्नता ह्याची किमत लोक फार मानीत तथापि, व्यवहारदृष्टया द्रव्यादि साधनानुकूलतेकडे ते मुळीच पहात नव्हते असे कसे म्हणावे ? यमूच्या इतर बहिणी श्रीमंत घराण्यामध्ये दिलेल्या आहेत. मग लौकिकसंपन्न व विद्वत्तेने मान्य परंतु आर्थिक दृष्टया गरीब अशा खरे घराण्यात सोमणानी यमूस का दिली या प्रश्नाचे उत्तर जरा चमत्कारिक आहे. यमूस खऱ्याकडे वासुदेवासच

देण्याच्या बाबतीत दामोदरपंत सोमणाना रा. रा. **माधवराव गाडगीळ, वकील, राहणार गुहागर,** याची फार भीड पडली. ह्या गाडगीळ वकिलाना वासुदेव खरे याची काय लक्षणे दिसून आली असतील ती असोत. ते वासूवर त्याच्या लहानपणापासून विलक्षण प्रेम करीत इतके मात्र खरे. माधवरावानी वासूची वारंवार चौकशी करावी, त्याची बंडी फाटली असेल किंवा पंचा धड नसेल तर ते ते वस्त्र त्याला त्यानी ताबडतोब पुरवावे, असा अतिशय लोभ करीत. त्यानी सोमणाना सांगितले, "दामोदरपंत, माझे ऐका. ही एक मुलगी तुमची गरीबाच्या घरी पडतेसे आज तुम्हाला वाटते तर वाटूं दे. पण मी तुम्हाला सांगतो, **हा वासुदेव खरे पुढे खचित मोठा माणूस होणार व तो खात्रीनें नशीब काढणार हे पक्के समजा.**" अशा प्रकारे अनेकदा गाडगीळ वकील व सोमण याच्या वाटाघाटी होऊन दामोदरपंत सोमण यमूस खऱ्याकडे देण्यास सिद्ध झाले व यमूचा वासुदेवशास्त्री खरे याशी विवाह होऊन कालांतराने माधवराव गाडगीळ याचे भाकितहि खरे झाले.

**बायकोचा लहानपणचा स्वभाव**—यमू स्वरूपाने सुंदर, सुस्वभावी पण मानी अशी होती. यमूचे सासरचे नाव **सत्यभामा असें** ठेविले होते. मानी स्वभावामुळे इतक्या लहान वयाची असून देखील आपल्या पतिदेवाला घरातील वडील माणसे नावे ठेवितात, याचे यमूस फार वाईट वाटे व तिच्या माहेरी सासरच्या गरीबीसंबंधी थट्टेतसुद्धां कोणी उपहास केला तर ते तिला बिलकूल खपत नसे. **सत्यभामाबाईंचा** हा स्वभाव आजपर्यंत कायम आहे. मात्र पतिदेव—शास्त्रीबोवा याच्या सेवेत त्या नितांत नम्र—त्रिवार नम्र—होत्या. मातुश्री सत्यभामाबाई याच्यासंबंधे पुढे एके प्रकरणी विशेष विस्ताराने लिहावयाचें आहे, तेथे त्यांच्याविषयी या चरित्रांत अवश्य तेवढी आणखी माहिती देण्यात येईल. तथापि, त्यांच्या लहानपणची एक मौजेची गोष्ट मुख्य चरित्रात शक्य तितका कालानुक्रम राखण्याच्या विचाराने येथेच देतो.

**एक गमतीची गोष्ट**—लग्न झाल्यानंतर थोडयाच दिवसात यमूच्या सासरच्या कोणी वडीलधाऱ्या बाईने गडबडीने, " भामे, आण लौकर तुझी साडी इकडे, मला धुवायला नेऊं दे," असे म्हणत यमूची नेसती साडी ओढिली. सूनबाई लहानच होत्या. सुट्दिशी साडी सुटून धुवावयास नेणाऱ्या बाईच्या हस्तगत झाली व यमू लाजून आडजागी पळून गेली. **बयाकाकू** नावाची शेजारची एक बाई वासुदेवशास्त्र्यापेक्षा १०।१२ वर्षांनी तरी वडील होती तिचा स्वभाव थट्टेखोर असून वासुदेवाच्या लहानपणापासून ती त्याची थट्टा करीत असे व त्यास चांगले वळण लागावे म्हणून कधीकधी तिच्या थट्टेत खोचदारपणाहि असे. वरील प्रसंगी बयाकाकू म्हणाल्या, " वासुदेवशास्त्री, काय ही तुझ्या बायकोची फजीती? केवढा हा तुझा अपमान!!" त्यावर त्यांनीं लगेच उत्तर केलें, "कौरवाच्या सभेत द्रौपदीला फजीत करण्यासाठी तिची वस्त्रें ओढण्यात आली, तेव्हां सुज्ञ व सज्जन लोकांनी त्यात त्या द्रौपदीची फजीती झाली असें मानिले नाही आणि अखेर परमेश्वरसुद्धां द्रौपदी व तिचे पति ह्याचाच सहाय्यकर्ता झाला." ह्या पौराणिक दृष्टांताने बयाकाकूंस चोख उत्तर मिळून त्यांचे तोंड अगदी बंद झालें!

लग्न झाल्यानंतर त्याचे सुमारे एक वर्ष असेच इकडे तिकडे व अंशतः पूर्वपरिचित व्यवसायांत गेले शेवटी स. १८७५ साली ते जे एकदां घराबाहेर पडले ते, त्यांचे लहानपणचे अकारण हितचिंतक माधवराव गाडगीळ याच्या मुखांतील " **वासुदेव मोठा माणूस होणार व तो खात्रीनें नशीब काढणार** " इत्यादि भविष्यवाणी साक्षात् वस्तुस्थितीत उतरेपर्यंत घरी परत गेले नाहीत. माधवराव गाडगिळाचे हे भविष्योद्गार या चरित्रात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवावे इतक्या योग्यतेचे ठरले हे सत्य, यापुढील चरित्रच वाचकास निवेदन करील.

---

# सातारा व पुणें येथील अभ्यास व इतर उद्योग



**आचार्य गजेंद्रगडकर**—स. १८७५ त शास्त्रीबुवा दृढनिश्चयपूर्वक पूर्वसंकल्पानुसार विद्याभ्यासासाठी किंवा जमल्यास स्वावलंबनाने स्वतः-च्या पायावर उभें राहून काही उद्योग पहावा या हेतूने कोकणातून देशावर येण्यास निघाले. ते प्रथम बहुत दिवसाच्या मनोरथाप्रमाणे साताऱ्यास, **विख्यात पंडित अनंताचार्य गजेंद्रगडकर** याजपाशी विद्याभ्यासास येऊन राहिले. पंडित अनंताचार्य याचे आजे **राघवेंद्राचार्य** हे जाडे विद्वान् व भाग्यशाली पुरुष होते यास **सातारकर महाराजां-कडून** दरमहा ५०रु. वेतन रोख मिळे. खेरीज सातारा माहुलीच्या दर-म्यान वनवासवाडी म्हणून भाग आहे, त्यातील जमीन **महाराजांनी** त्यास इनाम दिली होती. **सरदार आंग्रे** यानी राघवेंद्राचार्य यास **अली-बाग**कडे सहा खंडी भाताचा खंड नेमून दिला होता व **श्रीमच्छंकरा-चार्य मठ संकेश्वर** व **करवीर** याजकडून त्यास जिल्हा सोलापूरपैकी **धूळखेड** नावाचा गाव इनाम मिळाला होता. ह्या उत्पन्नातून विद्या-र्जनासाठी जवळ येऊन राहिलेल्या छात्रगणाचा चरितार्थ चालवून राघवेंद्राचार्य त्यास विद्यादान करीत असत. पुढे ते काशीयात्रेस गेले असता तसेच ग्वाल्हेरीस गेले. तेथें **कृष्णाशास्त्री** नामक पंडित न्याया-धीश होते ते वारले. त्याच्या जागी राघवेंद्राचार्य याची नेमणूक व्हाव-याची होती. परंतु ह्याच वेळीं त्याचे बृहस्पतितुल्य कनिष्ठ चिरंजीव[१] वामनाचार्य दिवंगत झाल्याचे दुःखदायक वर्तमान समजून ते उदासीन झाले व त्यानी ती न्यायशास्त्र्याची जागा नाकारिली. तथापि ग्वाल्हेर

---

१. राघवेंद्राचार्य यास सहा मुलगे होते, बाबाचार्य, गोविंदाचार्य, कृष्णाचार्य, नारायणाचार्य, रामाचार्य व वामनाचार्य.

दरबारनें सालीना २०० रु. दक्षिणा ठरवून त्यांचे दुसरे एक चिरंजीव **रामाचार्य** यांस ग्वाल्हेरीस ठेवून घेतलें. यानंतर राघवेंद्राचार्य दक्षिणेत न येतां तिकडेच ब्रम्हावर्तास दुसऱ्या बाजीरावसाहेबांजवळ यांच्या आग्रहावरून आमरण राहिले. राघवेंद्राचार्य मोठे निःस्पृह होते. त्यांच्यामागें साताऱ्यास अध्यापनाचें कार्य त्याचे चिरंजीव **नारायणाचार्य** यांनी चालविले हे न्याय, व्याकरण व वेदान्त ह्या शास्त्रात निष्णात होते. वडिलाप्रमाणे हेहि निःस्पृह, निराग्रही व निरलस अध्यापक होते. ह्यांनीं एकदा परदेशगमनाच्या प्रायश्चित्ताच्या संबधात श्रीमच्छंकराचार्यांच्या मताविरुद्ध शास्त्रनिर्णय दिल्यामुळे त्यांचें धूळखेडचें इनाम आचार्यांनी काढून घेतलें होतें. परंतु पुढे एके प्रसंगी ( स. १८७० साली) श्रीमच्छंकराचार्य यांच्या आज्ञेवरून पीठाचे अधिकृत प्रमुख शास्त्री या नात्यानें नारायणाचार्य यानीं केलेल्या उत्तम कामगिरीमुळें धूळखेडचे उत्पन्न आचार्यपीठाकडून या घराण्याकडे इनाम म्हणून पुन्हां पूर्ववत् चालूं झाले. नारायणाचार्य यांचे चिरंजीव **अनंताचार्य** हे देखील वडिलांप्रमाणेच विद्याविभूषित होते. ह्याचेच चिरंजीव **विद्वद्वर्य बाळाचार्य** होत. हे शास्त्रीबुवाचे सहाध्यायी होते.

**चरितार्थासाठीं स्वावलंबन—गजेंद्रगडकर आचार्य** याचे शास्त्री घराणे फार प्रसिद्ध असून त्यांस राजाश्रय चागला होता हे वर सागितलेच आहे. ह्यामुळे त्यांजकडे विद्यार्थीहि पुष्कळ येत असत. कांही विद्यार्थ्यांची गुरुगृही भोजनाची सोय लागलेली असे. काहींस कालवण पाणी मिळे. वासुदेवशास्त्र्यांची आचार्यांकडे जेवणाची व्यवस्था पुढेपुढे झाली. आरंभी त्यास या बाबतीत हालच काढावे लागले. त्यास

१. विष्णु परशुरामशास्त्री पडित याच्या पुनर्विवाहपक्षाचें खडन. २ वे. शा. स. व्यकटाचार्य उपाध्ये हेहि होते. वरील वृत्तात त्यानी सागितलेल्या माहितीवरूनच येथे दिला आहे.

मराठी वाचनाची गोडी असल्यामुळे व वर्तमानपत्रांतून चालू परिस्थिती-विषयी काय लिहिले आहे तें पाहण्याची जिज्ञासा जरा तीव्र असल्या-मुळें त्यांचे बसणे उठणे 'शुभसूचक'[1]चे संपादक रा. रामभाऊ चितळे, 'बोधसुधाकर'[1]चे संपादक रा. पांडुरंगपंत काशीकर वगैरे मंडळींत जास्त असे. त्या मंडळीकडे ते वाराने जेवीत असे कोणी सांगतात. तथापि, स्वावलंबनाची मिळालेली एकहि संधि ते वाया दवडीत नसत. "**आधीं मेळवी मग जेवी। गुंतल्या लोकांस उगवी। शरीर कारणीं लावी। कांहीं तरी॥**" या समर्थोक्तीप्रमाणे वागणे त्यास आवडत असे. यासंबंधे एक गोष्ट अशी आहे की, 'महाराष्ट्रमित्र' नावाच्या साप्ताहिकाचे संपादक रा. गणपतराव कोल्हटकर किंवा व्यवस्थापक रा. पांडोबा अण्णा वाळिंबे यांनी स. १८७६ सालच्या भयंकर दुष्का-ळाच्या दिवसांत आपल्या पत्रांतील संपादकीय लेख वासुदेवशास्त्र्या-कडून लिहून घ्यावे आणि त्याच्या मोबदला त्यांना एक भाकरी व वाटीभर अंबील येवढे वेतन[2] द्यावे! काय, किती स्वस्त संपादकत्व हे!! तरी पण ही गोष्ट मात्र खरी की, या लेखामुळे या पत्राची योग्यता लोकांत वाढली आणि नामधारी संपादकास "अलीकडे तुमच्या पत्रांत लेख चांगले येतात" अशी शाबासकी वाचकवर्ग देऊ लागला. हा क्रम ८।१० महिने तरी चालू असावा.

**अध्ययन—गुरुवर्य पंडित अनंताचार्य** यांचे आज्ञेप्रमाणे त्यांच्या पुढे वासुदेवशास्त्री प्रथम रघुवंश काव्याचा दुसरा सर्ग वाचू लागले. तो सर्ग संपतांच ते कौमुदी म्हणू लागले. त्यांची अभ्यासाची कळकळ

---

१ हीं सारीं सातारा येथें निघणारीं त्या वेळची वर्तमानपत्रें होत

२ शास्त्रीबुवा तेथें मुद्रितें तपासण्याचें काम करीत. त्याबद्दल त्यास द. म. ३ रु. मिळत

व बुद्धिमत्ता पाहून अनंताचार्य यानी आपल्या घरीच त्याची जेवणाखाणाची सोय केली. साताऱ्यास ते सुमारे अडीच वर्षे होते. येवढ्या मुदतीत त्यानी **कौमुदी, तर्कसंग्रह व काव्यें** याचा अभ्यास केला. त्याची स्मरणशक्ति विलक्षण असल्यामुळे एकादा भाग १।२ वेळा त्यांनीं वाचिला किंवा ऐकिला तरी तो पक्का होत असे. साताऱ्यासहि अभ्यासक्रम गुहागर येथे जसा असे तसाच होता. म्हणजे स्वतःचे पुस्तक उघडून अभ्यास करीत कधी बसावयाचे नाहीत. घोकणे, पाठ करणे, त्यास ठाऊकच नाही! इतराचे पाठ चालले असता ते ऐकून किंवा दुसरे विद्यार्थी नव्या पाठाच्या दृढीकरणास्तव चिंतनिका करीत असता, हिंडताफिरता त्या ऐकून काय तयारी होईल ती होईल. अशी लोकाना दिसण्यात अभ्यासातहि त्याची स्वच्छंदवृत्ति असली तरी आचार्यांच्या पाठशाळेत शिकविण्यांत येत असलेल्या बहुतेक विषयात त्याची चागलीच गति झालेली होती असे मानण्यास काही हरकत दिसत नाही. कारण, पुढील आयुष्यात निरनिराळ्या प्रसंगी अलंकारशास्त्र, न्याय, वेदान्त इत्यादि विषयात त्याच्या बुद्धीचा जो व्यापकपणा व सूक्ष्मपणा दिसून आला तो एऱ्हीं दिसून आला नसता. आणि ह्याची कारणे त्याची लोकविलक्षण बुद्धिमत्ता व असाधारण स्मरणशक्ति हीच असली पाहिजेत हे उघड आहे असो. पाठशाळेत ते गुरुजनाशी आज्ञाधारकपणे व सहाध्यायाशी मिळून मिसळून प्रेमाने वागत आणि ते विद्याव्यासंगी व निरभिमानी असल्यानें आपल्यापेक्षा लहान वयाच्या विद्यार्थ्यांबरोबर देखील चिंतनिका इत्यादि करण्यासाठी मिसळण्यात त्यास मुदलीच कमीपणा वाटत नसे.

**सोबत्यांची थट्टा व संस्कृतांत कविता**—आपला अभ्यासाचा उद्योग संपला की, ते आपल्या सोबत्याशी थट्टामस्करी करीत बसत. अभ्यासी विद्यार्थ्यांची अथडणे लपवून ठेवीत व ते फार गयावया करूं लागले म्हणजे छूः मंतर करून काढून आणून परत देत. त्यानी एक

सांकेतिक भाषा बसविली होती. त्या भाषेत आपल्या मित्राशी बोलून अगर केव्हा केव्हा गमतीच्या स्वकल्पित रचीव गोष्टी सांगून त्यांनी आपल्या मित्रमंडळीत कित्येकदा तरी हशा पिकवावा. त्यांचा स्वभाव जरी एकंदरीत फार गमती--विनोदी--आणि थट्टेखोर होता, तरी साताऱ्यास ते आले तेव्हा प्रथम, हे कवि आहेत असे समजताच पाठशाळेतील विद्यार्थी त्यांस 'तुकाराम तुकाराम' म्हणून हाक मारून चिडवूं लागले. त्यावर एका मित्राने त्यांस तोड सुचविली व दुसऱ्यांनी त्यांना 'तुकाराम तुकाराम' म्हणून चिडविण्यापूर्वी शास्त्रीबुवाच त्यांस 'तुकाराम तुकाराम' म्हणूं लागले! हा मंत्र छान लागूं पडला. आपण मराठीत काही काव्यरचना केली असल्याचे ते वारंवार बोलत. त्यांना कविता करण्याचा खरोखरच भारी नाद होता. साताऱ्यास रघूचा एक सर्ग होताच ते संस्कृतात सुद्धा कविता करूं लागले होते. तथापि, त्यांचे हे कवित्व किंवा त्यांच्या कवितेचे स्वरूप प्रत्यक्ष लक्ष्यात न घेता कित्येक विद्यार्थी त्यांची थट्टा करीत. परंतु त्यांचा हा गुण अगदी अनपेक्षित रीत्या एकदा उत्तम प्रकारे प्रकट होऊन या चेष्टा करणाऱ्यांच्याहि आदरास ते पात्र झाले. अनंताचार्यांचे चुलते रामाचार्य हे ग्वाल्हेरीस शिंद्यांचे आश्रयास होते असे मागे आलेच आहे. एकदा, ते साताऱ्यास आले असतां वासुदेवशास्त्री यांची परीक्षा पाहण्याच्या हेतूने रामाचार्य यांनी त्यांस "रासक्रीडेचे वर्णनात्मक संस्कृत श्लोक अमक्या वृत्तामध्ये कर," अशी आज्ञा केली. शास्त्रीबुवांनी ते श्लोक सुमारे अर्ध्या तासांत तयार करून लिहून दिले. ते वाचून रामाचार्य फार खुष झाले. या वेळी वासुदेवशास्त्र्यांचे अध्ययन रघूचा एक सर्ग व कौमुदी पंचसंधीपर्यंत, इतकेच झाले होते. या गोष्टीवरून त्यांची कवित्वस्फूर्ति अगदी जन्मजात-उपजत-होती व ते उत्तम शीघ्रकवि होते या विधानास चांगलीच बळकटी येते.

**तालीम**—शास्त्रीबुवांनी साताऱ्यास येईपर्यंत पद्धतशीर व्यायाम मुळीच केला नव्हता तथापि मूळचेच ते अंगापिडानें दांडगे असून त्यांचे हाडपेर बळकट होते. आणि पोहणे, पळणें, धांवपळीचे खेळ, झोंबी धरणे, इत्यादींची त्यास मोठी हौस असे त्यानींच त्यास काय व्यायाम घडला असेल तो असेल पण साताऱ्यास आल्यावर त्यास तालमीचा नाद लागला. साताऱ्यास ' धनीच्या बागेतील विहिरी ' वर सर्वजण पोहण्यास जात त्या विहिरींत शास्त्रीबुवा अशी खुबीनें उडी मारीत की, कितीहि उंचीवरून उडी मारिली तरी ते आपले डोकें भिजूं देत नसत ! आचार्यांच्या येथील बहुतेक विद्यार्थी तालमीचे शोकी असल्याने ' जलमंदिराजवळ गोजरासाहेबाच्या तालमी 'त ते मेहनत करण्यास जात. ते वासुदेवशास्त्र्यासहि बरोबर घेऊन जाऊं लागले प्रथम त्यानी जेव्हा मल्लखांब करण्याचा प्रयत्न केला तेव्हा शरीर बोजड असल्याने तो त्यास साधला नाही. मग, दोघानी वरून त्यांस मल्लखांबावर चढविले !! परंतु पुढें त्याच्या चिकाटीमुळे व नित्य अभ्यास करण्याच्या तत्परतेमुळे १।२ महिन्यात ते सफाईने मल्लखांब करू लागले. बैठ्या खेळापैकी बुद्धिबळे त्याना उत्तम खेळता येत होती. तथापि बैठ्या खेळापेक्षा या वयात त्याना शारीरिक खेळच मनापासून आवडत असत व असल्या खेळातच त्याचे चित्त जास्त गुंतून जात असे. शास्त्रीबुवाची उंची ५॥ फुटाहून थोडी जास्त, पण ६ फुटाच्या आंत होती. शरीर आडव्या बांध्याचे होते आणि वर्ण तांबूस गौर होता. स्वच्छंदी व उल्लसित वृत्ति, आचार्यांच्या घरचे सुग्रास भोजन आणि तालमीचा नाद, ह्यामुळे विशीचे आत वय असता शास्त्रीबुवा चांगले नजरेत भरण्यासारखे पुरुष दिसत. पुढे जन्मभर इतिहाससंशोधनाच्या व ग्रंथकर्तृत्वाच्या कामीं त्यानी केलेले अमर्याद शारीरिक व मानसिक कष्ट आणि वर्षानुवर्ष त्यास घडलेली रात्रीची जागरणे लक्ष्यात घेता

अखेरची १।२ वर्षे खेरीज करून यावज्जन्म प्रकृतीची किरकोळ तक्रारहि कधी उत्पन्न झाली नाही, अशी शरीराची सुदृढता देवदयेनेच त्याना लाभली होती असे मानिले तरी देखील, या बाबतीत श्रेयाचा फार मोठा वाटा शारीरिक खेळ व व्यायाम याजवरील शास्त्रीबुवाच्या सक्रिय प्रेमासच दिला पाहिजे. आणि ही गोष्ट आधुनिक तरुण विद्वानानीहि अवश्य ध्यानात ठेवून अनुकरण करण्याजोगी आहे

**नेने मास्तरांशीं सामना**—गजेंद्रगडकर आचार्य याजकडील विद्यार्थी नेहमी भटजीमहाराजाच्या मठाजवळच्या[1] हौदावर स्नानास जात असत. तरुण वय, पोरबुद्धि, आताच्या विद्यार्थ्यांइतकी मने दुर्बळ नसलेली, सारे समवयस्क विद्यार्थी, पाठशाळेत स्वतंत्रता थोडी अधिक, अर्थात् स्नानाच्या वेळी हौदावर त्याच्यात कधी दंगामस्ती चाले. **तालीम करून शरीरांत थोडीतरी रग आलेली असल्यावांचून कोणाहि जिज्ञासूस या दंगामस्तीचें मर्म कळण्यासारखें नाहीं.** एकदा पुण्याच्या शाळेतले एक शिक्षक, रा. **बजाबा बाळाजी नेने**, 'सैरंध्री' नाटकाचे कर्ते, या हौदावर आले. त्याचेहि वय लहानच खरे, परंतु शिक्षक व तेहि पुणे शहरामधले! तेव्हा सभ्यपणाचा आव आणून पोक्तपणे जरा दरडावून या मुलाना म्हणाले, "काय रे, विद्यार्थी म्हणवता आणि असा दंगा करिता? अंगी विद्वत्ता असली तरी '**विद्या विनयेन राजते**' अशी म्हण आहे. तुमच्या अंगी विद्वत्ता तर दिसत नाहीच; पण दंगेखोरपणा मात्र भरपूर आहे!" यावर विद्यार्थ्यांनी त्यास विचारिले, "विद्या नाही असे कशावरून म्हणता?" शिक्षक जरा ऐटीनेच "असेल तयारी तर होऊन जाऊं द्या! आपण भंड्या खेळूं," असे विद्यार्थ्यांना आव्हान देते झाले. विद्यार्थी मंडळीहि तयार झाली व उभय पक्षात भंडयाचे सवाल-जबाब सुरू झाले.

---

१. सातारा येथील एक प्रसिद्ध मठ.

शिक्षक मजकूर मुलाना भारी तर खरेच, मुले हरूं लागली, त्याच्यावर खंडे होऊं लागले व नेने मास्तरानी तर शरणचिठ्ठी मागण्यापर्यंत मजल आणिली ! आतां मात्र येवढा वेळपर्यंत चाललेला प्रकार त्रयस्थाप्रमाणें तटस्थपणे पहात बसलेले वासुदेवशास्त्री पुढे आले व सहाध्यायी विद्यार्थ्यांचा कैवार घेऊन नेने मास्तर यास म्हणाले, "अजून शरणचिठ्ठीला अवकाश आहे मी हरलो म्हणजे पाहता येईल." या ठिकाणी एक पौराणिक दृष्टांत आठवला तो द्यावासा वाटतो. सीताशुद्धीसाठी समुद्रोल्लंघनास समर्थ कोण ? अशी चिंता अंगदजांबवतादि वीरास पडली असता श्रीमारुतिराय गंभीरपणे विचारमग्न होऊन एका बाजूस बसले होते. परंतु शेवटी यशस्वी कार्यकर्ते श्रीमारुतिरायच ठरले त्याप्रमाणे वासुदेवशास्त्र्यानी पुण्याच्या शिक्षकाचा मंडयात पराभव करून शरणचिठ्ठीचा डाव त्याजवरच उलटविला ! यानंतर एकाद्या विषयावर कविता जास्त व जलद कोण करितो याची पैज लागून त्यातहि सदर शिक्षक पराभूत झाले व वासुदेवशास्त्री सरस ठरून आचार्यांचा छात्रगण विजयी झाला. असो. या प्रसंगामधून शास्त्रीबुवाचे साताऱ्याहून पुण्यास प्रयाण व काहीं अंशी व्यवसायसंक्रमण या दोन गोष्टीचा जन्म कसा झाला हे पुढील प्रकरणावरून वाचकाच्या ध्यानी येईल.

हे पुण्याचे मास्तर रा. बजाबा बाळाजी नेने सोलापुराकडचे राहणारे असून पुण्यास एका शाळेत मास्तर होते. आपल्या जागीं बदली इसम देऊन त्याना कांहीं दिवस रजा घेऊन आपल्या गांवी जावयाचें होतें. आपले प्रतिपक्षी वासुदेवशास्त्री हे या कामीं योग्य आहेत असें जाणून नेने यानी आपल्या पुण्याच्या नोकरीवर जाण्याच्या बाबतींत त्याचा मानस पाहिला तो त्याजकडूनहि होकार मिळाला. कारण, शास्त्रीबुवाच्या घरची गरीबी इतकी होती की, साताऱ्याहून त्यांनीं एकदां घरीं पत्र लिहून खर्चास मागितलें असता अवघे

दोन रुपये मोठ्या कष्टानें त्यास तिकडून पाठविण्यांत आले! तात्पर्य, सातारा येथून अध्ययन सोडून पुण्याच्या नोकरीवर जाण्यास परिस्थितीनेच त्यांना भाग पाडिलें. पुण्याचा त्या वेळचा पगार द. म १५ रु. म्हणजे आजकालच्या द. म. ४०।५० रु. प्राप्तीची बरोबरी करणारा असे. करिता शास्त्रीबुवा नेन्याच्या जागीं बदली जाण्यास कबूल झाले आणि नेन्याचें पत्र घेऊन ते त्यांच्या शाळेच्या मुख्य अधिकाऱ्यास जाऊन भेटले. याना पाहून ते शाळाधिकारी प्रथम हासले. कारण, ह्याचें वय लहान दिसले. परतु काहीं प्रश्नोत्तरे होताच त्याना कळून चुकले की, वय लहान असले तरी मुलगा तरतरीत व बुद्धिमान् आहे. आणि पुढें तर अधिकाऱ्यांची खात्री झाली की, नेने मास्तरापेक्षां त्यांचा बदली मनुष्य विद्वत्तेत काकणभर उजवाच आहे. ही नोकरी किती दिवसांपुरती होती हे समजलेलें नाही. वासुदेवशास्त्री यास पुणें येथें दरमहा १५।२० रु. पगार मिळूं लागला, हे ऐकून आजोबा महादेवशास्त्री यांस मोठा आनंद झाला व वासुदेवशास्त्र्याच्या स्वावलंबनाचे त्यास मोठें कौतुक वाटले. महादेवशास्त्री पुढें दोन वर्षांनी म्हणजे स. १८८०।८१ च्या सुमारास वारले.

**काव्येतिहाससंग्रहाशीं संबंध**—वासुदेवशास्त्री पुण्यास गेल्यावर त्यानी पुणे येथील प्रसिद्ध वैय्याकरणी **पंडित नारायणशास्त्री गोडबोले** याजपाशी **मनोरमा** व **शब्दरत्न** या उच्च व्याकरण-ग्रंथाच्या अध्ययनास प्रारंभ केला. यापूर्वी साताऱ्यास त्याचा सिद्धातकौमुदीचा व्यासंग उत्तम प्रकारें झालेला होताच. पुढे '**शेखरा**'दि ग्रंथ ते वाचणार होते, परंतु पोट आणि पठनप्रेम याचा मेळ बसेना. करिता पाठशालीय अभ्यासक्रम सोडून जमेल तसे स्वतंत्र वाचन करण्याचा मार्ग त्यांनी स्वीकारिला व त्यात पाणिनीय व्याकरणसूत्रावरील '**काशिकावृत्ति**' हा ग्रंथ त्यांनी स्वतःच्या बुद्धीने पाठशाळेताल अध्ययनाखेरीज वाचिला.

याशिवाय, कित्येक काव्यनाटकाचाहि अभ्यास त्यांनी स्वतंत्रपणे अत्यंत परिश्रमपूर्वक केला. 'काव्येतिहाससंग्रह' मासिकाच्या संस्कृत भागाचे सपादन **कै विष्णुशास्त्री चिपळूणकर** करीत असत. ते ह्या वेळीं पुणे हायस्कूलमध्ये शिक्षक होते. त्याची बदली रत्नागिरीस झाली (स. १८७८) त्या मुदतीत विष्णुशास्त्री याच्या गैरहजिरीत या भागाचें संपादन करण्याचें काम वासुदेवशास्त्री याजकडे आलें ते त्यानी अतिशय उत्तम प्रकारे चालविलें होते. ह्या कामगिरीमुळें त्याच्या बुद्धीचा व्यापकपणा व तिची कुशाग्रता प्रथमच लोकनिदर्शनास आली आपण पुढें अमुक काव्य लिहूं किंवा मोठे नाटककार होऊं असें गुहागरच्या रानावनात भटकत असता केलेल्या काव्य-नाटक-रचनेच्या प्रसंगी शास्त्रीबुवास क्वचितच वाटले असेल. तसेंच, सातान्यास 'महाराष्ट्रमित्रा' चें गुप्त संपादकत्व करीत असता, आपण स्वत ७।८ हजार पृष्ठें ऐतिहासिक मजकुराची संपादून छापवून प्रसिद्ध करूं किंवा नामांकित ग्रंथकार होऊं असे त्याच्या मनीमानसीसुद्धा आले होते किंवा कसे कोणास ठाऊक ? पण, त्यानी कवि, नाटककार, इतिहाससशोधक, संपादक आणि ग्रंथकार व्हावे अशीच ईश्वरी योजना असली पाहिजे, कारण, पुण्याच्या वातावरणांत येताच हळूं हळू असे विचार त्यांस स्फुरूं लागले होते व क्वचित् तसे उद्गारहि केव्हा केव्हा त्याच्या तोंडून निघत उपर्युक्त काव्येतिहाससंग्रहातील संस्कृत भागाचें संपादन हें केवळ या विचारजागृतीचे पहिलें दृश्य फल होय व मराठी मासिकात त्यानीं लेख लिहूं लागण्याचा 'श्रीगणेशा' येथूनच झाला असावा.

**पुण्यांतील ओळखी**—पुण्यास आल्यावर आस्ते आस्ते त्या काळातील पुण्याच्या विद्वान् मंडळींशी शास्त्रीबुवांच्या ओळखी होऊं लागल्या. **कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, कै. जनार्दन बाळाजी मोडक, कै. रा. ब. काशिनाथ नारायण साने** यांचा परिचय त्यांस

प्रथम काव्येतिहाससंग्रहामुळे झाला असावा. रा. ब. साने व खरेशास्त्रीबुवा यांचा हा जडलेला स्नेहबंध दृढतर होत जाऊन आमरण कायम होता. उभयताच्या ठिकाणी इतिहाससंशोधनाची आस्था असल्यामुळे परस्पर आदरभाव चागला वसत होता. ह्यांखेरीज **प्रो. जिनसीवाले व विद्वद्वर्य कृष्णशास्त्री चिपळूणकर** हेहि खरेशास्त्रीबुवांवर मोठा लोभ करीत. प्रो जिनसीवाले याना वादविवाद करणारे पाणीदार तरुण फार प्रिय वाटत. त्याना आपल्या जुन्या संस्कृतीचाहि मोठा अभिमान असे. आणि या समानगुणास्तव ते खरे याजवर फार प्रेम करीत. कृष्णशास्त्री चिपळूणकर याना तर खरे आपल्या मुलाप्रमाणेच वाटत. त्यानी एकदां खरे यास विचारिले "वासुदेवशास्त्री, तुम्ही पुढे काय करणार ?" खरे यानी चटकन् उत्तर दिले, "**ग्रंथलेखन**" कृष्णशास्त्री यांनी स्वत. मराठींत पुष्कळ ग्रंथलेखन करून अनुभव घेतला असल्यानें त्यानी खरेशास्त्र्याच्या बेताचा निषेध पुढील शब्दानी केला:-" अहो, काय वेड आहे ! मराठी भाषेत ग्रंथ लिहून त्या योगे पोट भरेल अशी स्थिति येण्यास अद्यापि बहुत वर्षे गेली पाहिजेत. शहाणे असाल तर इंग्रजी शिका, बुद्धिमान् आहा, चागले वकील वगैरे व्हा. मग हौस म्हणून हवेंतर ग्रथलेखन करा" कृष्णशास्त्री सर्वसामान्य सिद्धात बोलले, व द्रव्यदृष्टया इतिहासप्रकाशनाच्या कामी खरेशास्त्र्याना या कटु सत्याचा अनुभव पण आला! तथापि, नावलौकिक मिळविण्याच्या दृष्टीने खुद्द कृष्णशास्त्र्याचे चिरंजीव विष्णुशास्त्री व पुढे वासुदेवशास्त्री या उभयतानी '**क्रियासिद्धिः सत्त्वे भवति महतां नोपकरणे**' हा सिद्धांत आपल्या कृतीने प्रस्थापित केला, हे आता सूर्यप्रकाशाइतके सर्व महाराष्ट्रास महशूर झाले आहे. **कै. लो. टिळक, कै. आगरकर, कै. गणेश वासुदेव जोशी** ऊर्फ **सार्वजनिक काका** याच्याशीहि खरेशास्त्रीबुवा यांचा अति निकट संबंध आला तो कां व कसा हें पुढें ओघानें येणारच आहे.

ह्यांच्याशिवाय रा. **श्रीधर विठ्ठल दाते**, रा. सा. **माधवराव कुंटे**, हेड्मास्तर, पुणे हायस्कूल, इत्यादि कर्ती, सुशिक्षित व पुढें आलेली बहुतेक माणसें खरेशास्त्रीबुवाना चागलें ओळखीत.

**स्वदेशी हरिदास—सार्वजनिक काकांचे स्वदेशीचे वेड—अत्युत्कट प्रेम—प्रसिद्ध आहे.** त्यांनी स्वदेशी धंद्याच्या उत्तेजनार्थ व प्रसारार्थ काही कीर्तनें बसविलीं होती. शिळाप्रेसवर छापलेले अशा कीर्तनसंग्रहाचे एक जुने चोपडे आमच्या पाहण्यांत आले आहे. काकानी शास्त्रीबुवाना ही कीर्तने करण्यासंबंधी भीड घातली व शास्त्रीबुवानी ती गोष्ट मान्य केली. खरेशास्त्री कीर्तनास उभे राहिले म्हणजे काका त्याच्यामागें उभे राहून त्यांची साथ करीत असत. अर्थात्‌च लोकाना या गोष्टीचें कौतुक वाटे. व आतां जसे राष्ट्रीय विचाराचे व स्वदेशीवर प्रेम करणारे लोक आपल्या वळणाचा हरिदास उत्सवादि प्रसंगी शोधितात व त्यासच कथेस आणितात, त्याप्रमाणे तेव्हां देखील लोकप्रवृत्ति अशी असणें संभवनीय आहे ते कसेहि असो. या स्वदेशी-कीर्तन-मडळीस एकदां बाहेरगावचे निमत्रण आलें.

**उरवडें येथें कीर्तन व वासुदेव बळवंताशीं प्रसंग**—पुण्याच्या पश्चिमेस १३।१४ मैलावर **उरवडे** नावाचा एक गाव आहे. तेथील '**पोतनीस**' उपनामक कोणी गृहस्थ खानदानी, प्रसिद्ध घराणदार होते. त्यांजकडे श्रीरामनवमीचा उत्सव मोठा थाटाचा होत असे. अन्नसंतर्पण ५।४ हजार पान होई. तेथें ही मंडळी कथेस गेली. कथा संपली, स्वयपाक सिद्ध झाला होता, माणसें जमूं लागलीं, मंडपात पानें माडण्याची गडबड सुरू होती. इतक्यांत त्या गावाच्या आसपास शिंग वाजलेलें ऐकूं आलें. तो काळ वासुदेव बळवंताच्या बंडाच्या धामधुमीचा होता. शिंगध्वनि हे वासुदेव बळवंताच्या आगमनाचे चिन्ह समजलें जाई. तो प्रथम भयसूचक शिंग वाजवून मग गांवावर हल्ला करीत

असतो, असा त्याचा परिपाठ असल्याचें गांवोगांवीं लोकांना ठाऊक झालें होते. असो; शिंग वाजलेलें ऐकूं आलें. मग काय ? कुठलें जेवण न् कुठले काय ? रामभट, बचंभट, जीव घेऊन पळत सुटले, सैपाकीण बाया जागचेजागीं पोळपाट लाटणीं टाकून लपून बसल्या, प्राणत्राणपरायण गुजर-मारवाडी, शेट-सावकार, आबालवृद्ध स्त्रीपुरुष या सर्वांचा पोतनिसांच्या वाड्यात मारे तोबा उडून राहिला ! एकच गर्दी; जो, तो ' मला वाचवा ! मला वाचवा ! ' असें दीनवाणीनें म्हणत पोतनिसाच्या पाटीशीं दडूं लागला ! ! घरधन्यास काही सुचेनासे झालें. एकटा विचारा काय करणार ? आमचे चरित्रनायक वासुदेवशास्त्री तेथे नसते तर आणखी काय प्रकार झाले असते कोणास ठाऊक ! तेथें चाललेली सर्व धादल पाहून ते पुढे होऊन म्हणाले, "अहो, तो वासुदेव बळवंत काय वाघ आहे ? त्याजकडे पुढें कोणी तरी जावे, समजुतीच्या दोन गोष्टी सांगून त्यास काही देऊं घेऊ करून वाटेस लावावे म्हणजे झालें !" पण ही धीट शिष्टाई करण्याचे काम त्यास स्वतःच करावे लागलें ! ते न डगमगता नेहमीच्या पोशाकात हातात काठी घेऊन निघाले, व शिंगाच्या आवाजाच्या धोरणाने गावाबाहेर आले. तेथे थोड्या तपासाअतीं कळून आले की, गावाबाहेर **श्रीअंबिकेच्या** देवालयांत महापूजा बांधिली होती, त्या पूजासमारंभाप्रीत्यर्थ गावच्या गुरवाने शिंग वाजविले होते. हा पुढचा मजकूर साधा होता हे निराळे. परंतु वासुदेव बळवंतास भेटणे हा निकराचा प्रसंग होता ह्यात शंका नाही. असे असता त्या गावच्या हजारो लोकांमधून एकहि पुरुष पुढें आला नाहीं व शास्त्रीबुवा परस्थ आणि प्रतिष्ठित पाहुणे—हरिदास—म्हणून तेथें गेलेले असून ते त्या संकटास तोंड देण्यास पुढे झाले व त्यायोगें त्यांची समयसूचकता व त्यांच्या अंगचे धाडस हे गुण उत्कटतेने प्रकट झाले. हें त्यांचे निःस्वार्थी धाडस अपूर्व होते, असें कोणास वाटणार नाही ?

**राष्ट्रीय त्रिमूर्तींशीं सहकार्य**—तत्कालीन महाराष्ट्रांतील राष्ट्रीय त्रिमूर्ति—**कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक** व **आगरकर** यांनी स्वतंत्र शिक्षण-संस्था काढण्याचे ठरवून ता. २ जानेवारी स. १८८० इ. रोजी '**न्यू इंग्लिश स्कूल**' नांवाची संस्था पुण्यास स्थापन केली. त्या वेळी पहिल्या दिवशीच्या शिक्षकात वासुदेवशास्त्री खरे यांचे नाव आहे. असे सागतात की, हायस्कूलमधील मुलाची मने वळवून त्याना ह्या नवीन शाळेंत येण्याविषयीं उपदेश करण्याच्या कामीं खरेशास्त्री यांचा पुढाकार असे. ह्याच्या मुळाशी प्रमुख त्रिवर्ग संस्थापकांप्रमाणें त्याच्या अंगचे स्वातंत्र्यप्रेम, राष्ट्रीयत्वाची तीव्र जाणीव व उज्ज्वल स्वाभिमान हेच गुण प्रामुख्यानें असले पाहिजेत. कारण, शास्त्रीबुवांच्या काव्यात, नाटकांत व इतिहाससंशोधनाच्या प्रयत्नात आणि अखंड इतिहासपरिशीलनाने बांधिलेल्या अनुमानात व ठरविलेल्या सिद्धांतांत त्यांचे हेच गुण स्थळोस्थळीं प्रकट झालेले दिसतात. न्यू इंग्लिश स्कूल-मध्यें शास्त्रीबुवा फक्त अकराच महिने होते त्या वेळच्या त्याच्या विद्यार्थ्यांपैकीं एक ठळक नांव **प्रो. पानसे** याचें ऐकूं[1] येते. उपर्युक्त राष्ट्रीय त्रिमूर्तींनें सुरू केलेला दुसरा उद्योग म्हणजे '**केसरी**' वर्तमानपत्र होय. केसरीस '**केसरी**' हे नांव खरेशास्त्रीबुवा यानीच सुचविलें व तेंच सर्वांस आवडलें. '**केसरी**' पत्रावरील जुना ध्येयदर्शक श्लोक '**स्थितिं नो रे दध्याः क्षणमपि०**' इत्यादि त्यानीच सुचविला व तो विष्णुशास्त्र्यांनींहि पसंत केला. स्वतः विष्णुशास्त्र्यांनीं दुसऱ्या एका श्लोकाची निवड केली होती, पण खरेशास्त्री यांचा श्लोक त्यांस जास्त

---

१. प्रो. राजवाडे, प्रो. आर्ते, रा. मो. साने, कै. हरिभाऊ आपटे वगैरे पुढें प्रसिद्धीस आलेलीं विद्वान् व कर्ती माणसें ह्या वेळी हायस्कूल सोडून न्यू. इं. स्कूलमध्ये शिकण्यास आलीं. (रा. आबेकरकृत हरिभाऊ आपटे चरित्र पृ. १०).

बरा वाटला असें सांगतात. शनिवार पेठेतून आप्पासाहेब मांडे याच्या शिवाजी छापखान्याच्या जागेंतून बुधवारांतील मोरोबादादांच्या वाड्यांत एका रात्रींत टाइपाच्या पेट्या वगैरे छापखान्याचे सामान खांद्यावरून वाहून नेणाऱ्या मंडळीत शास्त्रीबुवाहि होते व ते त्यासंबंधीं वृत्तांत सागत असता मोठ्या अभिमानाने बोलत. विष्णुशास्त्री व आगरकर हे फार दिवस जगले नाहींत. परंतु टिळक व शास्त्रीबुवा दोघेहि साठी उलटल्यानंतर अवघ्या चार वर्षांच्या अंतरानें वारले. त्याचा स्नेह कसा होता याचे वर्णन पुढें एका स्वतंत्र प्रकरणांत केलेलें आहे.

**रा. सा. कुंटे व न्यू इं. स्कूल**—रा. सा. माधवराव कुंटे हे पुणे हायस्कूलचे हेडमास्तर होते आणि विष्णुशास्त्री तेथेंच असि. मास्तर होते. विष्णुशास्त्र्यांना सरकारी नोकरीचा पाश मनापासून नको होता. कुंटेमास्तराबरोबर त्याचे काहीं कारणावरून खटके उडूं लागले होते. त्यानतर पुढे विष्णुशास्त्री यांची रत्नागिरीस बदली झाली, तीमुळें विष्णुशास्त्री यानीं पुण्यास सुरू केलेल्या उद्योगाच्या बाबतींत त्यास मोठी अडचण पडूं लागली. ही पारतंत्र्याची रुपेरी बेडी त्यांस असह्य झालेली होती. स्वदेशोद्धारासाठीं कांही तरी केलें पाहिजे ही तळमळ त्याना चैन पडूं देईना. अखेर टिळक, आगरकर, नामजोशी इत्यादींच्या सहाय्यानें त्यानीं न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना केली. ह्या मंडळींच्या स्वार्थत्यागानें लोक-प्रेमाचा ओघ साहाजिकच ह्या नवीन शाळेकडे वळून त्याचा हायस्कूलमधील विद्यार्थ्यांच्या सख्येवर चांगलाच परिणाम झाला. कुंटे मास्तर मोठे विद्वान् खरे, परंतु ते ह्या नवीन शाळेच्या चालकांना तुच्छतेनें 'रोमँटिक पोरें' ह्मणून नावें ठेवीत. सारांश, त्यांचा न्यू इं.

---

१. ज्ञानप्रकाश, जून १९२४, खरे-मृत्युलेख, पहा. २ केळकरकृत टिळकचरित्र, भाग १ ला, पृष्ठ ११४।११५ वरून.

स्कूलवर मोठा घुस्सा होता. या शाळेंत शिक्षक असतां वासुदेवशास्त्री पुण्याच्या ' **वेदशास्त्रोत्तेजकसभे** ' च्या परीक्षेस बसले होते. त्यांस ह्या परीक्षेचे २ ऱ्या नंबरचे बक्षीस रु. १५ मिळालें. हा बक्षीससमारंभ रा. सा. कुंटे ह्यांच्या हस्तें झाला. अध्यक्ष या नात्यानें त्यांनीं संस्कृतमध्यें भाषण केले, त्याचा प्रारंभ ' हरिस्य कृपया ' असा झाल्यामुळें खरेशास्त्री यांस आलेले हांसूं आवरले नाही. ते अध्यक्ष कुंटे यांना ऐकूं गेले. त्यांनी ' कोण हासला ? ' असे विचारिताच यानीं उठून त्याची शंका दूर केली. ह्यास पाहून न्यू इंग्लिश स्कूलविषयीं विकारवश असलेल्या मास्तरसाहेबांस काय वाटलें असेल तें असेल

**रा. सा. कुंटे व खरेशास्त्री**—खरेशास्त्री याना हांसें येण्याचे कारण मात्र वेगळे होते. पुण्यास पंडित नारायणशास्त्री गोडबोले याजपाशीं शिकत असता ते त्याच्या समागमे एकदा रा. सा. कुंटे यांच्या घरीं गेले. बोलता बोलतां कुंटे, प्रसिद्ध टीकाकार **मल्लिनाथ** याजवर अवास्तवपणें घसरले आणि त्याच्या टीका हे मूर्खपणाने केलेले व्यर्थ परिश्रम आहेत असें म्हणून मास्तरसाहेब उपहासार्थ खूप हांसले ! खरेशास्त्री यांचे गुरुजीहि हासले. खरे यांना मात्र अतिशय राग आला होता. रा. सा. कुंटे याच्या येथून बाहेर पडण्याचा अवकाश, रस्त्यांतच त्यांनीं गुरुजींस प्रश्न केला कीं, ' ते एक हांसले ते हासले, पण आपणहि मल्लिनाथास कसे हांसला ? मास्तरांचा निषेध करणें तर बाजूसच राहिलें ! ' गुरुजी म्हणाले, ' अरे तो हांसला मल्लिनाथाला, पण मी हांसलो या नूतन पंडिताला !! ' हे ऐकतांच तडफदार तरुण खरेशास्त्री यांचे समाधान झाले अगाधज्ञानी मल्लिनाथाला बेजबाबदारपणें हांसणाऱ्या सुशिक्षित गृहस्थाने सभेत बोलताना अगदीं प्रारंभींच ' हरिस्य ' सारखी चूक केली तर कोणाला का बरें हासूं येणार नाहीं ?

———

# मिरजेस आगमन
# व
# शिक्षक या नात्यानें त्यांची कामगिरी

---

**मिरजेस स्थिर कां झाले ?**—स. १८८० च्या अखेरीस मिरज येथील इंग्रजी शाळेत एक शास्त्री नेमावयाचे ठरलें. त्या जागेसाठी त्या वेळचे मिरजेचे स्टेट कारभारी रा. ब. यशवंत मोरेश्वर केळकर ह्यांनी खरेशास्त्रीबुवाना मिरजेस मागवून घेतले. व ता. २८ नवंबर स. १८८० इ. रोजीं द. म. रु. ३० वर त्यांची नेमणूक झाली. व ते वरील तारखेस मिरजेच्या नोकरीवर रुजू झाले. तथापि, आरंभापासून स्वातंत्र्यप्रिय असलेली त्यांची वृत्ति आणखी कांही वर्षे मिरजेस स्थिर झाली नाही. मध्यंतरीं ते उज्जयिनी वगैरे भागांकडे कांहीं महिने रजा घेऊन गेले होते. तेव्हां जमल्यास तिकडेच राहण्याचा त्यांचा मानस होता असें सांगतात. पण, '**मळे संस्थानांतील दप्तरा**'सारखा **ऐतिहासिक कागदपत्रांचा अपरंपार सांठा** त्यांना अकस्मात् लाभला, व जणू काय, '**याच्याचकरितां त्यांचा जन्म**' असे वाटावें, इतक्या कल्पनातीत रीतीनें त्यांचे चित्त तेथें जडून गेलें ! आणि मग मिरज सोडण्याचा विचार त्यांच्या मनास कधी शिवलासुद्धां नाही ! ! त्यांच्या ह्या स्थिरतेचा वास्तविक लोहचुंबक हाच असावा. व्यावहारिक दृष्टीने आणखीहि एक कारण संभवतें. त्या वेळची मिरजेची राहाणी अतिशय स्वस्ताईची होती. घरभाडे, दूधदुभतें, भाजीपाला, सर्व जिन्नस स्वस्त असत. ह्यामुळें खालसातीत द. म. रु. ७५ मिळण्याचा योग आला असतां त्यांनीं ती नोकरी पतकारिली नाहीं. तो प्रकार असाः—

**मे. रसेलसाहेब व खरेशास्त्री**—एकदां, दक्षिणभाग इन्स्पेक्टर-मे. रसेलसाहेब मिरजेस शाळा तपासण्यासाठीं आले. शास्त्रीबुवा मिरजेस आले तेव्हां, त्यांना इंग्रजी मुळींच येत नव्हतें साहेब आले त्या सालीं ते नुकतेच इंग्रजी शिकूं लागले होते. इन्स्पेक्टर शाळेंत आले तेव्हा हेड्मास्तर नव्हते, म्हणून किंवा काही अन्य कारणानें त्याशी बोलण्याचा शास्त्रीबुवांस प्रसंग पडला. शास्त्रीबुवा साहेबाशीं आपल्या मोडक्यातोडक्या इंग्रजी भाषेंत बोलूं लागले. साहेब त्या वेळीं कांहीं म्हणाले नाहींत. परंतु हेड्मास्तर यांजपाशीं साहेबांनीं विचारपूस केली तेव्हा, हे संस्कृतशास्त्री आहेत असें कळून आल्यामुळे ते गप्प बसले. पुढच्या वर्षीं तेच साहेब पुनः शाळा तपासण्यास मिरजेस आले त्या वेळी शास्त्रीबुवाची इंग्रजी भाषेतील प्रगति पाहून ते फारच खुष झाले. त्यांनीं एकदां बोलता बोलता खरेशास्त्री यांस प्रश्न केला कीं, ' शास्त्री-बुवा, तुम्हास कृष्णशास्त्री यांचें मराठी आवडतें का विष्णुशास्त्री याचें ? ' ह्या प्रश्नास शास्त्रीबुवांनीं पट्कन् ' **विष्णुशास्त्री यांचें मराठी मला आवडते** ' असें उत्तर दिलें. ह्यावरून ' हा ब्राह्मण निखट आहे ' अशी रसेलसाहेबांची समजूत झाली होती, असो. ते साहेब, शास्त्रीबुवाची हुशारी, तरतरीतपणा व बुद्धिमत्ता पाहून त्यांस द. म. रु. ७५ वर खालसा मुलुखांत शास्त्र्याच्या कामावर नेमण्यास तयार होते. परंतु शास्त्रीबुवा तिकडे गेले नाहींत. निमित्त कांहींहि असो, ह्यापुढे शास्त्रीबुवा मिरज येथेंच आमरण राहिले व त्याच्या हातून ' **पानिपतोत्तरकालीन मराठी इतिहासाचा उद्धार** ' **हें महत्कार्य सिद्ध झालें.**

**प्रारंभींची कामगिरी**—शास्त्रीबुवा मिरज हायस्कूलमध्ये संस्कृत-शिक्षक म्हणून आले तेव्हां त्यांस इंग्रजी येत नव्हते. तथापि, हे त्यांचें वैगुण्य विद्यार्थ्यांच्या लक्षांत फारसें कधीं आलें नाही. वर्गांतील नित्यो-पयुक्त आज्ञा–' बी सायलेंट् '–गप्प बसा; ' ओपन् युअर बुक्स् '–

आपलीं पुस्तकें उघडा, ' स्टॅड् अप् '–उभा राहा, इत्यादि त्यांना अवगत होत्या. त्या वेळीं सातव्या इयत्तेंत ' मेघदूत ' काव्य शिकवीत असत. कै. कृष्णाजीपंत फडके याजकडे सकाळीं जाऊन त्यास एक एक श्लोक मराठींत उत्तम प्रकारें सांगावा, त्याचें इंग्रजी भाषांतर सदर फडके यांच्या तोंडून ऐकावें व ते लागलीच आपण त्यांस पाठ म्हणून दाखवावें असा त्यांनीं क्रम ठेविला. फडके यांनी ' ऑल राइट् '–सर्व बिनचूक, असें म्हटलें कीं, २ रा श्लोक, मग ३ रा असे करीत. एकदां ऐकिलें कीं वज्रलेप ! सायंकाळीं शेवटच्या तासास सकाळचे श्लोक वर्गांत इंग्रजी भाषांतरासह बरोबर शिकवीत. कोणी विद्यार्थी मध्येंच ' स्पेलिंग् '–इंग्रजी शब्दाचा वर्णानुक्रम–विचारी, त्यास ' रिफर् इट् टु दि डिक्शनरी ' ते कोशांत पहा, असें ठराविक उत्तर मिळे. पण, नंतर कांहीं वर्षांनीं त्यांची इंग्रजी भाषेची तयारी उत्तमच झाली.

मिरजेची इंग्रजी शाळा १८८५ मध्ये रजिस्टर होऊन हायस्कूल् या सदराखालीं दाखल झाली. त्यापूर्वी येथील विद्यार्थी मॅट्रिक्युलेशन् परीक्षेस बसत असत. परंतु, त्यांस फॉर्म मिळण्याची वेगळी सोय करावी लागे. स. १८८१ साली शास्त्रीबुवांच्या हाताखालीं शिकलेला एक विद्यार्थी–रामचंद्रपंत ऊर्फ बाणोपंत खाडिलकर, **माजी हेडमास्तर जमखिंडी हायस्कूल** हे मॅट्रिक् पास झाले. गोविंदराव पेठे व बाळू कानिटकर, माधवराव केळकर ( **हल्लीं रि डे. कलेक्टर, धुळें** ) हे विद्यार्थी हायस्कूल् होण्यापूर्वी मॅट्रिक्च्या परीक्षेस गेले व पास झाले. 'खतीप' आडनांवाचा एक मुसलमान विद्यार्थी स. १८८५ त पास झाला. परशियन् भाषा शिकण्याची मिरज हायस्कुलांत सोय नसल्यामुळें मुसलमान विद्यार्थ्यांसहि ह्या शाळेंत संस्कृतच शिकावें लागते. खतीप यांस संस्कृत

---

१. उत्तम इंग्रजी जाणणारे त्या वेळचे मिरजेंतील एक सद्गृहस्थ.

चांगले येत असे. सन १८९२ साली रा. ब. चित्रे, स्टेट कारभारी, मिरज, यांनी शाळा पाहून दिलेल्या शेऱ्यांत शास्त्रीबुवांच्या कामगिरीबद्दल "Shastribua deserves special mention" असा स्वतंत्र उल्लेख करून त्याचा गौरव केला आहे.

**मारकट मास्तर**—तरुणपणीं शास्त्रीबुवांचा स्वभाव अत्यंत तापट होता. शिक्षक या नात्याची दृष्टि लावून बोलावयाचे झाल्यास मारकट मास्तर म्हणून त्यांची प्रसिद्धी होती. त्यांच्या पहिल्या पहिल्या एकदोघां विद्यार्थ्यांस विचारितां त्यांनी त्यांच्या शिकविण्यापेक्षां माराचेंच वर्णन जास्त केलें! तथापि, शिक्षणपद्धतीसंबंधी हा त्या विद्यार्थ्यांचा अभिप्राय खरा नाही, हे पुढील प्रकरणांमधून साधार व स्पष्टपणें विशद केले आहे. सामान्यतः त्या काळचे बरेच शिक्षक माराच्या बाबतीत जरासे बेजबाबदारपणेच वागत असत सांगावयाचें हेच की, या बाबतीत शास्त्रीबुवांचें वागणे मोठेसे अपवादात्मक होते असे नव्हे. उलट, शास्त्रीबुवा राग आला म्हणजे त्या तावांत अतिशय मारीत हें खरें, पण मागाहून त्यांना त्याबद्दल फार वाईट वाटत असे. आतां, त्या वेळचे मास्तर जितके मारीत तितकें आमच्या वेळचे मारीत नसत. आणि त्यापुढें हे प्रमाण त्याहून कमी होऊन अलीकडे त्याहिपेक्षा कमी असे होत आलें आहे, ह्याचे कारण, शाळेंत विद्यार्थ्यांस शारीरिक शिक्षा सहसा द्यावयाची नाही असा सरांस निर्बंध शिक्षकवर्गावर बहुधा सर्व शाळांमधून घालण्यांत आला आहे हेच असावें. शास्त्रीबुवांच्या ह्या तापटपणांत वयोमानानुसार पुढें पुढें फरक होत गेला. प्रस्तुत लेखक स. १९०४ पासून गुरुवर्य खरेशास्त्री यांस शिक्षक म्हणून ओळखीत आहे. आमच्या वेळी त्यांचा रागीट स्वभाव इतका पालटला होता की, कधी काळीं ते फार संतापी होते असें कोणी म्हटल्यास तें आम्हांस खरें देखील वाटते ना! त्यांचा देह भव्य,

मुद्रा उग्र, हातीं धरावयाची काठी मोठी असे व ती वर्गांत बरोबर आणून टेबलावर आडवी ठेवीत. आवाज मोठा आणि शिकवीतसुद्धा मोठ्याने बोलून. ह्या सर्व प्रकारावरून त्याची भीति मात्र वाटे. पण, त्यांनीं कधीं कोणास मारिले नाही. फारच रागावले तर ' अरे बैलोबा, ' ' स्टुपिड् '--मूर्ख, किंवा ' ए बंगूलर्–' अरे गडबड्या–धांदल्या–असे कांहीं तरी ते म्हणत असत.

**निर्भीड शिक्षक**—शास्त्रीबुवा मिरजेच्या इंग्रजी शाळेंत शिक्षकाचें काम करूं लागल्यानंतर पहिल्या १०।१२ वर्षांत घडलेली त्यांच्या निःस्पृह वर्तनाची एक गोष्ट मोठी कौतुकास्पद व त्याच्या धैर्याबद्दल आश्चर्य वाटण्याजोगी आहे. मिरजेच्या शेजारच्या एका छोट्याशा संस्थानचे युवराज या हायस्कूलमध्यें शिकावयास येऊ लागले. आधीं मुलें म्हटली कीं, त्यांचा स्वभाव अल्लड असतोच, परंतु बहुतेक सामान्य माणसे आपल्या मुलांचा हा स्वभाव पालटण्याचा प्रयत्न करीत असतात. पण, जहागीरदाराची मुले, शागीर्द, हुजरे, इत्यादि क्षुद्र दर्जाच्या हाजीहाजीखोर नोकरानी त्यास त्याच्या मोठेपणाच्या भलत्याच कल्पना करून दिल्या असल्या कारणानें बहुधा मोठी गर्विष्ट व घमेंडखोर बनलेली असतात. एकदा शास्त्रीबुवा इतर विद्यार्थ्यांप्रमाणें या श्रीमत पुत्रास " + + साहेब, आज तुम्हीं अभ्यास केला नाहीं!" म्हणाले. त्यावर + + साहेब उत्तरले " मर्जी आमची ! " मग काय विचारता ? शास्त्रीबुवांनीं त्यास ह्या अपराधाबद्दल वर्गाबाहेर उभें राहण्यास फर्माविले. त्यानी ऐकिलें नाही तेव्हां, शिपायाकडून त्यांनीं त्यास बाहेर जाण्यास भाग पाडिलें ! ! हेड्मास्तर व इतर शिक्षक चपापून जाऊन " शास्त्रीबुवा, हें काय करितां ? पुढच्या परिणामाचा विचार केला आहात काय ? " वगैरे बोलू लागले शास्त्रीबुवांनीं " नोकरी जाईल या भीतीनें मी वर्गांत कोणालाहि गैरशिस्त वागूं

देणार नाहीं, " असा खडखडीत जबाब दिला सदर लक्ष्मीपुत्राचे आई-बाप मात्र सुज्ञ होते. + + साहेबांच्या मातुश्रींनी आपल्या मुलाकडून शास्त्रीबुवाची क्षमा मागविली, स्वतः त्यांच्या न्याय्य व निःस्पृह वागणुकीची त्या बाईंनीं प्रशंसा केली, आणि त्यास प्रार्थना करून आपल्या ह्याच मुलास घरींहि शिकवावयास नेमिलें.

**संस्कृत शिक्षणाचा लौकिक**—मिरजेस आल्यानंतर प्रथम काही वर्षें ते विद्यार्थ्यांना आपल्या घरी देखील शिकावयास बोलावीत. तेथे ते विद्यार्थ्यांशी ममतेने वागत. त्याच्या शिक्षणाची विद्यार्थ्यांवर चागली छाप पडे. त्यामुळे प्राक्कालीन व अलीकडील अशा सर्व विद्यार्थ्यांची त्यांच्यावर सारखीच भक्ति होती. संस्कृत अगर मराठी कोणताहि मुख्य विषय शिकवीत असता त्याच्यापासून अवातर माहिती इतकी विपुल उपलब्ध होई की, ती सारी ध्यानात धरील तो मनुष्य चागला बहुश्रुत गणला जावा. आणि एकादा चलाख बुद्धीचा विद्यार्थी त्या माहितीचा उत्तम तऱ्हेने स्वत स फायदा करून घेई. इतकेंच काय, परतु अमुक विद्यार्थी मिरज हायस्कूलमधील आहे असे समजल्याबरोबर सामान्यतः त्याच्या संस्कृतच्या ज्ञानाबद्दल कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजमधील संस्कृतचे प्रोफेसर गौरवाचे उद्गार काढीत. एकदां ( बहुतेक स. १८९० सालची गोष्ट ) राजाराम कॉलेजातील सं. प्रो. **शिवराम बापुजी परांजपे** हे मिरजेच्या भावे आडनावाच्या विद्यार्थ्यास उद्देशून म्हणाले, " अरे, तूं मिरज हायस्कूलचा वासुदेवशास्त्री खरे याचा शिष्य व संस्कृतमध्यें नापास ! हें कसे ? मिरज हायस्कूलचा विद्यार्थी संस्कृतात नापास झालेला आम्हांस सहसा ठाऊक नाहीं ! ! " प्रो. पराजपे आपला दहा वर्षांचा अनुभव वरील उद्गारांत किती ठासून प्रदर्शित करीत आहेत हें येथें लक्ष्यात घेण्याजोगें आहे. अस्तु. काव्य असो, नाटक असो, शास्त्रीबुवा तें अत्यंत रसाळपणे शिकवीत. प्रतिपाद्य अध्यापन-

विषयाशी समरस होऊन जाणें हा त्यांच्या शिक्षणपद्धतींतील विशेष होय. कारण, केंव्हा केंव्हां 'उत्तररामचरित' काय, 'वेणीसंहार' काय किंवा 'मुद्राराक्षस' काय, एका श्लोकापासून प्रारंभ करून सबंध अंकच्या अंक ते साभिनय पाठ म्हणत. आणि तास केंव्हा निघून जाई तें समजत देखील नसे. व हा एकंदर देखावा मोठा चित्ताकर्षक असे. 'शास्त्रीबुवाची शिक्षणपद्धति चागली असून तिचा मला माझ्या पुढील अभ्यासक्रमात चागला उपयोग झाला,' अशा अर्थाचा अभिप्राय प्रो. पानशे यानीं बोलून दाखविला आहे. आणि रा. सा. माधवराव केळकर यानीं ४।५ वर्षे शास्त्रीबुवांच्या शिक्षणाचा शाळेंत व घरीं अनुभव घेत-लेला असून ते सुद्धा त्याविषयी अद्यापि फार प्रशंसा करितात.

**विद्यार्थ्यांशीं मनमोकळेपणा**—राग आलेला अवसर वगळला तर पूर्वी काय किंवा अलीकडे आमच्या वेळीं काय, शास्त्रीबुवा मोठ्या कळकळीनें व प्रेमळपणें शिकवीत. व आम्हा विद्यार्थ्यांना ते ममतेने व गोडीनें वागवीत. प्रसंगोपात्त ते विद्यार्थ्यांशीं विनोदहि करीत. वर्गांत शिकवीत असता गुरुवर्य शास्त्रीबुवा शिकवावयाचे संस्कृत, मराठी, वगैरे श्लोक यथास्थित मोकळेपणाने व मोठ्याने म्हणत व मुलानीहि ते तसेच म्हणावे अशी त्यास मोठी हौस असे. यास्तव ते आग्रहपूर्वक विद्यार्थ्यांस श्लोक म्हणावयास लावीत त्यांच्या मनाप्रमाणे श्लोक म्हटला कीं, त्यास मोठा संतोष होऊन ते आनंदभरित होत. पण जर कोणी लाजाळू, रडतराऊ, रडक्या पडक्या स्वरानें, अशुद्ध, अपस्वर, किंवा वृत्त-छंद सोडून श्लोक म्हणू लागला कीं, त्यांचा एक ठराविक श्लोक असे तो त्या मुलाप्रमाणें म्हणूं लागून त्याची ते थट्टा करीत. 'मुके आंधळे पागळे आणि थोटे। अशा दुर्बळांना करा साह्य मोठें॥ ३०' त्या मुलाप्रमाणे स्वर काढून व अंगविक्षेप करून ते म्हणत व वर्गांत हंशा पिके. थट्टेचा हेतु अर्थातच त्या विद्यार्थ्याची सुधारणा

व्हावी हाच असे. आमचे मोरूभाऊ आगाशे यांस 'मोरा' व नमू गोखले यांस 'नर्मदा गणपति' असें विनोदानें म्हणत, व त्यांस केव्हां केव्हां 'उजव्या सोंडेचा कीं डाव्या सोंडेचा?' असेंहि गमतीनें विचारीत. ही टोपण नावें कधीं लडिवाळपणानें ठेविलेली तर कधी साभिप्रायसुद्धा असत. उदा.:—नमू गोखले याचा वर्ण गौर, मुखावर लाली व नाक जरा विशेप उंच व लांब असल्यामुळें हें नाव त्यांस साजेसेंच होतें. एकदां एकाच वर्गांत दोघे भाऊ शिकत होते. दोघांचीहि गणित विषयात बिलकुल मति चालत नसे. एके दिवशी त्या दोघास उद्देशून शास्त्रीबुवा म्हणाले, 'अरे, तुम्ही अगणित भाऊ आहां!' दोघेहि त्यांच्या तोंडाकडे पाहूं लागले. कारण, त्यांना ह्या बोलण्याचा अर्थच कळेना. वर्गांत कांही चाणाक्ष मुले होती त्यानीं या वाक्यांतील मर्म ताडिले व ती हासूं लागली. थोडया वेळाने त्या दोघा परतु अगणित—गणितज्ञानरहित—भावाच्या डोक्यात गुरुवर्यांचा उद्दिष्ट अर्थ उतरला व त्यानीं आपली दृष्टि खाली—जमिनीकडे—वळविली!

ह्यांखेरीज वर्गांत चालू असलेल्या विषयावरून केलेल्या काव्यमय विनोदाचे १।२ प्रसंग आठवतात ते असे :—मुद्राराक्षस, अं. २ रा, श्लोक १२ वा चालला होता. ह्या श्लोकांतील वर्ण्य विषयांत शृंगाररस प्रधान असून कांही भीतीच्या कल्पनेने तो किंचित् दूषित झालेला आहे. त्यामुळे 'संभोगाभिलाष' नावाचा श्रृंगाराचा प्रकार त्यात साधला गेला आहे.

**वामां बाहुलतां निवेश्य शिथिलं कंठे विवृत्तानना।**
**स्कंधे दक्षिणया बलान्निहितयाऽप्यंके पतंत्या मुहुः॥**
**गाढालिंगनसंगपीडितमुखं यस्योद्यमाशंकिनी।**
**मौर्यस्योरसि नाधुनाऽपि कुरुते वामेतरं श्रीः स्तनम्॥**

अमात्य राक्षस ह्याचा हेर विराधगुप्त ह्या श्लोकात म्हणतो:—

"श्री–नंदराजांची राज्यलक्ष्मी–आपला डावा हात अगदीं सैल असा, कसातरी चंद्रगुप्तराजाच्या खांद्यावर टाकून तोंड फिरवून उभी आहे. चंद्रगुप्त बळेंच तिचा उजवा हात धरून आपल्या दुसऱ्या खांद्यावर ठेवीत असतां तो वरचेवर गळून खाली तिच्या मांडीवर पडत आहे. सारांश, (मनापासून) गाढ आलिंगन देऊन मौर्याच्या–चंद्रगुप्ताच्या–छातीशीं छाती भिडविण्यास नंदांच्या राज्यलक्ष्मीस ज्याच्या उद्योगामुळें अद्यापि भय वाटत आहे तोच हा अमात्य राक्षस–" वगैरे.

हा श्लोक समजावून दिल्यानंतर, नायकाची आलिंगनाविषयी उत्सुकता व नायिकेची त्याच कामी साशंकता व तीमुळे तिच्या मनाचा घाबरेपणा दाखविणारे 'हे चित्र कोणी कुशल चित्रकाराने तयार केले तर ते मोहक दिसेल, नाहीं रे?' असा प्रश्न वर्गातील प्रौढ व ललितकलारसिक अशा एका विद्यार्थ्यास त्यानी केला होता.

२. आणखी एके प्रसंगी, उत्तररामचरित नाटकांतील अंक १ ला, श्लोक २७ वा शिकवीत होते :–

**किमपि किमपि मंदंमंदमासक्तियोगा–।**
**दविरलितकपोलं जल्पतोरक्रमेण ॥**
**आशिथिलपरिरंभव्यापृतैकैकदोष्णो– ।**
**रविदितगतयामा रात्रिरेव व्यरंसीत ॥**

"प्रेमातिशयामुळे अगदी गालाला गाल चिकटवून हळू हळू काही तरी इकडच्या तिकडच्या (अक्रमेण) गोष्टी बोलणाऱ्या व सुतरा दृढ आलिंगनामध्यें एक एक हात गुंतून गेलेल्या त्या दोघाची–सीता व राम यांची–रात्र, किती प्रहर झाले हे ध्यानात न येतां निघून गेली." या श्लोकांतील 'व्यापृतैकैकदोष्णोः'–एक एक हात गुंतून गेलेल्या दोघाची–इत्यादि पदांवरून कांहीं गमतीचा सूचक प्रश्न त्यानी विद्यार्थ्यांस केला. प्रश्नाचा हेतु समजून विद्यार्थी मनांतल्या मनांत हासले !

**सुभाषितें**—मुख्य विषय शिकवीत असतां शास्त्रीबुवा ओघाओघानें सुभाषिते, **भट्टिकाव्यांतील** श्लोक वगैरे पुष्कळ सागत; आणि बोलता बोलतां शब्दादिकांवरून कोट्या, श्लेष, विपुल करीत. ह्यांपैकी शेपन्नासांची स्मृति साधारण सुबुद्ध विद्यार्थ्यांस सहज राहाण्यासारखी ती सोपीं असून कित्येक व्यवहारोपयोगीहि असत. उदाहरणार्थः—

**द्वंद्वो द्विगुरपि चाहं मम गेहे सततमव्ययीभावः ॥**
**तत्पुरुष कर्मधारय येनाऽहं स्यां बहुव्रीहिः ॥ १ ॥**

एक याचक दात्यास विनवितो—" मी सजोड-मी व माझी बायको-असा, दोन गुरे असलेला, व माझ्या घरांत नेहमीच ( खायलाप्यायला ) काही नसते करितां, हे पुरुषा, असे कर्म कर ( देणगी दे ) कीं, ज्यायोगें मी पुष्कळ तांदुळांचा ( खाद्य पदार्थांचा ) धनी होईन. "
( या गोष्टीबरोबर सहा समासांची नावेहि सहज लक्ष्यांत राहतात ).

**राजन् तव यशःकांत्या तिथयः पौर्णिमाः कृताः ॥**
**तस्माद्गृहान् न मे याति तिथिरेकादशी भयात् ॥ २ ॥**

" राजा, तुझ्या यशाच्या तेजानें सर्व तिथि पौर्णिमा केल्या. त्यामुळें भीतीनें एकादशी तिथि माझ्या घरातून बाहेर निघत नाहीं. ( सारांश, दातृत्वादि गुणानी तूं चंद्रापेक्षांहि तेजस्वी आहेस. पण मला मात्र नित्य उपास पडतात. करिता माझेहि दारिद्र्य तूं दूर कर असा भाव.)

**दूये कांताकरं वीक्ष्य मणिकंकणवर्जितम् ॥**
**अतःपरं परं दूये मणिकं कणवर्जितम् ॥ ३ ॥**

एक श्रीमान् म्हणतो:—"बायकोच्या हातांत रत्नजडित कंकणें नाहींत म्हणून मला दुःख होतें." गरीब म्हणतो –"ह्याच्याहिपेक्षां ( माझ्या घरांतले ) धान्यकणरहित मडकें पाहून मला फार मोठें दुःख होतें ! ! "

---

१ कांहीं विशिष्ट मापाचें धान्याचें साठवण,—राजण, डेरा वगैरे.

'मणिकंकणवर्जितम्' यामधील भिन्न भिन्न पदच्छेदामुळें दोन भिन्न अर्थ संभवले. श्रीमंताचे दुःख मानीव, तर गरीबाचे दु ख यथार्थ आहे.

**कंकणं नयनद्वंद्वे कज्जलं करपल्लवे ॥**
**अहो भूषणवैचित्र्यं भोजप्रत्यर्थियोषिताम् ॥ ४ ॥**

"अहो, भोजराजाच्या शत्रूंच्या स्त्रियांचीं हीं विचित्र भूषणे पहा. डोळयांत कंकण व हाताचे ठिकाणीं काजळ!" याची संगति अशी की, भोजराजाकडून मारिल्या गेलेल्या त्याच्या शत्रूंच्या स्त्रिया रडूं लागल्या, अर्थात् त्याच्या डोळयात कं-कण = जलबिंदु-अश्रु-आले. व हातानी त्या डोळे पुशीत म्हणून हातास डोळयातील काजळ लागलें.

**अमुना कुंदकुंजेन सखि मे किं प्रयोजनम् ॥**
**'अमु'ना कुंदकुंजेन सखि मे कि प्रयोजनम् ॥**

"गडे, ह्या कुंदकुंजाला घेऊन मी काय करूं? का म्हणशील तर अमु-मुरहित-कुंदकुंज म्हणजे 'मुकुंद' नाम कृष्णरहित कुंज मला काय करावयाचा?" श्रीकृष्णविरहव्याकुल व्रजांगनेचे हे उद्गार तिच्या मनस्थितीस अनुरूपच आहेत.

**'य' एवादिः 'स' एवांते मध्ये भवति मध्यमः ॥**
**एतत्पदं न जानाति न वेत्ति तृणमप्यसौ ॥ ६ ॥**

"'**य**' हेंच अक्षर आरंभीं व '**स**' हेच अक्षर शेवटी व वर्णमालेपैकी या दोन अक्षरांमधील अगदीं मधलें '**व**' हें मध्यें (**य** र ल **व** श ष **स**) '**यवसं**' हा शब्द ज्याला कळत नाहीं त्याला काडीचेंहि ज्ञान नाहीं!" बरोबरच आहे. कारण, 'यवस' असा जो शब्द साधला त्याचा अर्थ तृण = गवत असाच आहे. या श्लोकाचा सरळ दिसतो तसा अर्थ करीत बसल्यास अर्थ लागणार नाही व तसे करणारा अज्ञानी ठरणार हें उघड आहे.

**ऐतावत्सरासि सरोरुहस्य कृत्यम् ।**
**भित्वांभः सपदि बहिर्विनिर्गतं तत् ॥**
**आमोदो विकसनमिंदिरानिवासः ।**
**तत्सर्वं दिनकरकृत्यमामनन्ति ॥ ७ ॥**

एक विद्वान् अतिथि नाना फडनवीस यास म्हणत आहेः—"सरोवराचें पाणी बाजूला सारून त्यातून बाहेर पडणे—डोकें वर काढणें—इतकेच कमलाचें कार्य. त्याचें उमलणे, त्यांत सुवास भरणें व देवी लक्ष्मीचें वास्तव्य त्यांत होणे हे दिनकराचे कृत्य आहे असे म्हणतात." त्याचप्रमाणे विद्वान् होऊन समाजात पुढे येणे येवढेच विद्वानाच्या हातीं आहे. त्याचा विद्यागुण उजेडात आणून त्याच्या कीर्तीचा प्रसार करणें व त्यास धन देऊन त्याची आपात्ति दूर करणें हे **दिनकराचे—भानूंचें[२]—** काम आहे," हें सुचविले.

**पानीयं पातुमिच्छामि त्वत्तः कमललोचने ॥**
**यदि दास्यासि नेच्छामि नो दास्यासि पिबाम्यहम् ॥ ८ ॥**

"हे कमलाक्षि, तुझ्या हातून पाणी ( घेऊन ) पिण्याची माझी इच्छा आहे. पण, जर तूं दासी असशील तर मला त्याची इच्छा नाही. दासी नसशील तर पितो." दासी+असि = दास्यसि. दास्यसि = देशील असा अर्थ घेतला तर 'देशील तर नको, न देशील तर पितों' असा चमत्कारिक अर्थ होतो.

**अयमांदोलिकादंडः स्कधे किं तव बाधति ॥**
**न तथा बाधते दंडो यथा बाधति बाधते ॥९॥**

---

१. हा श्लोक नाना फडनवीस याच्या जुन्या चरित्रात पृष्ठ १६५ वर आहे. असले श्लोक 'तात्या काकिर्डे' नांवाचा एक चतुर कारकून नानाजवळ होता, तो रचीत असे. त्याचे इतरहि एक दोन श्लोक प्रसिद्ध आहेत. "**अलंकारप्रियो विष्णुः**" इ० श्लोक त्याचाच आहे. २. नानांचें उपनाम.

" पालखीत बसलेला कोणी एक पंडित, पालखी फार डळमळूं लागली म्हणून पालखी वाहणाऱ्या भोयास विचारितोः--"हा पालखीचा दांडा तुझ्या खांद्याला ' बाधति ' ( हा प्रयोग चूक आहे. ) पीडा देतो काय ?" भोयी ( हा कालिदासाची पालखी वाहात असे.) उत्तर करितो-" पंडित-महाराज, ह्या ' बाधति ' शब्दानें जशी पीडा होते तशी, तितकी पालखीच्या दांड्याने होत नाही. "

" पुरा कवीनां गणनाप्रसगे । कनिष्ठिकाधिष्ठितकालिदासः ॥
अद्यापि तत्तुल्यकवेरभावा-। दनामिका सार्थवती बभूव ॥ १० ॥
[1]"यः पूतनामारणलब्धकीर्तिः । काकोदरो येन विनीतदर्पः ॥
यशोदयाऽलंकृतमूर्तिरव्या- । न्नाथो यदूनामथवा रघूणाम् ॥११॥
" आपादलंबिनीमाला कंठे रामस्य सीतया ॥
बुधा बुधा भ्रमंत्यत्र प्रत्यक्षेपि[2] क्रियापदे ॥ १२ ॥
[3]" भोजनांते च किं पेयम् । जयंतः कस्य वै सुतः ॥
कथं विष्णुपदं प्रोक्तं । तक्रं शक्रस्य दुर्लभम् ॥ १३ ॥
" आनंदतांडवपुरे द्राविडस्य गेहे ।
चित्रं वसिष्ठवनितासममाज्यपात्रम् ॥
विद्युल्लतेव परिनृत्यति तत्र दर्वी ।
धारां विलोकयति योगबलेन सिद्धः ॥ १४ ॥"

इत्यादि अनेक श्लोक देता येतील. परंतु काही श्लोकाचा खुलासा देणे इष्ट वाटल्यामुळे व त्या खुलाशासह झाला हाच विस्तार फार झाल्या-कारणाने येथेंच थांबणे भाग आहे.

---

१ पूतनामा, रणलब्धकीर्ति, काक अदर यशोदयालंकृतमूर्ति, अशी पदें वाचिली असता हा श्लोक रामवर्णनपर होईल. वरील कृष्णपर आहे २ प्रत्यक्षेऽपि असा दुसरा पदच्छेद. ३. पहिल्या तीन प्रश्नांस अनुक्रमें तक्र, शक्रस्य, दुर्लभं, अशी ३ उत्तरें आहेत.

**त्यांच्या शिक्षणपद्धतीवर एक आक्षेप**—शास्त्रीबुवांच्या संस्कृत विषयाच्या शिक्षणपद्धतीवर एक मोठा आक्षेप घेण्यात येतो तो हा की, " त्यांना, '**शंकरशेट स्कॉलर**' सबंध नोकरीच्या काळांत एक देखील तयार करिता आला नाहीं. अगदीं लगत असलेल्या सांगली हायस्कुलांतील विद्यार्थ्यांनी या बाबतीत मिरज हायस्कुलांतील विद्यार्थ्यांपुढे तोरा मिरवावा आणि आम्हांला ही गोष्ट मुकाट्यानें सहन करण्याचा प्रसंग यावा, असें होण्याचीं जीं अनेक कारणें असतील त्यांतच आमच्या शास्त्रीबुवांनी त्या दृष्टीनें कधीं शिकविलें नाहीं हें एक प्रबल कारण आहे. सर्वच दोष विद्यार्थ्यांच्या माथीं मारण्यांत अर्थ नाहीं. शास्त्रीबुवांची शिक्षणपद्धतीहि ह्यास जबाबदार धरिली पाहिजे. "

**आक्षेपनिरसन**—शास्त्रीबुवांची शिक्षणपद्धति व एकंदरीत त्यांचें संस्कृत विषय शिकविण्याचें धोरण काय होतें हें या प्रकरणीं आतांपर्यंत जें विस्तृत विवेचन करण्यांत आलें आहे त्यावरून वाचकांच्या ध्यानीं आलेंच असेल. 'शंकरशेट स्कॉलर'नें मोठा तोरा मिरविण्याजोगें त्यांत काय आहे ? स. १९०७ पर्यंत तरी मुंबई युनिव्हर्सिटीच्या मॅट्रिकच्या संस्कृत विषयाच्या प्रश्नपत्रिकेंत शेकडा ६० । ७० पर्यंत मार्क नुसत्या व्याकरणभागास असत. साधारण बुद्धिमान् परंतु निरलस, अभ्यासी, वर्णाचा शुद्ध व मुळांतच संस्कृतची आवड असलेला विद्यार्थी दिसला कीं, त्याचे संस्कृत विषयाचे गुरुजी ४ थ्या ५ व्या इयत्तेपासून २।३ वर्षें तरी त्याच्याकडून त्या विषयावर सक्त मेहनत करवीत. आणि हुषार विद्यार्थी, बहुधा ज्याची टवाळी 'झकू, ताड्या, घोक्या', वगैरे शब्दांनीं करितात, त्या घोकंपट्टी मार्गाचा अवलंब करून तो बिचारा रात्रीचा दिवस करून हाडें झिजवून ती संस्कृत व्याकरणामधली अनेक प्रकारची अनियमित क्लिष्ट रूपें अगदीं मुखोद्गत करी. आणि युनिव्हर्सिटींतले परीक्षक एखाद्या कंजुष सावकाराप्रमाणें पाव-अर्धा, पाव-अर्धा, मार्क टाकीत

प्रश्नाच्या उत्तराचे नाणे खणखणीत वाजवून पारखून घेत ! व मग, कधी 'रत्नागिरी हायस्कूल', कधी 'पुणे न्यू इंग्लिश स्कूल' तर कधी 'सांगली हायस्कूल'मधील एकादा विद्यार्थी संस्कृत विषयातील आपल्या पात्रतेचे भरपूर माप परीक्षकाच्या पदरी घालून '**शंकरशेट**'ची वरणी मिळवी !! ह्यामुळे, ह्या परीक्षेत जे नापास होत त्यांना लगेच त्या परीक्षेस नालायक अगर कमी बुद्धिमान् असे मानणे युक्त होईल काय ? उलट, मिरज हायस्कूलमधला एकादा विद्यार्थी जर **आय्. सी. एस्.** होऊं शकतो तर तिथलाच दुसरा एकादा विद्यार्थी शंकरशेट स्कॉलर कां नाही होणार ? सारांश, येथे विद्यार्थ्यांच्या बुद्धिमत्तेचा प्रश्न नाही. शास्त्रीबुवांना स्वतः घोकंपट्टीचा कंटाळा असल्यामुळे ज्यायोगे ती विद्यार्थ्यांवर लादली गेली असती असा उद्योग त्यांनी केला नसावा हे स्वाभाविकच होते, ह्यांत त्यांचा तरी काय दोष ? शिवाय, एका दृष्टीने, एकादा शंकरशेट स्कॉलर तयार करण्यापेक्षा, **राजाराम कॉलेजमधील संस्कृत प्रोफेसरांचे, मिरज हायस्कूलमधील विद्यार्थ्यांच्या संस्कृत भाषेच्या ज्ञानासंबंधींचे सर्वसाधारण प्रशंसोद्गारच अधिक स्पृहणीय नव्हेत काय !**

शास्त्रीबुवा आपल्या सर्व अंगीकृत व्यवसायांत तत्पर असत त्याप्रमाणे ते आपल्या शिक्षणाविषयक कार्यांतहि किती मनापासून काम करीत हे मागे सांगितलेच आहे. आणि त्याबद्दल त्यांना योग्य अभिमानहि वाटत असला पाहिजे. पण, केवळ 'शंकरशेट स्कॉलर तयार करणारा शिक्षक' या नावलौकिकापेक्षा '**उत्तम ग्रंथलेखक, संशोधक,**' इत्यादि नावलौकिकसंपादनाची दुसरी विशाल कार्यक्षेत्रे त्यांना दिसूं लागली व स. १८९२ सालापर्यंत त्यांनी त्या क्षेत्रांत एकाददुसरे पाऊल टाकिले देखील होते. अर्थात् तेव्हापासून आपला शाळेबाहेरचा सर्व वेळ या लेखन-वाचन-संशोधनादि कार्यांकडे ते खर्च करूं लागल्यामुळे शाळेबाहेरचा वेळ विद्यार्थ्यांकडे देण्यास त्यांस सवड नव्हती, व न्यायतः सुद्धां

त्यांच्यावर या कामाचे बंधन पडण्याजोगे नव्हते. तरी पण, असा एकादा विद्यार्थी त्यांची मदत त्याच्या सोयीसवडीने मागता तर त्यांनी त्यास शिकविण्याचें सहाय्य केले नसते असे आम्हास मुळीच वाटत नाही. त्यांनी आपण होऊन हा प्रयत्न का केला नसावा याचे उत्तर वर आलेच आहे. तथापि, इतक्या समर्थनानंतर देखील कोणाच्या मते हा विषय वादग्रस्त राहात असेल व उपस्थित आक्षेपाचे निरसन निश्चितपणे झालेसे त्यास वाटत नसेल, तात्पर्य, 'शंकरशेट स्कॉलर तयार करणे' एवढीच उत्तम संस्कृत शिक्षणाची कसोटी असे कोणी ठरविले असेल तर मात्र तेवढ्यापुरती शास्त्रीबुवांची शिक्षणपद्धति सदोष होती हे मत स्वीकारावे लागेल.

**केकावलीचें उत्तमत्व**—पंतांची '**केकावलि**' हे काव्य किती भक्तिरसपूर्ण आहे हे सर्वश्रुतच आहे. केकावलीवर शास्त्रीबुवांचा व्यासंग बाळपणापासूनचा होता हे मागे सांगितलेच आहे. पंतकाव्यांपैकी **केकावलि** हे एकटे काव्य देखील पंतांची महति यथार्थपणे व अजरामर टिकविण्यास पुरेसे आहे. अवघे १२१ श्लोकांचेच प्रकरण खरे, पण त्यावर अनेक विद्वानांनी आजपर्यंत मोठ्या परिश्रमाने टीका वगैरे लिहिल्या आहेत. मराठीत ज्ञानेश्वरीवांचून इतर ग्रंथांवर टीका क्वचित्च झाली आहे. केकावलीवर पहिली टीका मराठी व्याकरणाचे कर्ते **दादोबा पांडुरंग** यांनी लिहिली व आपल्या वडीलमातुःश्रींच्या स्मरणार्थ त्यांनी तिला '**यशोदा पांडुरंगी**' असे नांव दिले. शास्त्रीबुवांनी लहानपणी हीच टीका वाचिली होती. केकावलीच्या आक्षेपकांना दादोबांनी आपल्या प्रस्तावनेत छानदार उत्तर दिलेले आहे. स. १८६५ मधील ह्या मराठी लेखकाच्या साध्या पण जोरदार व परिणामकारक मराठी भाषेचा नमुना म्हणून ह्या उत्तरांतील थोडासा भाग येथें उतरून घेतला आहे:—

"मुले जशीं आपल्या आईबापांपाशी कांहीं वस्तु मागतांना आपला लडिवाळपणा, सलगी, रोष इत्यादि भाव दाखवितात तसे या देशांत भक्तजन आपल्या इष्ट देवतेपुढे यथारुचि अनर्गल वाक्पाटवाने अनेक भाव दाखवून वर मागतात........परंतु ज्या लोकांमध्ये लडिवाळ-पणाने आणि सलगीने ईश्वराची प्रार्थना आणि स्तुति करण्याचा संप्रदाय व्यासाच्या वेळेपासून पडला आहे, त्यामध्ये आपल्या कवीसच निवडून काढून या दोषाचा भार त्यांच्या ( पंतांच्या ) मस्तकावर ठेवण्यास त्यास पुढे करणे मला योग्य दिसत नाही.........ज्या लोकांत व ज्या देशांत रसभरित म्हणून प्रसिद्ध काव्ये असतात, त्याच्या गुणाचे यथायोग्य परीक्षण करण्यास, आणि त्यांची रुचि घेण्यास त्याच देशाचे डोळे आणि जीभ असली पाहिजेत.........ज्या लोकांत वंशपरंपरेनें ज्याचा सह-वास असतो, त्याचा पूर्वापार व्यवहार, रीतीभाती, विद्या, ज्ञान, आचार या सर्व गोष्टींच्या संघट्टनानें त्याची मने तशीच रंगलेली असतात, म्हणून त्यांच्या काव्याने जे हर्षशोकादि विकार त्याच्या मनावर होतील, तसे विकार अशा संघट्टनाच्या अभावामुळे ज्यांची मने तशीं रंगली नसतात त्याजवर होणार नाहीत. अशा विचाराने पाहिले असतां हें पुढील स्तोत्र ( केकावलि ) प्रौढ आणि रसिक काव्यांत गणिले पाहिजे."[1]

**रा. सा. रानडे** ( पुढे न्यायमूर्ति ) याचा या पुस्तकावर–मूळ काव्य व टीका यांवर–अभिप्राय[2] फारसा चागला नव्हता. त्यानी त्यावर बरीच टीका केली होती. तथापि, उतार वयांत **रा. सा. रानडे** यांची मूळ

१. प्रो पोतदारकृत 'मराठी गद्याचा इंग्रजी अवतार' पृ.७३–७४. २ हा अभिप्राय **कै. परशुरामपंत तात्या गोडबोले** याच्या '**केकादर्श**' नामक पुस्तकावर आहे. ऑक्टिंग् मराठी ट्रॅन्स्लेटर या नात्यानें स. १८६७ नवंबरमध्यें रा. सा. रानडे यांनीं तो सरकारी रिपोर्टांत प्रसिद्ध केला होता.

काव्यावरच इतकी भक्ति बसली होती की, केकावलीमधील कित्येक श्लोक प्रात:काळी त्यानी पुन पुन आपल्या पत्नीकडून वाचवावे व मधून मधून सद्गदित होऊन साश्रु नयनानी व आर्द्र अतःकरणाने डुलत-डुलत त्यांनी ते ऐकावे. केकावलिकाव्याच्या प्रेमळपणाचा असाच काही प्रभाव आहे! दादोबानंतर **परशुराम तात्या गोडबोले** या प्रसिद्ध मराठी कवीनी '**केकादर्श**' नावाचा ग्रंथ केकाच्या स्पष्टीकरणार्थ लिहिला ( स. १८६७ ). व '**सुलभ केकावलि**' नावाचे एक अगदी लहानसे पुस्तक रा. रा. **रामचद्र भिकाजी जोशी** यानी केकांच्या सुलभ अर्थासाठी लिहिलें. परंतु श्री. रा. **श्रीधर विष्णु परांजपे** नामक विद्वान् गृहस्थ **वर्धा** येथे असतात; त्यानी जुन्या संस्कृत टीकाकारा-प्रमाणे या काव्याची छाननी काव्य, अलंकार, व्याकरण इ० यथासंभव अनेक शास्त्राच्या दृष्टीने केली आहे हा ग्रंथ फार मोठा असून त्याची नुकतीच ४।२ वर्षांपूर्वी सुधारून वाढवून छापिलेली आवृत्ति फारच मोठी–दोन भागाची–झालेली आहे! तात्पर्य, **केकावलि** हा मराठीच्या रसिक वाचकाचा आवडता काव्य ग्रंथ आहे.

**केकावलिशिक्षक**—हे काव्य शास्त्रीबुवा शिकवीत असत तेव्हा ऐकणारा मनुष्य देहभान विसरून जाई. एका इंग्रज ग्रथकाराची, काव्य शिकविणारा शिक्षक कसा असावा ह्यासंबंधीची २।३ सुदर वाक्ये फारच मार्मिक अशी आहेत, ती खरेशास्त्रीबुवाच्या काव्य शिकविण्याच्या पद्धतीशी तंतोतंत जुळतात म्हणून या ठिकाणी उद्धृत केली आहेत.

(1) "Let poetry be for the children a living joy, (a thing of beauty) while they are with us *i. e.* the teachers. + + + + + + + And so it will be, if the teacher remembers, that he is dealing with living developing characters entrusted to his care

—that life will breed life and death, death". (2) "To make a beautiful poem live to children so that they are glad in its beauty, is to get right home to their hearts" (3) " They will remember him in the company of poets he taught, his voice will ring down the years to them in the words of the poems they love " (Alexander Haddow )*

( १ ) "शिक्षकाच्या सहवासात असता मुलाना काव्य म्हणजे मूर्तिमंत आनंद किंवा केवळ सौंदर्याचा गाभाच असे वाटले पाहिजे. + + + + + + आणि आपणास आपल्या हातीं सोपविलेल्या चालत्या बोलत्या व वर्धिष्णु स्वभावाच्या मानवी जीवाना शिकवावयाचे आहे ही गोष्ट जर शिक्षक मनात वागवील तर त्याने शिकविलेल्या काव्याचा हा इष्ट परिणाम अवश्यमेव होईल.–( शिक्षणातील ) चैतन्य चैतन्यास व मरकेपणा मरकेपणास प्रसवेल." ( २ ) " एकाद्या कवितेच्या खुमारीने मुलाना आनंद व्हावा म्हणून त्याच्यासाठी त्या सुदर कवितेत जीवितसचार करविणे म्हणजे तिला थेट त्याच्या हृदयमदिरात नेऊन बसविणेच होय " ( ३ ) "विद्यार्थ्यांना, त्याने ( काव्यशिक्षकाने ) शिकविलेल्या कवीच्या स्मृतीबरोबर त्याचीहि आठवण होईल. आणि ज्या कवितावर त्याचे प्रेम असेल त्याच्या शब्दामधून त्याचा ( काव्यशिक्षकाचा ) आवाज त्याना वर्षानुवर्ष ऐकू येत राहील. "

केकावलि शिकवीत असता शास्त्रीबुवा केकात येणारी सारी आख्याने, कथानके व संदर्भकथा इत्थंभूत सागत. आणि वरवर वाचणाराला केकातील श्लोक त्रुटित वाटण्याचा सभव आहे. पण मुळात ते तसे नसून

* P. 11 'Qualifications of the Teacher', P. 31 and P. 114, 'The Teaching of Poetry' by Alexander Haddow, M.A.

उंसाच्या पेरांप्रमाणे सरळ पहिल्यांतून दुसऱ्याची, दुसऱ्यामधून तिसऱ्याची कल्पना असे क्रमाने अखेरपर्यंत होत गेले आहे, ही श्लोकसंगति लावण्याची रीत आम्हांस प्रथमच शास्त्रीबुवांपासून समजली. **आणि आमूलाग्र प्रतिपर्वी म्हणजे केकांमधील प्रत्येक श्लोकांत उत्तरोत्तर चढती वाढती गोडी आहे हें उत्तम तऱ्हेने मनावर बिंबलें.** केकाच्या बाबतीत हाच अनुभव त्यांच्या हाताखाली शिकलेल्या अनेक वर्षांच्या विद्यार्थ्यांचाहि आहे.

**आणखी १।२ गोष्टी**—मिरज हायूस्कूलचे पहिले मुख्याध्यापक रा. सा. आण्णाजी रामचंद्र अत्रे व त्याच्या मागून आलेले रा. सा. कानेटकर या दोघांचा शास्त्रीबुवावर मोठा लोभ असे. रा. सा. कानेटकर यांना तर त्याचेसबधी एक प्रकारची पूज्यबुद्धि वाटे. इतर शिक्षक मंडळीतहि ते फार प्रिय असत. त्याच्या विनोदी स्वभावामुळें ते या मंडळीत बसलेले असतां तेथें आनंद पसरला नाही असें सहसा होत नसे. परीक्षेच्या प्रश्नाच्या उत्तराचे कागद तपाशीत असतां ते नेहमी म्हणत कीं, "मुलाना काय येतें तें पहावयाचे असतें, येत नाही ते काय पहावयाचे? तें अनत आहे !! " या धोरणानें ते परीक्षा घेत असल्यानें विद्यार्थ्यांना त्यांच्या हातून लवमात्रहि अन्याय होण्याची भीति वाटत नसे. शास्त्रीबुवानी पेन्शन् घेतले त्या सुमारास शिकण्याचे ज्याचे भाग्य होते अशा एका विद्यार्थ्याने अशी माहिती सांगितली की, इयत्ता ५।६।७ मध्ये ते रोज एकादी गोष्ट त्या त्या वर्गास झेंपेल अशा संस्कृत भाषेत सांगत असत. हा क्रम कित्येक महिने चालला होता. तसेंच त्यांनी, पेन्शन् घेऊन घरी राहावयाचे त्याच्या आदले दिवशी ७ व्या इयत्तेत सुंदर व बोधपर व्याख्यान देऊन विद्यार्थ्यांचा सद्गदित कंठाने निरोप घेतला, तो प्रसंग संस्मरणीय होता.

---

# इंग्रजीचा अभ्यास

**प्रारंभ**—शिक्षणविषयक नित्य व्यवसायासाठी व पुढे विद्याव्यासंगाची हौस म्हणून शास्त्रीबुवांना इंग्रजी शिकण्याची अतिशय आवश्यकता भासूं लागली. आपल्या शाळेतील व्यवसायबंधूकडून—इंग्रजी शिक्षक मंडळीपासून—प्रथम त्यानी इंग्रजी भाषेच्या रचनेविषयी काय थोडीबहुत सामान्य माहिती करून घेतली असेल ती खरी, अक्षरओळख होऊन थोडेंसे वाचितां येऊं लागतांच ते स्वावलंबनाने इंग्रजी वाचन वाढवूं लागले. त्यानी इंग्लिश लेखनाचा प्रयत्न मुळीच केला नाही. अखेरपर्यंत त्यांस इंग्रजी मुळाक्षरें काढितां येत नव्हती की, इंग्रजी शब्दांचे स्पेलिंगहि त्याना बिनचूक करिता येत नव्हते ! संस्कृतच्या अभ्यासाप्रमाणे इंग्रजी अभ्यासाची त्यांची तऱ्हा विलक्षण होती ! दुसऱ्याचे ऐकून ऐकून अनुकरणाने ते इंग्रजी बोलावयास शिकले. व त्यावरून त्या भाषेतील प्रयोग, वाक्प्रचार व म्हणी त्यानी भराभर उचलिल्या असाव्या. एकाच इंग्रजी शब्दाचा प्रयोग वारंवार ऐकून किवा वाचनांत ठिकठिकाणी आलेला पाहून ते त्याचा अर्थ निश्चित करीत. त्यासाठी कोश सहसा पहावयाचा नाहीं असे त्यांचे धोरण होते. त्यांचा अव्याहत व दृढ व्यासंग आणि इंग्रजी भाषेतली वेगाने होणारी प्रगति पाहून तेव्हांपासून पडलेला लोकप्रवाद मात्र असा ऐकूं येतो की, “शास्त्रीबुवा किती बुद्धिमान् बुवा ! त्यांनी इंग्रजी मोठी डिक्श्नरी पाठ केली होती बघा ! !” कोकणांत ‘काव्याच्या सबधांत त्यांना देवता प्रसन्न होती,’ असा भाविक लोकात रूढ असलेला समज व हा वरील प्रवाद एकाच मासल्याचे होत, हे निराळे सांगावयास नकोच. मात्र एकाद्या विषयाचा पिच्छा पुरविण्याची त्यांची चिकाटी असामान्य असे यांत शंका नाही. प्रथम प्रथम ‘**बॉम्बे टाईम्स्**’ हे इंग्रजी वर्तमानपत्र ते जाहिरातीसुद्धां साद्यंत वाचीत !

**दांडगें वाचन**—इंग्रजी चांगले समजूं लागल्यावर त्यांनी **मेकॉले, स्कॉट्, बायरन्, गोल्ड्स्मिथ्, ॲडिसन्** इत्यादि नामांकित इंग्रज ग्रंथकारांचे ग्रंथ समग्र वाचिले. एक ग्रंथकार वाचावयास घेतला की, त्याचे सर्व ग्रंथ वाचावयाचे अशी त्यांची तऱ्हा होती. हेतु हा कीं, त्या ग्रंथकाराचे सारें हृद्गत पुरतेपणीं आपल्या मनांत ठसावें. मेकॉलेच्या निबंधावर त्यांच्या भाषासरणीस्तव त्यांचा फार लोभ असून त्यांतील कित्येक पॅरिग्राफ् त्यांना तोंडपाठ झाले होते. **सर जॉन् ब्राइट् यांची** ब्रिटिश पार्लमेंटमधील ज्यू लोकांच्या उद्धारार्थ झालेली भाषणें, मेकॉलेचे **क्लाइव्ह** व **हेस्टिंग्स्** यावरील निबंध हे शास्त्रीबुवांच्या विशेष आवडीचे विषय होते. यावरून त्यांच्या विचाराची दिशा काय असे याची कांहीशी कल्पना होण्याजोगी आहे. हिंदुस्थानविषयक इतिहाससंबंधी **ग्रँट्डफ्, मरे, मिल्ल, मॉरिसन, एल्फिन्स्टन्स् हिस्टॉरिकल मिनिटस्, गॅझेटिअर, ग्रीस, रोम,** वगैरे प्राचीन युरोपियन राष्ट्रांचे इतिहास, **न्या. मू. रानडे यांचा 'राईज् ऑफ् दि मराठा पॉवर'** ( मराठी सत्तेचा उत्कर्ष ) तों अगदी अलीकडील **प्रो. जदुनाथ सरकार** यांचा **'शिवाजी'** इ० सर्व इंग्रजी इतिहासग्रंथ त्यांनी वाचिले होते. ' मिरज स्कूल लायब्ररी, ' ' नेटिव जनरल लायब्ररी, ' व इतर मिळून सुमारे चारशे इंग्रजी पुस्तकें त्यांनी वाचिली होती. इंग्रज इतिहासकारांचे ग्रंथ मार्मिकपणें समजावे म्हणून व इंग्रजीचें उत्तम ज्ञान व्हावें यासाठीं, इतिहास व इतिहासेतर इंग्रजी वाङ्मय त्यांनीं केवढें वाचिलें होतें हे पाहिलें म्हणजे मन आश्चर्यानें थक्क होऊन जातें; आणि त्यांच्या सर्वगामी बुध्दीची व उत्कृष्ट स्मरणशक्तीची फिरून एकवार साक्ष पटते.

---

१. कै. वामनराव हरि कानेटकर, माजी हेडमास्तर, मिरज हायस्कूल, यानीं एकदा ही गोष्ट सांगितली होती.

**प्राविण्य**—इंग्रजी भाषेवरील त्याच्या या दांडग्या व्यासंगाचा परिणाम असा झाला होता की, त्या भाषेतील खाचाखोचा त्याना पूर्णपणें ज्ञात झाल्या होत्या व एकादे वेळी सहज गमतीनें आपल्या कोणातरी ग्रॅजुएट् विद्यार्थ्यास अशी एकादी खोच ते उलगडण्यास सांगत व अखेर त्यास उलगडा करिता न आल्यास आपण तो करूनहि दाखवीत. प्रसंगी ते इंग्रजींत अस्खलित बोलूं शकत व व्याख्यानहि देऊं शकत. इंग्रजी भाषेंत दरबारी व इतर प्रसंगी कागदोपत्री लिहिण्याचे **मायने** व **शिष्टाचार** यांची त्याना उत्तम माहिती होती. बायरन्‌च्या '**ओशन**' –महासागर–नामक काव्यांतील ३।४ कल्पना मराठी पेहेरावांत त्यानी आपल्या '**समुद्र**' नावाच्या काव्यांत सुंदर मांडिल्या आहेत, त्यांचा निर्देश पुढे काव्यविवेचनांत येणारच आहे. मेकॉलेच्या '**होरेशस्**' नावाच्या वीररसप्रधान काव्यांतील वीराच्या वर्णनासारख्या वर्णनाचा भास शास्त्रीबुवांच्या '**यशवंतराव महाकाव्यां**'त कांही ठिकाणी होतो. पण, तो केवळ भासच कारण वर्णनसादृश्य दिसलें म्हणून तेवढ्यावरून अमुक वर्णन अमक्यामधून घेतलेंच आहे असे म्हणतां येत नाहीं. व आमच्या इकडच्या प्राचीन वीरकथानकांत त्याहिपेक्षां उत्कृष्ट वर्णनाची रेलचेल असल्यामुळे त्यासाठी शास्त्रीबुवानी मेकॉलेचेंच अनुकरण केलें असेल असे कोणी म्हणण्याचें कारण नाहीं.

शास्त्रीबुवांचें इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व व दृढ व्यासंग यांविषयी २।३ गोष्टी सांगण्यांत येतात त्या अशा:–एकदा, इंग्रजी शिक्षकाचे गैरहजेरींत ७ व्या इयत्तेवर शास्त्रीबुवाना जावें लागलें. तेव्हां मेकॉलेचे निबंध त्या इयत्तेत शिकवीत ह्यांनी ५।७ मुलांकडून त्यांतील एका निबंधाचा भाग पुन: पुन: वाचून घेतला व मग मुलास तो गोषवारा सांगण्यास सांगितलें. मुलांपैकी कोणास ते साधलें नाहीं. परंतु शास्त्रीबुवानी स्वत: तो भाग जवळ जवळ जशाचातसा म्हटला. मुलांना त्यांच्या ह्या विलक्षण

**स्मरण**शक्तीचे आश्चर्य वाटले. (२) शास्त्रीबुवानी एकदा **ग्रीस** देशाचा इतिहास घरी वाचावयास आणिला व रात्री जेवणखाण झाल्यावर तो हाती घेऊन ते दिव्यापुढे वाचावयास बसले. इतर मंडळी सकाळी उठून आपापले व्यवसायास लागली. पण शास्त्रीबुवा पुस्तक हाती घेऊन वाचीतच बसले होते! त्यांनी पुस्तक वाचून संपविले व मग ते नित्यकर्मास लागले. 'वाचनाकरितां इतके कष्ट का? व झोप कशी येत नाही?' असे कोणी त्यांना विचारितां त्यानी, '**आम्हांस वाचनांत फार आनंद होतो व त्यापुढे झोपेचे स्मरणहि आम्हांस होत नाही.** शिवाय, कित्येक शतकाचा इतिहास एका बैठकीत वाचिल्याने त्या राष्ट्राचा उत्कर्ष व ऱ्हास कसा व का झाला याचे बिनचूक ज्ञान होण्यास त्यायोगे फार मदत होते हा मोठा फायदा होतो.'' असे उत्तर दिले. '**जावे त्याच्या वंशा तेव्हां कळे!**' ( ३ ) स. १८९७ नंतर केव्हा तरी **डॉ. वान्लेस्** यास गावातील 'प्लेग ड्यूटीचा रिपोर्ट' सादर करण्याचे काम ज्या गृहस्थाकडे होते त्यांनी एकदा स्वत तयार केलेला रिपोर्ट शास्त्रीबुवास दाखविला. ह्यानी मित्रभावाने रिपोर्टांतील इंग्रजी भाषेसंबंधी जरा नापसंती दर्शविली. त्यावर ह्यांची कुचेष्टा करण्याच्या हेतूने सदर गृहस्थानी ह्याच्या सागण्याप्रमाणे दुसरा रिपोर्ट लिहून घेतला. आणि तात्या पतोजीच्या शाळेतील मुले पूर्वी करीत त्याप्रमाणे डॉ. वॉन्लेस्पुढे भाषेच्या दृष्टीने त्याच्या पसंतीस्तव दोनी रिपोर्ट त्या स्वारीने ठेविले! परतु डॉ. वॉन्लेस् याचा अभिप्राय शास्त्रीबुवांनी सागितलेल्या रिपोर्टाच्या मसुद्यावर अनुकूल पडून उपद्व्यापी रिपोर्टरमजकूर यांची परस्पर फजीती झाली!!

---

# काव्यदेवीची उपासना

( स. १८८१ ते स. १८९१. )

**प्रास्ताविक**—इंग्रजीचा अभ्यास, घरगुती शिकवण्या, काव्य व इतिहासाचे वाचन इत्यादि उद्योगांबरोबर त्या वेळच्या काही मासिका-मधून स्वतंत्र लेख किंवा काव्यादि परीक्षणाचे लेख लिहिण्याचा शास्त्री-बुवांचा क्रम चालू होता रा. रा **वामन एकनाथशास्त्री केमकर** यानी चालविलेले '**आर्यमित्र**' मासिक, रा. रा. **रामचंद्र भिकाजी जोशी** यांचे '**निबंधचंद्रिका**' मासिक, आणि शास्त्रीबुवाचे स्नेही रा. रा. **नारायण नरसिंह फडणीस** यांनी आजपर्यंत चालविलेलें '**काव्य-रत्नावली**' नांवाचे मासिक यामध्ये शास्त्रीबुवा लेख व परीक्षणें देत असत. परतु जसजसे त्याचें लक्ष्य इतिहाससंशोधनाकडे वेधलें गेलें तस-तसें हे त्याचे स्फुट लेखन बंद पडत चालले. **कै. श्रीमंत बापूसाहेब कुरुंदवाडकर** (धाकटी पाती) याच्या पत्नी **कै श्री. सौ. जानकीबाई साहेब** यानी **गणेशपुराणावर** मराठींत आर्या रचिल्या होत्या. त्याचें प्रकाशन होण्यापूर्वी त्यावर संशोधन शुद्धिकरणादि सस्कार त्यानी खरे-शास्त्रीबुवा याजकडून करून घेतले. खरेशास्त्री याच्या विद्वत्तेबद्दल **श्रीमंत बापूसाहेब** याना मोठा आदर वाटे व ह्यामुळे शास्त्रीबुवावर ते अतिशय लोभ करीत. असो. या १०।१२ वर्षांच्या काळातच काय ती स्वतंत्र अशी काव्यरचना करण्यास शास्त्रीबुवाना सवड मिळाली. कारण, ह्यापुढे इतिहाससंशोधनाच्या नादांत त्याना स्वतंत्र काव्यरचना करण्यास फुरसत झाली नाहीं. पेन्शन् घेतल्यानंतरच्या सगीत नाटकांत

---

१. हें मासिक सन १८८४ त जगद्धितेच्छु छापखाना कचेरी, पुणें पेठ शनिवार, १२०, येथें निघत असे.

त्यांना कांहीं पद्यरचना करावी लागली. तथापि, नाटकातील विशिष्ट प्रसंगाची पूरक अशी पदे व स्वतंत्र विषयावरील साद्यंत कवितासंग्रह यामधील भेद सुज्ञ वाचकाना स्पष्ट समजेसा आहे. स. १८८४ मध्यें **'समुद्रकाव्य'**, स. १८८५ त **'गुणोत्कर्ष नाटक'**, स. १८८८ त **'यशवंतराव महाकाव्य'** आणि स. १८९१ त **'फुटकळ चुटके'**, भाग १ ला, हीं पुस्तकें शास्त्रीबुवानी छापवून प्रसिद्ध केली. त्यापैकीं **'गुणोत्कर्ष'** नाटक वगळले तर स. १८८१ ते स. १८९१ ह्या दहा वर्षांत मुख्यतः त्यानी **काव्यदेवीची उपासना** केली.

या दशवार्षिक कालावधीत, **काव्यपरीक्षण** व **काव्यग्रथन हाच** मुख्यतः त्यांचा बौद्धिक व्यवसाय होता यातच त्यानी एका उत्कृष्ट नाटकासहि जन्म दिला **' काव्येषु नाटकं रम्यम् '** या वचनातील शब्दश भावार्थानुसार हे त्याचे एकटेंच नाटक आपल्या काव्य-भावंडांसह शास्त्रीबुवांच्या **' काव्यरचनेचा काल '** या कालविभागास शोभाच देत आहे. शास्त्रीबुवा अगदीं बालपणापासून कवि व नाटककार होते याची साक्ष पटविणाऱ्या ४।२ गोष्टी त्याच्या बाळपणच्या चरित्रात सागितल्याहि आहेत **साक्रेतिसाच्या** चरित्रांत असे लिहिलें आहे कीं, "आपण ज्या गोष्टी बोलतो त्या कोणा देवतेकडून तशी प्रेरणा मिळाल्या-मुळें बोलतो," असे तो स्वतः लोकांस सागे. परंतु लहानपणी दिसून येणाऱ्या वासुदेवशास्त्र्याच्या अंगच्या कवित्वशक्तीवरून **' या मुलास कोणी देवता प्रसन्न आहे,'** असें दुसरे लोक बोलत. तसेंच, त्या वेळच्या त्याच्या पौराणिक नाटकांच्या उठावदार व यशस्वी प्रयोगामुळे तीं त्याच्या गांवांत व पंचक्रोशींत लोकप्रिय होत. पुढें, विद्यार्थिदशेत साताऱ्यास असता ते संस्कृतांतहि चांगल्या कविता करूं लागले, व पुण्यास आल्यावर काव्यविषयक चर्चाहि त्याना इग्रजी शिकलेल्या विद्वानांच्या भाषणांत व लेखांत वारंवार आढळूं लागली.

**काव्यरचनेची दिशा व स्वरूप**—आजच्याप्रमाणें तेव्हांच्या विद्वान् मंडळींतसुद्धा पौरस्त्य—**संस्कृत** व **मराठी**—आणि पाश्चात्य—**इंग्लिश्**—कवींच्या काव्यांची तुलना चाले व गुणदोषविवेचनदृष्ट्या त्यांवर टीका प्रतिटीकाहि चालत. तेव्हांपासून जुन्या मराठी कवींवर व त्यांच्या काव्यावर २।३ दोषारोप करण्यात येत असतात. आणि अद्यापि हीं दोषारोपणाची परंपरा मोडलेली नाहीं. पहिला आरोप असा आहे कीं, जुन्या मराठी काव्यांत शब्दालंकार—अनुप्रास, यमकें, इ०—साधण्याची कवींस आवड फार; त्यामुळें त्यांत कृत्रिमता व दुर्बोधता येते. नूतन पंडितांचा यमकावर कटाक्ष विशेष, मग त्यांनीं 'यमक्या' वामनाची ( **वामन पंडितांची** ) हजेरी खूपच घेतली असेल ! ! २ रा आक्षेपः—जुन्या मराठींत स्फुट कविता नाहीं. नित्य परिचयाच्या छोट्यामोठ्या वस्तु अगर निसर्ग—चमत्कार, उदाहरणार्थः—'उमलतें फूल,' 'वाऱ्याची झुळुक,' 'रडका बाळू' किंवा त्याचा 'रबरी चेंडू,' 'रुसलेल्या प्रियेस,' इ. इ. विषयांवर लहान लहान कविता नाहींत. सगळे ग्रंथ आपले मोठमोठीं बाडें आहेत. आणि ३ रा आक्षेपः—पुराणें, पुराणपरंपरा व जुनें तत्त्वज्ञान ह्यांपलीकडे जुन्या कवींना काव्यविषय दिसतच नव्हते. शास्त्रीबुवांना जुन्या कवींवरचे हे सर्व आक्षेप पटलेच असतील असें म्हणवत नाहीं. तथापि, हे आक्षेप टाळून मराठींत सरस कविता रचितां येते हें मात्र त्यांनीं आपल्या काव्यांत दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.

काव्येतिहाससंग्रहापासून प्रारंभ होऊन आजपर्यंत **श्री. पांगारकर, श्री. आठल्ये, समर्थभक्त शं. श्री. देव, कै. वि. का. राजवाडे,** इत्यादि विद्वानांनीं व वारकरी सांप्रदायाच्या अभिमान्यांनी परिश्रमपूर्वक जुनी मराठी कविता पुष्कळ प्रकाशांत आणिली आहे. तिच्या सहाय्यानें वादच घालूं म्हटलें तर वरील आक्षेपांविरुद्ध जुन्या कवितेच्या

वतीनें समर्थनपर असें पुष्कळ लिहिता व बोलता येण्यासारखे आहे; व ४०।५० वर्षांपूर्वीची स्थिति बदलून, जुन्या कवीचें वकीलपत्र घेऊन भाडणारे विश्वविद्यालयीन पदवीधर तेव्हापेक्षा आजकाल खात्रीनें अधिक भेटतील. मात्र हे मुद्दे अजून निकालात लागलेले नसून वाद-ग्रस्त स्थितीतच आहेत. शिवाय रुचिभेद आणि नैसर्गिक कुतूहल-प्रवृत्तीमुळे नाविन्याकडे असणारी मानवी मनाची ओढ, ह्याच्या योगाने हे वाद कधीं संपणारेहि नाहींत. असो, ही वाटाघाट येथे जास्त वाढ-विणें अप्रस्तुत आहे. शास्त्रीबुवाच्या कवितेंत ह्या तीनहि आक्षेपास फारसें स्थान उरलेलें नाहीं. त्याचे विषय पौराणिक नाहींत, काहीं ऐतिहासिक व काही काल्पनिक आहेत. **जन्मभूमि, मृत्यु, दुष्काळ-वर्णन** वगैरे स्फुट विषय व अकृत्रिम सृष्टीचा राजा असा ' **समुद्र** ' हा नैसर्गिक काव्यविषय त्यांनीं निवडून काढून त्याच्या पोटांत अनेक स्फुट विषय त्यानी गोविले आहेत. व बुद्धिपुरःसर यमक-लीला आपल्या काव्यात त्यानीं कोठे केलेली नाहीं.

शास्त्रीबुवानीं यशवंतराव महाकाव्याच्या प्रस्तावनेत मराठी कविते-संबंधी जे विचार प्रगट केले आहेत, त्यावरून शब्दालकारामुळे काव्यात कृत्रिमता येत असेल तर तो मोठा काव्यदोष समजला पाहिजे असे त्याचे मत असल्याचे दिसून येते. या प्रस्तावनेत ते लिहितातः–" कविता जितकी सोपी आणि सरळ असेल तितकी चागली असे मला वाटते." + + + + + + + + + मराठी कवितेत यमकें साधलीच पाहिजेत असा नियम असल्याने कवीस पुष्कळ वेळा यमकें ओढूनताणून जुळ-वावीं लागतात. अर्थात् कविता नीरस व क्लिष्ट होत्ये. जेथपर्यंत मराठी कवितेच्या पायातील यमकाचीं बंधनें शिथिल होणार नाहीत, तेथपर्यंत ती साधारण लोकांस 'सुबोध होण्यास कांहीं मार्ग नाहीं." या अभिप्रायास अनुलक्षून त्यानी आपली कविता सोपी व्हावी म्हणून

अर्वाचीन मराठी भाषेंतील अगदी रूढ शब्दाचीहि योजना तीत केली असून त्यांनी यमकें साधण्याची फारशी खटपट केलेली नाहीं. '**क्वचित् यमकांस आपण फांटाहि दिला आहे,**' असें ते म्हणतात. तथापि, लहानपणीं वाचिलेल्या पंतांच्या कवितेच्या छापेंतून ते अजीबात सुटले आहेत, असें झालेले नाहीं. संस्कृत शब्द व संस्कृत-प्राकृत-मिश्र सामासिक शब्द त्यानीं उपयोगात आणिले आहेत व बहुतेक एकाक्षरी यमक तरी सर्वत्र योजिले आहे कित्येक अभिनव मराठी कवीप्रमाणे हटातटाने इंग्रजी निर्यमक काव्याचें अनुकरण करण्याच्या भरांत मुद्दाम यमकास चाट देण्याचा वेडसर आग्रह त्यानी धरिलेला नाही. उलट, इंग्रजीत देखील अंत्याक्षर यमक किंवा क्वचित् पहिल्या व तिसऱ्या आणि दुसऱ्या व चवथ्या चरणाची यमकें बहुतेक कवी साधीत असतात, ह्याची जाणीव त्यास असली पाहिजे हे उघड आहे.

**कवि हे परिस्थितीचें संतान**—कवि हे परिस्थितीचे जनक असतात असे म्हणण्याचा साम्प्रदाय पडला आहे. तथापि, ते परिस्थितीचें **संतानाहि** असतात असे म्हटल्यास तेंहि तितकेंच खरें आहे उपजत अंकुर जातीचाच जोमदार असला तरी जमीन, खत, पाणी वगैरे जशी तदनुकूल पोषक गुणानी युक्त असावी लागतात म्हणजे पीक भरदार येतें, तसेच कवीच्या काव्यगुणप्रकर्षाचें आहे. या चरित्राच्या सुरवातीस कवीच्या जन्मभूमीचे-**गुहागर गांवाचे**-वर्णन बरेच विस्तृत दिले आहे, त्यात काव्यगुणाला पोषक अशी नैसर्गिक सामग्री किती आहे पहा'-

लहानपणी घरात घडलेल्या काहीं कारणानें उद्वेग वाटून, रागावून रुसून ते बाहेर पडले की, समुद्रकांठची वालुकाभूमि त्यास मांडीवर घेऊन खेळवी. केव्हां आम्रवृक्षाचे सुकुमार पल्लव त्याना आपल्याकडे प्रेमानें बोलावीत व तरुतळी शीतल छायेंत बसून शांत होण्यास त्यास सुचवीत. तर केव्हां पांढऱ्या शुभ्र फुलानी फुलून गेलेल्या वेळीच्या

लांबचलाब अभ्रांचे आंदोलन चालूं असे व कवीस वाटे की, ह्यांचा हा प्रयत्न आपणास हासविण्यासाठीच चालला आहे. कैक वेळां, सतत वाहणारा **अष्टवण्याचा** निर्मल, गार पाण्याचा झरा त्यास म्हणाला असेल कीं, " **या, बालकविराज, या, आणि माझी ही अमृततुल्य वारिधारा आपल्या मस्तकीं धारण करा व कीर्तिकारक काव्य करून अमर व्हा ! !** " जर कवीला कधीं आपल्या दारिद्र्यावस्थेचा खेद जाचूं लागला व कष्टी मनाने क्षणभर समुद्रतीरावर तो गेला तर मित्रभावाने रत्नाकराने त्याची समजूत घालावी की, " बाळ, मी साक्षात् लक्ष्मीचा पिता; मी ह्या कोंकण देवीचे-कोंकणप्रांताचें-अहोरात्र चरणक्षालन करीत असतां तुझ्यासारख्या तिच्या लेकरांना काय उणें आहे रे ? बाबा, ऊठ ! असा खिन्न होऊन बसू नको. **माझ्याप्रमाणें उद्योमप्रवण हो ! 'उद्योग्याचे घरीं ऋद्धिसिद्धी पाणी भरी.'** " एकादे वेळीं रानामधले एकादें सुंदर फूल सुकून जागच्याजागी गळून पडलेलें पाहून कवीच्या मनात येई कीं, मी असाच अज्ञात स्थितीत फिरून अव्यक्तात विलीन झालों तर ? तर लागलीच, प्रभुकंठांतून आपाद रुळणाऱ्या भक्तार्पित वनमालेचें स्मरण होऊन ते उल्हासित होत. का की, ती वनमाला इतकी भाग्यशाली झाली की, प्रत्यक्ष देवी लक्ष्मीलाहि तिचा हेवा वाटे. लक्ष्मी म्हणे " **ही वनमाला दीर्घकाल प्रभुहृदयाचा आश्रय करून राहते. मला ते सुख क्वचित् व किंचित्कालच लाभते ! !** ' इत्यादि विचार त्या वेळीं बालकवीच्या मनोभूमिकेवर आरूढ होत. अशा तऱ्हेने, अनेक प्रसंग, अनेक स्थलें व अनेक वेळी उठणारे मनस्तरंग, वासुदेवशास्त्र्यांची कविताशक्ति पुष्ट करण्यास गुहागार येथे त्यास असंख्य लाभले असले पाहिजेत यांत शंका नाही

**त्यांच्या काव्यांतील गुण**—शास्त्रीबुवांच्या कवितेमधला मुख्य गुण ' **सहजस्फूर्ति** ' ह्यास शास्त्रीय परिभाषेंत ' **प्रसाद** ' म्हणतां येईल सहजस्फूर्त काव्याचा प्रकार असा असतो:—" **त्यांत कवीच्या कल्पनांचा प्रवाह अखंड चालू राहतो—बुद्धिपुरस्सर योजिलेल्या शब्दालंकारांच्या खडकाळ मार्गाच्या अभावीं तो सरळ, सीधा व संथ असा वाहात राहून मध्ये मध्यें येणाऱ्या प्राचीन, अप्रसिद्ध शब्दांच्या गवताळ बेटांनीं तो कधीं दुभंगलेला असत नाहीं; किंवा दूरान्वयरूपी वाळूच्या ढिगाऱ्यांनी कोठे त्रुटित होत नाहीं तर तो गंभीरपणें एकसारखा रसिक हृदयाचा ठाव घेत जातो.** " साराश, अर्थबोधदृष्ट्या जें काव्य सरळ श्रोत्याच्या अंतःकरणास जाऊन भिडतें ते सहजस्फूर्त काव्य होय. **ओज, माधुर्य,** हे दुसरे गुणहि ठिकठिकाणीं त्यांच्या काव्यात आढळतील. विशेषतः **यशवतराव महाकाव्यांत** वर्णिलेले वीररसाचे प्रसंग वाचीत असतां कवीची ओजस्विता परिणामकारक रीतीने वाचकाच्या अनुभवास येते. ' **वाक्यं रसात्मक काव्यम्,** ' म्हणजे **रस हा काव्याचा आत्मा आहे.** पण, रसिकावाचून ते रसज्ञान इतरेजनास कसें अनुभवास येणार? शास्त्रीबुवा ह्यासंबंधी एक सुभाषित श्लोक वारंवार सांगत असतः—

**इतर-पाप-फलानि यथेच्छया। विलिखितानि सहे चतुरानन ॥**
**अरसिकेषु कवित्वनिवेदनम्। शिरसि मा लिख मा लिख मा लिख ॥**

या श्लोकाचा उत्तरार्ध पुष्कळाच्या परिचयाचा असतो. भावार्थ असा आहे की, ' वाटेल त्या पापाचें प्रखरांतलें प्रखर प्रायश्चित्त घेण्यास आपण तयार आहों, ' पण कवि म्हणतो, ' देवा, रसिकावांचून दुसऱ्या कोणास काव्यमाधुरि चाखण्यास सांगण्याचें माझ्या नशिबास आणूं नको! ' सागण्याचें तात्पर्य असें कीं, काव्याच्या श्रोत्यानी किंवा वाचकांनीं कांहीं अंशीं कवीच्या भावनांशीं आपल्या भावना एकरूप-

समरस–करून त्याच्या काव्याचा आस्वाद घेतला पाहिजे जितकी जितकी ही तन्मयता अधिक तितका तितका त्या काव्यास्वादनापासून होणार आनंद अधिक हें उघड आहे.

**शीघ्र व सरस कवि**—शास्त्रीबुवांच्या अंगच्या कवित्व-शक्तीचा आणखी एक विशेष होता तो हा कीं, ते शीघ्र कवि होते. पुष्कळ वेळा एकादा विषय घेऊन त्यावर त्यांस ताबडतोब कविता रचून द्यावी लागे. ती ते सत्वर तर रचीनच, पण ती सरसहि असे. **यशवंतराव महाकाव्य** हे ' **दक्षिणा प्राइझ् कमिटी** ' कडून मोठें बक्षीस मिळून यशस्वी झालेले त्यांचे काव्य आहे. तथापि, ह्यातले कितीं तरी श्लोक शाळेत मिळणाऱ्या फुरसतीच्या वेळात अगर मधल्या सुट्टीत त्यांनी रचिलेले आहेत. केळकरकृत टिळकचरित्रात उल्लेखित असलेलें '**हारिसाष्टकम्** ' हे शास्त्रीबुवाचें असलेंच एक सहजलीलाकाव्य आहे. त्यातली एक आर्या अजून त्यांच्या एका वृद्ध स्नेह्याच्या स्मरणात राहिली आहे, ती अशीः—

**पोषवितो तोषवितो यास्तव गोऱ्यांस थोर 'हारीस' ॥**
**लोळवितो, घोळवितो यास्तव आम्हांस थोर हा रीस ॥**

बोलतां बोलता एकाद्या प्रसिद्ध संस्कृत कवीच्या श्लोकाचे समवृत्त भाषांतर ते सहज करीत अशीं समवृत्त भाषांतरें **शतकत्रय, भामिनी-विलास**, इत्यादींची जुन्या वामनादि कवियांनी केलेलीं प्रसिद्ध आहेत शास्त्रीबुवा तीं जलद करीत, हा त्यांचा विशेष गुण होय. अशा समर्पक भाषांतराचा नमुना व एक प्रकारे ऐतिहासिक महत्त्वाचा म्हणून संस्मरणीय झालेला, **केसरी** पत्रावरील जुना ध्येयदर्शक मूळ संस्कृत श्लोक व त्याचे खरेशास्त्री यानी केलेले भाषांतर पुढें दिले आहेः—

---

१. श्री. केळकरकृत टिळकचरित्र, पूर्वार्ध, भाग २२, पृ. ४९८.

स्थितिं नो रे दध्याः क्षणमपि मदांधेक्षण सखे ।
गजश्रेणीनाथ, त्वमिह जटिलायां वनभुवि ।
असौ कुंभिभ्रांत्या खरनखर विद्रावितमहा- ।
गुरुग्रावग्रामः स्वपिति गिरिगर्भे हरिपतिः ॥१॥

मराठी— गजालिश्रेष्ठा ! या निबिडतर कांतारजठरीं ।
मदांधाक्षा मित्रा ! क्षणभरिहि वास्तव्य न करी ॥
नखाग्रांनीं येथे गुरुतरशिला भेदुनि करि- ।
भ्रमाने आहे रे, गिरिकुहरिं हा निद्रित हरि ॥

जुन्या केसरीवरील उपर्युक्त संस्कृत श्लोकाचें हें समवृत्त मराठी भाषांतर **कै. हरिभाऊ आपटे** ( कादंबरीकार ) यानीं केले आहे अशी एक शंका होती. **रा. बापूराव आंबेकर** यानी कै. हरिभाऊंचे चरित्र लिहिलें आहे. त्यात या श्लोकाचे हरिभाऊंनी केलेले भाषांतर दिले आहे. हा हरिभाऊंचा श्लोक **कै० आगरकर** यांनी केसरीवर घातला होता, असेंहि रा. आंबेकर यानी म्हटलें आहे. परंतु हा श्लोक केसरी-वरून केव्हा व का काढण्यात आला ते समजत नाहीं. बाकी अजूनहि 'गजालिश्रेष्ठा' इत्यादि श्लोक शास्त्रीबुवांचा नसून आणखी कोणाचा आहे असें ठरले तरी त्यात कांहीं बिघडत नाहीं. उलट, चरित्रांत—इति-हासांत—सत्यकथनाचीच योग्यता अतिशय असते. शिवाय, या चरित्रात शास्त्रीबुवानीं रचिलेल्या संस्कृत श्लोकांचे व समवृत्त मराठी भाषांतराचे

---

१. द्विपेंद्राच्या नाथा ! क्षणभरिहि या दुर्धर वनीं ।
मदाधा रे, येथें वसति करणें आण न मनीं ॥
गजाच्या भ्रांतीनें प्रखर नखरानी गुरुशिला ।
विदारोनी येथे बघ गिरिमधें सिंह निजला ॥ १ ॥

२. फक्त पहिल्या वर्षीच काहीं अंकांवर मधून मधून हा श्लोक आढळतो, अशी माहिती केसरी कचेरींत मिळाली.

जे अनेक उतारे देण्यांत आले आहेत त्यावरून त्याचें काव्यरचनाचातुर्य या श्लोकावाचूनहि स्वतंत्रपणे सिद्ध होण्याजोगें आहे. असो.

शास्त्रीबुवांची शीघ्रपणें काव्यरचना करण्याची हातवटी त्यांच्या उतार वयातहि केव्हां केव्हा प्रकट झालेली आहे. धुळें येथे **'तारामंडळ'** नाटकाच्या १ ल्या प्रयोगाच्या वेळी, श्री. रा. रा. बापूराव राजहंस (बालगंधर्वांचे बंधु) याचे म्हणणे पडले कीं, " शालिनी विघ्नपरिहारार्थ श्रीगजाननाची करुणा भाकते ( अंक ३ रा, प्र. २ रा ) त्या प्रसंगीं म्हणावयासाठी एक प्रार्थनापद पाहिजे. " ते शास्त्रीबुवानीं त्या दिवशी रात्री जेवणे झाल्यावर सहज पानसुपारी खाता खातां गोष्टी निघाल्या असता तेथल्या तेथे रचून रा. बापूराव यास उतरून घेण्यास सांगितले. तें पद पुढीलप्रमाणे आहे --

**"अजुनि दया नुपजे तुजसी । कीं गणराया निजलासी ॥अजुनि०॥**
**कैवारी तूं दीनअनाथां । आश्रय कोण दुजा मजसी ॥ अजुनि० ॥**
**आस तुझ्या चरणाची धरिली । लोटुं नको दुरि ही दासी ॥अजुनि०॥**
**दुस्तर संकट पडले देवा ! । अंत अतां किति तूं बघसी ? ॥अजुनि०॥"**

**कांहीं अप्रकाशित कविता**—फुटकळ चुटके या पुस्तकावर 'भाग १ ला' असे त्यानीं छापिले आहे. यावरून आपल्या स्फुट काव्याचे पुढें भाग २ रा, भाग ३ रा, असे भाग छापण्याचा त्याचा मानस होतासे दिसते. परतु पुढे ऐतिहासिक संशोधनाच्या नादात तो बेत तर रहित झालाच, पण अशी वेळोवेळीं केलेली त्यांची स्फुट कविताहि कोणींकडे नाहींशी होऊन गेली, हे मराठीच्या आधुनिक काव्य-वाङ्मयाचें मोठेच नुकसान झालें असें म्हणणे भाग आहे परवां, ( फेब्रुवारी १९२९ ) त्याच्या घरचें पुस्तकांचे कपाट चाळीत असतां एक हस्तलिखित कवितांची वही सापडली. तीत सुदैवानें शास्त्रीबुवांनी स्वतः रचिलेल्या आणखी कांही संस्कृत व मराठी कविता आढळल्या.

त्यांत **पटवर्धनकुल, विद्याप्रशंसा, स्त्रीशिक्षण, साहेबाची भूपाळी,** ( उपहासोक्ति ) **बापू गोखला, मित्र रा गोविंदशास्त्री बापट, गुरुवर्य अनंताचार्य व श्रीमंत रा. बापूसाहेब कुरुंदवाडकर यांस पद्यमय पत्रें, श्रीमंत सरकार स्वर बाळासाहेब मिरजकर यांस मानपत्रें** ( त्यापैकी एक विस्तृत चित्रकाव्य आहे. ) **मरहूम व्हिक्टोरिया राणीची जुबिली** आणि काही संस्कृत श्लोकाचे भाषांतर अशा विविध विषयावरील हा लहानसा कवितासंग्रह आहे तरी हे सारे मिळून सहज दीडशेवर श्लोक आहेत. ह्यातले बहुतेक विषय वर्णनात्मक असूनदेखील कवीने मधून मधून आपले गंभीर व उदात्त विचारहि वर्णनाच्या ओघांत सहज आल्यासारखे त्यात मिसळून दिले आहेत.

**श्रीमंत रा बापूसाहेब कुरुंदवाडकर** यास '**गुणोत्कर्ष**' नाटक भेटीदाखल पाठविले त्या वेळी त्यांस काव्यमय पत्र लिहिलें त्यातील पुढील दोन श्लोक पहा:—

**" वस्तू पाहुनि रम्य, थोर, कविची वाणी स्फुरे सुंदर ।**
**त्या वस्तू विलयासि जाति कविता पावेल कैशी भर ? ॥**
**होते वैभव आमुच्या जन-पदीं, होते कवी अद्भुत ।**
**ते गेले म्हणुनीच ते न दिसती, ऐसे मला वाटत ॥१॥**
**" आतां मद्यमदे वृथा धनमदे पाश्चात्य-विद्यामदे ।**
**राजे डोलति, जाति पंडित कवि आधार त्यां कोण दे ? ॥**
**अंगें पंडितता तशीच कविता संपादुनी राजता ।**
**वाटे शूद्रक, हर्ष, भोज, समता पावूनियां शोभतां ॥ ३ ॥ "**

**श्रीमंत सरकार बाळासाहेब मिरजकर** यास तीन मानपत्रें शास्त्रीबुवांनी स्वामिभक्तिपूर्वक समर्पण केली. त्यात स्तुतिस्तोत्र नाहीं असे नाहीं. परंतु, त्याबरोबरच राजांचीं कर्तव्ये विनम्रभावाने पण निर्भीडपणे त्यांनीं श्रीमंतास निवेदन केलीं आहेत:—

“ दिला प्रभुवरें कृपा करुन देह जो मानवा ।
परार्थ झिजवून तो सुजन पावती वैभवा ॥
शशांकसम सन्मती जसजसे वये वाढती ।
गुणे, अनुभवे, यशे, अतुल कीर्तिला पावती ॥ १ ॥

“ प्रजा समजुनी मुले करुनियां कृपा त्यांवरी ।
सुखे सतत वाढवा झटुनियां तयांचीं खरीं ॥
असे प्रथम धर्म हा नृपतिचा मनीं वागवा ।
स्वकीय परक्या जनीं चिर सुकीर्तिते गाजवा ॥ २ ॥

“ लोकीं नृपाकडुन जे उपकार व्हावे ।
विद्याप्रदान पहिले पद त्यांत पावे ॥
विद्याविभूषित जनां निजराज्यरीति ।
दे प्रीति, भीति पळवी, मळवी न नीति ॥ ३ ॥

“ यासाठीं करुन विचार पूर्ण आधीं ।
आणोनी मान जनरीति, काल-संधी ॥
धैर्यानें मग करणे तसे करावे ।
कां जेणे चिर भुवनांत नांव व्हावे ॥ ४ ॥

“ टाकूं प्राण गुणानुरक्त अपुल्या सेवेत राहो प्रजा ।
क्षम्या पुष्कळ दोषयुक्त जरि ती तीच्या सुखाते भजा ॥
वित्ता राखण, न्याय, शिक्षण, कला, व्यापार, शेती, अशा ।
षट्कार्यांत मती असोत, अपुल्या मंत्र्यांचियाही तशा ॥ ५॥”

मित्र गोविंद शंकरशास्त्री बापट यांचा होळकर दरबारांत मोठा सन्मान झाला. त्याच्या अभिनंदनार्थ लिहिलेल्या कविताबद्ध पत्रांत कवि व राजे याचा संबंध कसा असावा हें बहारीनें ज्यांत वर्णिले आहे असा पुढील श्लोक पहा:—

**" नाना काव्यफले पिकून सुरसें संतोष देती जनां ।**
**मालाकार कवी खपून करिती ज्याच्या श्रमे वर्धना ॥**
**वाणीरूप सुरम्य बाग भुवनी, कैसा धरी जीवन ? ।**
**राजे हे धन-वारि-मेघ न जरी देती तया जीवन ॥ "**

ह्या अप्रकाशित कवितांपैकी आणखी कांही निवडक वेंचे पुढे उत्तरार्धांत काव्यप्रकरणी देण्याचा विचार आहे. सबब, येथे हात आखडता घेतों.

**राष्ट्रीयकवि-वाद**—अलीकडे कवींसंबधीं, 'राष्ट्रीय कवि कोणाला म्हणावे ?' असा आणखी एक महत्त्वाचा वाद विद्वानात केव्हा केव्हा चाललेला असतो. व मग, या वादाच्या दृष्टीने जुन्या–नव्या कवींची तुलना विद्वान् लोक करीत असतात. त्यात, **जुने कवि राष्ट्रीय प्रश्नांची विशेष पर्वा करीत नसत, त्यांना राष्ट्रीय दृष्टिच नव्हती, त्यांनी राष्ट्रीय जागृतीचे काम केलें नाही**, वगैरे दोष त्याचे माथी लादून नूतन कवीना मात्र राष्ट्रीय दृष्टि व राष्ट्रविषयक तळमळ असून अमका तमका आधुनिक कवि त्याला हा राष्ट्रीय कवित्वाचा मान दिला पाहिजे असा हल्ली डांगोरा पिटण्यांत येत असतो. " **महाराष्ट्रीय जुन्या संत कवींनीं स्वराज्यसस्थापक श्रीशिवराय याच्यासाठीं भूमिका तयार केली** " असा अभिप्राय, **न्या. मू. रानडे**प्रभृति थोर विद्वानानी आपल्या ग्रथात नमूद करून ठेविला आहे. सबब, त्याचें वेगळें समर्थन करण्याचे येथें प्रयोजन नाही. परंतु ' **कवि हा राष्ट्राचा निर्माता**' किंवा ' **प्राणप्रतिष्ठापक** ' एवढी मोठी पदवी जर कवीस द्यावयाची असेल तर हा बहुमान पटकावणारा ' **महनीय अभिनव कवि** ' अद्यापि महाराष्ट्रात जन्मास यावयाचा आहे असें आमच्या अल्प मतीस वाटते. पण आज दुसऱ्या कोणा कवीस ' राष्ट्रीय ' म्हणून संबोधण्यांत येत असेल तर मग, **वासुदेवशास्त्री खरे यांना ' राष्ट्रीय कवि ' हें उपपद सर्वांआधीं लावण्यांत आलें पाहिजे**. कारण, त्यांच्या

**'यशवंतराव महाकाव्यां'**त काय किंवा **' जन्मभूमि ' ' उज्जयिनी '** वगैरेसारख्या चिमुकल्या स्फुट काव्यात काय, स्वाभिमान, स्वदेशाभिमान, मराठ्याचे पराक्रम, रजपुताचें धीरोदात्त मनौदार्य व निधडें शौर्य, पूर्वजांच्या विद्याकलादि नैपुण्याबद्दल योग्य आदरभाव, याजसबंधीं उद्बोधक, स्फूर्तिदायक, उत्कटभावनोद्दीपक असे किती तरी प्रसंग वर्णिलेले आढळतील. उलटपक्षीं स्वकीयाच्या दुर्गुणाबद्दल व आपल्याच धर्मबांधवांविरुद्ध परधर्मीयाना सहाय्य होऊन हत्यार चालविण्याच्या स्वार्थमूलक पापप्रवृत्तीबद्दल, वाचकात तिटकारा उत्पन्न करण्याचें स्तुत्य कार्यहि त्यानीं आपल्या महाकाव्यात जागजागी गोंविलेल्या काव्यमय उद्गारानी केलें आहे. या चरित्राच्या उत्तरार्धांत जेथे काव्यपरिचय करून देण्यात आला आहे तेथे या आमच्या विधानाचीं थोडीशीं प्रत्यंतर-प्रमाणे वाचकास पहावयास मिळतील. 'यशवंतराव काव्य' ज्या काळात लिहिले गेले त्या काळीं लोकात वाचनाभिरुचि आजच्यापेक्षां कमी होती व तें काव्य आणि त्याचा जनक अगदी एका मागसलेल्या गावात राहात असल्यामुळे दुर्दैवानें त्याची प्रसिद्धि आजपर्यंत विशेष झाली नाही हे मात्र खरें.

**या वादांत शास्त्रीबुवांचें मत**—शास्त्रीबुवाच्या लेखांवरून व क्वचित् प्रसगी त्यांनी संभाषणाच्या ओघात काढिलेल्या उद्गारावरून स्वतः त्यांचे मन या मुद्यासंबंधी काय होतें याचे अनुमान सहज होण्याजोगें आहे. **कालिदासादि** प्राचीन संस्कृत कवीविषयीं त्याना केवढा निस्सीम आदर वाटत असे हें त्याच्या **'उज्जयिनी'** काव्यात उत्तम प्रकारे व्यक्त झालें आहे. तसेंच एका अप्रकाशित स्फुट काव्यात ते म्हणतात:--

**" कालिदास, भवभूति, भारवी, । बाण, दंडि, जयदेवसे कवी ॥**
**कां न येति उदयास सांप्रत ? । हर्षपूरित करूं जगाप्रत ॥ "**

ही झाली प्राचीन संस्कृत कवीसंबंधी गोष्ट; परंतु, **मोरोपंत** व **वामन पंडितादि** जुन्या महाराष्ट्रीय कवीवर जो दांडगा व्यासंग त्यानीं अगदीं लहानपणापासून केला होता त्यावरून त्या कवींची योग्यता शास्त्रीबुवा किती थोर लेखीत हे कळून येतें.

**श्रीसमर्थ रामदास स्वामी** यांना लोक सामान्यतः संत समजतात; कवि समजत नाहींत. तथापि, शास्त्रीबुवा एकदा न्या. मू. रानडे यांच्या ' **मराठी सत्तेचा उदय** ' (Rise of the Maratha Power)[१] या ग्रंथासंबंधीं एका मित्राशीं बोलत असतां रामदासाचा विषय निघतांक्षणीं त्यांची चित्तवृत्ति एकदम गंभीर होऊन समर्थांच्या दासबोधाविषयीं ते प्रेमादरभरानें बोलूं लागले, " **अहो, हे कवि खरे ! कवित्ववर्णन, मृत्यूच्या बलिष्टपणाचें वर्णन, महंतलक्षण, राजकारण, सच्छिष्य व सद्गुरु यांची लक्षणे इत्यादि व आणखी अनेक प्रकरणांतील अखंड व गंभीर वाणीचा ओघ प्रत्यक्ष समर्थमुखांतून श्रवणपथावर येत असतां, त्यांत आजहि आढळून येणारा जिवंतपणा तत्कालीन महाराष्ट्रीय लोकांच्या अंतःकरणांत कां न संचारवा ? 'संतांनीं जागृति केली' असें रावसाहेब म्हणतात तें अगदीं बरोबर आहे.** " एकाद्या रमण्याच्या दक्षिणेच्या निमित्तानें प्रहरानुप्रहर कोंडून ठेविलेला भिक्षुकगण कोंडी फुटताच राजद्वारांतून जसा गर्दीनें बाहेर पडतो, तशा तातडीनें समर्थांच्या मुखावाटें अर्थपूर्ण शब्दसमुदाय झपाट्यानें धावत असतात, किंवा बंधारा फुटलेल्या प्रचंड जलौघाप्रमाणें त्यांच्या **मृतसंजीवनी वाग्विलासिनी सरस्वतीचा** प्रवाह वेगानें चाललेला असतो, असा अनुभव दासबोधाच्या सहृदय वाचकास केव्हांहि आल्यावाचून राहात नाहीं. असो. शास्त्रीबुवांच्या

---

१. 'Rise of the Maratha Power', Chapter III–'How the Seed Was Sown'. See page 53.

मते 'राष्ट्रीय कवि कोणाला म्हणावे?' ह्या प्रश्नाच्या उत्तराचा बोध वरील विवेचनावरून उपलक्षणानें वाचकांस होण्यासारखा आहे.

शास्त्रीबुवाच्या काव्यासंबंधें सामान्यपणे जें काय लिहिणे जरूर होतें ते येथें लिहिलें आहे. त्याच्या चरित्राचें मुख्य सूत्र मध्येच सुटल्यासारखें होऊं नये, यास्तव प्रत्यक्ष ग्रथाचा परिचय विशेष विस्तारपूर्वक पुढें उत्तरार्धांत करून दिला आहे त्यातील गुणदोष जिज्ञासु वाचकानीं आपापल्या आवडीप्रमाणें स्वतःच ठरवावे हे अधिक बरें. असो. या काव्यकालात स. १८८४ सालीं '**समुद्र**' काव्य प्रसिद्ध केल्यावर पुढें '**गुणोत्कर्ष**' नाटक मध्येच लिहिले गेलें तो वृत्तात मोठा मौजेचा आहे. कालानुक्रम राखण्याकरिता गुणोत्कर्ष नाटकाचे हे जन्मकथन या ठिकाणीच देणे योग्य दिसतें.

**गुणोत्कर्षाची मजेदार जन्मकथा**—**कै श्रीमंत छत्रपति शाहूमहाराज** याचे दत्तविधान ता. १७ मार्च सन १८८४ इ. रोजीं झालें. व नंतर त्याना राज्याभिषेक करण्यात आला. या महोत्सवप्रसंगीं अगर त्यानंतर एक वर्षाच्या आंत राजाराम कॉलेजमधील विद्यार्थ्यांना करण्यास सोयीचे असें एक नाटक हवे होतें. म्हणून बक्षीस लावून नाटकें मागविण्यात आली होती. पुष्कळ लेखकांनीं आपल्या हस्तलिखित नाटकाचे बाह्यांग वगैरेहि फार मोहकपणें सजविलेलें होतें बक्षिसासाठी जमलेल्या नाटकापैकी एक नाटक पास झाल्याचे वर्तमानदेखील बाहेर फुटले! परंतु परीक्षक मडळींपैकी एक गृहस्थ खरेशास्त्री यांच्या '**गुणोत्कर्षा**'चीं हस्तलिखित वही हातीं घेऊन म्हणाले, 'अहो, हें एक नाटक वाचावयाचे राहिलें आहे!' दुसरे कोणी म्हणाले, 'जाऊं द्या कीं हो, कुठे वाचीत बसतां किचकट लिहिणे?' यावर पहिल्या गृहस्थांनी गंभीरपणे म्हटलें की, 'छे, बुवा! हें असे करणे अन्याय्य (Against conscience) आहे!'

आणि त्यांनी स्वत: तें रात्रीं जागून वाचून काढिलें. बक्षिसाचा निकाल आतां अवघ्या एक दोन दिवसांत व्हावयाचा होता तेव्हां लागलींच ते गृहस्थ दुसऱ्या एका पंचाकडे गेले, व त्यास ते वाचून पहाण्याची शिफारस करू लागले. पुस्तक वाचून पाहिल्यावर ते-गुणोत्कर्ष-ह्या दुसऱ्या पंचासहि आवडले. आणि त्याने तिसऱ्या पंचास सांगितलें. अखेर ते सर्व परीक्षक पचापुढे वाचावयाचे ठरून वाचिले गेले. आणि सांगावयाची गोष्ट अशी की, ते पासहि झाले!

**विद्वन्मान्य कवि**—गुणोत्कर्षाच्या लोकप्रियतेचें एकच प्रमाण असे आहे कीं, त्याच्या प्रसिद्धीपासून अवघ्या २।३ वर्षांत त्याच्या तीन आवृत्ति निघाल्या! मध्यंतरी काही वर्षं सरकारच्या रोपास बळी पडलेल्या पुस्तकांच्या यादींत त्याची गणना झाली होती. तथापि, अलीकडे त्यावरची बंदी सरकारने उठविली असून त्याची आता सहावी आवृत्ति निघाली आहे. गुणोत्कर्ष व त्याच्या पाठोपाठ '**यशवंतराव महाकाव्य**' (स. १८८५ त लिहिलें व स. १८८८ त छापून प्रसिद्ध केले.) ह्या दोनहि कृती विद्वज्जनास मान्य झाल्या व त्यांस पारितोषिकेंहि मिळाली. शास्त्रीबुवांच्या यशवंतराव महाकाव्यास पुण्याच्या दक्षिणा प्राइझ् कमिटी-कडून बक्षीस मिळाल्याचे मागें सांगितलेच आहे. फुटकळ चुटके, भाग १ ला, नावाचा आपला स्फुट कवितेचा सग्रह त्यानी स १८९१ मध्यें छापविला. त्यासंबधें येथे विशेष सांगण्याजोगे काही नाही.

**मार्मिक काव्यपरीक्षक**—शास्त्रीबुवा स्वत जसे उत्तम कवि तसे ते मार्मिक काव्यपरीक्षकहि होते. त्याची कविता किंवा त्याचे काव्यपरी-क्षणात्मक लेख कशाकशात प्रसिद्ध होत असत हे मागे सांगितलेच आहे. त्यापैकी काव्यरत्नावलीचे संपादक व शास्त्रीबुवांचे जुने स्नेही रा. रा. नारायण नरसिंह फडणीस ह्यानीं खरेशास्त्री याच्या मृत्युलेखात ह्यासंबंधीं जें लिहिले आहे तें अक्षरशः येथें त्याच्याच शब्दात आम्ही देतों —

"त्याचे-शास्त्रीबुवाचे-काव्यरत्नावलीवर विशेष प्रेम होतें. काव्यरत्नावलींत प्रसिद्ध होणाऱ्या कविता तपासण्याकरिता त्या वेळी जी रसिक व कवि मंडळी होती त्यात शास्त्रीबुवा हे एक परीक्षक होते. त्यानी काव्य तपासण्याचे काम फारच चागलें व मार्मिक रीतीनें केलेले आहे. त्यांच्या काव्य तपासण्याच्या संबधानें एका गोष्टीचा उल्लेख प्रामुख्याने केल्याशिवाय आमच्यानें राहावत नाही. त्या वेळी कै० **केशव सदाशिव रिसबूड** ह्या नावाचे एक कवि होते. याची बरीच कविता रत्नावलींत प्रसिद्ध झालेली आहे. सदर कवीचे डोळे मूळचे अधु होते. पुढे एकाएकी ते दुर्दैवाने आंधळे झाले. त्या दुर्धर अंधस्थितीत त्यानी '**प्रभुलीलाशती**' हे काव्य लिहिले आहे. ह्या कवितेत प्राय त्यानी ईश्वराची करुणा भाकिली आहे. हें काव्य बरेच मोठे असून चागले वाचण्यासारखे आहे. यांतील करुणरस हृदयास पाझर फोडल्याशिवाय राहात नाही. हे काव्य आम्ही शास्त्रीबुवाकडे परीक्षणाकरितां पाठविले होते. त्यात शास्त्रीबुवानीं फारच मार्मिक रीतीची दुरुस्ती केलेली आहे. व व्याकरणरीतीनेहि फारच त्या काव्याची शुद्धि केलेली आहे. ही कविता शुद्ध करून त्यानी आम्हास खाजगी पत्रात असे लिहिले कीं, **मोरोपंतांच्या केकावलीनंतर अशी कविता हीच मी आज पहात आहें**"

निस्सीम पंतभक्त व केकावलीचा दृढ व्यासंग केलेले या दृष्टीने उपर्युक्त अभिप्राय देण्यास त्यास कसा अधिकार प्राप्त झाला होता हें येथे नव्याने सांगावयास नको आहे. ह्यानंतर स. १९११।१२ च्या सुमारास शास्त्रीबुवांच्याकडे '**वनविहार**' व '**रणविहार**' नावाचीं दोन मोठी काव्ये परीक्षणार्थ आलीं होती. ही सांगली येथील कवि श्री. **रा. गोपाळराव मुजुमदार** ऊर्फ **साधुदास** यांनी रचिलेलीं असून ती त्यांनी आता छापून प्रसिद्धहि केलेलीं आहेत.

---

# संशोधनकार्यांचा व्याप

" खरेशास्त्री यांच्या एवढा अवाढव्य माहितीचा माणूस एकाद्या राष्ट्रांत वारंवार उपजत नसतो. "

( कै. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे ).

**नानांचें चरित्र व मळेदप्तराची माहिती**—गुरु० वासुदेवशास्त्री खरे यांची प्रसिद्धि ज्या इतिहाससंशोधनाच्या प्रचंड उद्योगाने झाली तो उद्योग सतत ३५ वर्षे त्यानीं चालविला होता. लहानपणी मोरोपंत, मुक्तेश्वर, याच्या कवितांप्रमाणें 'मराठ्याची बखर' हे ऐतिहासिक प्रकरण त्यानी हौसेने वाचिले होतें व तेव्हापासून त्याना इतिहास-वाचनाची गोडी लागली होती. पुढे वयाच्या विसाव्या वर्षी पुण्यास आल्यावर **रा. ब. साने, रा. मोडक** व **विष्णुशास्त्री** यानी चालविलेल्या '**काव्येतिहाससंग्रहा**'मधून प्रसिद्ध होणारी, बखरी, वाके व इतर ऐतिहासिक साधने त्यास वाचावयास मिळूं लागली. तेव्हापासून ऐतिहासिक माहिती आस्थापूर्वक वाचण्याचे व्रत त्यानीं चालविले होतें. ग्रँट्डफ्च्या इतिहासावरील 'कीर्तने याचा टीकात्मक निबंध' त्यानी पूर्वीच वाचिला असून पुढे इंग्रजी शिकल्यानतर ग्रँट्डफ्चे मूळ पुस्तकाहि त्यानी वाचिलें. ह्या आतापर्यंत वाचिलेल्या माहितीच्या आधारे व **मेणवलीदप्तरांती**ल कांही पत्राच्या सहाय्याने त्यानी '**नाना फडनविसांचें चरित्र**' हा आपला पहिला ऐतिहासिक ग्रंथ छापून प्रसिद्ध

१ काव्येतिहाससंग्रहातील पत्रें, नागपूरकर भोसल्याची बखर, सरंजामेकृत शिंदे घराण्याचा इतिहास, पेशव्याची बखर, पंतप्रधान याची शकावली, मेजर मॅक्डोनल्ड याची 'नानाची बखर', धाकटे शाहूराजे याचें चरित्र वगैरे, वगैरे.

केला ( स. १८९२ ). हा ग्रंथ लिहीत असतां **मिरजमळा** संस्थानचे कारभारी कै. रा. सा. **गणेश कृष्ण सोहनी** यांनीं शास्त्रीबुवांस नाना फडनविसाविषयीं कांहीं माहिती सांगितली आणि 'मळे संस्थानच्या दप्तरांतील जुन्या अस्सल कागदपत्रांच्या आधारें ही माहिती आपण सांगत आहों,' असेंहि ते म्हणाले. ते ऐकून शास्त्रीबुवांना मोठा विस्मय वाटला व तें दप्तर पाहण्याची उत्कंठा त्यांना लागली. लौकरच त्यांची ही उत्कंठा तृप्त झाली. आणि या दप्तरामुळेच त्यांच्या ऐतिहासिक संशोधनाच्या कार्याचा प्रारंभ झाला. आणि त्यांच्या '**ऐतिहासिक लेख-संग्रह**' द्वारा प्रसिद्ध झालेली पत्रे व माहिती मुख्यतः या दप्तराच्या संग्रहामधूनच त्यांनी उजेडांत आणिली. हें काम त्यांच्या हयातीत त्यांस सतत तीस वर्षांवर पुरून उरलें!! नानांच्या चरित्र-ग्रंथाचा परिचय पुढे उत्तरार्धांत करून दिला आहे. मळेदप्तराचें केवळ संशोधन खरेशास्त्री यांनीं यानंतर अखंड ५।७ वर्षें चालविलें होतें. आतां यापुढील प्रकरणांत त्याचेंच प्रथम विस्तृत वर्णन दिलेलें आहे.

**इतिहासशास्त्र**—हें संशोधनाचें कार्य शास्त्रीबुवांनीं ज्या व्यापक ऐतिहासिक दृष्टीने सर्वांगपरिपूर्ण करण्याचा प्रयत्न केला ती शास्त्रीय दृष्टि कोणती याविषयीं विद्वानांच्या अभिप्रायास अनुसरून कांहीं थोडेसे लिहिणें येथें उचित वाटतें.

"इतिहास म्हणजे 'ज्यामध्ये धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे चार पुरुषार्थ कसे साधावे याबद्दलचा उपदेश केलेला असून तत्संबद्ध गोष्ट सांगितलेली आहे असा प्राचीन काळचा वृत्तांत,' असें सामान्यतः प्राचीन काळीं इतिहासाचें स्वरूप होतें. अथर्व वेद, बृहदारण्यकोपनिषद्,

---

१. महाराष्ट्रीय ज्ञानकोश, 'इतिहासशास्त्र,' शारीर विभाग ८, पृष्ठ १०६ ते १३२ वरून सारांश.

तैत्तिरीय आरण्यक, आश्वलायन गृह्यसूत्रे, इत्यादींमध्यें व महाभारत-रचना-काळी इतिहास-वेद, पुराण-वेद किंवा इतिहास-पुराण यांना चांगलें महत्त्व असे. तथापि, खरोखरी ऐतिहासिक महत्त्वाच्या सत्यकथा-बरोबरच दंतकथा व वैदिक वाङ्मयावरून केलेली रूपकें अशांसारख्या कल्पित कथा देखील त्यांत संग्रहित केलेल्या आहेत. यामुळे अर्वाचीन इतिहासाप्रमाणें त्यावरून प्राचीन काळच्या कोणत्याहि विवक्षित काल-विभागातील राजकारण, लोकस्थिति, व्यापारउदीम, उद्योगधंदे इत्यादीं-संबधी निश्चित माहिती मिळविणे अगर शोधून काढणे कठिण असते. आणि अशी शोधून काढिलेली माहिती केव्हा केव्हा वादग्रस्त असण्याचा संभव असतो. प्राचीन भारतइतिहासकालापासून म्हणजे बुद्धपूर्वजग-कालापासून खरे-राजवाड्याच्या कालापर्यंत इतिहासलेखनाचा विकास दाखविताना संस्कृत लेखकांपैकी **काश्मीरच्या कल्हण नामक 'राज-तरंगिणी'काराचा** उल्लेख करावा लागतो. **कल्हणानें** ऐतिहासिक सत्याची बरीच आवड दाखविली आहे **सिलोनच्या 'महावंसो' 'दीपवंसो'** मधून बुद्ध भिक्षूंची चरित्रे म्हणजे धार्मिक लिखाण आहे. ते लिखाण ब्राह्मणी पुराण-पद्धतीचे झाले आहे **वंसोकारांस** कोणत्याहि सामुच्चयिक संसाराच्या गोष्टीचे-**राज्याची जमाबंदी, करवसूल, राजनीति, इत्यादींचें** महत्त्व वाटत नाही. **कल्हणास** त्याचे महत्त्व वाटते व तो त्याबद्दल आस्था दाखवितो. तात्पर्य, प्राचीन पुराणपद्धति व अर्वाचीन इतिहास-लेखनाची पद्धति एकमेकींपासून अत्यंत भिन्न आहेत हे उघड आहे. अर्थात् आधुनिक शास्त्रीय पद्धतीने आपल्या देशाचा अर्वाचीन काळचा शास्त्रीय इतिहास लिहून तयार करण्यासाठी इतिहाससाधनांचा-स्मारके, वस्तु, लेख, यांचा-शोध, संग्रह, वर्गीकरण, सूचि, त्याच-प्रमाणे लिपिपरिज्ञान, कालमापन, भौगोलिक माहिती इत्यादि सह-कारी शास्त्रे, बाह्यचिकित्सा, अंतरंगपरीक्षण, मूळपाठसंशोधन व काल-

संशोधन, लेखसंग्रह, त्यांतील सारग्रहण, प्रत्यंतर पुराव्यांनी ऐतिहासिक विधानांचे सत्यत्व पारखून सिद्ध करणे, त्यांवरून कांहीं निश्चित सिद्धांत बांधणे, काल्पनिक किंवा अपुऱ्या माहितीवर बसविलेल्या तार्किक विधानांची ग्राह्याग्राह्यता ठरविणे इत्यादि अनेक महत्त्वाच्या अंगांचा विचार व्हावा लागतो, आणि मगच शास्त्रशुद्ध इतिहास तयार होतो. तस्मात् इतिहासशास्त्राच्या उपर्युक्त अंगोपांगाचा सूक्ष्म विचार करण्यास समर्थ अशी बुद्धिमत्ता इतिहाससंशोधकाच्या ठिकाणी असावी लागते. ”

**ह्या कामीं शास्त्रीबुवांची योग्यता**—वरील शास्त्रीय विवेचनानुसार शास्त्रीबुवाच्या अंगी मुख्यतः ऐतिहासिक लेखापैकी उपयुक्त लेख निवडणें, त्यांची तारतम्याने ऐतिहासिक किंमत ठरविणे, कालनिर्णय करणे व कोणत्या लेखात कोणत्या ऐतिहासिक मुद्दयाचा धागा गुंतलेला आहे हें चटकन् लक्षात घेणे, म्हणजे जुन्या लेखाच्या नित्य व सूक्ष्म अवलोकनानें व सतत अभ्यासाने प्राप्त होणारी अंतर्दृष्टि आणि प्रत्यंतर प्रमाणांच्या सहाय्याने पुरावे पारखून घेणे, हेच एका शब्दात सांगावयाचें तर, **‘भूतार्थाविषयीं संभवासंभवपरिज्ञान असणे’** हे गुण उत्कटतेने वसत होते. इतिहाससंशोधकाच्या धंद्याचे व शोधकबुद्धीच्या जातिवैशिष्ट्याचे हे सारभूत लक्षण खरेशास्त्री यांच्या ठिकाणी ऐतिहासिक लेखांच्या अनेक वर्षांच्या परिशीलनानें सिद्ध झालेलें होते या आमच्या म्हणण्यास प्रमाणभूत व पुष्टिदायक असे अभिप्राय त्याच्या ऐ. ले. संग्रहावर अनेक विद्वानांचे असून त्यापैकी मुख्य पुढे उत्तरार्धांत इतिहास-ग्रंथ-परिचय प्रकरणी परिशिष्टात दिलेले आहेत त्यावरून वाचकांची यासंबंधांत खात्री पटेल; असो. ‘ **महाराष्ट्रीय ज्ञानकोश** ’**कारांच्या** विस्तृत विवेचना-प्रमाणे इतिहाससंशोधनास अवश्य लागणारा गुणसमुच्चय शास्त्री-बुवांच्या अंगी होता ह्याबद्दल अधिक कांही न लिहितां यापुढे त्यांच्या संशोधनकार्यांतील परिश्रमाचें थोडेसे निरूपण करितो.

**सामग्री जुळविणें**—नाना फडनविसाचे चरित्र लिहीत असतां मळे संस्थानचे कारभारी याच्याकडून संस्थानच्या जुन्या दप्तराची माहिती लागतांच शास्त्रीबुवांनी त्याच्या परवानगीने ते दप्तर पाहण्याची इच्छा पूर्ण करून घेतली. सर्व पटवर्धनी संस्थानामधून लहानमोठे पत्रसंग्रह आहेत, हे जरी खरे आहे, तरी मळे संस्थानचें दप्तर सर्वांत जुनें व मोठें आहे. वस्तुत. ते **मिरजेचेंच दप्तर** आहे व पटवर्धन जहागिरीच्या वांटण्या होण्यापूर्वी **मिरजकिल्ला** हाच पटवर्धनाच्या राजकीय उलाढालींचें केंद्र असल्यामुळे चोहो बाजूंनी होणारा राजकारणी पत्रव्यवहार या मध्यवर्ती ठिकाणाशींच होत असे, मिरज व मिरजमळा ही वाटणी बरीच अलीकडची आहे, आणि हेच **मिरजेचें दप्तर** आज मिरजमळा संस्थानच्या ताब्यात आहे. **सांगली** व **जमखंडी** येथील दप्तरें मोठी असली तरी तीं अलीकडची—एकोणिसाव्या शतकातील—आहेत. शास्त्रीबुवांनी कामापुरती तीहि अंशत पाहिलीं होती. पण मळे संस्थानचे पत्रसंग्रहाचे २०० रुमाल—गठ्ठे—असून, त्यातला अगदी कपटानूकपटा खरेशास्त्री यानी वाचून पाहिला होता ! वाचताना महत्त्वाचीं पत्रे वाटली ती त्यानीं निवडून काढिली, काही पत्रातील निवडक भागाचीं त्यांनी टिपणे करून घेतलीं, या निवडलेल्या पत्राच्या मोडींत नकला करवून त्या अस्सल पत्रावरून तपासून पाहिल्या, या मोडी लेखकांस नकला करण्यासाठीं मोबदला त्यास ७।८ शें रुपये द्यावा लागला, शिवाय, ते स्वतः लिहीत ते वेगळेच, असा क्रम पहिलीं ५।७ वर्षे तर सतत चालला होता. पत्राच्या प्रकाशनाच्या कामी पोलिटिकल् खात्याची हरकत येईल कीं काय, असे वाटून मळे संस्थानचे अधिकारी प्रकाशनास परवानगी देण्यास कांकू करूं लागले. तेव्हां दक्षिणमहाराष्ट्र संस्थानांवरचे **पोलिटिकल् एजंट्** यांची परवानगी शास्त्रीबुवांनी मिळविली. त्यामुळें प्रकाशनाचे काम निर्धास्त व तितकें सुलभ झालें. यानंतर त्यांनी खुद्द

**मिरज, कुरुंदवाड, इचलकरंजी** इ० संस्थानांच्या **अधिपतींची** परवानगी मिळवून तेथील दप्तरेंहि शोधून पाहिली. यांखेरीज ह्या भागांतले लहान लहान जहागीरदार, इनामदार, तैनातदार व इतर जुनीं घराणी—जेथून जेथून जुना पत्रव्यवहार मिळणे शक्य होते तेथून—तो मिळविण्याचा हरएक प्रयत्न करून त्यांनी मिळविला. **पुण्यासारख्या** दूरच्या ठिकाणाहूनसुद्धा कित्येक कागदपत्र त्यांनी मिळविले व ह्या सर्व कागदपत्राचा त्यांनी आपल्या संशोधनकार्यास उपयोग करून घेतला.

**मळेदप्तराचें महत्त्व**—मराठी राज्याच्या **पानिपतोत्तरकालीन इतिहासाच्या** दृष्टीने या **पटवर्धनी दप्तराची** योग्यता फार मोठी आहे. पटवर्धन सरदारांची चलती इ. स. १७६०।६१ पासून पेशवाईच्या अंतापर्यंत ४० वर्षें चांगलीच होती ह्या अवधींत पेशव्यांनी केलेल्या सर्व मोहिमात पटवर्धन प्रमुख होते प्रत्येक लढाईत अघाडीचा मान पटवर्धनांकडे असे. ह्या ४० वर्षांतील लढायांत ह्या घराण्यांपैकी २०।२५ पुरुष समरांगणी पडले आहेत ! ! ! प्रत्येक स्वारींतील सैन्याच्या हालचाली, वेढे, लुटालुटी, लढाया, छापे, पाठलाग, फदफितूर वगैरे जे जे प्रकार झाले त्या सर्वांचे इत्थंभूत वर्तमान त्या त्या स्वारींतील सरदारांनी व कारकुनानी मिरजेस लिहून पाठविलेले आहे. पटवर्धनांच्या कुळात **गोपाळराव** व **परशुरामभाऊ** हे धुरंधर योद्धे होऊन गेले. त्यांनी मोठमोठ्या आणीबाणीच्या वेळी लिहिलेली हजारो पत्रें शास्त्रीबुवांस उपलब्ध झालीं. **वामनराव, निळकंठराव. कोन्हेरराव, रघुनाथराव, पुरुषोत्तमदाजी, पांडुरंगराव**, वगैरे पटवर्धन सरदारांची, तसेंच **नानासाहेबांपासून रावबाजीपर्यंत सर्व पेशवे,**

---

१ ह्या उताऱ्यातील बराचसा भाग खुद्द शास्त्रीबुवाच्या लेखातला आहे. ऐ. ले. सं—भाग १ ला, अंक १ ला पहा.

**सखारामबापू, मोरोबादादा व नाना फडनवीस, गोविंद शिवराम, आप्पा बळवंत, त्रिंबकरावमामा, नारो शंकर, विठ्ठल शिवदेव, महादजी शिंदे, तुकोजी होळकर, धायगुडे, रास्ते, कोल्हापूर-राजमंडळाचे सरदार, हैदरअल्ली, निजामअल्ली, नागपूरकर भोंसले, गायकवाड, मुरारराव घोरपडे,** इत्यादि इतिहासप्रसिद्ध पुरुषांचीं पत्रे पटवर्धन दप्तरांत सामील झालेली आहेत सारांश, **या चाळीस वर्षांत, मिरज हें तत्कालीन राजकीय उलाढालींचें एक मोठे केंद्रस्थान असल्यामुळें, अनेक लहानमोठ्या नद्या जशा समुद्रास जाऊन मिळतात त्याप्रमाणें देशांतील सर्व राजकीय घडामोडीची आणि कारस्थानांची बातमीपत्रें येथें–मिरजेंत–यावींच लागत.**

मळेदप्तरांतील ही सर्व पत्रे अर्थात्च शास्त्रीबुवांच्या वाचनात आलेली होती. त्यांच्या अश्रांत संशोधन-परिश्रमांबद्दल एका मार्मिक लेखकाने असे म्हटले आहे की, शास्त्रीबुवांनी वाचिलेल्या पत्राचे प्रमाण त्यानी छापिलेल्या पत्रांशी **पांचशेंस एक** असे पडते! व इतिहास-संशोधक कै. राजवाडे यांनी खरेशास्त्री याच्याजवळ तीस हजार निवडक लेख असल्याबद्दल एके ठिकाणी उल्लेख केला आहे. यांवरून पटवर्धनी दप्तरामधील अवाढव्य लेखसंग्रहाची कल्पना होईल. ह्यांतील निवडक पत्रांच्या नकला करितांना किंवा कित्येक पत्रांतील सारांश उतरून घेतांनाहि मूळ पत्रांतील शब्द जसेच्या तसेच कायम ठेविलेले आहेत. या पत्रप्रकाशनाच्या हेतूविषयीं **ऐ. ले संग्रह** मासिकाच्या पहिल्या वर्षाच्या पहिल्या अंकांत आरंभी प्रस्तावनेत शास्त्रीबुवांनी खालील-प्रमाणे खुलासा केलेला आहे.

---

१. इतिहासविहार, पृष्ठ १३०, केळकर याचे लेख, जून १९१४ पहा.

**बखरी आणि पत्रें यांतील तारतम्य**—"बखरी व दंतकथा यांचा इतिहासास उपयोग फार थोडा आहे. मराठी इतिहासाचा खरा पाया तत्कालीन पत्रव्यवहारावरच रचिला असला पाहिजे. तो पत्रव्यवहार हाती लागल्याशिवाय ज्या काळचा इतिहास लिहावयाचा त्या काळी लोकाची सामाजिक व राजकीय स्थिति खरोखरी कशी होती हे कधीं कळावयाचें नाही; परंतु, अस्सल जुने पत्रव्यवहार अनेक स्थळीं हिंडून धुंडाळ-ण्याचे काम फार दगदगीचे व खर्चाचे आहे. शिवाय, तें एकदोघांनीं कितीहि खटपट केली तरी सिद्धीस जाणारे नव्हे. पण आता या कामी हेळसांड केल्यास पुढें ते करण्याचें कारणच उरणार नाही ! जुन्या कागदांची हल्ली किंमतच नाहीशी झाल्यामुळें त्यांपैकीं किती गहाळ झाले, किती कसरीने खाल्ले, किती पावसानें भिजून कुजले व एखादा अडाणी अंमलदार भेटल्यास शेंकडों रुमाल 'बी लिस्टान' ओढले जाऊन त्यांचा कुट्टा होण्याची भीति आज उभी राहिली आहे !" 'बखरी व पत्रे यांचें तारतम्य राजवाडे यानी ठरविले,' असे ज्ञान-कोशात म्हटले आहे. परंतु खरेशास्त्रीहि ते जाणीत होते हे वरील उताऱ्यावरून कोणाच्याहि ध्यानी येईल; असो.

**पत्रांवर केलेले अनेक संस्कार**—जमाविलेल्या माहितीच्या आधारे कथासूत्र जुळविण्याची घाई न करितां तिचे सूक्ष्मपणे संशोधन करण्याचे कामीच ते फार परिश्रम करीत. कारण, मग त्यांची संशोधित माहिती डळमळण्याचा संभव नसे. या पद्धतीनें काम थोडे झाले तरी झालेले कार्य निश्चित पदरांत पडत असे. पत्रांच्या कालनिर्णयाच्या कामी ते लिहितातः—"स. १७७४ पूर्वींच्या कागदांवर फक्त मुसलमानी महिना, तारीख व क्वचित् हिंदु तिथि व महिना घातलेला आहे. कित्येक पत्रांवर ह्यांपैकीं कांहीच नाहीं! अर्थात् या पत्रांचा कालनिर्णय करण्यास किती त्रास पडला असेल याची कल्पना असलें काम ज्याने केलेलें आहे

त्यासच येईल !! " पत्राची मिति निश्चित केल्यावर त्यापुढचे काम म्हणजे जमविलेल्या पत्रसंग्रहाची सालवारी व पत्रांतील मजकुराच्या धोरणानें त्याची विषयवारी व क्रमवारी लावावयाची हें होय. त्यानीं छापिलेल्या पत्रांत मुख्यतः राजकीय महत्त्वाचींच पत्रे, पुष्कळ असलीं तरी तत्कलीन सामाजिक स्थितीची द्योतक—बेखरी, सरंजामाचे बेहेडे, तैनात जाबते, किरकोळ टिपणें, पंचायतींचे निकाल, बाजारनिरख, घोड्यांची चंदी, शिपायाची पोटगी, कैद्यांच्या शिक्षेचे प्रकार, काशीयात्राखर्च इ. इ. संबधी—पत्रें, यांचा देखील या प्रस्तावनेंत निर्देश केल्याप्रमाणें त्यांनी वेळोवेळी प्रसिद्ध केलेल्या आहेत यानंतर, छापिलेल्या पत्रातील कठीण—जुने म्हणून दुर्बोध—शद्बांवर अर्थाच्या खुलाशासाठी भरपूर टिपा देणे किंवा अप्रसिद्ध स्थळे व वाचकांस अज्ञात व्यक्ति याच्या माहिती-स्तवहि स्पष्टीकरण करणे अवश्य असते, ते त्यांनीं दरेक पृष्ठाखाली टिपा देऊन केलें आहे त्याचप्रमाणे जुन्या पत्रात आढळाणारे फारसी, ऊर्दू शब्द व क्वचित् पोर्तुगीज किंवा इंग्रजी शब्दाचे अपभ्रंश अगर कित्येक कानडी शब्द याचे अर्थहि त्यांनीं टिपात दिले आहेत. फारसी व ऊर्दू शब्दाचे अर्थ महत्प्रयासानें ते मिळवीत असत. तसेच कोठे विरोधी वचनाचा परिहार, सांकेतिक नावें व हल्ली प्रचारात नसलेल्या म्हणी इ० संबधी खुलासे त्यांनी अशा टिपातच केलेले आहेत, ते यथार्थ असून कित्येक तर वाचकास गमतीचे वाटणारे आहेत. सारांश, जुनी पत्रे सुबोध व मनो-रंजक करण्याची शक्य तितकी सारी तरतुद त्यांनी करून ठेविली आहे. ऐतिहासिक स्थळाचें भौगोलिक ठावठिकाण नक्की सांगता यावे, म्हणून प्रांतोप्रांतीचीं वर्णनें व नकाशे आणि व्यक्तींच्या माहितीसाठी जुन्या

---

१. ऐ. ले. सं. भाग १ ला, अं. १ ला, पृष्ठ ४ वर ह्यांचा उल्लेख आहे.
२. ऐ. ले. सं. भाग ६ वा व ७ वा पहा. ३. ऐ. ले. स. भाग ७ वा.

घराण्याच्या वंशावळी, गॅझेटिअर, अनेक मराठी व इंग्रजी ऐतिहासिक ग्रंथ व तारखा जुळविण्यासाठी जंत्र्या इत्यादि साहित्य त्यांनी जमविलें होतें. हिंदुस्थान देशाच्या भूगोलाची माहिती त्यांस उत्तम प्रकारची असून विशेषेंकरून त्यांच्या कार्यांत सतत जरूर लागणाऱ्या महाराष्ट्राच्या भूगोलाची अगदी बारीकसारीक माहितीसुद्धां त्यानीं करून घेतलेली होती. भूगोल हे इतिहासाचे किती महत्त्वाचे सहकारी शास्त्र आहे हे या गोष्टीवरून वाचकाच्या चागले लक्षात येईल.

**आणखी एक महत्त्वाचा संस्कार**—येथवर वर्णन केल्याप्रमाणे जुन्या कागदपत्रांना इतके संस्कार केले तरी आणखी एक महत्त्वाचा संस्कार खरेशास्त्र्याच्या हातून त्यावर घडत असे. प्रथम दोन तीन वर्षे ऐ. ले. संग्रह हे मासिक होते. ते केवळ याच्या एकट्याच्या जोरावर चाललेले, त्यास ग्राहकहि विशेषसे नव्हते व घरच्या द्रव्याचा पाठपुरावा अगदीं बेताबाताचा, असे असता सदर मासिकाच्या नियमितपणाबद्दल मोठी ख्याति होती. तथापि, पैशाच्या अडचणीमुळे व नोकरी वगैरे इतर व्यवसायाच्या सोयीच्या दृष्टीने तिसऱ्या किंवा चौथ्या भागापासून शास्त्रीबुवानी मासिक बंद केले आणि सुमारे पांचसहाशें पृष्ठाचा एक भाग याप्रमाणे ऐतिहासिक लेखसंग्रह खंडशः ते प्रसिद्ध करूं लागले. असा एक खंड प्रसिद्ध झाल्यावर त्याच्या व त्यांच्या काव्य वगैरे इतर पुस्तकांच्या विक्रीमधून अगर अन्य तऱ्हेनें नवीन खंडाच्या छापणावळीस लागणारी खर्चाची रक्कम जुळेपर्यंत त्याना थांबावे लागे. पण दरम्यानच्या काळांत ते पुढील खंडाची लेखी प्रत तयार करीत. असा क्रम सुरू झाल्यामुळें दरएक खंडात प्रसिद्ध होणाऱ्या निदान पाचचारशे तरी पत्रांत येणाऱ्या हकीकतीचें कथासूत्र वाचकांसाठी त्यांना द्यावें लागे. हा मजकूर चागलाच विस्तारपूर्वक ते लिहीत.

१. ग्रंथमाला. स. १८९९ नवबर, अ. ८, पृ. ४४ वरील अभिप्राय पहा.

किंबहुना त्या खंडांतील पत्रें जेवढया मुदतीतली असतील तवढया मुदतीचा तो संगतवार इतिहासच असे. कारण, दरएक खंडाच्या या भागात-प्रस्तावनेत-ह्या खंडात पुढे येणाऱ्या पत्रातून ज्या एक किंवा अनेक ऐतिहासिक कथाचा संबंध असेल तो विशद करून त्यांस सांगावा लागे. व साधकबाधक रीतीने विचार करून सर्व पत्रामधील परस्पर संदर्भ वाचकास ते स्पष्ट करून दाखवीत. ते नेहमी म्हणत की, 'पत्रें कोण वाचतो ? बहुतेक वाचक प्रस्तावना वाचूनच पुस्तक बाजूला ठेवितात. असो, तेवढी प्रस्तावना तरी वाचूं देत ! ' साराश, ह्यामुळे वाचकांचीहि बरीच सोय झाली. इतर संशोधक व खरेशास्त्रीबुवा यांच्या प्रकाशनामधील हा फरक लक्ष्यात घेण्यासारखा आहे. ह्यायोगे त्यांच्या प्रकाशित पत्राचे काम तेवढयापुरते हातावेगळे झाले आहे असे म्हणण्यास हरकत नाहीं. नुकतेच त्याच्या चिरंजिवानी '**मराठी राज्याचा उत्तरार्ध, खंड १ ला**' नावाचे जे पुस्तक प्रसिद्ध केले आहे त्यात त्यांनी **ऐ. ले संग्रहाच्या** पहिल्या चार भागातील पत्रे गाळून त्यातल्या नुसत्या प्रस्तावनाच एकत्र छापिल्या आहेत, ह्याचाहि इत्यर्थ असाच असावा.

**ऐतिहासिक लेखसंग्रह मासिक**—नाना फडनवीस याचे चरित्र प्रसिद्ध केल्यापासून तब्बल पाच वर्षे वरीलप्रमाणें परिश्रम घेऊन मळे-दप्तराचे संशोधन चालवून, आता, प्रकाशित करण्याजोगी थोडीफार सुसंगत ऐतिहासिक माहिती आपणाजवळ साठली आहे असे दिसूं लागताच शास्त्रीबुवांनी कुरुंदवाड येथील 'भाऊ नाना' छापखान्यांतून '**ऐतिहासिक-लेख-संग्रह**' नावाचें मासिक छापवून त्याच्या द्वारा ती माहिती प्रसिद्ध करण्याचे ठरविलें व त्याप्रमाणे जून स. १८९७ मध्ये सदर मासिकाचा पहिला अंक त्यांनीं प्रसिद्ध केला. त्याची वार्षिक वर्गणी तीन रुपये होती. फुटकळ अंकाची किंमत पांच आणे ठेविलेली होती. दरसाल तीन रुपयात पांचशे पृष्ठे मजकूर केवळ एकट्याच्या

जिवावर ते वाचकांस देऊं लागले. खरोखर तेव्हां काय किंवा आतां काय, एवढी जबाबदारी अंगावर घेणे म्हणजे मोठे साहसच होय! तीस वर्षांपूर्वी लोकांत वाचनाची अभिरुचि आजच्या मानाने अत्यल्प असतां केवळ ऐतिहासिक माहितीच्या जुन्या कागदपत्राचें मासिक काढण्यास संपादकास–तोहि द म. रु. ३० पगार मिळविणारा नोकर त्यास–धीर केवढा असला पाहिजे याची वाचकांनींच कल्पना करावी! व्यवहारदक्ष प्रापंचिक माणसानी खरेशास्त्री यांच्या या धाडसाबद्दल त्यांची तारीफ न करिता त्यांस वेडयातच काढिलें असावें. असो.

**सन १९१३ अखेर**—हे मासिक तीन वर्षें चालले. नंतर, आताच उल्लेखिल्याप्रमाणे ऐ. ले. संग्रह खंडशः ते प्रसिद्ध करूं लागले. स. १९०१ ते स. १९११ पर्यंत त्याचे ४, ५, ६ असे तीन भाग त्यांनी छापून काढिले. पुढे दोन वर्षें '**इचलकरंजी संस्थानचा इतिहास**' तयार करण्यांत गेली. ऐ. ले संग्रहाखेरीज '**मिरज प्रकरण**' सन १८९८, '**हैदरअल्लीवर तिसरी स्वारी**' सन १९०१, '**अधिकार–योग**' सन १९०८, व '**हरिवंशाची बखर**' सन १९०९, अशी तीन ऐतिहासिक पुस्तके शास्त्रीबुवांनी प्रकाशित केली. त्यानी आमरण—स. १९२४ पर्यंत–प्रकाशित केलेल्या ऐ. ले. संग्रहाच्या बारा भागांखेरीज इतर जे ऐतिहासिक ग्रंथ व लहान-मोठे निबंध प्रकाशित केले त्यांपैकीं कांहींत जरी ऐ. ले. संग्रहांतल्या माहितीचाच पुष्कळसा उपयोग त्या त्या प्रकरणी त्यांनी करून घेतला असला तरी त्याचे बाकीचे निबंध स्वतंत्र व रा. ब. साने, पारसनीस, कै. राजवाडे आणि इतर संशोधक ह्यांनी प्रसिद्ध केलेल्या माहितीच्या आधारे व क्वचित् इंग्रजी इतिहासलेखकांच्या म्हणण्याचाहि विचार करून लिहिलेले आहेत. फक्त एकटया राजवाडयांचे खंड विचारांत घेतले तरी ऐतिहासिक लेखनाबरोबरच खरेशास्त्री यांचें इतिहासविषयक

वाचनसुद्धां किती अगाध होते हे कळून येईल. या त्यांच्या ग्रंथांचें व निबंधाचें वर्णन आणि ऐ. ले. संग्रहाच्या बाराहि भागांतील महत्त्वाच्या व ठळक गोष्टीसंबंधी थोडेबहुत विवेचन उत्तरार्धांत इतिहासग्रंथ-परिचय प्रकरणी केलेले आहे तेथे ते वाचकानीं पहावें.

**ह्या परिश्रमांची प्रशंसा**—तात्पर्य, खरेशास्त्री यानी सतत ३०।३५ वर्षें खपून राबून ऐतिहासिक ग्रंथ, निबंध अगर अवांतर लहान-मोठे लेख लिहिले किंवा इतिहासविषयक व्याख्यानें दिलीं हीं सारीं त्याच्या ऐतिहासिक संशोधन-लेखन-वाचन इत्यादि दृढ व्यासंगाचीं सुफलें किंवा त्याच्या इतिहासप्रकाशनकार्यरूप प्रचंड वृक्षाचे ते शाखा-पल्लव होत. ह्याच्या छायेत कोणीहि इतिहासलालस मनुष्य क्षणभर विसाव्याकरिता बसला तरी तो सुख पावेल हें काय निराळें सांगावयास पाहिजे ? पण, या वृक्षाचे मूळ खोड-मुख्य स्तंभ-तो द्वादशखंडात्मक '**ऐतिहासिक-लेख-संग्रह**'च होय. हे बारा भाग प्रकाशित होण्यास २८वर वर्षें लागलीं! व शेवटचा भाग त्याच्या मरणोत्तर प्रसिद्ध झाला!! ऐ. ले. संग्रहास १००।१२५ चे पुढे ग्राहक कधींच लाभले नाहीत. 'मदत नाही, मदत नाही,' ही ओरड खरी कां खोटी हें यावरून कोणीहि ठरवूं शकेल. आणि म्हणूनच अनेक वर्तमानपत्रांनीं, मासिक पुस्तकानी, व शास्त्रीबुवांच्या चाहात्या विद्वान् लोकांनी आपापल्या अभिप्रायाच्या अखेरीस त्यांच्या इतिहासप्रकाशनकार्यास द्रव्यसहाय्य पाहिजे अशाविषयी कळकळीने आस्थापूर्वक व आग्रहाने महाराष्ट्र-जनतेस वारंवार विनविले आहे. आणि आपले सबंध आयुष्याच्याआयुष्य अंतःकरणपूर्वक इतिहास-सेवेस वाहिलेल्या एका जाज्वल्य स्वार्थत्यागी पुरुषानें, ज्याच्या साक्षात् पूर्वजांचा इतिहास प्रसिद्ध होत आहे त्यांनीं या कार्यांत यथाप्रमाण भार उचलला नाही एवढयाचसाठी—त्या लोकांच्या या डोळेझांकीनें, औदासिन्याने-अंतःकरणास पीळ पडून जरा कडकपणे लिहिलें आहे.

प्रसिद्ध इतिहाससंशोधक राजवाडे एके ठिकाणीं लिहितात:-"[1]वासुदेव-शास्त्री खऱ्यानी आपलें घरदार विकून पटवर्धनदप्तर छापावें, आणि मिरजकर, सांगलीकर, जमखिंडीकर यांनी खुशाल झोंपा काढाव्या ! शिवाजीमहाराज, दमाजी गाईकवाड, परशुरामभाऊ पटवर्धन हे आम्हां संशोधकांचे आजे पणजे आहेत, आणि संस्थानिकांचे कोणी नाहींत, असेंच ह्मणण्याची पाळी आली ! संस्थानिकांची व इनामदाराची आपल्या प्रत्यक्ष पूर्वजांसंबंधाने केवढी ही विस्मृति ! ! केवढा हा अपराध ! ! ही भरतभूमि पितृपूजेविषयी प्रख्यात आहे. तीन प्रस्तुत काळीं पितराची अशी बोळवण व्हावी ना ?" शास्त्रीबुवाच्या इतिहासप्रसिद्धीच्या कामी भासलेल्या आर्थिक अडचणींसंबंधी इतके स्पष्ट लिहिण्याचे कारण असे की, प्रपंचखर्च भागविण्यासाठीं नोकरीखेरीज नाटके वगैरे लिहिण्याचा बौद्धिक व्याप व कालक्षेप आणि नोकरीत असेपर्यंत खर्चाच्या तोडमिळवणीचा मानसिक काच सोसून त्यास हे कार्य करावें लागलें. पण त्यांनी ते संतोषाने केलें. मग ह्या अडचणी नसत्या तर त्याच्या हातून किती तरी अधिक कार्य झाले असते ! पण, '**सोनें स्वतःस घांसून, तापवून, ठोकून घेतें तेव्हांच मोलास चढतें.**' किंवा '**हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकाऽपि वा ।**' हेच खरें ! असो. **हा कार्यवृक्ष खरेशास्त्रीबुवांनी फक्त एकट्याच्या एकनिष्ठ स्वार्थ-त्यागाचें खतपाणी घालून संगोपिला व वाढविला, ही गोष्ट सुतराम् स्तवनार्ह आहे यांत तिळमात्र शंका नाहीं.**

शेवटी, आपल्या पूर्वजांचा इतिहास आपणांस कां समजलेला असला पाहिजे व तो शक्य तितका सत्य-बिनचूक-राखण्याचे महत्त्व काय हें **लोकमान्य टिळक** ह्यांच्या शब्दांत सांगून आणि इतिहासवाचनाचा

---

१. इतिहासविहार, पृ. १३१ पहा.

उपयोग कसा करून घ्यावा हे **दे. भ. तात्यासाहेब केळकर** यांच्या शब्दांनीं दाखवून देऊन प्रस्तुत प्रकरणाची समाप्ति करावयाची आहे.

"एखाद्या राष्ट्राची उन्नति व्हावी म्हणून जेव्हां कांही लोक प्रयत्न करूं लागतात तेव्हां त्याचे पहिले काम देशाच्या इतिहाससंशोधनाचे असते. फ्रान्स व जर्मनीमध्ये १८ व्या शतकांत जे प्रसिद्ध लेखक झाले, त्यांपैकी बहुतेकानी हेंच काम केले. तुमचे पूर्वज हुशार होते, स्वातंत्र्य-प्रिय होते, त्यांस राज्य करितां येत होते, ही गोष्ट जित राष्ट्रास नीट सांगावी लागते. हें काम जेत्यांकडून नीटपणे होणें शक्य नाही. त्याचा Angle of vision—दृष्टिकोन—निराळा असतो. मराठ्याच्या उत्कर्षाचें मर्म कशांत होते हे न कळल्यामुळे डफ्च्या पुष्कळ चुका झाल्या आहेत. क्वचित् त्याने विपर्यासहि केलेला आहे. जेत्यानी जिकलेल्या लोकांच्या इतिहासाची—त्यांच्या पूर्वीच्या वैभवाच्या आठवणीची—काळजी काय म्हणून वहावी ? आपल्या स्वत च्या गरजा काय, उणीवा काय, आपण काय वैभव हरविलें याची जाणीव आपणांस जशी असते तशी इतरांस कोठून असणार ? तात्पर्य, कोणत्याहि उदयोन्मुख राष्ट्राला आपल्या इतिहासाचे संशोधन करणें हे पहिलें काम असते."......
(यानंतर काव्येतिहास-संग्रह व खरे, राजवाडे, इत्यादींच्या निरपेक्ष श्रमाचा गौरवाने उल्लेख करून) **लोकमान्य** पुढे म्हणाले......
"आजवर झालेला प्रयत्न व्हावयाच्या कामाच्या मानानें अति अल्प आहे. हे केवळ बीज आहे. त्याचा वृक्ष होऊन त्यास फळ-पुष्प आणणें तुमचे हातीं आहे. नुसता, 'तुम्ही प्रयत्न करितां तो चागला आहे' एवढे म्हणून काहीं भागणार नाहीं. ज्या चार पांच लोकांनी या कामी आपले आयुष्य वेंचलें आहे त्यांच्या प्रयत्नाबद्दल राष्ट्राला उतराई व्हावयाचे असेल तर त्यांच्या प्रयत्नांचे साफल्य करून त्यांची परंपरा कायम ठेविली पाहिजे. **पूर्वजांच्या यशोदुंदुभीचा तुम्हांस**

**आदर असेल, तुम्ही आपल्या पूर्वजांचे रक्तामांसाचे आहांत याबद्दल जर त्यांची स्मृति कायम ठेवावी असे तुम्हांस वाटत असेल, तुमचें राष्ट्र उदयास यावें असें जर तुम्हांस वाटत असेल, तर सर्व आळस व हलगर्जीपणा टाकून या कार्यास मदत करा.** आमच्या राष्ट्राचा आजवर या दोन प्रकारच्या हेळसांडीनीं नाश झाला आहे....... पूर्वजांचे नुसते नाव सांगण्यात कांहीं तात्पर्य नाही. आजकाल प्रत्येक गोष्टीबद्दल पुरावा द्यावा लागतो. तुम्ही जर हा पुरावा न मिळवितां नुसत्या गप्पा माराल तर त्या कोणी ऐकणार नाही पूर्वजांनी राज्य घालविले, तुम्ही जर इतिहास घालविलात तर तुमचे वंशज धर्म घालवितील व महाराष्ट्राचे नाव जाण्याचा—महाराष्ट्र नामशेष होण्याचा—प्रसंग येईल. आजवर केलीत इतकी उपेक्षा बस्स झाली. आता हा हलगर्जीपणा सोडा व या कार्यास मदत करा. व तशी करणे प्रत्येक महाराष्ट्रीयाचे कर्तव्य आहे." (**लोकमान्य टिळक** याचे भाषण.)

"इतिहास हा मनुष्याचे हातीं एकाद्या सोन्याच्या गटाप्रमाणे संकलित ज्ञान देतो. पण, ते सोने कसे, कोठें किती किंमतीस मोडावे व खावे याचे तारतम्यज्ञान स्वतः मनुष्यास असावें लागते. कित्येक वेळां इतिहास हा मार्कट्वेनने एका विनोदी गोष्टीत सांगितल्याप्रमाणें दहा हजार पौंडाइतकी मौल्यवान् चलनी नोट आपल्या स्वाधीन करितो. पण अट अशी घालतो की ती मोडूं तर नये, पण ती दाखवून बाजार तर करून यावा! परिस्थितीमुळे अव्यवहार्य असणारे असे इतिहासाचे जे अनुभव ते या चलनी नोटीसारखे असतात. त्यांचा प्रत्यक्ष उपयोग करितां येत नाहीं म्हणून त्याच्या पतीवर जो व्यवहार सिद्धीस नेतो त्यानेंच खरोखर शहाणपणाने इतिहास वाचिला."(**श्री. केळकर**, इतिहासविहार, पृ. ३२.)

---

१ भा.इ.मं.पुणें, रविवार ता. ९ मे स. १९१५(केसरी ता.१८।५।१९१५).

# नाट्यकलेशीं मनोविनोद

## ( स. १९१३ ते स. १९२४ )

**नाटकें लिहिण्याकडे कसे वळले ?**—खरेशास्त्री यांनी आपल्या आयुष्याच्या शेवटच्या या बारा वर्षांतहि आपल्या आवडत्या ऐतिहासिक कार्याचे संशोधन व प्रकाशन क्रमशः आस्ते आस्ते चालविलेच होतें. ऐ. ले. संग्रहाचे भाग ७ ते १२ आणि '**इचलकरंजी संस्थानचा इतिहास**' स. १९१३, '**प्रो लट्टे व परशुरामभाऊंची छत्री**' लेखमाला स. १९१४, '**ग्रँट्डफच्या चुकांचे हसे**' लेखमाला स. १९१५।१६, '**चालू भाषेतील ऐतिहासिक शब्द**' निबंध स. १९१८, 'मराठे व इंग्रज' या ग्रंथास '**उपोद्घात**' स. १९१८ आणि '**मालोजी व शहाजी**' निबंध स १९२० व ह्यांखेरीज दुसऱ्या कांहीं ऐतिहासिक निबधांचीं टांचणे त्यांनी या काळात तयार केली. तथापि, याहून अगदी भिन्न असा एक मोठा उद्योग—**नाटकें रचणें** हा—स. १९१३ सालीं अगर त्या आधीच थोडे दिवस त्यानी आरंभिला व आपल्या आयुष्याच्या अतापर्यंत तो चालविला. या अवधींत त्यांचा बराच वेळ "**नाट्यकलेशी मनोविनोद**" करण्यांत गेला म्हणून शास्त्री-बुवाच्या आयुष्यातील या १२ वर्षांच्या काळास त्यांच्या '**नाट्यरचनेचा काल**' असे नांव देण्यास कांही हरकत नाही. आता 'गुणोत्कर्षा'-नंतर २८।३० वर्षांनी व मुख्यत इतिहासभक्त, इतिहाससंशोधक या नात्यानेच ते लोकांत प्रसिद्धीस आले असता फिरून नाटके लिहिण्यास ते कसे सरसावले याचें किंचित् दिग्दर्शन येथें करणे अवश्य आहे.

स.१९१२।१३ चा अजमास असेल; ह्या वेळी शास्त्रीबुवा पेन्शन् घेण्याच्या विचारांत होते. त्यामुळे पगारापैकीं द. म. निदान ३० रुपये

प्राप्ति कमी होण्याचा संभव उत्पन्न झाला. लहानमोठ्या ७।८ माणसांचा प्रपंच पुढे कसा चालवावयाचा हा प्रश्न साहजिकच त्यांच्या मनांत घोळत असला पाहिजे. ऐ. ले. संग्रहांत कांहीं प्राप्ति होत नसे म्हटले तरी चालेल. अशा संधीस एके दिवशीं 'महाराष्ट्र नाटक मंडळी'चे मालक—श्री. त्रिं. सी कारखाननीस—हे शास्त्रीबुवांकडे आले आणि **गुणोत्कर्ष** नाटकाच्या लोकप्रियतेची प्रशंसा करून ते शास्त्रीबुवांस आपल्या कंपनीसाठी एक नाटक लिहून मागूं लागले त्या वेळी उभयतांत बरीच चर्चा झाला. रा. कारखाननीस यांचें म्हणणे असे की, 'आपल्याजवळ संपात्ति मिळविण्याचे साधन असून आपण असे पैशासंबंधी विवंचनेत कां?' मराठी नाटककारांनीं यापूर्वीच्या गेल्या तीस वर्षांत नाटके लिहून त्यायोगें पैका मिळविण्याच्या बाबतीत पल्ला किती गाठला होता याची बरोबर कल्पना नसल्यामुळें शास्त्रीबुवांनी विचारिले, " काय, नाटके लिहावी म्हणतां? नाटके लिहून तरी काय होणार? सगळ्या प्रकारच्या ग्रंथकारांचे नशीब सारखेच!!" परंतु अखेर या वाटाघाटीत त्यानी महाराष्ट्र मंडळीसाठी एक नाटक लिहून देण्याचें कबूल केले. जवळ साधन असता व त्यापासून द्रव्यप्राप्ति होईल असा निर्वाळा एका नाटयकलापरिचित अनुभवी गृहस्थांकडून मिळाल्याकारणाने हा स्वावलंबनाचा सुलभ मार्ग त्यांच्या स्वाभिमानी वृत्तीस पसंत पडला यांत मोठेसे आश्चर्य नाहीं. शिवाय, इतिहासप्रकाशनासाठीं नाही नाही म्हटले तरी त्यांस कोणा ना कोणा संस्थानिकास व सामान्य ग्राहकांस शब्द टाकावाच लागे! बरें, इतकें करूनसुद्धां कार्यभाग आटोपे असे होतच नसे. खेरीज, पेन्शन् घेतल्यानंतर फुरसतहि जास्त मिळण्याचा संभव होता.

**प्रभावशाली नाटककार**—लहानपणी शास्त्रीबुवा पौराणिक नाटकें कवितांसह रचून हौसेनें बसवून देत. व त्या कामी तेव्हांसुद्धां ते वाहवा मिळवीत. या आख्यायिकेवरून एवढें अनुमान करण्यास हरकत नाहीं

की, नाटयरचनेचा गुणहि त्यांच्या ठायी जन्मतःच होता. पुढे ' गुणोत्कर्ष ' नाटकात त्यांस जे सुयश लाभलें त्यामुळे या अनुमानास सहजीच सिद्धान्ताचे स्वरूप आले. शिवाय, काव्य आणि नाटक याचा संबंध अति निकटचा आहे. किंबहुना नाटक हा काव्याचाच एक प्रकार असून त्यांतल्यात्यात तो रम्य प्रकार आहे. ' **काव्येषु नाटकं रम्यं** ' हे सुभाषित प्रसिद्धच आहे. आणि जसे काव्य म्हणजे ' श्राव्य चित्र ' तसेच नाटक म्हणजे 'दृश्य काव्यच' होय. शास्त्रीबुवाच्या काव्यनाटकासंबंधी स्तुतिस्तोत्रें अनेक विद्वानांच्या लेखणीतून आजवर उतरलेलीं पुष्कळ वाचावयास सापडतात. त्यांतली काही वेचक वचनें मासल्याकरितां पुढे दिली आहेतः—

१ "काव्य व नाटक या वाङ्मयांत शास्त्रीबुवाची कुशाग्र बुद्धि अप्रतिहत चाले. त्याचें पहिले नाटक '**गुणोत्कर्ष.** ' ऐतिहासिक दृष्टया याची नाटकरचना फार मार्मिक आहे. शास्त्रीबुवाचे भाषाप्रभुत्व त्याच्या गद्यपद्यकृतींत स्पष्ट दिसतें " (श्री रा. ना न. फडणीस, 'काव्यरत्नावली ' )

२ "भाषाप्रभुत्व, रसिकत्व, विनोद, हे गुण त्याच्या काव्यनाटकात असून त्याच्या नाट्यकृतींनी नाट्यलोलुपाचे मनरंजन केले आहे त्याचीं नाटके रंगभूमीवर चिरकाल प्रभावशाली राहतील."(श्री.शेजवलकर,'नवा काळ ')

३ "हे रसिक विद्वान् असून यांच्या साध्या भाषणात मनोरंजक कोट्या व विनोदपर अलंकार भरपूर असत. '**उग्रमंगल**' व '**शिवसंभव**' यानीं त्याच्या सर्व नाटकांवर ताण केली आहे." ( श्री. केळकर, 'केसरी.' )

ह्या उताऱ्यावरून एवढेंच दाखवावयाचें कीं, काव्याप्रमाणें नाटककलाहि शास्त्रीबुवांच्या हातची केवळ एक लीला होती. आणि इतिहासाच्या गाढ संशोधनाच्या आवडीमुळें त्यांनी जरी तिची उपेक्षा केली होती तरी त्याना द्रव्याची आवश्यकता भासली तेव्हां ती त्याच्या सेवेस सादर झाली व त्यांनीहि तिला आपल्या इच्छेप्रमाणे हवी तशी खेळविली !

**एका कुत्सित आरोपास उत्तर**—एका सुज्ञ लेखकानें म्हटल्याप्रमाणें द्रव्याकरितांच त्यांना या कलेशी मनोविनोद करावा लागला. एरव्हीं, इतिहाससेवेविषयींचे आपले शुद्ध प्रेम आतां थोडें तरी कलुषित करावें लागणार हा विचार त्यांच्या मनास इतका जाचक झाला नसता. या बाबतीत त्यांच्या स्वतःच्या मनाची स्थिति अशी होती, तथापि, कित्येक रिकामटेकडया अहंमन्य विद्वानांनी त्याच्या नाटयलेखनव्यवसायासंबंधीं अगदीं निःस्नेहपणाचे उद्गार काढून त्यांस मोठा दोष दिला आहे त्यांचें म्हणणें असे की, "काय, हा आमच्यांतील विद्वानांचा केवढा बौद्धिक अधःपात आहे बरे ! नाटकें लिहिण्यात आपली विद्वत्ता खर्च करून ह्यांनी शुद्ध विद्याविडबन चालविलें आहे ! !" सामान्य जनसमूह नाटकपराङ्मुख नाही. रोज नवीं नवीं नाटकें लिहिलीं जात आहेत व ती पाहण्यास समाज निरंकुशपणे धांवत आहे. अशा स्थितीत समाजास वळण लावणारीं, गतवैभवाचें स्मरण करून देणारी, उद्बोधक, बोधप्रद, स्फूर्तिदायक, अशीं नाटके लिहिण्यात महत्पाप आहे की काय कोण जाणे ! प्रस्तुत लेखकास देखील खेद होतो तो एवढ्याचसाठीं कीं, शास्त्रीबुवाचा नाटकें रचण्यात गेलेला वेळ फुकट गेला ! पण, तो कशामुळे—कोणाच्या अपराधानें-हा प्रसंग त्यांच्यावर कोणी आणिला म्हणाल, तर उपर्युक्त धनकनकसंपन्न सुशिक्षित विद्वान् टीकाकारांनींच ! कारण, खरेशास्त्री याच्या विद्वत्समागमामध्यें आपला थोडा तरी कालक्षेप व्हावा या बुद्धीने किंवा आपल्या देशाचा व पूर्वजांचा सत्येतिहास स्वतःस कळावा, निदान समाजांत त्याचा प्रसार व्हावा ह्या दूरदर्शीपणाच्या हेतूनें तरी, शास्त्रीबुवांच्या घरी धूळ खात पडलेले त्यांच्या ऐ. ले. संग्रहाचे भाग खरेदी करण्यासाठीं ह्या फुकट्या टीकाकारांनीं आपल्या संचित द्रव्याच्या थैल्यांची तोंडे तिळभर देखील कधी शिथिल केलीं नाहीत ! असो.

**संस्कृत नाट्यरचनेचें अनुकरण व त्याचा नव्या रंगभूमीशीं मेळ**—शास्त्रीबुवांनी 'गुणोत्कर्ष' नाटक लिहिले त्यावेळी त्यांच्या मनावर जुन्या संस्कृत नाटकांची छाप चांगलीच होती असें दिसते. कारण त्या नाटकाच्या संविधानकाचा प्रारंभ त्यांनी सूत्रधार व विदूषक यांच्या संवादाने करून दिला आहे. विशेषतः त्यांतील मंगलाचरणाचा श्लोक तर थेट 'मुद्राराक्षस' 'वेणीसंहार' 'मालती-माधव' इत्यादि संस्कृत नाटकांतील नांदीच्या थाटाचा आहे:—

**नेऊं दैत्यां लयातें परिहरण करूं भक्त दुःखांस देव।**
**कौसल्यादेवकींच्या उदरिं जनन घे, अद्वितीय प्रभाव।**
**ज्या ज्या मर्त्यांस साधारण घडति दशा हर्षशोकादि त्यांते।**
**दावी स्वाभाविकत्वें अवनकर असो नाटकी तो तुम्हांते॥ १॥**

गुणोत्कर्षानंतर सुमारे २८।३० वर्षांनी फिरून नाटकें लिहिण्यास त्यांनीं लेखणी उचलिली. तरीसुद्धा इतकी वर्षे त्यांच्या मनोमंदिरांत सुप्तावस्थेत असलेली ही कला, एका नवलकथेतील, कित्येक वर्षे निद्रित असलेल्या तरुण राजकन्येप्रमाणे पुन्हां पूर्वीइतक्याच उमेदीनें व भरदारपणें त्यांच्या उपयोगास आली; आणि, गेल्या तीस वर्षांच्या अवधींत महाराष्ट्र रंगभूमीचे स्वरूप बरेंच पालटले होतें तें लक्ष्यांत घेऊन त्यांनीं आपल्या अलीकडील सर्व नाटकांच्या रचनेंत परिस्थित्यनुकूल पालट करून ती लोकादरास पात्र केली.

रा. कारखाननीस यांच्या मागणीप्रमाणे त्यांनीं प्रथम जें नाटक रचिलें ते '**तारामंडळ**' नांवाचे गद्य नाटक होय. यापुढें त्यांनीं अनुक्रमे संगीत '**चित्रवंचना,**' संगीत '**कृष्णकांचन,**' '**शिवसंभव,**' (गद्य) व संगीत '**उग्रमंगल,**' अशीं पांच नाटकें छापून प्रसिद्ध केलीं. त्यांपैकीं 'तारामंडळा'च्या तीन व 'शिवसंभव' आणि 'उग्रमंगल' यांच्या दोन दोन आवृत्ती निघाल्या ! शेवटीं '**देशकंटक**' नांवाचें

एक नाटक त्यानीं लिहिलें होते. परंतु तें अद्यापि अप्रकाशितच आहे. यांपैकी संगीत नाटकांच्या प्रारंभींच्या पद्यात, 'चित्रवंचने'त प्रभावशाली ठरलेल्या कामदेवाचें स्तवन करून, 'कृष्णकांचना'त कपटनीतीच्या सामर्थ्याचा उल्लेख करून व 'उग्रमंगला'त मगळग्रहाच्या पीडेची चिंता प्रदर्शित करवून त्या त्या नाटकांतील कथेचे आदिसूत्र सुचवून देण्यापुरते संस्कृत नाटकांचें अनुकरण केल्याचे दिसून येते. तसेच, 'उग्रमंगल' नाटकांत४।५ ठिकाणी वेत्रवतीच्या तोंडच्या एकाद्या पदाने दोन प्रवेशांमधील कथासंदर्भ जोडून दिला आहे, हेहि संस्कृत नाट्यरचना-पद्धतीचेच अनुकरण आहे, असो. आतापर्यंत प्रकाशित होऊन जनमनरंजनास कारण झालेलीं व सुशिक्षित रसिक प्रेक्षकांपुढे रंगभूमीवर नित्य विहार करणारी शास्त्रीबुवाचीं नाटके महाराष्ट्रीयांच्या चांगलीं परिचायाचीं आहेतच तथापि, काव्य व इतिहासविषयक भावडाबरोबर शिष्टाचाराप्रमाणे या नाटक-ग्रंथानाहि ग्रंथ-परिचय-प्रकरणांत स्थान देऊन गौरविले पाहिजे हे चरित्र-लेखकाचे क्रमप्राप्त कर्तव्य आहे. म्हणून आम्ही गुणोत्कर्षासुद्धा त्याच्या सहाहि नाटकाचा विस्तृत परिचय पुढे उत्तरार्धांत यथामति करून दिलेला आहे.

**नाटकांतील स्वाभाविकता**—शास्त्रीबुवानी काव्यांतल्याप्रमाणें आपल्या नाटकांमध्येहि राष्ट्रीय उन्नतीला पोषक अशाच कोणत्या ना कोणत्या एक वा अनेक गुणाचा उत्कर्ष दाखविलेला असतो व तो दाखवींत असता शक्य तितकी व्यावहारिक प्रसंगांची चित्रे प्रेक्षकापुढे त्यांनी ठेविलेलीं असतात अद्भुतता उत्पन्न करण्यासाठीदेखील भुते, पिशाच्चे, चेटकें, अगर इतर अतिमानुष गोष्टीचा आश्रय त्यांनी आपल्या नाटकांत कोठे केलेला नाही. तथापि, 'शिवसंभवा'मध्यें

---

१. 'उग्रमंगल', पृष्ठ १७, ३६, ५०, ९७ व ११० पहा.

श्रीजगदंबेचा स्वप्नांतील दृष्टांत, किंवा 'उग्रमंगला'मधील आठव्य मंगळाचें अनिष्ट फल सांगणारे ज्योतिष, या दोन गोष्टी विशेष भाविक-पणाऱ्या व दैवी स्वरूपाच्या आहेत असें वाटण्याचा संभव आहे. पण, ह्या दोनहि गोष्टींचा त्या नाटकात घडलेल्या कोणत्याहि अद्भुत प्रसंगाशी मुळीच संबंध नाही हे ध्यानांत ठेवण्याजोगे आहे. वेषांतराने मात्र अद्भुतता उत्पन्न करण्यास बहुतेक नाटकात त्यास पुष्कळ सहाय्य झाले आहे. सारांश, जी कांही अद्भुतता, जे कांही आश्चर्यजनक प्रसंग त्यात आढळतात ते सारे मानवी प्रयत्नानें—मनुष्याच्या अचुक यत्नाने—सावधानतेने, अखड व सतत चालनेने घडून आलेले आहेत.

त्यानी आपल्या नाटकातील ऐतिहासिकसदृश पात्रांचे गुणदोष किंवा कृती, खरोखरीच्या ऐतिहासिक व्यक्तींच्या प्रत्यक्ष गुणदोषांवरून व त्यांच्या कृती पाहून त्याप्रमाणें दाखविलेल्या आहेत. असे करण्यांत त्यांचा हेतु असा असावा की, त्यांत अनुकरण करण्याजोगे जे असेल त्याचे अनुकरण वेळप्रसंगी कोणास करिता यावे, केवळ काल्पनिक म्हणून त्या गोष्टींकडे दुर्लक्ष्य होऊं नये. उदा०—उग्रमंगल नाटकांत **लक्ष्मणसिंगानें** शत्रूच्या दरबाराच्या ठेंगण्या दरवाजातून आत जातांना प्रथम आपले पाय आंत ठेवून मग बांकीच्या शरीराची उलटी कमान करून तो तेथें गेला व लक्ष्मणसिंगास नमविण्याची शत्रूनें केलेली युक्ति फुकट जाऊन तो स्वतःच फजीत झाला, असे दाखविले आहे. हैदरअलीनें चिकबाळापूरच्या देसायास फजीत करण्यासाठीं असलीच हुबेहुब शक्कल लढविली होती. पण, त्या देसायाने लक्ष्मणसिंगाप्रमाणेंच करून हैदराची फजीती केली हा मजकूर त्या नाटकाच्या प्रस्तावनेत शास्त्रीबुवानी मुद्दाम दिला आहे

**नाटकांत पेरलेले राष्ट्रीय विचार**—त्यांनी आपल्या नाटकांमधून सांप्रत काळीं आपल्या देशांत चाललेल्या राजकारण-विषयक विचारांच्या

मंथनापासून निघणारे स्थूल व सत्य सिद्धांत मांडिले आहेत व त्यांचें दिग्दर्शन पुढें नाटयग्रथपरिचय प्रकरणी कोठें कोठें त्या त्या नाटकाच्या विवेचनांत प्रसंगानुरोधानें करण्यातहि आलें आहे; तथापि, हे सिद्धांत त्यांनी 'कृष्णकांचन' व 'उग्रमंगल' नाटकांत जास्त स्पष्टपणें प्रकट केले आहेत. व्यक्तिमात्राच्या मनोरचनेप्रमाणें व परिस्थित्यनुसार त्या व्यक्तीचीं मतें बनत असतात. शास्त्रीबुवांचीं मतें वर्षानुवर्षे ऐतिहासिक अनुभवांवर घांसलीं गेल्यामुळें त्यांना आलेलें तेज व या नित्य घर्षणानें पैलू पडून त्यांस आलेला बाळसेदारपणा प्रेक्षकाच्या डोळ्यांत भरत असल्यास त्यात नवल काय? **कै. देवलांच्या 'शारदे'**तलें '**जो लोककल्याण साधावया जाण । घेई करीं प्राण**' इ. पद ऐकिले म्हणजे कोणी न सागतां न सवरतां ऐकणाराच्या डोळ्यांपुढे जशी **लोकमान्य टिळकांची** मूर्ति उभी राहाते तशी 'तारामंडळ' नाटकातील **इतबाररावाची** धीरोदात्त भूमिका **ही लो. टिळकांची** अपर प्रतिमाच आहेशी वाटते. **इतबारराव** स्वामिभक्त व **टिळक** देशभक्त इतकाच फरक. भक्तीच्या अनन्यतेचें स्वरूप दोघाचें एकच!! स्वतः शास्त्रीबुवांनी तर आपल्या इतबाररावास 'लोकमान्य' ही पदवी देखील बहाल केली आहे. 'उग्रमंगल' नाटकांत दुर्गावती-पद्मावतीच्या वादांत '**सामोपाय श्रेष्ठ कीं संग्रामोपाय श्रेष्ठ**' ही चर्चा आणणें, निष्काम कर्मयोगाची महती गाणें, '**शठंप्रति शाठ्यम् हे लोकमान्यांचे तत्त्व**' असें पद्मावतीच्या तोंडून वदविणें, किंवा 'कृष्णकांचन'मधील **कृष्णराजाच्या** कृष्णकारस्थानाचें त्या सर्व नाटकभर प्रदर्शित केलेलें थैमान, तर त्याच्या उलट **उज्ज्वलेनें** स्वदेशबांधवाच्या दुःखविमोचनासाठी केलेला उज्ज्वल स्वार्थत्याग, इत्यादि प्रकारची स्वभाव-चित्रे रंगविण्यांत त्यांचा हेतु काय असावा हे न सांगतांहि वाचकांस समजण्यासारखें आहे.

**या प्रकरणीं आणखी दोन शब्द**—शास्त्रीबुवांच्या नाटकातील काल्पनिक पात्रांपैकी महत्त्वाच्या पात्रांची नांवें बहुधा सार्थ व साभिप्राय असतात एकदोन अपवाद वगळले तर पात्रांच्या दर्जाप्रमाणें त्यांच्या तोंडी अगदीं गांवढळ किंवा अशुद्ध भाषा सहसा कोठें घातलेली नाही. नोकरचाकर, दासदासी इ० पात्रांची निष्कारण भरती त्यांच्या नाटकांत कधीं नसते, तर नाटकांत योजिलेल्या बहुतेक पात्राना रंगभूमीवर वारंवार येऊन आपल्या स्वभावास व वागणुकीस अनुरूप अशी बरीच कामगिरी करावयाची असते. त्यांचे कोणतेंहि संविधानक किंवा त्याचा एखादा भाग लोकाची अभिरुचि बिघडविणारा नसून उलट सदभिरुचीस पोषकच असतो त्याचा विनोद व कोट्या पोरकट, अप्रौढ, अश्लील, अगर ग्राम्य केव्हाहि नसतात. ह्याच्या नाटकांतील विनोदाचे व श्लेषादिकांचे अनुकरण करण्याचा प्रयत्न प्रेक्षकवर्गाने केल्यास त्यांस खासगी गप्पागोष्टींत मनरंजनाबरोबर भारदस्तपणाहि आणिता येईल.

त्यांच्या नाटकापैकी कल्पित कथानकाचा काल बाराव्या ते चौदाव्या शतकांतला आहे, असें मानिले असलें तरी ‘ चित्रवंचने ’ मधली प्रीति-विवाहाची कल्पना, ‘ उग्रमगला ’तील राजकारणाची चर्चा आणि विद्यार्थ्यांनींच नव्हे तर विद्यार्थिनीनींसुद्धा राजकीय प्रश्नांची वाटाघाट करावी की करूं नये याचा निर्णय (पद्मावती व दुर्गावती याच्या विद्यार्थीदशेंत सिद्ध झालेल्या राजकीय मतांचा उल्लेख उग्रमंगलांत आहे. ) हे विषय अगदीं आधुनिक आहेतसे वाटतात. पण असले विचार निराळ्या स्वरूपांत तेव्हां देखील उच्च समाजांत वावरत असणें संभवनीय आहे. ‘ चित्रवंचनें ’त चंपीने कंकाची फजीती करण्याच्या हेतूनें, बळेंच त्याला जालंधर दरोडेखोर ठरवून राजवाड्यांतल्या नोकरमाणसांकडून त्याच्यावर जो गहजब उडविला आहे त्या वेळची सारी धांदल व

त्या लोकांची जी त्रेधा दृष्टीस पडते, तो प्रवेश रंगवितांना पोतनीस यांच्या घरी रामनवमीच्या उत्सवप्रसंगीं वासुदेव बळवंताच्या भीतीमुळे उरवडें गावच्या लोकांची जी तारांबळ उडालेली त्यांनी प्रत्यक्ष पाहिली होती तिचा देखावा शास्त्रीबुवांच्या मनश्चक्षूंपुढें उभा असावा असे वाटते. असो. 'शिवसंभव' खेरीज करून बाकीच्या त्यांच्या अलीकडील सर्व नाटकाची नांवे व्यक्तींचीं वाचक नसून गूढार्थक असल्यामुळें नांव ऐकल्यापासून 'हें काय असावे' अशी जिज्ञासा उत्पन्न होते, ती पुस्तक पूर्ण वाचल्यावांचून अगर रंगभूमीवर खेळ संपेपर्यंत तृप्त होत नाहीं हा त्याच्या नाट्यरचनाचातुर्याचा एक महत्त्वाचा भाग आहे. तसेंच, 'गुणोत्कर्ष' वगळून त्यांच्या बाकीच्या नाटकांचीं नावें पंचाक्षरयुक्त व त्यांतील मध्यमाक्षरावर अनुस्वार या गोष्टी पुढे कधींतरी भावी संशोधकास बहिरंगपरीक्षणाच्या कामीं कौतुकास्पद व उपयुक्त वाटण्याचा संभव आहे. शास्त्रीबुवांच्या नाटकांसंबधी सामान्य गोष्टी याप्रमाणें आहेत; प्रत्येक नाटकाचें विशेष विवेचन पुढे उत्तरार्धांत केलेले आहे.

---

## कांहीं इतर माहिती

**कार्यनिष्ठा**—शास्त्रीबुवांनीं आमरण केलेला लेखन-वाचन-व्यवसाय व इतिहाससंशोधनाचें त्यांच्या जन्मास पुरून उरलेलें कार्य यांपायीं त्यांनी केलेले कष्ट स्वतत्रपणें वर्णिले पाहिजेत इतक्या महत्त्वाचे आहेत. त्यांच्या स्वभावांतले, करारीपणा, अविरत दीर्घ उद्योग, कष्ट सोसण्याची पराकाष्ठा, चिकाटी, इ. इ. गुण या कामीं चांगलेच कसोटीस लागले.

१. 'चित्रवंचना', अंक ३, प्र.२. पृ. ७२ते७४. २ हें चरित्र, पृष्ठ ५१ पहा.

ऐतिहासिक संशोधनाच्या उद्देशानें त्यांनीं लाखों पत्रें वाचिलीं. शाळेच्या कामाखेरीज रोजी ७।८ तास हें काम ते करीत. ह्या जुन्या कागद-पत्रांत येणारे फारशी व ऊर्दू शब्द ह्याची माहिती ते मिरज येथील एका तज्ज्ञ रजपूत गृहस्थाकडून व उर्दू शाळेतील शिक्षक मंडळीपासून त्यांजकडे जाऊन करून घेत. हें काम वेळांत वेळ काढून त्या लोकांच्या सोयीसवडीने त्यास करून घ्यावे लागे. स्वतःच्या मोठे-पणाची भावना विसरून जाऊन निगर्वीपणाने वागण्याची त्यांची ही पद्धत कौतुकास्पद व कार्यकर्त्यास अनुकरणीय होय असेंच कोणासहि वाटेल. निवडलेल्या पत्रांच्या नकला करण्यासाठी किंवा इतर तऱ्हेच्या लेखनासाठीं, उदा०—प्रारंभी काव्यरचनेच्या निमित्ताने तर पुढें पेन्शन् घेतल्यावर नाट्यलेखनाकरिता, त्यांस रात्री जागावे लागे. ग्रीसचा इतिहास वाचिला त्या रात्रीप्रमाणे एकदाच नव्हे तर, अनेक रात्रीं जागून त्यांनी वाचनात घालविलेल्या आढळून येत त्यांचें वाचन जबर असे. एकदा वाचिलेली हकीकत तशीच जरूर पडल्यास तें तें पुस्तक चाळून चार दोन मिनिटांत ते काढून देत. उद्योगाच्या वेळीं त्याना आसपास गडबड चाललेली नको असे म्हणून त्याचें वाचन-लेखन बहुधा रात्रीच जास्त चाले.

**लेखनपरिश्रम**—ऐतिहासिक कागदपत्राच्या मोडी बाळबोध नकला करून घेण्यांत त्यानी शेकडो रुपये खर्च केले असले तरी आरंभी त्याना स्वतःच फार लिहावे लागे. त्याचे स्वतःचे लिखाण फार मोठे आहे. त्यांचें लिहिणे बारीक पण मोकळे व सुवाच्य असे. त्यांचा तक्या हेच त्यांचे लिहावयाचें डेस्क् असे. तक्या पुढें आडवा टाकून व त्यावर कागद ठेवून ते लिहीत व बसून बसून कंटाळा आला म्हणजे पाय लांब करून आडवे पडून लिहूं लागत. त्यांनी लिहिण्यासाठी टेबल, खुर्ची, कधी वापरली नाहीं व कमी दिसूं लागल्यामुळे लिहावाचावयास त्रास

पडे तरी त्यांनीं डोळ्यांस कधी चाळशी लाविली नाहीं. ते रात्रीं गोडया तेलाच्या दिव्याशीं बसून लिहीत व वाचीत. मध्यंतरी त्यांच्या पत्नी कांहीं दिवस कोकणांत गेल्या होत्या, घरांत दुसरे बायकोमाणूस नव्हतें;

---

खरे–शास्त्रीबुवांचें

---

खरे–शास्त्रीबुवांचें

---

दिव्याच्या वार्ता संपल्या. तेव्हां, वाती करण्यांत व्यर्थ वेळ न दवडितां बैठकीच्या संतरंजीची सुते वातीस घालून ते काम भागवीत. अशा तऱ्हेनें दोन हात सतरंजी वातींस खर्च झाली होती !!

---

## मोडी अक्षर व सही.

## बाळबोध--हस्ताक्षर.

---

**सुखदुःख–तितिक्षा**—अंगीकृत कार्य करीत असतां शीतोष्ण, सुख-दुःख इत्यादींविषयी तितिक्षा–सहनशीलपणा–त्यांच्या ठिकाणी अतिशय असे. जागरणांचा प्रकार वर वर्णिलाच आहे. ऐतिहासिक कागदपत्र पाहण्यास मिरज–बुधगावचे हेलपाटे सतत महिनेन्‌महिने ते घालीत. हें अंतर ५।७ मैल आहे. वाटेनें छायेची झाडेसुद्धां नाहीत! हे हेलपाटे घालतांना त्यांनी ऊन म्हटलें नाही, तहान म्हटली नाही, की कांही तक्रार नाही. उमेदीत असतांना तर ही पायपिटी त्यानी केलीच; परंतु मृत्यूपूर्वी वर्ष सहा महिनेपर्यंत ते बुधगांवला पायी जात! '**देहेदुःख ते सूख मानीत जावें।**' ही समर्थोक्ति सर्वांस विदित आहे, पण, त्याप्रमाणे अल्प तरी आचरण करण्यास कितीजण राजी असतात? शास्त्रीबुवाच्या वरील वर्तनांत हे वचन सत्य झालेले दिसतें. ते ही दगदग आनंदाने सहन करीत. कार्यप्रेमापुढें ते देहकष्टाची मुळीच क्षिति बाळगीत नसत. किंबहुना ते आपल्या कार्यांत गुंतले असले म्हणजे जणूं काय त्याचें देहभानच उडे.

एकदा, मुंबईस 'शिवराज सं. ना. मंडळी'चा मुक्काम असतां शास्त्रीबुवा तेथे गेले होते. एके रात्रीं, 'कृष्णकांचन' नाटकांतील पदे रचण्याचें काम चालले होतें. त्यांतून मध्येच उठून त्यास बाहेर जावें लागले. तेथें खालीं बसतांना त्याच्या नाकास लाकूड किंवा काहीं लागलें. परत लिहिण्याच्या जागी येईपर्यंत नाकास लागलेल्या जागी रक्ताची धार लागून तें सदऱ्यावर पडून सदरा रक्ताने भिजून बराच लाल झाला होता. शास्त्रीबुवांस या गोष्टीचें भान नव्हतेंच! डोके पदाच्या रचनेंत गुग झालेलें; मनांत व कंठांत पद्यध्वनि गुणगुणत होते, दुसरा तिसरा विचार नाही! पण, इतर मंडळीनी तो रक्तस्राव पाहून त्यास सावध केले. मग, मलमपट्टी ( dressing ) करण्यात आल्यावर फिरून ते आपल्या कामांत गढून गेले. त्यांच्या सबंध आयुष्यांतील उद्योगपद्धतीची बरोबर कल्पना यावी म्हणून या सर्व गोष्टी येथे एकत्र वर्णिलेल्या आहेत.

**करमणुकीचे उद्योग**—मिरजेस आल्यापासून सरासरीं ८।१० वर्षें शास्त्रीबुवा, समवयस्क तरुण शिक्षक व इतर मित्रमंडळी यांच्या समागमें मिरजेच्या उत्तरेस 'निमजगा' नावाचा प्रशस्त माळ-मैदान आहे, त्यावर चेंडूच्या धबाधबीचा खेळ खेळावयास जात; व शाळेस सुट्टी असली म्हणजे केव्हां केव्हां आप्पासाहेबाच्या मळ्यातल्या विहिरींत पोहावयास जात असत. बैठ्या खेळात सोंगट्या व बुद्धिबळें यांचा नाद त्याना विलक्षणच असून वीरश्रीला चढून खेळावयास बसले म्हणजे बैठक जबर व चिकाटी दांडगी असे. जेवण-खाण-झोपसुद्धां मग विसरावयाचे ! कित्येकदां त्याना छादिष्ट म्हणावे की काय असे वाटण्याइतका अतिरेक ह्या खेळांत त्याच्याकडून व्हावयाचा, व त्याची भीड चेपलेला एकादा माणूस त्यांना तसें म्हणत देखील असेल !

त्यांच्या घरीं एका मंगल कार्याच्या निमित्ताने **श्रीमंत सर बाळासाहेब सरकार मिरज** ह्यांना मेजवानीस बोलाविले होते. आदल्या दिवशी शास्त्रीबुवा **रा. सा. नरसिंगराव भानु** याचे घरी बुद्धिबळे खेळत बसले होते. त्यांत अगदीं गर्क होऊन शास्त्रीबुवास घरी जाण्यास फार उशीर झाला. तेव्हां रा. सा. भानुवगैरे मंडळीनी त्यास म्हटले, "अहो शास्त्रीबुवा, तुमच्या येथे लग्नघाई, उद्या सरकारस्वारीस तुमच्या घरी मेजवानी; व तुम्ही असे इथे खेळत बसला तर कसें होईल?" शास्त्रीबुवांनी खालीं डाव देता देता म्हटलें, "आमच्या घरी माणसें हुशार आहेत; (मुख्यत: हें वाक्य बायकोस अनुलक्षून होते.) मला काही बघावें लागत नाहीं व मी स्वतः या गोष्टींकडे कधी पाहातहि नाही."

---

१. मिरजेस गावाच्या लगत ईशान्येस **श्रीमंत थोरले चिंतामणराव आप्पासाहेब सांगलीकर** याचा मोठा मळा असून त्यांतील विहीर फारच प्रशस्त—बारा मोटांची—आहे.

इकडे खेळ सुरूच होता. अखेर रा. सा. भानु यांनीं स्वत: त्यांस हातास धरून उठविले व मेजवानीची सर्व तयारी यथास्थित होत आहेशी पाहण्यासाठी आग्रहानें त्यांस घरी जाण्यास भाग पाडिले ! पुढे संशोधनकार्याचा त्यांचा व्याप वाढत गेला त्या मानानें हे सारे खेळ कमी कमी होत गेले. तरी स १९०४ पर्यंत शास्त्रीबुवा मधून मधून बुद्धिबळें खेळत असलेले दृष्टीस पडत

पेन्शन् घेतल्यानंतर, '**काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम्**' या सुभाषितानुसार मित्रमंडळीबरोबर कांहीं थोडया गप्पागोष्टी त्यांच्या घरींच घटका दोन घटका चालत. त्याच्या मृत्यूपूर्वी ५।४ वर्षे **रा. ब. आगाशे**, माजी स्टेटकारभारी मिरज, कै. **रा सा. डॉ. भडभडे**, इत्यादि मंडळी त्यांच्या या बैठकीत बसत असत. ही सर्व मंडळी शास्त्रीबुवाच्या घरींच जमत असे. रा. सा भानु अगर मिरजेतील शास्त्रीबुवांचे अगदी जुने स्नेही रा. रा. **त्रिंबक नारायण साठे** यांचेखेरीज खेळकरमणुकीकरितां आपण उठून दुसऱ्या कोणाच्या घरीं ते सहसा कधी गेले नाहींत. व्यायामाची क्वचित् कधी जरूर भासल्यास शास्त्रीबुवा फिरावयासहि जात. रोज थोडा वेळ लायब्ररींत जाऊन किंवा घरीं आणवून टाइम्स्, क्रॉनिकल्, ही रोजचीं व केसरी, ज्ञानप्रकाश, ही आठवडयाची वर्तमानपत्रें ते नियमाने वाचीत चालू परिस्थितीच्या माहितीसाठी किमानपक्षीं हे इतके वाचन तरी असेच. चित्रमयजगत्, विविधज्ञानविस्तार इ. मासिकातील महत्त्वाच्या ऐतिहासिकसारख्या विषयांवरील लेखांखेरीज नियतकालिकांतील इतर लिखाणांकडे ते फारसे लक्ष्य देत नसत.

**भाषणांतील विनोद**—शास्त्रीबुवांच्या घरी विद्वान्, अविद्वान् कोणीहि माणूस येऊन बसे व आनंदित होई, ह्यास मुख्य कारण त्यांचे विनोदी भाषणच होय शिवाय तें भाषण विद्वत्ताप्रचुर व बोधप्रद असे. शास्त्रीबुवाच्या ह्या विनोदी भाषणशैलीची व वागणुकीची कांहींशी

कल्पना यावी म्हणून येथे कांहीं थोडया गोष्टी दिल्या आहेत. त्यांत शब्दावरून केलेल्या कोट्या, श्लेष, उपरोध, उपहास, इत्यादीचे नमुने वाचकास आढळतील हे सारे प्रकार त्यांच्या नित्याच्या साध्या सहज बोलण्यातले आहेत. आणि ह्यामुळें त्यांच्या फुरसतीचा व विश्रांतीचा वेळ घरच्यावरीच आनंदाने घालविण्यास त्यास ४।२ माणसें सहज मिळत **श्रीमंत सरकार बाबासाहेब इचलकरंजीकर** यांनी शास्त्रीबुवांच्या विनोदी स्वभावाचे व कोटीबाजपणाचे सुंदर व मार्मिक वर्णन एकाच अर्थपूर्ण वाक्यात सांगितले ते असे –"शास्त्रीबुवानी एकदां केलेला विनोद किंवा कोटी सहसा पुन कधी त्यांच्या भाषणात येत नसे हे विशेष होय." नित्य नव्या नव्या कोटया अगर विनोद सुचणे हे कल्पनाचातुर्य कोणासहि आश्चर्यकारकच वाटेल. असो, पुढील विनोदी **चुटके** पहाः—

**भिकेच्या चाळण्या**—एकदा **कै. विसूभाऊ राजवाडे** यांच्या घरी आले होते दोघेहि संशोधक परस्पराविषयी मोठा आदर व लोभ मनांत बागवीत शास्त्रीबुवाचा एक लेखक विद्यार्थी काही जुनी पत्रे चाळीत बसला होता तें पाहून राजवाडे यानी विचारिले, "अहो, ह्या 'भिकेच्या चाळण्या' ह्या लहान पोराच्या हाती आतापासूनच कशाला देतां?" ह्यानी चटकन् उत्तर दिलें, "अहो विसूभाऊ, काय टाकावें व काय घ्यावे–ठेवावें–संग्रहित करावें–हे चाळणीच शिकवीत असत्ये! मात्र विवेक, तारतम्य पाहिजे!!"

**अधम अर्धांगें**—एकदां, **कै. गुरु. कानेटकर** हेडमास्तर, हायस्कूल, मिरज,याचेकडे भोजनसमारंभ होता. बहुतेक मंडळी पाटावर येऊन बसली, वाढपहि सर्व झालें; तरी कानेटकर उदक सोडीनात मंडळीनी विचारिलें, "मास्तर, विलंब कां? आता आम्हास परवानगी का देत नाही?" कानेटकर मास्तर इग्रजीत म्हणाले, 'The better halves are to come'– 'बायका यावयाच्या आहेत.' ( Better halves=उत्तम अर्धांगे =

बायका असा अर्थ.) यावर लगेंच शास्त्रीबुवा हांसत हांसत विचारतात, 'Yes, yes, you mean, we are the worse halves.'– " होय, होय, ( एकंदरीत ) तुमच्या म्हणण्याचा भाव असा कीं, आम्ही 'अधम अर्धांगें' आहों !" या उद्गारांनीं तेथें जमलेल्या मंडळींत हंशा पिकला हें सांगावयास नकोच.

**पगार किती ?**—एके दिवशीं एका परस्थ स्नेह्याने विचारिलें, " शास्त्रीबुवा, तुम्हांला पगार काय मिळतो ?" त्यानी तात्रडतोब सांगितलें, "आमचे प्रभु '**पट—वर्धन**' आहेत. ते मला '**पंचे--चाळीस**' देतात" श्रीमंतांचें उपनांव व पगाराचा आंकडा हे शब्द उत्तर देतांना वरीलप्रमाणे पदच्छेद करून त्यांनी उच्चारिले.

**अनुस्वार**—मिरजेतील किल्ल्यांत श्रीमंत सरकारांच्या भाऊबंदांची २।३ घराणीं आहेत. त्यांपैकीं, **कै श्रीमंत केशवराव मोरेश्वर** हे आपल्या चौचाकी गाडीतून फिरावयास जात असत. त्यांच्या व श्रीमंत सरकार यांच्या गाडीतून फिरण्यांत फरक हा कीं, श्रीमंतांच्या स्वारीच्या चौचाकीमागें स्वार दौडत जात असतो. त्यावरून शास्त्रीबुवा एकदां विनोदाने म्हणाले होते की, "ह्याना–सरकार स्वारींना–'अनुस्वार' आहे व इतरांना तो नाहीं." ह्याचा भावार्थ, पहिल्यांना **श्रीमंत** हे विशिष्ट अधिकारदर्शक उपपद आहे व दुसऱ्यांना **श्रीमत्** असे केवळ वैभव-सूचक उपपद आहे. २रा अर्थ:–अनु+स्वार = पाठीमागून + स्वार = श्रीमंतांच्या बगीपाठीमागून स्वार असतो; इतरांच्या नसतो.

**सद्‌गुरूंचे चेले!**–" 'सद्‌गुरूवांचोनी सांपडेना सोय। धरावे ते पाय आधी त्यांचे ॥' या वचनाचा संतसंमत अर्थ प्रसिद्ध आहे. पण लबाड शिष्य या सतवचनाचा काय अर्थ करितात ठाऊक आहे काय ?" असा प्रश्न एकदां उपस्थित करून शास्त्रीबुवांनी त्याचें उत्तर सांगितले, "अहो, सद्‌-गुरु चांगला ( भोगी ) असला तर ठीकच आहे. आम्हां शिष्यमंडळींचीहि

मग चंगळ चालतेच आहे. परंतु तोच जर वाईट (त्यागी) असला तर तो वाचोनी म्हणजे जिवंत राहून आमची सोय लागावयाची नाही, तो मेलाच पाहिजे !! कारण नंतर त्याची समाधि बांधून समाराधना, आरत्या, धूपारत्या, भंडारा-प्रसाद, रमणा-वगैरे निमित्तांनीं आमची चम्मन चालावयाला हरकत नाही ! म्हणून करावे काय? प्रथम त्याचे पाय धरून त्याला पाडावे-मारावे-इत्यादि." [ अशा वृत्तीचे शिष्य कांहीं थोडे थोडके नसतात. जरा डोळे उघडे ठेवून संतमंडळया शोधाल्या म्हणजे अनुभव येईल. ]

**एक समीकरण**—शास्त्रीबुवांनी Prince of Wales (इंग्लंडचे युवराज) याच्यासंबंधी एक समीकरणात्मक कोटी एकदां सांगितली. तें समीकरण असे –Prince of Wales = Sovereign--Crown म्हणजे इंग्लंडचे युवराज = 'मुकुटरहित साम्राज्याधिपति' असा वास्तविक अर्थ. परंतु सॉव्हरिन् किंवा पौंड = २० शिलिंग व क्राऊन = ५ शिलिंग हे कोष्टक मराठी तिसऱ्या इयत्तेमधल्या विद्यार्थ्यांससुद्धा पाठ येत असते, त्यावरून सकृद्दर्शनीं, प्रिन्स् ऑफ् वेल्स् = १५ शिलिंग असा अर्थ मनात येऊन गम्मत वाटते.

**बागांचा विटाळ !**—सांगली येथील शेवटच्या महत्त्वाच्या ज्योतिष-संमेलनप्रसंगीं **लो० टिळक** सांगलीस आले असता, त्यांच्या आदरातिथ्यास सांगली सरकाराच्या बागेंतली फुलें देऊं नयेत अशी सरकारी

---

१. अशा सारखी एक कोटी एडमंड् बर्क् या प्रसिद्ध इंग्रज लेखकानेंहि मॅजेस्टि (सार्वभौम) या शब्दावरून केलेली आहे ती अशीः—"What is Majesty ? Majesty is but '*a jest*' when deprived of its externals 'M' and 'y.' Externals म्हणजे बाह्य डामडौल-उंची पोषाक, राजचिन्हें वगैरे—असादि अर्थ होईल. A jest=थट्टा.

तारीद होतो असें म्हणतात त्यास अनुलक्षून शास्त्रीबुवा म्हणाले होते, "बरे झालें बुवा! अहो, बागा त्या 'पुष्पवती;' त्यांचा विटाळ ह्या पवित्र महापुरुषास झाला नाहीं हेच फार उत्तम झाले!" ह्या वेळी **लोकमान्य** मिरज येथें चौदा वर्षांनंतर आलेले, ह्यापूर्वी स. १९०६ मध्ये आले होते. अगदी भरतभेटीसारखा सोहळा—आनंद—झाला. ते शास्त्रीबुवांच्या घरी सुमारें अर्धा तास होते. तेवढ्या वेळात बोलता बोलता ह्यांच्या २०।२५ कोटया झाल्या असतील! लोकमान्याना मोठे कौतुक वाटले.

**एक नामी युक्ति**—एके दिवशीं एक भोळा माणूस मोठया उत्सुकतेने ह्यास सांगूं लागला, "शास्त्रीबुवा, 'अडीचकी' शिकविण्याची एक सोपी युक्ति मी बसविली आहे-इष्ट अंकास पाचांनी गुणून दोहोंनी भागावें म्हणजे झालें." त्यावर त्याचा उत्साहभंग होऊं न देता शांतपणे शास्त्रीबुवा त्या गृहस्थास सांगूं लागले, "अहो, मलाहि चिमण्या धरण्याचा एक साधा उपाय सुचला आहे. अंगणात थोडे दाणे टाकावे, ते टिपण्यास तेथे चिमणी येऊन बसली की, तिच्या डोकीवर थोडेसे मेण ठेवावें मग, तें वितळून तिच्या डोळयात जाऊन तिला दिसेनासे झालें म्हणजे हळूच जाऊन तिला धरावे." हें सारे बोलणे त्या भोळ्या माणसाने भाविकपणे ऐकून घेतलें. (चाणाक्ष वाचक या उत्तरातील खोच तेव्हांच ताडितील)

**गवईबुवा**—शास्त्रीबुवाना गाण्याचा नाद असे त्यामुळे **श्री. रा. वझेबुवा गवई** त्यास घरी भेटण्यास आले. 'बुवा आले,' असें मोघम ऐकून, त्याच्या समोर खेळत असलेले त्यांचे नातवंड भिऊन घरांत जाऊं लागताच शास्त्रीबुवा म्हणाले, "तान्ये, भ्यालीस होय? अग वेडे, हा बुवा असला तरी भिवविणारा—बागुलबुवा दाखविणारा—नव्हे, रजविणारा आहे. हा तुला झोळींत घालून बडविणार नाहीं हो! तर तुझ्यासारख्या रडणाऱ्या मुलाना गाऊन गुंगविणारा आहे. बैस इथे; भिऊं नको अं!"

**त्वत्=दुसरा–री–रें!**–एके संध्याकाळीं, '**गीतगोविंदां**'तील पदाचें त्यांचे आवडतें गायन चाललें असतां मी तेथे गेलो मला पाहून त्यांनीं विचारिले, 'तुला संस्कृत येते नाहीं रे!' मी कांहीं एक न बोलतां उभा राहिलों; व आतां काय गम्मत ऐकायला मिळते पाहूं, अशा उत्कंठेने त्याच्या पुढच्या बोलण्याकडे मी माझे लक्ष्य वेधले. ते म्हणाले, "अरे, राधेची एक सखी श्रीकृष्णाला, त्याच्या विरहानें राधेची झालेली अवस्था वर्णन करून सांगत आहे:–'**पश्यति दिशि दिशि रहसि भवन्तम्। त्वदधरमधुर-मधूनि पिबन्तं**॥' याचा अर्थ काय?" मी काय सांगणार? कारण या संस्कृत पद्याचा शब्दशः अर्थ मुळी जुळतच नाही! '**त्वत्**' पदाने घोटाळा होतो. गुरुवर्यांनीं, **त्वत्**[1] शब्दाचा 'अन्यत्=दुसरा, दुसरी, दुसरें,' असा एक अप्रसिद्ध अर्थ असल्याचें सांगून हा घोटाळा दूर केला. "एकांतांत, (त्वत्) दुसऱ्या कोणा गोपीच्या अधरामृताचें पान करणाऱ्या तुला दिशे दिशेस–जिकडे तिकडे–(ती राधा) पाहते." असा अर्थ.

**गायनाचा अभ्यास**—इतिहास--वाचन--संशोधनादि कार्यानें आलेला शीणभाग घालविण्यासाठी काव्यदेवीच्या उद्यानांत सचार करणें हे शास्त्रीबुवांचे सहज कर्म असे. कविता रचण्याचा उद्योग ते करमणुकी-खातर करीत असत. परंतु मिरजेस आल्यावर त्यांनी एका ललितकलेचा परिचय असाच, स्वत:ची करमणूक स्वत:सच करितां यावी म्हणून करून घेतला. पण, कोणतीहि कला म्हटली की तिच्या आराधनेस्तव अभ्यास–उद्योग–हा करावाच लागतो. त्यांनी हा उद्योग **गायनकला**

---

१. 'त्व त्व इति द्वावपि अजन्तौ अन्यपर्यायौ। एक. उदात्तः अपरः अनुदात्तः इति एके। एक तान्त. इति अपरे। इत्यादि '**आमि सर्वनाम्न: सुट्**' या सूत्रावरील सिद्धन्तकौमुदीमधील विवरण पाहावें. तेथें उदाहरणार्थ गीतगोविंदा-तील उपर्युक्त चरणच उध्दृत केलेले आढळतील.

साध्य करून घेण्यासाटीं केला. मिरजेस, **प्रसिद्ध गवई बाळकृष्णबुवा** हे बरीच वर्षे होते. त्यांजपाशी ३।४ वर्षे शास्त्रीबुवा गाणें शिकावयास जात असत. गायनविद्येंतले ते चांगले तज्ज्ञ झाले होते. या कलेच्या ज्ञानाचा पूर्ण उपयोग त्यांनी आपल्या संगीत नाटकातल्या पदांच्या रचनेंत केला आहे. चागले गायक नट असे कबूल करिताव कीं, शास्त्री-बुवांनी रचिलेली पदे गातांना आम्हांस कधी अडचण पडत नाही व स्वर मात्रा सुद्धां कधी बदलावी लागत नाहीं. ते खुषीत येऊन **जयदेव** कवींचीं ‘ गीतगोविद ’ काव्यातील पदे गाऊं लागत तेव्हां ती ऐकताना मोटी मजा वाटे. दिवसभर लिहून वाचून थकले म्हणजे स्वतःच्या मनास रिझविण्याकरितां ते हीं पदे गात असत. गायन ऐकण्याची त्यांना आवड असून तसाच कोणी नामांकित गवई असेल तर सवडी-प्रमाणे त्याचे गाणे ऐकावयास ते कधी कधी जात.

**वेदान्त**—ऐतिहासिक सनाशकाशी (Dates and figures) व ऐतिहासिक प्रसंगांशी (Events and facts) तन्मय झालेला त्यांचा मेंदु वेदान्तासारख्या अगदीं भिन्न विषयात देखील तितक्याच सामर्थ्याने समरस होत असे. अभ्यासाचा विषय बदलून मनाला उत्तेजित राखणें, ‘Recreation of mind by the change of subject,’ मनाची उद्योग करण्याची तरतरी कायम ठेवण्याचा हा जो एक प्रकार, त्यास अनुसरून शास्त्रीबुवांनी कांही दिवस वेदान्त-विषय स्वतः वाचिला व तो दुसऱ्यास समजावूनहि दिला. स. १९०६।७ च्या अजमासास कै. रा. ब. आगाशे, रा. सा. प्राणी मुन्सफ व डॉ. भडभडे हे शास्त्री-बुवांच्याकडे शारीरभाष्य—**वेदान्त** किवा **ब्रह्म-सूत्रांवरील श्रीमदाद्य-शंकराचार्य यांचें भाष्य** ’—वाचावयास येत असत. ह्यांपैकी आगाशे व प्राणी उत्तम संस्कृतज्ञ व या विषयाचे अभ्यासी होते. त्यांस खरे-शास्त्री यांनी अनेक टीकांच्या आधारें व विशेषतः ‘ **आनंदगिरी** ’

टीकेवरून भाष्य उत्तम प्रकारे समजावून सांगितले असे ऐकिवांत आहे. **कै. श्रीमंत आण्णासाहेब कुरुंदवाडकर** यांच्या ग्रंथसंग्रहांतील एका प्रसिद्ध इंग्रज तत्त्ववेत्याचा वेदान्तशास्त्रावरील एक ग्रंथ[१] शास्त्रीबुवांनी वाचिला होता. वेदान्तशास्त्रांतील संस्कृत पारिभाषिक शब्दांस त्या ग्रंथकाराने योजिलेले इंग्रजी पर्यायशब्द यथायोग्य आहेत असे त्या ग्रंथाच्या काळजीपूर्वक वाचनाने त्यांचे मत झाले होते.

**अलंकारशास्त्र**—त्याचा पाठशाळेतील मुख्य अधीत विषय व्याकरणशास्त्र हा होता. तथापि अलकारादि इतर शास्त्रें त्यांना चांगली अवगत होतीं. यासंबंधीं एक उत्कृष्ट प्रमाण पुढील हकीकतीत आढळेल. **रा. सा भास्करराव महाबळ** हे शास्त्रीबुवांचे आवडते विद्यार्थी होत. ते म्हणतातः—

"सन १९०८ साली मी बी. ए. च्या वर्गांत असतांना **मम्मटाचा 'काव्यप्रकाश'** ग्रंथ कै. शास्त्रीबुवाच्याजवळ वाचावा असा हेतु मीं त्यांचेपाशी प्रकट केला. नेहमीच्या प्रेमळ स्वभावामुळे तो ग्रंथ समजावून देण्याचें त्यांनी कबूल केले परंतु, 'त्या ग्रंथाचे व्यवस्थित अध्ययन आपले नाहीं, यामुळे कसें जमतें पाहावे' अशी शंका त्यांनीं प्रदर्शित केली. काव्यप्रकाशाची एक प्रत माझ्याकडे होती दुसरी प्रत शास्त्रीबुवांचेकडे नव्हती. पण, मौज अशी की, शास्त्रीबुवानी तक्क्या पुढे घेऊन डोळे साधारण मिटून डुलत बसावे; (तो प्रसंग व ते दृश्य माझ्या डोळ्यांपुढे आतां मूर्तिमंत उभें आहे.) मी काव्यप्रकाशांतील भाग वाचावा आणि शास्त्रीबुवांनी अत्यंत मार्मिकपणे तो समजावून द्यावा. ग्रंथाचें अध्ययन व्यवस्थित रीतीनें त्यांनी केलेलें नव्हते तथापि माझी तयारी

---

१. **डॉक्टर थिबो** यांनीं केलेलें 'वेदान्तसूत्रां'चें भाषांतर असावें.

त्यांनी अवघ्या एक दीड महिन्यांत करून दिली! त्या वर्षीं पुढें तोच विषय फर्ग्युसन् कॉलेजांत महामहोपाध्याय **गुरु. वासुदेवशास्त्री अभ्यंकर** यानी शिकविला. पण सांगावयास अभिमान वाटतो की, अभ्यंकरशास्त्रीबुवांच्यापेक्षां खरेशास्त्रीबुवाची विषयप्रतिपादनाची शैली अधिक मनोरम ठरली! आत्मप्रौढीचा दोष स्वीकारून देखील मी असें म्हणतो की, त्या विषयाची तयारी मला पुन्हा करावी लागली नाही. परीक्षा झाल्यानंतर ह्या विषयाची प्रश्नपत्रिका शास्त्रीबुवांनी माझ्याकडून मुद्दाम तोंडी सोडवून घेतली. आणि आपल्या शिकविण्याचा किनपत उपयोग झाला आहे हे त्यांनी तपासून पाहिले. सांगण्याचे तात्पर्य हेच कीं, ते आपल्या बुद्धीच्या जोरावर कठिण विषयाचें आकलन सहज करीत.''

**शाळेंतील नोकरीखेरीज इतर सरकारी सेवाचाकरी**—स. १८९२ सालीं शास्त्रीबुवांचे शिक्षणाचे काम पाहून त्यासंबंधी आपली पसंती **रा. ब. चित्रे कारभारी** यांनी हायस्कूलच्या शेरेबुकांत नमूद करून ठेविली असल्याचे मागे सांगितलेंच आहे. शाळेंतील कामाखेरीज, (१) स. १८९८।९९ मध्ये प्लेगची भयंकर आपत्ति मिरज शहरावर गुदरली. त्या वेळी सर्व नोकरांबरोबर ह्यांच्याहि वांट्यास जें जे काम आलें तें तें त्यानी लोकदृष्टया व सरकारदृष्टया समाधानकारक केलें. प्लेगमध्ये होणारी डॉक्टरी तपासणी, घरसफाई, सेग्रिगेशन्-कँपात रोग्याची पाठवणी, इत्यादि शब्दांबरोबर आजहि अंगावर शहारे आणणाऱ्या प्रसंगांच्या आठवणी डोळ्यापुढे नाचूं लागतात. लोक या उपायांना त्रासून गेलेले असत. याचें कारण उपाययोजनेचा मूळचा सद्धेतु व प्रत्यक्ष अम्मलबजावणी यांमधील विपरीत अंतर हेच होय ह्या कामीं शास्त्रीबुवांची वागणूक अम्मलदार या

नात्याने लोकांशी अत्यंत सहानुभूतीची होती. लोक त्यांच्या प्लेग-मधील कामगिरीबद्दल आजहि प्रशंसा करितात. ( २ ) प्लेगमध्यें अनाथ झालेल्या मुलांची व्यवस्था ( Orphanage ) पाहण्याचे काम कांहीं वर्षे यांजकडे होतें. तेहि चोखपणें व बिनबोभाट बजावून त्यांनी सरकारातून वाहवा मिळविली. ( ३ ) श्रीमंताचे अधिकारारोहण, सरकारी छापखाना उघडला तो प्रसंग, इत्यादि मिरज सरकाराकडील अनेक आनंदोत्सवाच्या व दरबारी थाटाच्या समयास शास्त्रीबुवांनीं कधी परेच्छेने, तर कधी स्वेच्छेने ( Voluntarily ) आपला काव्य-मय आहेर समर्पण करण्याचे काम मोठ्या तत्परतेनें केले, कधींहि त्यांत कुचराई किंवा टाळाटाळी केली नाही.

नोकरीच्या अगदीं शेवटीं, **श्रीमंत सर बाळासाहेब सरकार मिरज** यांच्या आज्ञेवरून ' मुखज्योतिष ' शास्त्रावर सुमारे दोनशे संस्कृत श्लोक शास्त्रीबुवांनी रचून दिले. लक्ष्मेश्वरचे रा. गोकाक वकील हे ह्या शास्त्रामधले नादी, त्याच्यासाठी त्याच्या विनंतीवरून श्रीमंतांनी शास्त्रीबुवाकडून ही कामगिरी करून घेतली. वस्तुतः हें शास्त्र त्यांना अपरिचित असता अंगीकृत कार्य एकनिष्ठेनें व परिश्रम घेऊन करावयाचेंच या देहस्वभावानुरूप त्यांनी ते स्वामिभक्तिपूर्वक पुरें करून दिले. सन १८८१ ते सन १९१३ पर्यंतच्या त्यांच्या नोकरीच्या ३२ वर्षांत त्यांचा पगार द म ३० रुपयापासून द. म. ४५ पर्यंत वाढला व पेन्शन् ( Good service reward– नेकीने केलेल्या नोकरीबद्दल बहाली ) त्यांस द म. रु. १५ मिळूं लागले. आणि ता. १ एप्रिल १९१३ पासून ११ वर्षे त्यांनीं ह्या पेन्शन्चा उपभोग घेतला.

———

## घरगुती गोष्टी



**परत कोंकणांत जावयाचे होते ते घर करून मिरजेंतच राहिले**—सन १८७५ पर्यंत लहानपणी ते कोंकणांत असतां पायीं फार फिरले, भटकले व शेकडो मैलांचा प्रवास त्यानी पायीं केला. पण सातारा व पुणे येथील उद्योग संपवून शास्त्रीबुवा मिरजेस आले ते सुमारें ४३।४४ वर्षे-आमरण-तेथेच राहिले. कुरुंदवाड, बुधगाव, इचल-करंजी, या ठिकाणी इतिहास-संशोधनादि कार्यार्थ, एकदा, उज्जयिनी, इंदूर वगैरे भागीं बंधु चिंतामणशास्त्री यांस भेटण्यास, दोन वेळां, मुलींच्या लग्नांसाठी रत्नागिरी व चिपळूण येथे आणि ४।२ प्रसंगी घरीं गुहागरास व भा. इ. मं च्या सभासाठी पुण्यास आणि पेन्शन् घेतल्यावर धुळे, मुबई, उमरावती, वगैरे ठिकाणी, स्वतः रचिलेल्या नाटकाचे प्रयोग बसविण्याकरिता त्यांना थोडा फार प्रवास करावा लागला. बुधगावचे हेलपाटे मात्र त्यानी मरेपर्यंत घातले ! तथापि, त्यांस प्रवासाचा मनापासून अगदीं कटाळा असे ! पूर्ववयात एक इच्छा मात्र ते मोठ्या हौसेनें बोलून दाखवीत. ती ही कीं, पेन्शन् घेतल्यानंतर कोंकणात जावयाचे, व तेथील आबराईत किंवा नारळी बागेत निसर्गरमणीय भूमातेच्या उत्संगावर बाळपणीं खेळल्या जागीच, एक लहानशी बंगली बांधून आयुष्याचे शेवटचे दिवस शातपणे त्या बंगलीत घालवावयाचे. त्यांची ही उत्कंठा ‘ जन्मभूमि ’ काव्यातील पुढील श्लोकांत चांगली व्यक्त होते —

**पाथोधीची श्रवणिं पडतां गर्जना मंद धीर ।**
**वृक्षच्छायांतरिं झुळु झुळू वाहतां वात गार ॥**
**होतों अंकीं निजत जननि ! जन्मभूमि ! तुझ्या ते ।**
**गेले कोठे दिवस ? झुरतों आठवोनी तयांतें ॥ १ ॥**

अथवा:—आंबे, पोफळि, साग, नारळि, तटीं दाटे तरूंचें बन ।
झोके घेति सुरम्य चंचळ जळीं छाया तयांच्या घन ।।
आकाशीं जणु की, विजा तळपती मासे जळीं त्यापरी ।
खाड्या त्या तव जन्मभूमि ! नयनीं पाहीन केव्हां तरी ! ॥२॥

यावर त्याचे समवयस्क स्नेही थट्टेने म्हणत, " शास्त्रीबुवा, कोकणातून देशावर आला तो परत कोकणात जाऊन रमला असे कधीं झाले आहे काय ? " ते कसेहि असो, नोकरी संपण्याच्या सुमारास त्यांनी इकडेच देशावर मिरजेस घर बांधिले व पेन्शननंतर १०।१२ वर्षें त्याचा त्यांनी उपभोगहि घेतला. संशोधनकार्य हातावेगळे झाल्यानंतर त्यांना आपली कोकणात राहण्याची हौस पुरी करिता आली नसती असें नाही, पण त्याचे आयुष्य त्याच्या संशोधनाच्या कार्यासच त्यांस अपुरें पडले ! त्याचे घर मिरजेस सरकारी थिएटरच्या उत्तरेस चुणेकर याच्या पडक्या घराची बखळ विकत घेऊन तेथे एकमजली तिघई जाप्त्याचें त्याच्या कुटुंबास पुरेसे असे प्रशस्त पण साधे व बळकट बांधिलेले आहे.

**सांपत्तिक स्थिति**—आज शास्त्रीबुवांचा कुटुंबपरिवार खाऊन पिऊन सुखी व एकंदरीत महाराष्ट्रीय ब्राम्हणाच्या स्थितीच्या मानानें बऱ्या स्थितीत आहे. कोंकणांत मूळची फार गरीबी होती, त्यामुळें पुण्यांतील पहिल्या नोकरीचा पगार द. म. रु. १५ त्यांस विशेष वाटला हे साहजिकच होते. कोकणात घरी त्यांची आई होती तोपर्यंत म्हणजे ते मिरजेस आल्यापासून १०।१२ वर्षें पगारांतले १०।१५ रु. ते घरी आईसाठीं पाठवीत. धाकटे बंधु परशुरामशास्त्री स. १८८९ साली वारले. त्यापूर्वी वर्ष सहा महिने ते अजारी होते. ह्या दुखण्यांत त्याच्या औषधपाण्यासाठी शास्त्रीबुवांनी स्वतःचे हजार आठशे रुपये खर्च केले. इतिहासप्रकाशनाच्या कामी त्यास मुळीच प्राप्ति होत नसे. ह्या बाबतीत विद्वद्वर्य कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचे म्हणणेंच त्यांच्या

अनुभवास आलें असें कबूल करणे भाग आहे. ४० वर्षांच्यावर सहवास असलेले त्यांचे मित्र **ग. सा. गोगटे** त्यास नेहमी **केप्लर**[1] नामक शास्त्रज्ञाचा दृष्टान्त देत. तो ज्योतिषशास्त्रज्ञ होता. फलज्योतिषावर तो पैसा मिळवून उदरनिर्वाह करी, आणि गणितज्योतिषाचे शोध लावणे, ग्रहाचे वेध घेणे, इत्यादि बौद्धिक व्यवसाय हौसेमुळे करी. ग. सा. गोगटे म्हणत, "शास्त्रीबुवा, ह्या केप्लरप्रमाणे तुम्ही करीत जा काव्ये, नाटकें, वगैरे लिहून पैसे मिळवीत जा. आणि आवड आहे म्हणून इतिहाससंशोधन करा." असो. मिरजेस आल्यावर १०।१५ वर्षे तरी द्रव्यप्राप्तीचे साधन म्हणून ते घरगुती शिकवण्याहि करीत. मिरजेंत ३२ वर्षे त्यानी भाड्याच्या घरांत काढिलीं ! ! त्याचे स्वत्तेचे घर स. १९१३ साली झालें; त्याचा खर्चहि त्यानीं आपली कोंकणातील जिंदगी सुमारे तीन हजार रुपयास विकून त्यांतून केलेला आहे. अर्थात्, सांप्रत जी त्यांची स्थिति सावरलेली दिसते ती मुख्यत त्यांच्या नाटकांमुळे होय. ही सारी लक्ष्मी आयुष्याच्या चरम भागांत–अखेरच्या १०।१२ वर्षांत–त्याच्या नाटक-ग्रथांनी त्यांना लाभलेली आहे.

**स्वरूप व परिणामकारक भाषण-पद्धति—** शास्त्रीबुवा शरीरानें स्थूल होते. हा त्यांचा अंगलोट त्याच्या आईच्या वळणावर होता. शास्त्रीबुवा कसे दिसत हें आज कोणास पहावेसे वाटल्यास गुहागरास त्यांची बहीण मथूताई ह्या आहेत त्यास जाऊन पाहावे. ते ठेंगणे नव्हते; अंगबांधा आडवा असल्यामुळे त्यांची उंची लक्ष्यांत येत नसे. त्यांचा तोंडवळा वाटोळा, रुंद, डोळे बारीक व मिशा पुष्कळ असत. एकंदरीत त्यांची मुद्रा भव्य, रुबाबदार व पाहिल्याबरोबर पाहणारांवर छाप पाडणारी होती. बोलतां बोलतां त्यांची विद्वत्ता, बहुश्रुतपणा व विनोद प्रकट

---

१. केप्लर हा जर्मन पंडित असून त्याचा जन्म स. १५७१ व मृत्यु स. १६३० मध्ये झाला. (ज्ञानकोश, प्रस्तावना विभाग ५, पृ. ३४३, पहा.)

होऊन त्यांचा ऐकणारावर तत्काल परिणाम होत असे. त्यांच्याशी ५।४ मिनिटेंच बोलले तरी तेवढया अवकाशांत ते समयचसूक, हजरजबाबी ( Ready witted ) आणि विनोदप्रचुर बोलणारे आहेत असे कळून येई. त्याच्या खाजगी बैठकींतील भाषणास त्याच्या एका चिरपरिचित विद्वान् विद्यार्थ्याने डॉ. **जॉन्सन्च्या** खाजगी बैठकींतील भाषणाची उपमा दिली आहे डॉ. जॉन्सन्प्रमाणे मोठा आवाज, विपुल माहिती, आकर्षक भाषाशैली, समर्पक दृष्टान्त व प्रत्यक्षदर्शी ( Picturesque ) कथावर्णने इ शास्त्रीबुवाच्या अंगच्या गुणसाम्यावरून या उपमेची यथार्थता वाचकांच्या ध्यानी येईल. त्याची चालण्याची ढब गंभीर मानीपणाची व पाहणाराच्या मनांत आदर उत्पन्न करणारी असे.

**स्वभाव**—त्याचा स्वभाव तापट, करारी, उद्योगप्रिय, धैर्यपूर्ण, कष्टाळू सत्याभिमानी, स्ववैशिष्टयरक्षणाची हौस असलेला, आनंदी-प्राप्तस्थितीत संतोष मानणारे-निष्कपटी, सरळ, साधा, मनमिळाऊ, उत्तम स्वभावपरीक्षक-दुसरा त्यांच्याशी डावपेचाने वागला तर ते डावपेच ओळखून त्याच्याशी सावधपणानें वागणारे-पण, प्रतिपक्षी म्हणून उलट आपण त्याच्याशी घावाडावाने वागावयाचे नाही असे उदार धोरण, मनाचे थोर, कीर्तीसाठी धडपड नाही-निरपेक्षपणे स्वकार्यरत-नाहीं पेक्षां हेच शास्त्रीबुवा पुण्यामुंबईस राहाते व कीर्तीचीच इच्छा धरते तर त्याचाहि बोलबाला पुष्कळ झाला असता! परंतु मुकाट्याने काम करीत राहाण्याचाच मुळी त्याचा स्वभाव होता. त्याचे एक सुशिक्षित, विद्वान् व पुष्कळ दिवसाचे अनुभवी स्नेही सांगतात, ' As a scholar and a gentleman, his was a high character : He would never seek favour by abject means, even from a very high personality."—" **जाडे पंडित व सन्मान्य गृहस्थ या नात्यानें त्यांचा दर्जा फार उच्च असून तोंडपुजेपणानें**

**किंवा इतर क्षुद्र साधनांनीं कितीहि थोरामोठ्या व्यक्तीची कृपा संपादण्यास ते प्रवृत्त झाले नसते.**" या सर्व गुणांमुळें लहानापासून थोरापर्यंत त्यांनी सर्वांचा लोभ संपादन केला. रा. ब केळकर, चित्रे, आगाशे, इ. वरिष्ठ अधिकाऱ्यासुद्धां मिरजेमधील सर्व विद्वत्प्रेमी अधिकारी मंडळी शास्त्रीबुवाना फार मानीत असे.

**संवयी**—शास्त्रीबुवाची पचनशक्ति चांगली असून आहारहि बरा असे. खाण्यापिण्याविषयीं कांहीं विशेष आवडनिवड किंवा 'हे नको, ते हवें' अशी तब्बेत फारशी सभाळावी लागत नसे. अनेक वर्षांच्या सहवासानें त्याच्या आवडीचे खाण्याचे पदार्थ वगैरेची माहिती त्याच्या पत्नीस झाली होती. त्या ते पदार्थ करून प्रेमानें त्यास वाढीत. ते रोज सकाळीं एकदां चहा नियमाने घेत. जरूरी वाटली तर क्वचित दुसऱ्यांदां दुपारीं घेत. पण, चहा न घेणाऱ्या लोकाना त्यानीं कधी नांवे ठेविली नाहीत, किंवा त्यांनी त्याचा कधी त्याबद्दल उपहास केला नाहीं. त्यांना तंबाकू खाण्याचें व्यसन होते, पण, व्यसन म्हणावें तर आपल्या लिहावाचावयाच्या कामांत गढून गेले असले तर चार चार तास त्याना तंबाकू खाण्याची आठवण देखील होत नसे! वर्गांत शिकवितांना, कित्येक गयाळी शिक्षकांप्रमाणे ते तोंडात तबाकूची अडचण ठेवीत नसत. वर्गावर जातांना स्वच्छ चुळा भरून टाकून तोंड धुवून मग जावयाचें असा त्यांचा प्रघात होता चार मंडळींत बसले असले म्हणजे ते विडीहि ओढीत. तंबाकूची पीक अगर जळक्या विड्यांचे तुकडे टाकण्यासाठी ते तस्ताचा उपयोग करीत; ती घाण ते इकडे तिकडे पडूं देत नसत.

**पोषाक**—त्यांची राहाणी अत्यत साधी होती. नेहमींचा पोषाक पांढरा एक ठराविक नमुन्याचा असे. एक पातळ सदरा, शॉर्ट् कोट, डोकीस साधा मोठा रुमाल, साधे उपरणें, ते उजव्या कांखेखालून न घेतां, पुष्कळ वेळां इतरांहून उलट म्हणजे 'डाव्या भुजेवरून उजव्या

खांद्यावर ' असें टाकीत, हातांत बळकट काठी, पायांत जोडा, असा असे. लग्नकार्यांत व दरबारी समारंभाच्या वेळी, डोकीस केशरी रंगाचें पागोटे व रेशमी कांठाचें उपरणे एवढा फरक केलेला असे. अलीकडे केव्हां केव्हा त्यांच्या रुमालास जरीची किनार असे. व नागपुरी करवत-काठी उपरणें ते वापरीत. फोटोंत दिसतो इतका ठाकठीकपणा नेहमी त्याच्या पोषाकांत नसे. ' वेष असावा बावळा । परी अंतरीं नाना कळा ॥' अशी विलक्षणपणाची एक गोष्ट तर पाहाणारास त्यांच्या पोषाकात हटकून आढळे ती ही की, **त्यांच्या कोटाची दुसरी गुंडी गळ्या-जवळच्या पहिल्या काजांत नेहमी अडकाविलेली असे.** धोतरे, सदऱ्याकोटाचे कापड, रुमाल, इत्यादींची पेठ (Trade-mark) सुद्धा बहुतेक ठराविक होती.

**धार्मिक आचार**—शास्त्रीबुवा कर्मठ ब्राह्मण नव्हते. तथापि, नित्य संध्येची दोन आचमनें, सोंवळें नेसणे, वार्षिक श्रावणी घरीं करविणे, श्राद्धपक्ष इ. पितृकर्म करणे, इतका तरी त्यांचा धार्मिक आचार प्रत्यक्ष दृष्ट असे. कोणी अतिथि-अभ्यागत-वैदिक, शास्त्री, पुराणिक-त्यांजकडे आला गेला तर त्यासहि ते पात्रापात्र पाहून दानधर्म करीत. आपल्या घराण्यांतील पूर्वजांच्या पवित्र आचरणाचा त्यांना मोठा अभिमान असे. व त्याविषयी ते अत्यंत आदरानें बोलत. त्यांच्या स्वतःच्या श्रेष्ठ नीतिमत्ते-बद्दल आजहि अनेकाच्या मुखांतून प्रशंसेचे उद्गार ऐकूं येतात. सामान्य हिंदु माणसाची दृष्टि कोणाच्याहि धार्मिक आचरणाकडे जास्त सूक्ष्मपणें जाते. आचार किती प्रमाणांत पाळला पाहिजे, एकाद्या व्यक्तीच्या इतर महत्त्वाच्या कार्यांमुळें त्यांत मागें पुढे करण्यास कांही वाव आहे की नाही, याचा कोणी विचार करीत नाहीं. तात्पर्य, वैयक्तिक अधिकारभेद व सत्कार्यव्यापासाठीं सोय-सवड असावी असें मानण्याइतकें औदार्य समाजांत नाहीं. उलट, सामान्य नीतिनियम झुगारून देऊन

प्रायश्चित्तरूप नित्यकर्मांचें दांभिकपणें यथास्थित स्तोम माजवून बसणारांस आमच्या समाजात बहुमान आहे. अशा प्रवृत्तीचे लोक गुरुवर्य खरेशास्त्री यांना त्याच्या धार्मिक वर्तनाबद्दल नांवे ठेवितात. ह्या लोकाचें चुकते कोठें हे त्याच्या ध्यानात यावें म्हणून वर हें किंचित् विवेचन केले. स्वतः शास्त्रीबुवा समयानुसार आमच्या प्राचीन परंपरित चालीरीतींचे समर्थनच करीत. शिवाय, विद्वत्तेच्या बाजूने आचार्यपदाप्रत पोचण्याच्या योग्यतेस चढलेल्या शास्त्रीबुवाच्या बाह्याचाराचा विचार करीत असता सामान्य माणसानी, "**यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि नो इतराणि**" हे प्राचीन ऋषीचें वचन प्रमाण मानून चालावें हेंच श्रेयस्कर नव्हे काय ?

**सामाजिक मतें**—युक्तिवादाने पटणारी व कालप्राप्त सामाजिक सुधारणा तत्त्वतः त्यास मान्य असली तरी ते सामाजिक बंडखोर नव्हते. आजूबाजूच्या समाजाची मनस्थिति जाणणारे व त्याच्या चालीने मंदपणें प्रगतीच्या मार्गावर पाऊल टाकणारे असल्यामुळे ते पुण्यासारख्या ठिकाणी राहाते तर त्यांस सुधारकानी या बाबतीत **लो. टिळकांच्या** पक्षाचे ठरविलें असते. व खुद्द शास्त्रीबुवाना त्यामुळे वाईट मुळीच वाटते ना ! तथापि, सुधारकातहि त्याचे पुष्कळ स्नेही होते. **श्री आण्णासाहेब कर्वे** मिरजेस आले असता त्याच्या स्त्रीशिक्षणार्थ चालविलेल्या संस्थेस शास्त्रीबुवानी शक्त्यनुसार चांगली देणगी दिली होती त्याच्या औदार्याचा ओढा सार्वजनिक व राष्ट्रहिताच्या कार्यास मदत करण्याकडे विशेष होता. '**भारत-इतिहास-संशोधक-मंडळा**'स ग्रंथरूपानें व रोख मिळून त्यांनी कमीत कमी एक हजार रुपयावर मदत केली. '**टिळक पर्स**'फंडास व '**महाराष्ट्र होमरूल लीग**'ला त्यांनीं प्रत्येकी रु. १०० दिले. 'केसरी'वर वेळोवेळी गुदरलेल्या संकटप्रसगीं स्वतः हिंडून त्यांनी लोकातूनहि द्रव्यसहाय्य गोळा करून दिले.

**जुन्या-नव्याची जोड**—धार्मिक काय किंवा सामाजिक काय जुनें सगळेच मोडावे, नवे मांडावे हें त्यास पसंत नव्हतें. ह्या विचाराची ऊर्मि त्यांच्या काव्यांत जागोजागी उठलेली दृग्गोचर होते. आपल्या ' यशवंतराव ' महाकाव्यांत ते वर्णन करितात:—

**" अतुल वैभव शास्त्र कला गुण । सकल जाति पुण्यांतुन लोपुन ॥**
**नव नवी व्यसने नव दुर्गुण । नव विचार इथें नव भाषण ॥१२।६१**
**" जरि पुढे अणखी शत-वत्सर । स्थिति अशीच असेल अम्हांवर ॥**
**स्वजनराज्य इथे वसले, असे । वदति की अमुचे पणतू केस ? ॥ १२।६२**
**" जनहि दुर्बळ होति दिनोदिन । विसरले अपुले मुळचे गुण ॥**
**बदलुं पाहति पद्धति ते जुनी । म्हणुनि फार विषाद वसे मनीं ॥ १२।६३**

हे विचार अर्थात् ४०।४५ वर्षांपूर्वींचे आहेत. मल्लिनाथादि संस्कृत पंडिताविषयींची त्यांची निस्सीम आदरबुद्धि मागे एके ठिकाणी व्यक्त झालीच आहे. तथापि, " सांप्रत परिस्थितींत, आमची आचार्यपीठें आपली जबाबदारी ओळखून योग्य कार्य करीत नाहींत, उलट, ' ऋग्वेदी श्रेष्ठ कीं आपस्तंब श्रेष्ठ ' असले क्षुद्र वाद माजवून तीं सामाजिक संकोच व मोडतोड करीत बसली आहेत, " अशी चरचरीत टीका करून या त्यांच्या विघातक वर्तनाबद्दल खरेशास्त्री यांनी एकदां अतिशय खेद प्रदर्शित केला होता. तात्पर्य, जुनें तेवढे सारेच चांगले ( Old is gold ) असेंहि त्यांनी कधी प्रतिपादिलें नाहीं. तर, " **होतां होईल तों जुन्या नव्याची जोड घालावी—शक्य तितकें जुनें स्वाभिमानपूर्वक टिकवावें व विवेचक शहाणपणाने नवें त्याच्याच पायावर स्थापावें,** " असें त्यांचे मत होते.

---

# शास्त्रीबुवांच्या पत्नी श्रीमती सत्यभामाबाई

[१] "अर्धं भार्या मनुष्यस्य भार्या श्रेष्ठतमः सखा ॥"

[२] "भार्या हि परमो ह्यर्थः पुरुषस्येह पठ्यते ॥
असहायस्य लोकेऽस्मिँल्लोकयात्रासहायिनी ॥"

**गृहसौख्य**—शास्त्रीबुवांचीं नोकरीचीं ३०।३२ वर्षें गरीबींत सुखानें गेलीं ह्याचे सर्व श्रेय अर्थात् त्यांच्या पत्नी श्री. सत्यभामाबाई यांसच दिले पाहिजे. कारण, सत्यभामाबाई याचा स्वभाव अत्यंत कष्टाळु, गृहकृत्यांत पराकाष्ठेचा दक्ष, स्वाभिमानी व पतिनिष्ठ होता. '**जे दे पतीस सुख फार**' किंवा '**यद्भर्तुरेव हितमिच्छति**' असें कलत्र शास्त्रीबुवांस लाभले होते याचा संतोष ते फार मानीत. आणि प्रसंगोपात्त मोठया आदराने ते या सौख्याचा सानंद उल्लेख करीत असत. मातु:श्री सत्यभामाबाई, एका संस्कृत सुभाषितांत वर्णिल्या-प्रमाणें सद्गुणी आर्य स्त्रियाच्या ठिकाणी आढळणाऱ्या सहा गुणांनीं मंडित, नम्र, विनयशील, संतुष्ट-कोंडयाचा मांडा करणाऱ्या-प्रपंचभार आवरणाऱ्या व पतिभक्तिपरायणतेविषयी अनन्य अशा प्रेमळ पत्नी होत्या. द. म. १५।२० रुपयांत काय काय म्हणून ध्यावें ? नवा संसार मांडलेला, घराहून कोकणांतून बोराएवढे भांडे देखील मिळालेले नव्हते ! शब्दश: मातीच्या भांडयांनीं संसारव्यवहार करण्याची पाळी

---

१. म. भा. आदि. ७४।४१. अर्थ—भार्या ही पुरुषाची अर्धी सहायकर्त्री आहे व ती त्याचा उत्तमोत्तम मित्र आहे. २. म. भा. शांति. १४४।१४. अर्थ—भार्या हाच पुरुषाचा मोठा अर्थ आहे असें म्हटलें आहे. या मृत्युलोकांत असहाय मर्त्यांची जीवितयात्रा चालविण्याच्या कामीं ती सहाय्य करणारी आहे.

असे. अशा स्थितीत त्या माउलीने कितीक वर्षे काढिलीं व धैर्यानें प्रपंचाचा गाडा हांकिला ! पण घरचे न्यून एका शब्दाने देखील कधीं घरात किंवा घराबाहेर कोणापाशी उच्चारिले नाहीं ! ! घरात दुसरे माणूस नाहीं, शास्त्रीबुवा शाळेतल्यासारखे घरी सुद्धा तापटपणानेच वागत, घरांत एकाददुसरे तरी लहान मूल असावयाचे, ते रडले तरी ह्यांना खपत नसे. ह्याची शाळेसाठी नित्य दसघंटेची गडबड ! आणि शास्त्रीबुवांच्या चंचीतल्या कात, चुना, तंबाकूपासून सगळी तरतूद सत्यभामाबाईंना पाहावी लागे ! ! परंतु या सेवेचा बाईंनी कधी कंटाळा केला नाही, उलट, हीच आपली देव-देवपूजा असे त्या मानीत असत. त्याचे कपडे तयार करविणे, वड-फाटले पाहाणे, मळलेले कपडे परटाकडे धुवावयास टाकणे, ह्या गोष्टीसुद्धा बाईंनाच कराव्या लागत. हाताखाली सून आल्यावर देखील पतीच्यासंबंधीं बारीकसारीकहि कामे त्या स्वतःच टिपेने करीत. घरातल्या नित्याच्मा खर्चावेचाचे कामहि शास्त्रीबुवा स्वतः पाहात नसत हे निराळे सांगावयास नकोच. त्याचीहि व्यवस्था कशी ना कशी सत्यभामाबाईंनाच लावणे भाग पडे.

गुरुवर्यांना ह्या सर्व गोष्टीची पूर्ण जाणीव होती. पत्नीच्या कर्तबगारीवरचा त्याचा विश्वास मागे एका गोष्टीत-रा. सा. भानु याजकडे बुद्धिबळे खेळत असता त्याच्या बोलण्यात-ह्यांच्या तोडून व्यक्त झालाच आहे. मी त्याजकडे ऐतिहासिक पत्राच्या नकला करण्यास जात असे. एके दिवशी मातु.श्री सत्यभामाबाई जवळच पलीकडे सालबेगमीच्या डाळीडुळीचे काम स्वत करीत बसल्या होत्या. त्यांजकडे बोट दाखवून गुरुवर्य मला म्हणाले, "दामू, माझ्या संशोधनकार्याचे अर्धे अधिक श्रेय हिला आहे. हिने जर असे कष्ट केले नसते व घरगुती सर्व व्यवहार हिने संभाळले नसते तर त्या कामी माझा वेळ खर्च होऊन माझ्या हातून झाले याच्या निम्मे कार्यहि झाले नसते. कारण, हिच्या

सहाय्याने वेळ तर वाचलाच; परंतु हिचे हे काबाडकष्ट व त्यांमुळे झालेली बचत आणि हिने केलेली काटकसर, यांयोगे माझ्या प्रकाशनकार्यास मोठी मदत झाली व प्रपंचखर्चासहि भर पडली."

**परस्पर प्रेमबंध**—अत्यंत प्रेमाचे माणूस आपल्यापासून दूर असले म्हणजे आपल्या मनात त्याच्या सुरक्षिततेसंबंधी केव्हा केव्हा निष्कारण विपरीत कल्पना येत असतात. म्हणून म्हण पडली आहे की, 'मन चिंती ते वैरी न चिंती' त्यातून बायकाची मने तर फारच हळवी-कोमल-असतात एकदा शास्त्रीबुवा आपल्या धाकट्या भावजयीस[1] समागमे घेऊन घरी गुहागरास गेले होते. इकडे, मिरजेस सत्यभामाबाईंच्या जिवास हुरहुर लागली तशात एके रात्री त्यास स्वप्न पडले की, "आपले सौभाग्याचे जहाज डळमळूं लागले आहे, आपले पति मोठ्या संकटांत आहेत, म्हणून त्या घाबरल्या. तोच कोणी देवीने येऊन हात उभारून त्यास अभय दर्शविले आणि त्याच्या कपाळी कुंकू लावून देवी अदृश्य झाली." या स्वप्नाने बाईंचे मन जास्तच अस्वस्थ व अधीर झाले होते. स्वप्नावर कोणाचा भरंवसा असो वा नसो, कित्येक स्वप्नें पुढे होणाऱ्या गोष्टीची सूचक असतात असा अनुभव पुष्कळाना येतो हे मात्र खरें सत्यभामाबाईंचा स्वप्नावर विश्वास होता हे सांगावयास नकोच.

शास्त्रीबुवा पुढे ८।१० दिवसानी मिरजेस सुखरूप परत आले व स्वप्नांत बाईंच्या कपाळी कुंकू लावून देवीने दर्शविलेलें अभय सत्य ठरले. परंतु प्रवासांत घडलेल्या भयंकर प्रसंगाची जी हकीकत शास्त्रीबुवांनी सांगितली, तिजवरून सत्यभामाबाईंच्या मनाचा घाबरेपणा अकारण होता असे म्हणतां यावयाचे नाही. कारण, शास्त्रीबुवांची बोट दाभोळच्या खाडींतून जात असतां समुद्रावर एकाएकीं मोठे वादळ

---

१ परशुरामशास्त्री यांचें कुटुंब. नाव—'वाराणशीबाई.'

होऊन बोट[1] फारच डळमळूं लागली. रात्रीचा समय, खाडीतील पाण्यास भयंकर वळसा, तेव्हा आतां काय होईल आणि काय नाही—बोट कदाचित् बुडेल देखील—असें वाटून सर्व उतारू अगदीं हवालदील झाले ! शास्त्रीबुवांची भावजयहि घाबरून रडूं लागली. शास्त्रीबुवांचा स्वभाव मूळचाच धाडसी असल्यामुळे व लहानपणापासून त्याच्यावर अनेक संकटें ओढवलीं असताहि त्यांमधून ते ईशकृपे निभावले असल्यानें त्याच्या वृत्तीत एक प्रकारचा निश्चितपणा व निश्चलपणा आला होता ते शातपणे सर्वांस परोपरीनें धीर देत होते व ' आतां देवाचें स्मरण करा ' असें सांगत होते. असो. कित्येक तास बोटीस हिसके चारून उजाडता उजाडता वादळ शात झाले आणि या बोटीवरील सर्व उतारू सुरक्षितपणे किनाऱ्यावर उतरले योगायोग असा की, वादळ झालें ती रात्र व सत्यभामाबाईंना पडलेल्या स्वप्नाची रात्र एकच होती ! स्वप्न त्यास पहाटेच्या प्रहरींच पडले होते !! सांगावयाचे तात्पर्य असें की, सत्यभामाबाईंचा निदिध्यास—त्याच्या चित्तास लागलेला पतिस्मरणाचा वेध—असा जबरदस्त होता. आसनीं, भोजनी, शयनी, त्याचे पतिस्मरण अखंड चालूं असे.

धुळ्यास तारामंडळ नाटकाचा पहिला प्रयोग झाला तो पाहण्यास शास्त्रीबुवा गेले होते. तेथे सत्यभामाबाईच्या माहेरची[2] माणसे—रा. मोरोपंत सोमण व त्याचा परिवार—राहात असत. त्यानीं ह्या नाटकाचीं

---

१. गुहागरास कोल्हापूर-रत्नागिरी मार्गानें जाताना वाटेंत दाभोळची खाडी ओलांडावी लागते. त्यासाठी नांवा असतात. तसलीच ही एक नांव असावी. ह्या खाडींत पाण्यास मोठा भोंवरा आहे, नावाडी दारू पिऊन धुंद झाले होते; त्याच्या बेहोषपणानें ही नाव त्या भोंवऱ्यात सापडली होती. २. वडद येथील सोमणाचे अगदी निकटचे भाऊबंद.

५१७ तिकिटें काढून आणिलीं होती. पुढे शास्त्रीबुवांची व रा. मोरो-पंत ह्यांची भेट झाली. आगतस्वागत व कुशल प्रश्न झाल्यावर शास्त्री-बुवांनी सोमणांना घरच्या सर्व माणसांसह नाटकास येण्याचे निमंत्रण दिले. सोमण ह्यांनी सांगितले, " आम्ही येणारच आहों. ही पहा तिकिटे सुद्धां घेतली आहेत " तेव्हां शास्त्रीबुवांनी तीं तिकिटें परत काढून घेतली, व " पहिला खेळ माझा आहे, ह्यांत कंपनीचा कांहीं संबंध नाही, सबब, तिचेही नुकसान होण्याची भीति नाहीं. शिवाय तुम्ही घरची माणसे, तुम्ही—माहेरच्या माणसांनी—खेळ पाहिला हे तिला ( पत्नीला ) समजले म्हणजे तिला स्वत खेळ पाहिल्यापेक्षाहि जास्त आनंद होईल. बायकांचे माहेरच्या माणसावर तितके प्रेम असतेच !" असे ते बोलले सत्यभामाबाई शास्त्रीबुवासह धुळ्यास हा खेळ पाहाण्यास जाणार होत्या, परतु प्रवासाची दगदग त्यास सोसणार नाही, मिरजेहून धुळयापर्यंत वाटेत २।३ ठिकाणीं गाडी बदलावी लागते, त्यामुळे त्रास होईल म्हणून त्यांनीं पत्नीस बरोबर नेले नव्हतें. ह्यास्तव वरील संभाषणात त्यांनी पत्नीचा मुद्दाम उल्लेख केला होता असो

**आदरातिथ्य**—पाहुण्यांचा सत्कार करण्यात आपण गृहस्थाश्रमाचे कर्तव्य-पालन करण्यापलीकडे विशेष कांही करीत नाही असे त्यांस मनापासून वाटे व आर्यांची आदरातिथ्याची रीतच त्यास पसंत असे. तीन शिरत असलेले इंग्रजी पद्धतीचे चोचले अगर शिष्टाचार त्यांस आवडत नसत. यासंबंधी आपला अभिप्राय त्यांनी एके प्रसंगी मजेदार रीतीनें प्रकट केला:—सत्यभामाबाईंचे भाचे-गणेश गोपाळ ऊर्फ बापूराव सोमण-एकदां मिरजेस सकुटुंब यावयाचे होते. नक्की दिवस ठरला होता म्हणून त्यांनी शास्त्रीबुवांस आगाऊ पत्र पाठवून आपण उभयतां—नवराबायको--त्यांस भेटावयास येणार असल्याचें कळवून ठेविलें. ठरल्याप्रमाणे दुसऱ्या दिवशीं बापूराव शास्त्रीबुवांचे घरी येऊन दाखल

झाले. बापूरावांनी आपल्या पत्नीसह त्यांस नमस्कार केला. त्यांनी उभयतांस आशीर्वाद देऊन बोलण्यास प्रारंभ केला:-"बापू आलास, ये बाबा ! आज अशी गम्मत झाली--तूं येणार म्हणून मी सकाळींच उठून बाजारांत गेलो व एका मुसाऱ्याकडे एक पोते तांदूळ मागूं लागलो, पण ते मिळाले नाहीत. मग, वाण्याच्या दुकानात तूप एक डबाभर मागितलें, तेहि मिळाले नाही ! तूं येणार तेव्हा म्हटले निदान एक पोतेभर तरी साखर पाहिजे, तीही मिळेना ! मी मोठा काळजींत आहें ! घरांत आमच्या बेगमीचें सामान आहे. पण वाटले, तुम्ही येणार, करितां पुरेल की नाही कोणास ठाऊक ? " इतके विनोदाने बोलून ( ह्या बोलण्याचा अर्थ बापूरावांच्या लक्ष्यात नीटसा आला नाहींसे त्यांच्या चर्येवरून ओळखून ) मग ते म्हणाले, " अरे बापू, एवढे मुद्दाम पत्राने आगाऊ कळविण्याची काय जरूर ? तुम्ही दोन माणसे ! केव्हांहि आलात तरी आमची अडचण कां होणार आहे ? त्यातून तुम्ही घरचीच माणसे, अगदी अनोळखी परकी असतां तर एक असो." तात्पर्य, ही पाश्चात्य शिष्टाचाराची आपल्या देशांत रूढ होत चाललेली नक्कल त्याना आवडली नाही.

शास्त्रीबुवा व त्यांच्या पत्नी ह्यांच्या प्रेमळ स्वभावांविषयी रा. सा. माधवराव केळकर लिहितात, " आम्ही त्रिवर्ग बंधु शास्त्रीबुवांच्या घरीहि शिकावयास जात असूं. घरी ते फार ममतेनें व प्रेमळपणानें वागवीत व शिकवीत. त्यांच्या पत्नीचा स्वभाव मुळापासोनच फारच प्रेमळ होता. त्याहि आम्हांस आपल्या मुलांप्रमाणें वागवीत. त्यांचा स्वभाव लोकांशीं वागण्यांतसुद्धां फारच प्रेमळ होता. आम्ही त्रिवर्ग बंधु जरी मिरज हायस्कूल् सोडून गेलो तरी पुढे, ते मरेपर्यंत त्यांचे आमचेवरील प्रेम कायम असे. केव्हांहि भेट जाहली म्हणजे आम्हास व त्यांस घरचीं माणसे भेटल्याप्रमाणे आनंद होई. "

**राजवाडे यांस शिदोरी**—शास्त्रीबुवांच्या आदरातिथ्याच्या विचारांशी सत्यभामाबाईंचे विचार अगदी मिळते असत. कै. विसूभाऊ राजवाडे पत्नीहीन अगदी एकाकी, तेव्हां ते शास्त्रीबुवांच्या घरांतून प्रवासास निघाले की, सत्यभामाबाईंनी त्यांचेबरोबर पाथेय-शिदोरी-चांगली भक्कम बांधून द्यावी. कणकेच्या दशम्या, तूप, गूळ नाहीतर साखर, लोणचे, दुसरे एकादें पुरेसें तोंडीलावणे–भाजी, झुणका, वगैरे-ताजे, अशी तयारी करून द्यावी. तो ब्राह्मण मात्र निःस्पृह, वीतरागी, खरा! ते एकदां शास्त्रीबुवाच्या येथें म्हणाले, " मला फराळाचे इतके सोपस्कार कशाला करून देतां ? मी एखाद्या वेळी खातो, बाकी उरलेले कोणास तरी देऊन टाकतो, झाले ! ! "

**वडील बंधूंनीं केलेली थट्टा**—शास्त्रीबुवांचे वडील बंधु कृष्णशास्त्री २।३ वेळां तरी मिरजेस आले होते. शेवटच्या खेपेस ते आले त्या वेळी वासुदेवशास्त्री आपल्या मालकीच्या घरात राहूं लागले होते. सत्यभामाबाई थोरल्या भाऊजींची मर्यादा फार राखीत. आतां त्या वयाने प्रौढ झाल्या होत्या तरी जेवणाचे वाढण्याच्या वेळेखेरीज त्या कृष्णशास्त्री यांजपुढे सहसा जात नसत. अर्थात् त्यांच्याविषयीं काही बोलावयाचे झाल्यास व तें त्याना ऐकूं गेले पाहिजे असे असल्यास तो विषय कृष्णशास्त्री जेवतानाच काढीत व तो बहुधा विनोदाचा असून त्यांत सत्यहि भरलेले असे. ते म्हणत, " हिनें मात्र नशीब काढिले खरे, आम्ही गरीब, सोमण केवढे सावकार ? पण, सोमणांच्या सुनालेकीना शोभतील असे दागिने हिच्याहि अंगाखाद्यावर हिने घातले तर देवाने अनुकूलता दिली आहे. " ( सत्यभामाबाई चार चालीरीतीच्या जिनसांखेरीज अधिक दागिने अंगावर नेहमी घालीत नसत. ) वासुदेवशास्त्री यांजकडे पाहात व हांसत हांसत वरचेवर कृष्णशास्त्री असें बोलत. त्यावर वासुदेवशास्त्री जरा रागावल्यासारखें

दाखवून बंधूंस विचारावयाचे "दादा, एकूण हा सारा हिच्याच नशीबाचा प्रभाव म्हणावयाचा? आमचे कष्टबिष्ट सारे निरुपयोगींच ना!!" तेव्हां कृष्णशास्त्री संथपणें उत्तर करीत, "अरे आण्णा, तुझा स्वभाव किती चंचल, तऱ्हेवाईक! हिनें केलेल्या आराधनेमुळे त्याला स्थिरता आली व तुझे उद्योग सुरळीत चालले-इत्यादि."

**मुलेंबाळें, नातवंडें**—शास्त्रीबुवांना मुलें पुष्कळ झाली. त्यात देवदयेने एक मुलगा-आमचे मित्र रा. यशवंतराव[1] व तीन मुली हयात असून मुली चागल्या थोर व सन्मान्य कुलामध्ये पडल्या आहेत. थोरली मुलगी सौ. रंगूआक्का ही रत्नागिरीस मधल्या आळीचे श्री. रा. विष्णु गोपाळ ऊर्फ भाऊसाहेब पराजपे, सावकार व बडे शेतकरी यास दिली आहे. तेथें ती आपल्या मुलामाणसासह आनंदात असते. दुसरी मुलगी बनूताई हिला चिपळुणास रानडे याजकडे दिली होती. तिचे पति श्री. रा. हरि विठ्ठल रानडे हे बी. ए. एल्एल्. बी. झाले होते. त्यानी नदुरबार येथे सुमारे आठ महिने वकिली केली. परंतु पुढे त्यास क्षयाची भावना होऊन ते ४।६ महिने अजारी होते. मिरज येथें डॉ. वान्लेस याचे उपचार चालू असता ते वारले. त्यास अजमासे वीस वर्षे झाली. अशा तऱ्हेनें लहानपणीच दुर्दैवाने वैधव्यदशेत पडलेल्या मुलीस व तिच्या एकुलत्या एक कन्येस शास्त्रीबुवानी उत्तम प्रकारे संगोपिले व आपल्या वात्सल्याने बनूताईचे दुर्धर दुःख हलकें करण्याचा त्यानी प्रयत्न केला. परंतु स्वतः त्यांस हे दुःख जन्मभर जाणवलें. तिसरी मुलगी सौ. बबूताई हिला जमखिंडी येथें रामदुर्गचे खासगी कारभारी[2] रा. सा. गंगूनाना रानडे याचे चिरंजीव रा. रा. विष्णुपंत रानडे यास दिली आहे. तेथें ती आपल्या गुणांनी श्वशुरकुलास आनंदवीत आहे. आपल्या सर्व मुला-

---

१. विशेष हकीकत पुढें स्वतंत्रपणे दिली आहे २. Private Secretary.

मुलीस सत्यभामाबाईंनी स्वतःच्या जिवापलीकडे जपून 'राईचे पर्वत' केले आणि **'प्रेमळ माता'** या थोर पदवीस त्या सर्वस्वी पात्र झाल्या. सौ. रगूआक्का व सौ. बबूताई यांची मुले त्या माहेरपणास चार दिवस आल्या म्हणजे त्यांच्या बरोबर असावयाची, परंतु बनूताईची मुलगी किंवा रा. यशवंतरावांचीं मुलें ही शास्त्रीबुवांच्या पुढें नेहमी वावरणारी नातवंडें होत. अलीकडे उतारवयाचे झाल्यावर शास्त्रीबुवा फुरसतीअंतीं ह्यांच्याशीहि कधी गमतीचे भाषण अगर थट्टा, विनोद करीत.

**बाईंचें देवापाशीं मागणें**—अलीकडे, सत्यभामाबाईंना थोडी कामाधामातून फुरसत मिळे. त्यामुळे त्या घरात देवापुढें हात जोडून प्रार्थना वगैरे करीत बसत. त्यावेळी कधी कधी शास्त्रीबुवा थट्टेने विचारीत, "काय, देवाला काय मागत्येस? आणखी कोणते मनोरथ पूर्ण व्हावयाचे राहिले आहेत?" यावर बाईंचे बहुधा एक उत्तर असे. त्या विनयाने म्हणत, "आणखी दुसरे काय मागावयाचें आहे? '**देवा हे चरण मला लाभले आहेत, त्यांची अखंड सेवा मला घडो! ह्यांत अंतर आणूं नको,**' हेच मागत्ये. आतां दुसरा काहीं एक मनोरथ नाही." पण, देवाने हे त्याचे गाऱ्हाणे ऐकिले नाही! आणि ह्या मृत्युलोकात वृद्ध झालेल्या पतिपत्नींत कोणाची कांही इच्छा असली तरी ती पूर्ण होणे न होणे त्याच्या स्वाधीनचे नसल्यामुळे भाविक आर्य-स्त्रियांना दुःसह असा पतिमरणोत्तरकाल सत्यभामाबाई पतिचिंतन करीत कष्टेनैव कसातरी कंठीत आहेत. बाईंच्यासंबंधी येथे आम्ही थोडे विस्ताराने लिहिले ते **'आदर्श गृहिणी'** कशी असते हे दाखविण्याच्या उद्देशाने लिहिले आहे.

———

# सार्वजनिक महत्त्वाच्या बाबी



**राजकीय मतें**——खरेशास्त्री पुण्यास आल्यावेळेपासून त्याचा स्नेह, त्याचे बसणे-उठणें, सार्वजनिक काका, विष्णुशास्त्री चिपळूणकर, टिळक, आगरकर इत्यादींसारख्या स्वदेशाभिमानी व स्वतंत्र बाण्याच्या तरुण सुशिक्षित मंडळींतच बहुश असल्यामुळे स्वभावत: स्वातंत्र्यप्रिय असलेली त्याची वृत्ति ह्या स्वदेशाभिमानगुणाने मंडित होऊन अधिकच तेजस्वी बनली. ती इतकी की, मे. रसेलसाहेबासारख्या आपल्या खात्याच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांपुढें कृष्णशास्त्री--विष्णुशास्त्री ह्या पिता-पुत्राच्या मराठी भाषेतला नरम--गरमपणा ओळखूनहि विष्णुशास्त्री याची तेजस्वी लेखणी स्वत:स प्रिय असल्याबद्दल निर्भयपणे बोलून दाखविण्यास ते बिलकुल कचरले नाहीत!! पुण्यास त्या वेळच्या सुशिक्षित मंडळींत राजपक्षीय व प्रजापक्षीय असे दोन तट होते असे कल्पिलेच तर खरेशास्त्री निश्चयाने दुसऱ्या तटात गणले गेले असते हे स्पष्ट आहे, असो. आपल्या देशाच्या साप्रतच्या हीनदीन स्थितीसंबंधी त्यांना अतिशय दु:ख होत असे. देशभक्ति,स्वदेशाभिमान इत्यादिविषयक त्यांचे विचार ' यशवंतरावा ' दि काव्यांत व त्याच्या गुणोत्कर्ष, कृष्ण-काचन, शिवसंभव, उग्रमंगल वगैरे नाटकात इतस्तत: ठसठशीतपणे विखुरलेले दिसतात. उग्रमंगलमध्ये तर अगदी ताजा राजकीय वाद-**सामोपाय कीं संग्रामोपाय**—याचीहि विचिकित्सा त्यांनीं नाटकाच्या संविधानकांत गोवून दिली आहे. तसेच ऐतिहासिक लेख-संग्रहद्वारा व आपल्या अनेक ऐतिहासिक निबंध--प्रबंधांमधून त्यानी मराठेशाहीच्या उत्तरार्धाच्या इतिहासाचा जो उद्धार केला आहे त्याचा हेतुहि, महाराष्ट्रीय जनतेपुढे पूर्वजांच्या पराक्रमांचें, उज्ज्वल देशभक्तीचें

व स्वाभिमानाचे समष्टिरूप चारित्र्य ठेवून तिला जागृत करावी व तिच्या ठिकाणी सुप्तावस्थेंत असलेल्या ह्या गुणाना जोराने चालन देऊन तिला फिरून स्वदेशोद्धाराच्या कामी कार्यक्षम करावें हाच असला पाहिजे, असे अनुमान करण्यास त्यांच्या ऐतिहासिक ग्रंथांवरून मुळींच हरकत दिसत नाही.

चालू राजकीय चळवळीसंबंधी ते फारसे कधी बोलत नसत. परंतु तिच्याविषयींचे त्याचे वाचन अगदी चालू घटकेपर्यंत असे. तिच्या प्रचलित साधनाविषयी, अंतिम साध्याच्या दृष्टीने त्याना फारसे महत्त्व वाटत नसावे, तथापि, सद्य:परिस्थितीत त्याखेरीज दुसरे कांहीं करिता येण्यासारखे नाही ही गोष्ट ते जाणून होते. ऐ. ले. सं. त त्यानी एके ठिकाणी म्हटले आहे की, " त्या वेळचे लोक जरूर लागतील ते युद्धोपयोगी पदार्थ परदेशाहून आणवीत; पण ते येथेच तयार करण्याचे त्यांनी कधी मनांत आणिले नाही व आजच्या स्वदेशीची कल्पनाहि त्यास कधी त्या काळांत शिवली नाहीं. " हल्लीचे परकीय राज्यकर्ते आमच्या देशाचा व्यापारहि मारीत आहेत. त्याहिपेक्षां मोठा घात त्यानी केला आहे तो हा की, गुलामी मनोवृत्ति 'Slave-mentality' त्यांनी येथील लोकात उत्पन्न केली आहे, असे त्याचे मत बनले होते. तन्निवारणार्थ स्वदेशी, बहिष्कार व राष्ट्रीय शिक्षण हीं साधने असली तरी राजकीय मोक्षाचे–स्वराज्यप्राप्तीचे–प्रधान साधन हे नव्हे असे त्यास वाटे. स्वदेशी चळवळ भावनोद्दीपक व लोकांत जागृति उत्पन्न करणारी असली तरी पूर्णत्वाने स्वदेशी व्यापाराची अभिवृद्धि व मनाजोगे राष्ट्रीय शिक्षण स्वसत्तेवांचून आपणांस करिता येणार नाहीं असे ते म्हणत. राजकीय चळवळीविषयी ते एकदां म्हणाले, " अरे, कांही थोडयाच लोकांची राजकारणी मनोरचना 'Political mentality' असत्ये. त्याना जें काय वाटतें, ते जे बोलतात, वागतात, ते सामान्य जननेत पुष्कळांना

मुळी पटतच नाही. उलट, तिला ते सारे थोताडच वाटते. करितां, त्यांनीं **आपल्या मनोवृत्तीचीं माणसें शोधून काढून किंवा शिकवून तयार करून त्यांच्या संघबलानें हीं राजकीय हक्कसंपादनाचीं कामें घडवून आणली पाहिजेत.** बाकी चालूं द्या, प्रचारकार्य–Propaganda Work–आहे असेच चालवयाचे ! ! ” दीर्घ-कालीन इतिहास–परिशीलनाने व अनेक देशांच्या प्राचीन ऐतिहासिक घडामोडींच्या सूक्ष्म अवलोकनाने त्याचें असे ठाम मत झाले होते की,

**यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ॥**

**तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवानीतिर्मतिर्मम** ॥ गी. १८।७८

**“ज्या राष्ट्रांत कृष्ण व अर्जुन, रामदास व शिवाजी–शास्त्री आणि शस्त्री–दोघेहि असतात तेंच राष्ट्र सुप्रतिष्ठित राहातें.”**

**शिक्षणविषयक विचार**—चालूं शिक्षणपद्धतीच्या एका बाह्य अंगावर त्याचा एक मोठा आक्षेप असे व त्याविषयीं अनेक प्रसंगीं ते आपली तळमळ व्यक्त करीत त्यांचे बाळपणापासूनचे स्नेही, वे.शा. सं. व्यंकटाचार्य उपाध्ये सागतात, “ शास्त्रीबुवा मिरजेस राहूं लागल्या-नंतर मी त्यास कधी कधी भेटत असे. त्या प्रसंगी पुष्कळ सुख-दुःखाच्या गोष्टी परस्पर होत. सभाषणाच्या ओघात खासगी व सार्व-जनिक स्वरूपाच्या चर्चेचाहि एकादा विषय निघे. अशाच विषयापैकीं विशेष ध्यानात ठेवण्यासारखा विषय म्हणजे हल्लीच्या शिक्षण-पद्धती-सबधी होय. ह्या पद्धतीवर त्याचा बराच कटाक्ष होता. त्यांतल्यात्यात भोजनोत्तर लगेच शाळांत डाबून ठेविल्यानें व त्यापायी खाण्या-पिण्याची आबाळ झाल्याने विद्यार्थ्यांचा शारीरिक ऱ्हास विलक्षण होत आहे याबद्दल त्यांस अतिशय वाईट वाटत असे. ”

शिक्षणसंस्था आर्थिक दृष्टया स्वावलंबनी झाल्या, परकीय सर-काराच्या मदतीची अपेक्षा न करिता निवळ लोकाश्रयावर त्या चालूं

लागल्या तरी तेवढ्याने सर्व प्रकारे त्या राष्ट्रीय झाल्या असें होत नाहीं. हल्लीच्या शिक्षणक्रमांत असे पुष्कळ विषय शिकविण्यांत येतात कीं, त्याचा पुढे व्यवहारात मनुष्यास कांही उपयोग होत नाहीं, परंतु ज्याला त्यांपैकी एकादा विषय आवडत असेल त्याला आपल्या हौसे-प्रमाणे त्याच्या अधिक व्यासंगास शाळेतील पूर्वाभ्यासामुळें मदत मात्र होते. आमचीं प्राचीन शास्त्रें उत्तम प्रकारे हल्लीच्या शिक्षणक्रमात पूर्णत्वानें शिकविण्याची व्यवस्था नसल्यामुळें आमच्या स्वकीय विद्यां-विषयींचा अभिमान नवशिक्षितात साहजिकपणेच दिसून येत नाही. ज्या देशी संस्थानांत सुदैवाने जुन्या पाठशाळा आहेत त्यांत ह्या जुन्या विद्या व त्यांचा अभिमान असलेली माणसें जगविण्यासाठीं सहज सोय करितां येण्यासारखी आहे. अशा शाळांत मोडी लेखन, जमाखर्च, बोलतां लिहिता येण्यापुरते इंग्रजी हे विषय शिकविले, व तेथील इतर विषयाबरोबर ह्यांचीहि परीक्षा घेऊन तिची सरकारी अगर खासगी नोकरीच्या दृष्टीने अमुक योग्यता असे सरकारी हुकुमाने ठरविण्यांत आले तरी बरेच काम होईल असें ते वारंवार म्हणत.

**वक्तृत्व व व्याख्यानें**—शास्त्रीबुवाना, व्याख्यानें देण्याची हौस नसे, ह्याचा अर्थ त्याचे ठिकाणीं वक्तृत्वगुणाभाव होता असा नव्हे हे उघड आहे. तथापि, त्यांना बोलण्यापेक्षां करणे अधिक प्रिय होते. किंबहुना ते 'मूर्तिमंत कार्य ' किंवा यथार्थ 'मुग्ध कार्यकर्ते '—Silent worker—होते. ह्यामुळे अंगी वक्तृत्वकला असूनसुद्धा कामापायीं फुरसत नाहीं असे होत असे. मिरजेंतल्या मिरजेंत प्रसगोपात्त त्याची आम्हा विद्यार्थ्यां-पुढे ४।२ व्याख्यानें झालेलीं आठवतात. मिरजेत सुशिक्षित व विद्वान् अशा बड्या नोकरांचा ' मित्रसमाज ' नांवाचा एक संघ ( क्लब ) होता. त्याच्या मार्फत दर शुक्रवारी विद्यार्थ्यांकरितां **श्रीमंत सरकार बाळासाहेब** यांच्या नेतृत्वाखालीं ही व्याख्यानमाला चाले. पण,

उभ्या महाराष्ट्राच्या दृष्टीनें महत्त्वाचे असे खरेशास्त्री याचे पहिले व्याख्यान म्हटलें म्हणजे वेळास येथे नाना फडनवीस यांच्या आठव्या वार्षिक उत्सवात स. १९०७ साली, नानांच्या कर्तबगारीसंबधी त्यांनीं वाचिलेला विस्तृत निबंध होय. बंगालच्या फाळणीमुळे देशभर उसळलेल्या स्वदेशी-बहिष्काराच्या गेल्या १।२ वर्षांतल्या जोराच्या चळवळीमुळे या वर्षी या उत्सवासहि विशेष स्वरूप आले होते प्रेक्षक-समुदाय २।३ हजार जमला असून **श्रीमंत दादासाहेब खापर्डे** अध्यक्ष होते. निबंधवाचन तीन साडेतीन तास चालले होते तरी देखील हा प्रचंड श्रोतृसमूह चित्रासारखा बसून याचे व्याख्यान ऐकत होता ! पुढें हाच निबंध वाढवून '**नानांचा अधिकारयोग**' या पुस्तकरूपाने छापिला गेला.

दुसरे व्याख्यान लेखकाने स. १९१९ साली सातारा येथे ऐकिलें. विषय '**ऐतिहासिक स्वराज्य.**' ह्यात थोरल्या **शाहूमहाराजांच्या** मागून साताऱ्याच्या गादीवर बसलेले दुर्दैवी राजे '**रामराजे**' याची करुण-कहाणी व त्याची आजी **ताराबाईसाहेब** ह्यांची पाताळयंत्रें ह्याविषयी, उपलब्ध ऐतिहासिक माहितींतले अपुऱ्या माहितीचे तुटके धागे ऐतिहासिक अंतर्दृष्टी ( Historical insight ) ने सशोधनपूर्वक जुळवून त्यानी सगतवार व सुसंबद्ध इतिहास कथन केला. या त्याच्या कथानकास त्या दिवशी रम्य कादंबरीप्रमाणे रंग चढला ! ही रंगभर शास्त्रीबुवांसारख्या इतिहासज्ञानें व विनोदी कथाकथकानेंच करावी. ह्या दिवशी साताऱ्यास राहाणारे इ. **सं. रा. ब. पारसनीस** गांवीं नव्हते. अध्यक्ष कै. नानासाहेब आगाशे वकील हे होते. त्यांनीं ह्यांचें गुणगौरव " शास्त्रीबुवा हे self-made-स्वत सिद्ध-आहेत, " अशा अन्वर्थक विधानानें केले. शिवाय, नानासाहेब म्हणाले " आज आमचे रा. ब. पारसनीस येथे नाहीत. नाहीपेक्षां त्यांचे ह्यांचे दोन प्रेमाचे

हात झालेले आपणास पाहावयास मिळाले असते." यावर लगेच शास्त्रीबुवा म्हणाले, **"अहो, प्रेमाचे हात चार असतात, दोन नसतात!"** असो या व्याख्यानास आलेल्या ११२ अतिवृद्ध माणसास बहुत वर्षांपूर्वी गजेंद्रगडकर आचार्यांच्या घरी असलेल्या, या ज्ञानवृद्ध वासुदेवशास्त्र्याचे ज्ञान व वाग्वैभव पाहून मोठा आनंद झालेला दिसला. **'मालोजी व शहाजी'** हा निबंध, भारत-इतिहास-मंडळापुढे वाचिलेले कित्येक निबंध, सांगली सिटिस्कूलमध्यें दिलेले **'वसईचा तह'** या विषयावरील व्याख्यान, इ. त्यांच्या सार्वजनिक वक्तृत्वाचे मासले म्हणून सांगतां येण्यासारखे आहेत. तथापि त्यांच्या विद्वत्तेच्या व प्रसिद्धीच्या मानाने ते वक्ते या नांवापेक्षां लेखक या नावानेच जास्त ओळखिले जातात हे कबूल केले पाहिजे. लेखांत काय किंवा भाषणांत काय, पुऱ्या आधारावाचून-निदान स्वतःची तशी खात्री झाली असल्याखेरीज-ते बोलावयाचेच नाहींत अशी त्यांची रीति असल्यामुळे त्यांच्या भाषणावर प्रतिकूल टीका सहसा होत नसे. स. १९२० साली, **लो. टिळक** विलायतेहून परत आल्यानंतर मिरज येथे त्यांच्या सन्मानार्थ भरलेल्या सभेत शास्त्रीबुवा अध्यक्ष होते. त्या वेळच्या त्यांच्या भाषणाचा सारांश व त्या हृदयंगम प्रसंगाचे अल्पसे वर्णन पुढे लौकरच येणार आहे

**शास्त्रीबुवांवर लोभ करणारीं मोठीं माणसें**—या प्रकरणी प्रथम अशा थोर व्यक्तींचा एकत्र नामनिर्देश करून मग त्यांपैकी ज्यांचा विशेष उल्लेख करणे प्राप्त आहे त्यांचा पुढे तसा स्वतंत्र उल्लेख केलेला आहे. मोठमोठ्या पदव्या मिळविलेले, सरकारदरबारी श्रेष्ठ अधिकारपदारूढ झालेले किंवा लोकसेवा करून जनतेचे पुढारी बनलेले असे शास्त्रीबुवांचे कितीतरी विद्यार्थी अखिल महाराष्ट्रभर व त्याच्या बाहेरदेखील हिंदुस्थानच्या दूरदूरच्या प्रांतांत अनेक तऱ्हेच्या उद्योगांनिमित्त पसरलेले आहेत. त्यांचे शास्त्रीबुवांवरचे प्रेम त्यांच्या **'खरे मंदिर'** नांवाच्या

मिरजेंतील स्मारकाला त्यानीं दिलेल्या मदतीनें चांगले व्यक्त झालें आहे. गुरुवर्यांवर प्रेम करणारे व त्यांच्या संबंधे आदर व पूज्यबुद्धि बाळगणारे असे त्याचे ठळक विद्यार्थी म्हटले म्हणजे **प्रो. पानशे**[1], फर्ग्यु. कॉ. पुणे, **कै. श्रीमंत आण्णासाहेब कुरुंदवाडकर, कै. डॉ. गोपाळराव वाटवे, रा सा. एल्. पी. कुलकर्णी,** ( अ. डा. आफ् पोस्ट्स्, न्यू दिल्ली ), **दे भ तात्यासाहेब केळकर** व त्याचे बधु **रा. सा. माधवराव केळकर, प्रो. गंगाधरराव कानेटकर** (प्रो. स्पेन्स् ट्रे. कॉ. जबलपूर), **कै भाऊराव काळे,** ( अ. ए. नाशिक ), **रा. सा. भास्करराव महाबळ** ( सरन्यायाधीश जमखिंडी ), प्रो. **गंगाधरराव गोखले,** (प्रि. एंजिनिअरिंग कॉलेज, कराची), असे आणखी अनेक सांगता येतील माझ्या अल्प माहितीमुळे पुष्कळांची नांवे ह्यात आलेली नाहींत ह्याची दखलगिरी ठेवून मी प्राजलपणे अशी विनंती करितो की, ह्या उपलक्षणाने अशा सर्वांचाच बहुमान करण्याचा माझा हेतु आहे असे समजावे.

त्याच्या विद्यार्थ्यांखेरीज त्याच्या विद्वत्तादि गुणावर व सशोधनकार्यावर सादर प्रेम करणारे व द्रव्यद्वारां त्याच्या कार्यास थोडेंफार सहाय्य करणारे दक्षिण महाराष्ट्रातील संस्थानिक व शास्त्रीबुवाचे गरीब श्रीमत स्नेही पुष्कळच होते. संस्थानिकांपैकी **कै श्रीमंत बापूसाहेब कुरुंदवाडकर, कै. श्रीमंत बाळासाहेब कुरुंदवाडकर, कै. श्रीमंत भाऊसाहेब जमखिंडीकर** व विद्यमान **श्रीमंत सर गंगाधरराव बाळासाहेब मिरजकर, श्रीमंत सरकार बाबासाहेब इचलकरंजीकर, श्रीमंत सर आप्पासाहेब जमखिंडीकर, श्रीमंत सर आप्पासाहेब सांगलीकर, श्रीमंत सरकार रावसाहेब भावे, रामदुर्गकर, श्रीमंत सरकार बाबासाहेब मळेकर** इत्यादि व इतर विद्वान् मंडळीः—**कै. लो. टिळक,**

---

१ पुणें न्यू इं. स्कू. मध्यें स. १८८० त विद्यार्थी होते.

**कै. प्रो. विजापूरकर, कै. हरिभाऊ आपटे** (कादंबरीकार), **कै. हरिभाऊ लिमये** (प्रो. फर्ग्यु. कॉ. पुणें), **कै. रा. ब. महाजनी, कै. बाळाजी प्रभाकर मोडक** (लेखक, कोल्हापूर संस्थानचा इतिहास), **कै. इ. सं. विसूभाऊ राजवाडे, कै. रा. ब. साने व पारसनीस** इत्यादि स्मृतिशेष व्यक्ति आणि विद्यमान **श्री. नानासाहेब वैद्य, श्रीमंत तात्यासाहेब मेहेंदळे, प्रो. भानु, श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार, प्रो. पोतदार, श्री दत्तोपंत आपटे, इ.** (भा. इ. सं. मंडळ, पुणे) **श्रीमंत सरदार माधवरावसाहेब किबे** इंदूर, **श्री. सरदेसाई, श्री. वाकसकर** प्रभृति इ. सं. मंडळी, बडोदें, **ना. केशवराव** हैद्राबाद, **श्री पांडुआण्णा शिराळकर** कऱ्हाड, **रा. ब. पंडित** गुजराथ, (माजी ॲड्मिनिस्ट्रेटर स. बुधगांव), **व्ह. ट्रा. सोसायटी** पुणे, **केसरी-मराठा-संस्था, श्री. वामनराव पटवर्धन** व्यवस्थापक आर्यभूषण छापखाना, **प्रो. यदुनाथ सरकार** बंगाल, **प्रो के. व्ही. रंगास्वामी अयंगार,** प्रि. महाराजा कॉ. त्रिवेंद्रम् इ होत.

## गुणज्ञ संस्थानिक

**स्वराज्यसंस्थापक छत्रपति श्रीशिवाजी महाराज** याच्या वंशाबद्दल शास्त्रीबुवांस वाटत असलेला आदर त्यांनी गुणोत्कर्ष नाटकात आरंभीच सूत्रधाराच्या तोंडी '**महाराज शिवकुलालंकार बालभूपाल श्रीशाहू छत्रपति**' इत्यादि पदें घालून फार चांगला व्यक्त केला आहे. यानंतर, कै. **श्रीमन्महाराज शाहू छत्रपति** त्यांच्या समक्ष भेटीचा योग एकदां एका गृहस्थांनीं जुळवून आणिला होता. त्या वेळीं मात्र महाराजांनीं शास्त्रीबुवांच्या अंगच्या विद्वत्त्व-कवित्वादि गुणांसंबंधीं आपली गुणग्राहकता विशेष दाखविली नाहीं. तथापि, शास्त्रीबुवांनीं स. १९१७ सालीं छापकेलें आपलें 'चित्रवंचना'

नांवाचे संगीत नाटक ' कै. **श्रीमन्महाराज शाहू छत्रपति सरकार राज्य करवीर**, यांच्या सेवेस, ' समर्पण केले! कोणी असेंहि सांगतात कीं, अलीकडे श्रीमन्महाराजांच्या मनात शास्त्रीबुवाविषयीं फारच मोठा आदरभाव वसत होता ! !

**कै. श्रीमंत बापूसाहेब कुरुंदवाडकर** स्वतः कवि होते. त्यांच्या पत्नीनीं केलेल्या ' **गणेशपुराणा** ' वरील आर्यासंबंधे उल्लेख मागें एके प्रकरणी आलाच आहे. शास्त्रीबुवांवरील मूळ लोभाचे कारण काव्यप्रीति हा समानगुण. शिवाय, शास्त्रीबुवांच्या विद्वत्तेवर श्रीमत बापूसाहेब भारी खुष असत. शास्त्रीबुवाच्या भेटीनें श्रीमंताचे चित्त सुप्रसन्न होई म्हणून ह्यास वारवार भेटीस बोलावीत. दरसाल भाद्रपदमासी श्रीगणेशोत्सवात ५।४ दिवस अगत्यपूर्वक आमंत्रण यावयाचेच असा पूर्ण लोभ असे.

**कै. श्रीमंत बाळासाहेब कुरुंदवाडकर** (थोरली पाती) हे ऐ ले. संग्रहाच्या बाबतीत प्रथमच्या सहाय्यकापैकी एक होते हे येथें अवश्य सांगितलें पाहिजे त्याचे चिरंजीव कै. **श्रीमंत आण्णासाहेब कुरुंदवाडकर** मिरज हायस्कूलमध्यें शिकत असता शास्त्रीबुवा कांही वर्षे त्याचे सस्कृत भाषेचे ट्यूटर–खासगी शिक्षक–होते. श्रीमंत आण्णासाहेब याचीं तेव्हापासून शास्त्रीबुवाच्याविषयीं मोठी पूज्यबुद्धि असे. गुरुजी ह्या नात्याने त्याची शास्त्रीबुवावर आमरण भक्ति होती.

**कै. श्रीमंत भाऊसाहेब जमखिंडीकर** यानीं, शास्त्रीबुवानीं पेन्शन् घेतल्यावर ' चित्रवंचना ' नाटक त्याचेकडून लिहविलें. एकदा शास्त्रीबुवांस मुद्दाम जमखिंडीस बोलावून नेऊन त्यांस महावस्त्रादि देऊन **श्रीमंत भाऊसाहेब** यांनी त्यांचा मोठाच बहुमान केला.

**श्रीमंत सर शंकरराव आप्पासाहेब** यानीहि शास्त्रीबुवांच्यासंबंधांत आपल्या तीर्थरूपांचें धोरणच उत्तम प्रकारें पुढें चालविलें आहे.

**श्रीमंत सरकार बाळासाहेब मिरजकर** ह्यानी नाना फडनविसांचे चरित्रांत घालावयाच्या त्यांच्या **हस्ताक्षरांच्या** नमुन्यांचे फोटो स्वतः घेऊन छापून काढून देण्याचे कामी मोठे सहाय्य केलें. व त्या कामी लागलेला सर्व खर्च श्रीमंतांनीं केला. शास्त्रीबुवाच्या ऐ. ले. संग्रहाच्या दरेक भागाच्या सुमारें २० पर्यंत प्रती **श्रीमंत** विकत घेत असत, असे समजते. आपल्या ग्रंथांपैकी 'यशवतराव महाकाव्य,' 'मिरज प्रकरण,' 'अधिकार योग' व 'तारामंडळ' नाटक ही पुस्तकें शास्त्रीबुवांनी स्वामिभक्तिपूर्वक श्रीमंत सर बाळासाहेब यास समर्पण केली आहेत. **श्रीमंत युवराज तात्यासाहेब** यानाहि शास्त्रीबुवाबद्दल मोठा आदर आहे.

**श्रीमंत सरकार बाबासाहेब इचलकरंजीकर** यानीं आपल्या संस्थानचे जुनें दप्तर शास्त्रीबुवाकडून तपासवून त्यांचेकडून '**इचलकरंजी संस्थानचा इतिहास**' त्यांनी लिहून घेतला व आपल्या खर्चाने तो छापून दिला. ते खरेशास्त्रीबुवाना बहुत मानीत व त्याच्या विद्वत्समागमापासून श्रीमत बाबासाहेब यास मोठा आनंद वाटे श्रीमंत विलायतेस निघाले असता त्यांचे आश्रित वे. शा. सं. गोडबोलेशास्त्री यानी निषेध केला. श्रीमतानी विचारिल्यावरून खरेशास्त्री यानी 'जावे, काही हरकत नाही, आपला आचार राखावा म्हणजे झाले' असा अभिप्राय दिला. श्रीमंताच्याकडे मुक्काम असलेल्या वेळीं ते पदोपदीं कोटया व विनोद करीत आपल्या नाटकातील स्त्रीपात्रांच्या अनुरूपपणाबद्दल आणि स्वभावचित्रसादृश्यासंबंधीं **श्री. सौ. गंगामाईबाईसाहेब** याचा ते अभिप्राय विचारीत श्रीमंत बाबासाहेबांच्या सांगण्यावरून शास्त्रीबुवांनीं एकदां स्त्रियांसाठी व्याख्यान दिले. त्यांत त्यानी **कै श्री. अनुबाई** याच्या कर्तृत्वाचें निरूपण केलें. सारांश, **श्रीमंत बाबासाहेब** यांचा लोभ त्यांनी इतका संपादन केला होता कीं, त्याला अगदी पूर्ण घरोब्याचें स्वरूप प्राप्त झाले होते.

**श्रीमंत सर आप्पासाहेब सांगलीकर** हेहि शास्त्रीबुवांच्या दरेक भागास कांही ना काही द्रव्यसहाय्य देत असनात असें ऐकतो.

**श्रीमंत राजश्री रामराव व्यंकटराव ऊर्फ रावसाहेब भावे रामदुर्गकर** यांनी या चरित्रप्रकाशनास मदत देऊन शास्त्रीबुवांसंबंधीं आपला गौरव त्यानी व्यक्त केला आहे.

**श्रीमंत राजश्री बाबासाहेब मळेकर** हे पूर्ववहिवाटीस अनुसरून सस्थानच्या दप्तराच्या बाबतीत कै. शास्त्रीबुवांशीं अत्यंत सहानुभूतीनें वागत आणि अजूनहि त्यांच्या चिरंजिवाशी सुद्धा तसेंच वागतात व प्रकाशनास द्रव्याची मदतदेखील करितात असें समजतें.

असेच इतरहि संस्थानिक त्याचा बहुमान ठेवीत व त्याच्या कार्यास थोडेंबहुत द्रव्यसहाय्य करीत असत. त्यानी जें काय दिले त्याचा गौरव करणें व त्या देणग्यांबद्दल कृतज्ञता प्रकट करणे हे वाजवीच आहे; मात्र, तें थोडे होतें असें कोणीं म्हटल्यास तें थोडें या दृष्टीनें की, शास्त्रीबुवाच्या सशोधनप्रकाशनकार्यास ते अपुरें पडलें व त्यामुळें त्यांच्या अपेक्षेप्रमाणें त्याना आपले कार्य आपल्या हयातीत पार पडलेलें स्वतःच्या डोळ्यानीं पाहाण्याचे भाग्य लाभले नाहीं !

## विशेष परिचित विद्वान् गृहस्थ

विद्यार्थ्यांपैकी **श्री. दे. भ. तात्यासाहेब केळकर** यानी गुरुवर्यांच्या ऐ. ले. संग्रहाचे मार्मिक समालोचन अगदी पहिल्या भागापासून केलेले आहे. त्यांच्या ह्या उत्कृष्ट लेखाचे अनेक सुंदर सुंदर भाग 'इतिहास–विहार' नामक पुस्तकांत पहावयास सापडतात. त्यांची हीं समालोचने—परीक्षणलेख—त्या त्या वर्षाच्या 'केसरीं'तहि आलीं असावींत. व तात्यासाहेबांनी लिहिलेला '**वासुदेवशास्त्री खरे मृत्युलेख**' हा 'केसरीं'तील अग्र लेख तर त्यांच्या गुरुभक्तीचा म्हणण्या-

पेक्षां विशेषतः यथार्थ गुणगौरवाचा आदर्शच आहे. शास्त्रीबुवांनीहि तात्यासाहेबाच्या ' **मराठे व इंग्रज** ' या ग्रंथास प्रस्तावना लिहून त्या ग्रंथांतील त्यांच्या महत्त्वाच्या अनेक विधानास चांगली पुष्टि दिली आहे

**प्रो. चिंतामण गंगाधर भानु**-प्रस्तुत चरित्रग्रंथाचे प्रस्तावनालेखक-यांचा व शास्त्रीबुवाचा स्नेह अतिशय दाट जमण्याचें कारण दोघांचेहि उत्कट इतिहासप्रेमच होय. बाकी अनेक बाबतींत त्याची मते मिळतीं नसत. तथापि, या मतभेदामुळें त्याच्या स्नेहभावात तिळमात्र उणेपणा आला नाही फर्ग्युसन् कॉलेजमधील इतिहासाचे **प्रोफेसर कै. हरि गोविंद लिमये** यासहि शास्त्रीबुवांबद्दल मोठा आदर वाटे. **व डे ए. सो.** तील सर्वच मंडळी खरेशास्त्रीबुवाच्या, विद्वत्ता, इतिहाससंशोधन, अनन्यकार्यनिष्ठा इ. गुणाबद्दल मोठा आदर बाळगीत.

**कै. प्रसिद्ध इ स. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे** ह्याचा शास्त्रीबुवाशी अत्यंत घरोबा असे मिरजेत वरचेवर ते येत ते खरेशास्त्री याजकडेच उतरत. त्याचा स्वभाव कसा होता हे सर्वांना ठाऊक आहेंच. येथेंहि त्याचा बरेच वेळा खटका उडे. परंतु खरे याचेविषयी राजवाडे याची आदरबुद्धि व राजवाडे याचेवरील खरे यांचे शुद्ध प्रेम यात कधीहि अंतर पडले नाही **कै रा. ब साने** याना, आपले जुने स्नेही खरेशास्त्री याचे चरित्र लिहिले जात आहे असे जेव्हा समजले तेव्हां त्यानीं प्रस्तुत चरित्रलेखकास मोठया संतोषाने यशश्चिंतनपर आशीर्वाद लिहून पाठविला आहे. **कै. प्रो. विजापूरकर** यांनीं आपल्या ग्रथमालेत ऐ ले. संग्रह मासिक सुरू होतांच त्याच्याविषयी व खरे-शास्त्री यांच्या प्रयत्नास महाराष्ट्रजनतेनें सढळ हाताने सहाय्य कां केले पाहिजे याविषयी फारच कळकळीने लिहिलें होते. इतरहि सर्व इतिहासप्रेमी विद्वान् गृहस्थ, खरेशास्त्री व त्यांचे कार्य ह्यासंबंधी बोलतांना स्तुतिच करितात असे आढळून येते.

**रा ब. पंडित**, माजी अॅड्मिनिस्ट्रेटर सं. बुधगाव, यांचें असें निश्चित मत झालें होतें की, ह्या बाजूस खरेशास्त्रीबुवा हे एक मोठे संशोधक व जाडे विद्वान् गृहस्थ आहेत. रा. ब. पंडित ह्यांचा शास्त्रीबुवांशीं विशेष परिचय झाल्यानंतर ते त्यास मधून मधून रविवारी किंवा इतर सुट्टीच्या दिवशीं मुद्दाम बुधगांव येथें बोलावीत. श्री. पंडित याची मातृभाषा गुजराथी असल्याने खरेशास्त्री ह्याना त्यांच्याशी इंग्रजी भाषेतच बोलावें लागे. श्री. पंडित हे स्वत: विद्याव्यासंगी असल्यामुळे अनेक विषयावर उभयतांची संभाषणें होत असत. परंतु, त्यांतल्यात्यात स्वदेशातील किंवा परदेशांतील चालू राजकीय प्रश्नासंबंधीं साधकबाधक प्रमाणांनीं, ऐतिहासिक दृष्टातानी व अचुक अनुमानपद्धतीनें जी मार्मिक चर्चा शास्त्रीबुवा करीत ती पंडित यास फार पसंत पडे. केंव्हां केंव्हां त्यांची हीं संभाषणे ४।६ तास सुद्धां चालत.

---

## लोकमान्य टिळक यांचा स्नेह

**उत्तम मित्र**—टिळक डेक्कन कॉलेज्मध्ये शिकत असतानाच त्याची व खरेशास्त्री याची ओळख झाली. न्यू इंग्लिश् स्कूल्च्या स्थापनेच्या वेळीं उभयता सहकारी मित्र बनले. मिरज हायस्कूलमध्ये खरेशास्त्री टिळकांच्याच शिफारशीने आले असे वाचण्यांत आलें आहे. उभयतामधील स्नेहबुद्धि या वियोगातसुद्धां वाढतच गेली. आणि खरे याना टिळकाच्या राजकारणाबद्दल अंतःकरणपूर्वक आदर वाटत असल्यामुळे या स्नेहाचें दृढ प्रेमात रूपातर झाले. केसरी-वरील '**कोल्हापूरचें बर्वेप्रकरण**' व 'खुद्द टिळक यांजवर झालेला

स. १८९७ चा खटला आणि टिळकांनीं लढविलेली '**चिरोल केस**' या अडचणींच्या प्रसंगी शास्त्रीबुवानीं त्याच्या नित्याच्या स्वभावानुरूप कांहींएक गाजावजा न करिता मिरज येथून द्रव्याची मदत उभी करून पाठविली; आणि ते आपल्या प्रिय व पूज्य मित्रास '**राजद्वारे स्मशानेच यस्तिष्ठति स बांधवः**' असे उपयोगीं पडले. कोल्हापूर-प्रकरणाचे वेळीं, केसरीवर फिर्याद करणारे माधवराव बर्वे, मिरजेचे तेव्हांचे स्टेट कारभारी रा. ब. यशवत मोरेश्वर केळकर यास मध्यस्थ घालून, कोंकणच्या पूर्व ऋणानुबंधाचे स्मरण देऊन 'टिळकास मदत करू नका' अशी भीड शास्त्रीबुवास घालूं लागले. तरुण व कर्तव्य-निष्ठ शास्त्रीबुवांनीं न्यायाच्या सबंधांत भीड मानण्याचे साफ नाकारिलें.

**लो. टिळक यांच्याविषयीं आदर**—एकदा शास्त्रीबुवांच्या 'तारामंडळ' नाटकाचा प्रयोग लो० टिळक यांनी पाहिला. नाटकाच्या अखेरीस त्यांतील राजा महामंडलेश्वर याने जाहीर करविलें आहे की, "आपण ह्यापुढें मंत्र्यांच्या व प्रजेंतील महाजनाच्या सल्ल्याने राज्यकारभार हाकूं, केवळ स्वतःच्या व्यक्तीच्या सत्तेच्या जोरावर कारभार चालविणार नाहीं!" ह्याबद्दल लो. टिळक यांनीं खरेशास्त्री यास विचारिलें, "शास्त्रीबुवा, राजेलोक–राज्यकर्ते–अशी सुखासुखी हातची सत्ता गमावतील काय?" यावर शास्त्रीबुवा नुसते हासले, भावार्थ हा की, हें नाटक आहे! त्यांनी उत्तर कांहीं दिले नाहीं मात्र नाटक पाहाण्यांतसुद्धां लोकमान्यांच्या चित्तांत राजकारण जागृत व डोकीत सारे ते विचार ह्याचें त्यांना सादर कौतुक वाटले. शास्त्रीबुवा स्वतःच ही गोष्ट कधी कधीं सागत. खरेशास्त्री यांचे एक स्नेही त्याना नेहमी म्हणावयाचे, "Mr Shastri, you are simply writing the past history but Mr. Tilak is making the present history." "शास्त्रीबुवा, तुम्ही गतेतिहास केवळ लिहीत आहां, परंतु, **टिळक**

**वर्तमानकालीन इतिहास निर्माण करीत आहेत.** " हें ऐकून शास्त्रीबुवा ह्या उद्गारांस नेहमीं आदरयुक्त मान्यता दर्शवीत.

**गीतारहस्य आणि टिळकतत्त्वांचा प्रसार**—लोकमान्यांनी '**गीतारहस्य**' छापून होतांच त्याची एक प्रत भेटीदाखल ह्यांस पाठवून दिली. हा ग्रंथ हातीं येतांच दोन दिवस अहोरात्र बसून शास्त्रीबुवांनी तो वाचिला; व त्याच्या अलौकिकपणाविषयीं त्यांना मोठी धन्यता वाटली. हे वाचन त्याच्या जबरदस्त विद्याभिरुचीचे प्रमाण मानिता येईल, नाहीं असे नाही, पण त्यासाठीं अन्य पुष्कळ प्रमाणे आतांपर्यंत येऊन गेलीं आहेत अर्थात् त्याहीपेक्षा ही गोष्ट त्याच्या टिळक-प्रेमाची द्योतक समजणेच जास्त सयुक्तिक होय. पुढे समक्ष भेटीत हांसत हांसत शास्त्रीबुवा लोकमान्यास म्हणाले, " आपण तरी हा नूतन सांप्रदायच रूढ करीत आहा ! " यावर संमतिदर्शक किंचित् हासून लोकमान्यांनी उत्तर केले, " अहो, पण तो गीतेतच आहे. " गीतारहस्य ग्रंथातील '**निष्काम कर्मयोगा**'चे तत्त्व शास्त्रीबुवांनीं 'उग्रमंगल' नाटकाच्या भरतवाक्यात वदविले आहे तें असे:—

**संसरण--सुख--करी । भव–भयांतकारी ॥**
**भगवद्गीताज्ञा । ठसवुनि मनि निर्वृति** (सुख) **वरो विरागी ॥ ध्रु.॥**
**विहित संभारे करो । अवहित जन संसारीं ॥**
**फलकामनेला । नच धरो कर्मयोगी ॥**

'तारामंडळ' नाटकांतील इतबारराव ह्या गंभीर व धीरोदात्त स्वभावाच्या पात्रास '**लोकमान्य**' हे विशेषण देणे किंवा 'उग्रमंगल' मध्यें '**शठं प्रति शाठ्यं हें लोकमान्यांचें तत्त्व**' इत्यादि शब्द-योजना करणे यांवरून अनुमानच बांधावयाचें झाल्यास 'शास्त्रीबुवांनीं आपल्या नाटकांत गुंफलेली बरीचशीं राजकीय मते लोकमान्यांच्या राजकीय मतांविषयी जनतेत आदर वाढविणारीं आहेत,' असेच अनुमान

बांधावें लागेल. लोकमान्य टिळक यांच्या मृत्यूनंतर इतर लहान मोठया गांवांप्रमाणें मिरजेंतहि त्यांच्या स्मारकाच्या चळवळीची वावटळ चार दिवस उठली व पुढे ती थंडावली ! शास्त्रीबुवांना याबद्दल खेद वाटे. मिरजेत लहानसेंच का होईना, पण ' **टिळक झोंपडी** ' नांवाचे खरोखरीच एक स्मारक असले पाहिजे असे ते मोठया कळकळीने कोणा कोणाजवळ बोलून दाखवीत. [ मृताची ही सदिच्छा सफल करण्याची प्रेरणा व सामर्थ्य परमेश्वर कोणास तरी देवो ! ]

**जिव्हाळ्याचा स्नेह**—खरेशास्त्री व लो० टिळक यांचा परस्पर किती जिव्हाळयाचा स्नेह होता ह्यासंबंधी रा. सा. महाबळ यानीं आपल्या अनुभवाच्या २।३ गोष्टी लिहून कळविल्या आहेत त्या अशाः– " लोकमान्यांचा व त्यांचा जिव्हाळयाचा स्नेह होता. लोकमान्यास पहिली शिक्षा ज्या वेळी झाली त्या वेळी शास्त्रीबुवा मिरज येथें लायब्ररींत ( त्या वेळीं लायब्ररी टाउन् हॉलमध्ये होती. ) साक्षात् अगदी लहान मुलाप्रमाणे स्फुदस्फूंदून रडत असल्याचें मी पाहिल्याचे मला स्मरते. लोकमान्यावर त्यांचें प्रेमच तसें होतें. ( २ ) तसेंच वगभंगाचे चळवळीचे वेळीं सरकारी नोकर या दृष्टीनें टिळकांचे जाहीर स्वागत करणें इष्ट अगर कसें हा प्रश्न निघाला असता, ' मी नोकर असलों म्हणून काय झाले ? तो माझा स्नेही, तो जर माझेकडे येईल तर त्याला मी माझा दरवाजा बंद करूं की काय ? मला असे करवणार नाही. मग त्याच्या भेटीचा परिणाम कांहीहि झाला तरी मी भोगेन. ' असे उद्गार शास्त्रीबुवांनी काढिल्याचे पुष्कळास माहीत आहे. ( ३ ) लोकमान्य विलायतेहून परत आल्यानंतर मिरज–सरकारी थिएटरांत त्यांचे सन्मानार्थ सभा भरली होती त्या प्रसंगी शास्त्रीबुवानीं अध्यक्ष या नात्याने ' **लोकमान्यांनीं विलायतेस जाऊन स्वराज्य आणिलें आहे.**' असें म्हणून त्याचा गौरव केला त्यांवर प्रेमानेच पण आपल्या बाणेदार स्वभा-

वास अनुसरून लोकमान्यांनी **असें** उत्तर दिले कीं, " शास्त्रीबुवा वेदान्ती आहेत खरे, पण इथे मात्र चुकले. कारण, **ब्रम्हज्ञानाप्रमाणें** [ ब्रह्मज्ञान किंवा मोक्ष याचे जसे गाठोडें बांधिलेले नसतें–सद्गुरुकृपा झाली कीं, तें बांधीव गाठोडें ते शिष्याचे हातीं देतात असे होत नाहीं–तें प्रयत्नपूर्वक स्वानुभवानेच जाणावयाचें असतें. ] **स्वराज्याचें बांधिलेलें गाठोडें उचलून आणावयाचें नसतें. स्वराज्य मिळवावयाचें असतें** " दोघेहि थोरच ! परस्पराचा भाव परस्पराना समजलेला, परंतु श्रोत्याना मात्र क्षणभर मौज वाटली खरी ! असो या सर्व गोष्टी लिहिण्याचे कारण असे की, टिळकाची जीं राजकीय मतें तीच शास्त्रीबुवाची होतीं. "

**' हेमाद्रि ' उपमा**—वरील भाषणात शास्त्रीबुवांनीं लोकमान्याच्या कृतीस **हेमाडपंतांचा** दृष्टांत योजिला होता असे सांगतात. ते वाक्य असेः—" हेमाडपंतांनीं जशी लंकेहून मोडी लिपी व शिल्पकला महाराष्ट्रात आणिली, त्याप्रमाणें लोकमान्य विलायतेहून स्वराज्य-स्वातंत्र्य-घेऊन आले आहेत. " खरोखरच हा दृष्टात अत्यंत समर्पक आहे. देवगिरीच्या **रामदेव** राजाच्या दरबारात **हेमाद्रिपंत** नांवाचा विख्यात पंडित होता. त्याचे कर्तृत्व मोठें होते. त्याच्या सारख्या बुद्धिमत्तेची माणसे दरेक शतकांत विरळाच निपजतात. लोकमान्यांची बुद्धिमत्ता व त्याच्या कर्तृत्वाचा व्याप अशा विरळा कोटींतच मोडणारा असल्यामुळें व हेमाद्रिपंडिताचा त्या काळचा लंकाप्रवास आणि लो० टिळकांचा चालू युगांतला श्वेतद्वीपप्रवास ह्या साम्यामुळें शास्त्रीबुवांसारख्या इतिहासज्ञास ही समयोचित उपमा सुचावी हें योग्यच होते.

———

# शेवटचे दिवस व मृत्यु

---

**शेवटचें दुखणें-प्रारंभ**—स. १९२२ सालाच्या अखेरीपासून कामाच्या दगदगीमुळें म्हणा अगर आणखी कशाने म्हणा, मधून मधून त्यांस आमांशाचा विकार होऊं लागला आणि मूळव्याधहि त्यांना बराच त्रास देत असे. त्यांयोगे त्यांचा जीव अगदी गळून जाई. इकडे बाराव्या भागाची प्रस्तावना संपविण्याची ओढ, स. १८०२ इ म्हणजे वसईच्या तहापर्यंत इतिहासाची तड नेऊन पोचविण्याची उत्कंठा, त्याला कमीत कमी आणखी ३।४ भाग लिहिणे अवश्य; व त्यासाठीं ५।४ वर्षें तरी जगावयास पाहिजे होतें. परंतु प्रकृतीने अगदीच दम टाकिला! रविवार ता. २५ मे १९२४ रोजीं ऐ. ले सं. च्या १२ व्या भागाच्या प्रस्तावनेपैकी '**शिंद्यांचें हिंदुस्थानांत प्रयाण**' या प्रकरणाची शंभर सवाशे पृष्ठे लेखी प्रत एकसारखें ८।१० तास बसून त्यांनी स्वहस्ताने तपासून तयार केली ! त्याच्या पत्नी सत्यभामाबाई यांनी मधून एकदोनदा हातचे कागद बाजूस ठेवविण्याचा प्रयत्न केला असतां हे रागावले. कोणाची काही मात्रा चालली नाही. त्या दिवशीची हाती घेतलेली लेखी प्रत तपासण्याची कामगिरी संपताच खाली बैठकीवर लेखणी व मागे तक्क्यावर मान एकदां जी त्यांनी टाकिली ती टाकिलीच ! पुढे १६ दिवसांनी गुरुवर्यांचा अंत झाला. त्यांचा मृत्यु इतक्या समीप आला असेल अशी कल्पनाहि कोणास आली नाही. १२ व्या भागाच्या प्रारंभी '**ऐ. ले. सं. वरील गंडांतर**' या मथळ्याखाली त्यांच्या चिरंजिवांनी या त्यांच्या शेवटच्या कामगिरीच्या वेळच्या देखाव्यासंबंधीं लिहिलेलें पुढील हृदयस्पर्शी अवतरण पहाः—

**एक हृदयस्पर्शी देखावा**—" उठून बसलें असतां शरीर एका बाजूस कलंडू नये म्हणून आपल्या भोंवतीं त्यांनी गाद्या आणि तक्के यांचे उंचवटे तयार करविले. आणि अशा स्थितींत दहा तास बसून 'शिंद्यांचें हिंदुस्थानात प्रयाण' या प्रकरणाची २०० पृष्ठें कॉपी स्वहस्तानें तपासून तयार केली. कॉपी तयार झाल्यावर " आता ही वामनरावांकडे पाठीव. माझ्या हातून एकदांचें हे काम पार पडले ! " असे म्हणत असताना तीर्थरूपांच्या मुखावर जी प्रसन्नता आम्हास दिसली ती यावज्जीव आमच्या डोळ्यासमोरून हालणार नाही. कारण, अशी प्रसन्नता इतराच्याच काय पण त्याच्याहि ठिकाणी पूर्वी कधीं पाहिल्याचे आम्हास स्मरत नाही. योगसमाधि लागल्यावर योग्याच्या मुखावर दिव्य प्रसन्नता येत असते असें म्हणतात. आम्हांस दिसलेली प्रसन्नता तीच असेल काय ? " एकनिष्ठपणे अंगीकृत कार्य करीत करीत जीवितयात्रा संपवीत असल्यामुळे व जन्मसाफल्याचा आनंद इह-लोकीच अनुभवास येत असल्याकारणाने अंतःसमाधान बाह्य मुखचर्येवर व्यक्त होऊन कर्मयोग्याच्या समाधिमग्नतेचा दिव्य क्षण त्याच्या घरच्या मडळींस प्रत्यक्ष पाहावयास मिळाला असेंच वरील वर्णन वाचून म्हणावयाचे, दुसरे काय ? एका मार्मिक इंग्रज लेखकाचे उद्गार खरेशास्त्रीबुवांच्या ह्या वेळच्या स्थितीस तंतोतंत लागू पडणारे आहेत. "He finds the joy of life in his work, his reward in the joy of doing it." ('Teaching of Poetry' by A Haddow, p 94) **" त्याला--कार्योकर्त्या पुरुषाला—आपल्या कार्यांत जीवित-साफल्याचा आनंद दिसत असतो; आणि तें कार्य करीत असतां होणारा आनंद हेंच आपलें प्राप्तव्य असें तो मानितो."**

**रोगाचें निदान व त्यांची शांत मनःस्थिति**—ह्यानंतर दररोज **डॉ. भडभडे पिता-पुत्र** त्यांची प्रकृति पाहून जाऊं लागले. प्रिय

शिष्य डॉ. **गोपाळराव वाटवे**हि आले. रोगाचे निदान ‘ रक्तक्षय ’ (Anæmia) असे ठरलें. डॉ. वाटवे यांस शास्त्रीबुवा ह्मणाले, ‘ मला वसईच्या तहापर्यंत ऐ. ले. सं. चें काम न्यावयाचे आहे. त्यास आणखी ५।६ वर्षें लागतील. तेवढी कशी तरी दे. ’ गोपाळराव वाटवे म्हणाले, ‘आधी आपला आणि प्रकृतीचा तह होतो कां पाहूं ! वसईच्या तहाची आता कोरडी हकीकतच लिहावयाची, ती मागाहून कशीहि लिहून होईल.’ ह्या वेळी मी मिरजेस गांवीं नव्हतों. परत येतांच मी गुरुवर्यांच्या दुखण्याची वार्ता ऐकून त्यांस भेटावयास गेलों. मी नमस्कार केल्यावर मला पाहून ओळखून बोलूं लागले, “ अरे, इथें एक पडदा करावयाचा आहे त्याचें माप घे बघू ! ” ज्यांच्या प्रकृतीस कित्येक तासचेतास उघडयाने लिहीत अगर वाचीत बसलें असतां कधीं थंडीची बाधा झाली नाही ते आजच पडदावगैरे करण्यासंबंधीं काय बोलताहेत असे मनांत येऊन व ते नेहमीं बसत त्या जागी वाराहि विशेष लागत नसे म्हणून मीं जरा आश्चर्यानेंच विचारले, ‘ काय एवढा वारा देखील आपल्याला सोसत नाही ? ’ ह्यावर एकदम नेहमीप्रमाणें उत्साहाने पण जरा गंभीरपणे ते सांगूं लागले, “छे नाही, आणि असे व्हावयाचेच ! अरे, **आज पांसष्ट वर्षें देवानें मला** splendid health, splendid energy, splendid power of application ( **दांडगी शरीरप्रकृति, दांडगा उत्साह, दांडगें कार्यसामर्थ्य** ) **उपभोगूं दिलें असतां आतां त्याच्या विरुद्ध तक्रार करण्यास मला जागा कोठें आहे ? आतां आम्हीं त्याच्या इच्छेप्रमाणें मृत्यूस सादर राजी असलें पाहिजे.**” शास्त्रीबुवांनीं या ‘ मृत्यू ’ वर एक काव्य रचिलें आहे व वर्णनानुरोधानें सृष्टीतील या मृत्युरूप कोडयाचें कौतुक व स्तुतिहि पण केली आहे. हे काव्य वाचणारांपैकीं बहुतेकांस ती परभारे काव्यांत आहे तोच ठीक असें सहजच वाटणार; प्रत्यक्ष स्वतःवर पाळी आली तर मृत्यूचें स्वागत

करणारा धीरबुद्धि स्थितप्रज्ञ विरळाच असावयाचा! '**वासांसि जीर्णानि यथा विहाय**' इ. किंवा '**मृत्युर्ध्रुवं प्राणिनां ध्रुव**' असले तत्त्वज्ञान पूर्णपणे त्यांचे अंगीं बाणले असल्याने '**मृत्यु**' नामक काव्यांत त्यांनीं स्वत: गायिलेली शांत वृत्ति त्यांचे ठिकाणी ह्या प्रसगीं प्रतीत होत होती.

**नाना संकट-कंटकांकित अशा संसाररूपी पथा ।**
**आलों येथवरी पुढे न कळते होणार कैशी स्थिति ! ॥**
**थांबावे मम मार्गसंक्रमण हे वाटेल केव्हां तुला ? ।**
**सान्निध्या तव सर्व मंगलमया ! आत्मा असे लोभला ॥ १ ॥**
**इष्टांनीं वेष्टिलेला निजगृहि अथवा दूर देशीं भुकेला ।**
**घोरारण्यास किंवा जलनिधिसलिलां लंघितां श्रांत झाला ॥**
**माझा हा देह कोण्या स्थितिंतहि असतां मृत्यु येवो खुशाल ।**
**इच्छा देवाधिदेवा ! तव धरिन शिरीं शांतिने सर्व काळ ॥२॥**

अंतकाली अशी शांत मनःस्थिति काहीं थोड्या महाभागाचीच मात्र असते. असो.

**स्वर्गवास**—ह्यानंतर दुखण्याने होणाऱ्या तगमगीने व भयंकर कासाविशीमुळे अखेर अखेर थोडे भ्रमात थोडे शुद्धीवर असे असत. तथापि, भ्रमांतसुद्धां 'यशवंतराव होळकरानें सोलापूर जाळलें,' 'पुणे लुटले' असे जें काय बोलत तें जन्मभर केलेल्या इतिहासव्यासंगापैकीच काहीं तरी असे. ध्यानीं मनीं सर्व इतिहास, दुसरा ध्यास नाहीं ! शेवटची रात्र सर्वांनी जागून काढिली. या अंगावरचे त्या अंगावर होत, धांपा टाकीत, श्वास छाटत नसे, तहान अतिशय लागे, वरचेवर पाणी मागत व थोडें पाणी प्याले म्हणजे त्यांस क्षणभर बरें वाटे, असें दुसरे दिवशीं सकाळीं आठ वाजेपर्यंत चालले. सकाळीं डॉ. दत्तोपंत भडभडे एकदां येऊन गेले. नंतर पुनः डॉक्टरांकडे जाण्यापूर्वीच ता. ११ जून स. १९२४ इ. मिति ज्येष्ठ शु. ९ बुधवार शके १८४६ या दिवशीं

सकाळी ९ वाजतां, चरित्रनायक गुरुवर्य वासुदेवशास्त्री खरे यांचा आत्मा-लो. टिळकांच्या व्याख्येप्रमाणे त्याचा निष्कामकर्मयोगी आत्मा-

**अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ॥**

**तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥** गीता, ८।२४

या भगवद्वचनानुसार प्रत्यक्ष उत्तरायणकाली, जगदितिहासकारी अखिलेश्वरस्वरूपी परब्रह्मांत विलीन झाला ! ! !

**स्मशानयात्रा** — हे दुःखकारक वर्तमान गांवात जिकडे तिकडे समजून लोक जमण्यास व स्मशानयात्रेची तयारी होण्यास सुमारे प्रहरभर वेळ मोडला शास्त्रीबुवांच्या प्रेतयात्रेस मामलेदार, मुन्सफ वगैरे सरकारी अधिकारी, शाळेतील शिक्षक व त्याचे निस्सीम भक्त असलेले विद्यार्थी हजर असून जवळच्या गावीच मुक्काम असल्याने महाराष्ट्र नाटक मंडळीचे व्यवस्थापक व प्रमुख नट मुद्दाम येऊन दाखल झाले शास्त्री-बुवांचा पांचभौतिक जड देह घेऊन ही मंडळी त्याच्या अग्निसंस्कारार्थ येथें **श्रीकृष्णाघांटावर** गेली. तेथें नदीच्या काठी स्मशानभूमीवर त्याच्या शवाचें छायाचित्र घेण्यांत आले. ह्या वेळी मृत्यु होऊन ४।६ तास झाले होते तरी त्यांच्या चर्येवरील गंभीर शांति तशीच कायम होती.

**दुःखप्रदर्शन**—त्याच्या मृत्यूनिमित्त दुःखप्रदशनार्थ मिरज, कुरुदवाड, इचलकरजी, येथील शाळा व हायस्कुलें सरकारी हुकुमानें बंद ठेवण्यांत आली होती. 'केसरीत' 'वासुदेवशास्त्री खरे मृत्युलेखा'स अग्रलेखाचे स्थान मिळालें. 'नवाकाळ,' ' ज्ञानप्रकाश, ' 'लोकमान्य,' इ. वर्तमानपत्रांत व 'चित्रमयजगत्,' ' काव्यरत्नावली ' वगैरे मासिक पुस्तकांत त्यांचे संबंधी लहानमोठे मृत्युलेख आले असून ह्या सर्वांनीं मुक्तकठानें त्यांच्या त्रिविध ग्रथकृतींची व इतिहाससंशोधनाच्या उत्तमतेची स्तुति केली आहे.

---

वासुदेवशास्त्रीखरे—अंत्यदर्शन



मिरज, श्रीकृष्णाघांटावरील छाया-चित्र

‘ खरेमंदिर ’



‘ मिरज-विद्यार्थी-संघा ’ चें वाचनालय व ग्रंथसंग्रह.

# स्मारकें



**खरे-मंदिर**—खुद्द मिरजेत त्यांच्या मृत्यूनतर १।२ दिवसांत **रा ब. आगाशे** स्टेटकारभारी याचे अध्यक्षतेखालीं दुःखवटयाची सभा होऊन एक स्मारक-कमिटी नेमण्यात आली व 'अजमासे, कमीत कमी ५।६ हजार रुपये वर्गणी जमवून त्यायोगे शास्त्रीबुवाचे उर्वरित कार्य– **ऐ. ले. सं.** चे स. १८०२ पर्यंतचे म्हणजे वसईच्या तहापर्यंतचे भाग– छापवून प्रसिद्ध करावे, असे या स्मारक-कमिटीपुढील सामान्य व स्थूल ध्येय प्रथमारभी होते. परतु, ऐ. ले. स. च्या प्रकाशनाचे जुने धोरण– शास्त्रीबुवाचे धोरण—कायम राखावयाचे ही गोष्ट काहीं सोपी नव्हती. अर्थात् त्याच्याच हाताखाली कित्येक वर्षे काम करीत व त्याचे धोरण पाहात असलेल्या त्याच्या चिरंजिवानीच हे काम करावे व स्मारक-कमिटीने त्यास द्रव्यसहाय्य द्यावे; मात्र ते काम त्यानीं कमिटीच्या विद्यमाने व तिच्या सल्लयाने करावे अशी काही योजना ठरली. परंतु आपल्या वडिलाचे अपूर्ण राहिलेले कार्य स्वतःच्याच जबाबदारीवर पार पाडण्याचे आपण ठरविले असल्याचे त्यानीं स्मारक कमिटीस कळविल्यामुळें तिने '**मिरज-विद्यार्थी-संघ**' या सस्थेच्या **वाचनमंदिरा**साठी '**खरेमंदिर**' नांवाची इमारत बाधून देण्याची नवी योजना कायम केली.

मग कमिटीचे अध्यक्ष **रा. ब. आगाशे** याच्यासारखे खंबीर नेते व उभयता चिटणीस **रा. पु ह. कुलेंकर** व **रा कृ. गो रानडे** याची चिकाटी व दीर्घोद्योग अशा संगजोड साहित्याने सुमारे ३००० रुपये वर्गणी जमून मंदिराचा तळमजला तयार होताच सन १९२५ साली, शके १८४७ च्या दिवाळीच्या पाडव्यास, **श्रीमंत सर बाळासाहेब सरकार मिरज** यांचे हस्तें '**खरेमंदिरा**' चा उद्घाटन समारंभ

होऊन स्मारक कमिटी कृतकार्य झाली. हल्ली, 'खरेमंदिरा' वर दुसरा मजलाहि बांधला गेला असून त्यांत 'मिरज विद्यार्थी संघा' चा ग्रंथ-संग्रह ठेविलेला आहे. **श्रीमंत सरकार बाबासाहेब इचलकरंजीकर** यांनी शास्त्रीबुवांचे एक सुंदर तैलचित्र तयार करवून या ग्रंथसंग्रहालयांत ठेवण्यास दिलें आहे. हे तैलचित्र व हा ग्रंथसंग्रह याचा एकत्र संवास पाहून त्यांतील औचित्यामुळे पाहाणारास कांही विशेष प्रकारचा आनंद येथे अनुभवास येतो.

**इतर कांहीं स्मारकें**—'**महाराष्ट्रीय ज्ञानकोशा**' मध्ये खरेशास्त्री-बुवांचें छोटेसें चरित्र व '**इतिहासशास्त्र**' या प्रकरणावरील विस्तृत विवेचनाच्या अखेरीस इतर संशोधकाबरोबर कै **वासुदेवशास्त्री खरे** यांचा गौरवाने निर्देश करून त्याचे लहानसेच पण चिरनन वाङ्मय स्मारक महाराष्ट्रीय ज्ञानकोशाने आपल्या पोटात समाविष्ट करून ठेविलें आहे. स. १९२८ ज्या जुलैच्या २१ तारखेस भा. इ. सं. मंडळ पुणें, या संस्थेत वासुदेवशास्त्री खरे याचे Life-Size-यथाकार-तैलचित्र[1] समारंभानें ठेवण्यांत आले आहे. याचा **उद्घाटन-समारंभ श्रीमंत राजश्री बाबासाहेब इचलकरंजीकर** याच्या हस्तें झाला.

## श्रीयुत यशवंतराव वडिलांचें कार्य पुढें चालवितात

शास्त्रीबुवांचे चिरंजीव **रा. यशवंतराव** हे पदवीधर नसले तरी त्यांनी वडिलाच्या पाठीमागे अवघ्या दोन वर्षांत ऐ. ले. संग्रहाचा १३ वा भाग स्वतःच्या हिंमतीवर छापून प्रसिद्ध केला. गुणोत्कर्ष व यशवंतराव महाकाव्य या पुस्तकांस ज्या स. १८८४।८५ च्या सुमारास शास्त्री-बुवांस पारितोषिके मिळाली त्याच यशोदायी कालांत जन्मलेल्या या आपल्या मुलाचें त्यानी '**यशवंत**' असें नांव ठेविलें. त्यांच्या या

**१. पुण्याचे प्रसिद्ध चित्रकार प्रो. स. कृ. पिंपळखरे यांनीं तयार केलेलें.**

नामकरणाची सार्थकता या मुलाच्या पहिल्या यशस्वी ग्रंथानें लोकनिदर्शनास आली हा एक चमत्कारिक योगायोगच म्हणावयाचा ! ! कारण, ऐ. ले. सं. च्या १३ व्या भागाची प्रस्तावना व त्यातील पत्रावरच्या भरपूर टिपा वगैरेबद्दल **प्रो. भानु, श्री. रा. सरदेसाई, प्रो. पोतदार, श्री. दत्तोपंत आपटे** इत्यादि इतिहास-संशोधकांचे व '**केसरी**' '**नवाकाळ**' इ. पत्रकारांचे उत्कृष्ट अभिप्राय प्रसिद्ध झाले असून ते वाचकास श्री. यशवंतरावांच्या कर्तबगारीबद्दल परभारेंच साक्ष पटविण्याजोगे आहेत '**बाणकवीच्या पुत्राप्रमाणें वडिलांची कामगिरी यशवंतरावांच्या हातून अशीच यशस्वितेनें पार पडो**' असे कोणाहि सहृदय माणसास वाटल्यावाचून राहाणार नाही. याच अवधीत कोल्हापूरचे **श्रीमंत सरदार चव्हाण हिम्मतबहाद्दर** यांच्या घराण्याच्या इतिहासाचे एक पुस्तकहि श्रीमंत हिम्मतबहाद्दर यांच्या सांगण्यावरून यशवंतरावांनी त्यास लिहून दिलें. ( ते अजून अप्रकाशित आहेसें वाटते. ) **श्रीमंत 'चिंतामणराव आप्पासाहेबांचा वांका'** हे १३ व्या भागाच्या शेवटीं जोडिलेले प्रकरण स्वतंत्र पुस्तकरूपानेंहि त्यांनी छापविलें असून अगदी अलीकडे '**नाना फडनविसांचे चरित्र**' सुधारून वाढवून त्याची नवी आवृत्ति त्यांनी काढिलेली आहे. तसेच ऐ. ले. सं. चे पहिले चार भाग दुर्मिळ झाले आहेत, म्हणून शास्त्रीबुवांनी लिहिलेल्या त्यातील प्रस्तावनाच तेवढ्या एकत्र करून त्या, '**मराठी राज्याचा उत्तरार्ध खंड १ ला**' या नावाच्या पुस्तकरूपानें त्यांनीं छापून प्रसिद्ध केल्या आहेत. या सर्व ग्रंथावर त्यांनीं, '**तीर्थरूपांच्या स्मरणार्थ**' असें म्हटले आहे. ही सर्व पुस्तके व श्री यशवंतरावांचे या पुढील ग्रंथहि लोकादरास पात्र होवोत असे आम्ही मनापासून इच्छितो.

---

# खरेशास्त्री यांच्या चरित्राचें रहस्य

[१]"अर्थः सुखं कीर्तिरपीह माऽभूत् । अनर्थ एवास्तु तथापि धीराः॥
निजप्रतिज्ञामनुरुध्यमानाः । महोद्यमाः कर्म समारभन्ते ॥"

" व्याप आटोप करिती । धके चपेटे सोशिती ॥
तेणे प्राणी सदैव होती । देखत देखतां ॥" दासबोध १५।३।७

" अत्यंत साक्षपी व्हावे । न व्हावे आळसी कदा ॥ "
" मरोनि कीर्ति उरवावी । नुरवावी अपकीर्ति ते ॥
" भाग्यासि काय उणे रे । येत्नावांचून राहिले ॥ "
" अभ्यासे होत आहे रे । अभ्यास करणे सदा ॥ "
" यत्नाचा लोक भाग्याचा । यत्नेवीण दरिद्रता ॥ "
" यत्न तो देव जाणावा । अंतरी धरितां बरे ॥ "

—रामदासी स्फुट प्रकरणे.

**पुनर्जन्म-कल्पना**—आम्हा पुनर्जन्मवादी लोकाची दृढ श्रद्धा अशी आहे की, "मरणसमयीं मनुष्याचा आत्मा वासनात्मक लिंगशरीर धारण करून आपल्या कर्मफलानुसार व रुचिवैचित्र्यभेदाने पुन दुसऱ्या नवीन स्थूल देहाचा आश्रय करितो " यावरून भाविक प्रवृत्तीच्या माणसाच्या मनात असे येण्याचा संभव आहे की, ह्या चरित्राच्या प्रारंभी स्तविलेल्या ऐतिहासिक पुरुषाच्या भूमीत—गुहागरांत—जन्मलेले वासुदेवशास्त्री खरे, स्वतः पूर्वजन्मी कोणी इतिहास घडविणारे योद्धे किंवा राजकारण चालविणारे मुत्सद्दी पुरुष असावे; आणि सांप्रत

१. ह्या लोकी द्रव्य, सुख किंवा कीर्तिहि न मिळाली ( किंबहुना ) दारिद्र्यच असले तरी चालेल; पण, धैर्यशाली व महोद्योगी पुरुष आपल्या प्रतिज्ञेस अनुसरून उत्साहानें कार्यारंभ करितात.

काळी तो योद्धा अथवा मुत्सद्दी, 'प्रसिद्ध इ. सं वासुदेवशास्त्री खरे' या रूपाने पुन: जन्मास येऊन पूर्वजन्मी आपण पाहिलेला किंवा निर्माण केलेला इतिहास हल्लीच्या महाराष्ट्रीय तरुण पिढीमध्ये स्वातंत्र्य-प्रीतीचे व स्वदेशभक्तीचें नवजीवन-चैतन्य, जागृति, उत्साह व सामर्थ्य-उत्पन्न करील, आणि तेणेंकरून आपल्या पारतंत्र्यांत पिचत पडलेल्या पतित राष्ट्राच्या उद्धारास सहाय्य होईल अशा उच्च भावनेने प्रेरित होऊन त्यानेंच हा 'पानिपतोत्तरकालीन मराठी राज्याच्या इतिहासाचा उद्धार' केला असावा ! ! आत्मस्वातंत्र्य, आत्मविकास व पुनर्जन्मवाद यांवरून सुचलेलें हें सुसंगत विधान आहे. आणि ते आमच्या परंपरागत कल्पनास धरूनच आहे. मात्र या विधानामुळे लगेच अवतार-कल्पनेवर उड्डाण मारून कोणीहि, 'अहो ते काय अवतारी पुरुष ! त्याच्यासारखे कष्ट, त्यांच्यासारखा उद्योग आम्हाला कमचा होतोय ! !' असें म्हणून हातपाय गाळू नयेत; किंवा कोणीहि शास्त्रीबुवाच्या चरित्रांत अखंड दिसून येणाऱ्या **दांडग्या प्रयत्नवादाकडे** मुळीच दुर्लक्ष्य करूं नये. किंबहुना, **प्रयत्न-सतत उद्योग-हें त्यांच्या चरित्राचें मुख्य सूत्र आहे** हे त्यानीं पक्के समजावे.

**मोठ्या लोकांच्या छोट्या गोष्टी**—आतापर्यंत शास्त्रीबुवांच्या चरित्रात जे अद्भुत व चमत्कृतिजनक वाटणारे कित्येक प्रसंग कथन करण्यात आले आहेत, त्यास वस्तुतः तितकेंसे महत्त्व नाहीं. कारण, कदाचित् असले प्रसंग लौकिक दृष्टया एकाद्या अगदी सामान्य व्यक्तीच्या आयुष्यक्रमणात ह्याच्याहिपेक्षां जास्त घडून आले असतील. परतु ती व्यक्ति व तिच्याबरोबर ते प्रसंगहि अप्रसिद्ध व म्हणूनच अज्ञात राहिल्या-मुळे विस्मृतीच्या गर्तेत पार गाडले गेले असतील ! उलट असेसुद्धा म्हणावयास हरकत नाही की, खरेशास्त्री यांस अन्य तऱ्हेने-विद्या-व्यासंगादिकाने-प्राप्त झालेल्या मोठेपणाच्या योगानेंच चरित्र-विषय-भूत

त्यांच्या खासगी गोष्टींस आतां—लौकिक रीत्या शास्त्रीबुवांनी अलौकिक लौकिक मिळविल्यानंतर—महत्त्व आले आहे. उघडच आहे:—**सुभेदार मल्हारराव होळकर** तापीतीरावर नंदुरबारजवळच्या कुरणांत जन्मभर मेंढरें राखीतच राहाते तर 'बाळपणी त्याच्या सुकुमार मुखमंडलावर लागणारी व त्या अर्भकास पीडा करणारी उन्हाची तिरीप, एका नागानें आपली फणा त्या बालमुखावर पसरून निवारण केली ' हा चमत्कार कितीहि अद्भुत असला तरी मल्हारी धनगराच्या आईच्या तोंडून किंवा फार तर त्याच्या स्वतःच्या हयातीत खुद्द त्याच्या मुखावाटें कोठे कोठे ऐकू येता ! ! तथापि, आपल्या अगच्या अतुल पराक्रमाने मालवाधिप झालेल्या सुभेदारसाहेबांच्या या बाळपणच्या कथेस दैवी साक्षात्काराचें आज प्राप्त झालेले महत्त्व तिला कितीं साजन आहे बरें ?

वासुदेवशास्त्र्यांनीहि आपल्या लहानपणी गुहागरास असता तेथील श्रीदुर्गादेवीपुढील तळयाच्या गारव्यास बसून चंद्रबिंबास कौतुकानें न्याहाळीत असलेला अनेक फणाचा सुगंधक्षेपी सर्पराज पाहिला होता. श्रीदुर्गेचा सेवक असलेल्या या नागराजाच्या दुर्लभ दर्शनाने शास्त्रीबुवाचे भावी वैभव सूचित झाले असे आता हवे तर खुशाल म्हणावें ! परतु खरेशास्त्री साधे शास्त्रीच अखेरपर्यंत असते तर ह्या वरील गोष्टीस काय अर्थ होता ? कसल्या तरी सुताबिताच्या वाती दिव्यास घालून आपली चंद्रमौळी खोपटें प्रकाशित करणारी दरिद्री कुटुंबे आपल्या महाराष्ट्रात काय थोडी असतील ? शास्त्रीबुवानी असल्या मिणमिण्या दिव्याच्या प्रकाशात रात्रींच्यारात्री जागून आपल्या संशोधक दृष्टीचा दिव्य प्रकाश मराठ्याच्या पराक्रमी पूर्वजाच्या इतिहासावर पाडला यांत त्यांच्या दिव्याच्या वातीसंबंधी गोष्टीचें खरे थोरपण पाहावयास सांपडतें. सारांश, वासुदेवशास्त्री यांचा मोठेपणा त्यांच्या चरित्रांतील अद्भुत प्रसंगांत नसून त्यांनी आपल्या वाङ्मयसेवेनें व

आमरण केलेल्या इतिहासतपस्येने लोकनिदर्शनास आणिलेल्या त्यांच्या **निरतिशय उद्योगप्रियतेंत व स्वावलंबनादि अनेक थोर गुणांत त्यांची सर्व थोरवी सांठविलेली आहे.**

**प्रयत्नवाद्**—शास्त्रीबुवाच्या असाधारण बुद्धिमत्तेचे अगर विलक्षण स्मरणशक्तीचे भाडवल सर्वांजवळ कोठून येणार? त्याच्या एकपाठीपणाचे कितीहि आश्चर्य वाटलें तरी त्याचें इतरास काय होय! हे गुण काही केवळ अनुकरणाने प्राप्त होणारे नव्हत. त्याच्या संस्कृत किंवा इंग्रजी भाषेच्या अभ्यासाच्या रीतीचे असेंच आहे. ती कांही सर्वांस साधावयाची नाही. तथापि, त्याची **चिकाटी, दीर्घोद्योग, अविश्रांत परिश्रम, कष्ट सोसण्याची तयारी, अंगीकृत कार्यांत येणाऱ्या अडचणींशी झगडण्याचें धैर्य,** हे गुण अभ्यासाने–सतत प्रयत्नानें–साध्य करून घेता येण्याजोगे आहेत. वस्तुतः प्रयत्नसाध्य नाही असें जगात काय आहे? मात्र '**अचूक यत्न तो देव। चुकणें दैत्य जाणिजे॥**' हे विसरता कामा नये. प्रयत्न करीत असता सावधानता, विवेक, इ गुण सोडूं नयेत. बुद्धिमत्ता, स्मरणशक्ति, साहस, अभय, वगैरे सर्वच गुण उपजत कोठे कमी कोठे अधिक असे असतातच व त्यामुळेच आपणास मनुष्यामनुष्यात विविधता आढळून येते. पण, **श्रीसमर्थ** सागतात '**सहज गुणास न चले उपाय** । (तथापि) **कांहीं तरी धरावी सोय। आगंतुक गुणांची** ॥' डोगराच्या माथ्यावरून दिसणारी तळाशी असलेल्या भूभागाची शोभा पाहावयाची झाल्यास स्वतः पर्वतशिखरावर चढून जाण्याचे श्रम घेतलेच पाहिजेत.

> "**कष्टेंविण फळ नाहीं। कष्टेंविण राज्य नाहीं।**
> **केल्याविणा होत नाहीं। साध्य जनीं॥ दासबोध १८।७।३०**

हा श्रीसमर्थांचा सिद्धांत त्रिकालाबाधित आहे.

**अनेकजन्मसांसिद्धि**— **श्रीज्ञानेश्वरमहाराज** अवघ्या एकोणीस वर्षांच्या वयात कृतकार्य होऊन **जगद्वंद्य सिद्ध पुरुष** होऊन राहिले. **कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर** यांनीं ३२ वर्षांच्या वयोमर्यादेंत मराठी भाषेची उत्कृष्ट सेवा करून तिला नवीन वळण लाविलें; किंवा तिच्यात मोठी क्रांतिच त्यांनी घडवून आणिली व स्वतःस '**मराठी भाषेचा अद्वितीय शिवाजी**' असें ह्मणवून घेऊन आपल्या बुद्धीची चमक लोकास दाखवून ते विराम पावले ! आणि खरेशास्त्री यांनी आपल्या वयाच्या तिसाव्या वर्षी इतिहाससंशोधनाच्या कार्याची सुरुवात करून अवघ्या ३५ वर्षांत ४।५ लक्ष जुनीं ऐतिहासिक पत्रें वाचून, तारतम्याने त्याचे महत्त्व ठरवून, त्यातील निवडक पत्रें बाजूस काढून कालानुक्रमाने त्याची सालवारी व प्रकरणवारी लावून मराठ्यांचा पानिपतोत्तरकालीन इतिहास सुसंगतपणें प्रकाशित केला. ऐ. ले. सं.च्या या बारा भागाखेरीज काव्य, नाटक व इतिहासविषयक सुमारे वीस पुस्तकें लिहून ह्या तीनहि वाङ्मयात त्यांनीं उत्तम भर घातली असा मोठमोठ्या विद्वानाचा एकविध अभिप्राय आहे. त्याचे मराठी भाषा-लेखनाचे स्वतंत्र वळण आहे. ते स्वतः ग्रॅजुएट् नसता त्यांचे ग्रंथ बी. ए., एम्. ए. च्या अभ्यासक्रमात स्थानापन्न झाले ! ! आणि ग्रॅजुएटास अडविण्याइतके इंग्रजी भाषेचे ज्ञान त्यांनीं संपादन केलें ! ! वरील तीन्ही व्यक्तीचे कार्यक्षेत्र परस्पर अगदी भिन्न असून लोकदृष्टया त्याचा दर्जाहि वेगवेगळा आहे. श्रीज्ञानेशाचे महानुभावित्व व चिपळूणकरांची भाषा-क्रांति यांची छाप जनमनावर विशेष प्रकारची आहे हे खरे, तथापि जुन्या कागदपत्राचा गळांठा अथवा ढीग उकरून त्यातील कागदांचा कपटान् कपटा तपासून धुळींतून धान्यकण मिळविणाऱ्या एकाद्या पक्ष्याप्रमाणे उपयुक्त माहितीचा मिळेल तेवढा लवलेश सांठवीत बसणाऱ्याच्या चित्तांत केवढी शांति, केंवढा धीर ( Patience ) पाहिजे याची

तिळमात्र कल्पना तदितरांना येणें शक्य नाही. आणि मानवी जीविताच्या इतर सुखदु:खांची पर्वा न करितां वर्षानुवर्ष शातपणे हा कंटाळवाणा उद्योग करावयाचा ही तपश्चर्यादेखील काहीं लहानसान नव्हे. ही वासुदेवशास्त्री खरे यानी सतत तीन तपे चालविली. तिघेहि पुरुष अनेक जन्मसंसिद्ध होते असें म्हटले तरी ही संसिद्धि पूर्व, पूर्वतर-पूर्वीच्या, त्या पूर्वीच्या-जन्मात केलेल्या त्यांच्या अभ्यासाचेच फळ होय. तात्पर्य, अभ्यास-उद्योग-प्रयत्न, हेच त्याचे साधनसर्वस्व मानणें भाग आहे.

**चरित्राचें समालोचन**—शास्त्रीबुवाच्या आयुष्यातली पहिली २५ वर्षें नियतकार्याचें क्षेत्र शोधण्यात गेली. तोपर्यंत त्याच्या चित्ताला स्थिरता नव्हती पाटणच्या आगाशाचा आश्रय किंवा श्रीमंत मल्कापूरकर बाईसाहेबाचे सहाय्य घेणें त्यांना स्पृहणीय वाटले नाही. एक भाकरी व वाटीभर अंबीळ असले कदन्न स्वावलंबनाने मिळण्याची संधि येताच त्याच्या मोबदल्याची युक्तायुक्तता ठरवीत न बसता आनंदाने ' महाराष्ट्रमित्रा'स त्यानीं लेख लिहून दिले. मिरजेस स्थिर होण्याचा त्यांचा विचार प्रथम डळमळीतच होता. तेथे अनिश्चित वाढीचा द. म. ३० रुपये पगार असून व गरीबीत काय कष्ट भोगावे लागतात ह्याचा स्वत:स घडलेला कटु अनुभव मूर्तिमंत डोळ्यांपुढे उभा असता मे. द. भा. इन्स्पेक्टरसाहेबानी देऊ केलेली द. म ७५ रु. पगाराची नोकरी त्यास लोभनीय वाटली नाही. वस्तुत: अव्वल पगाराइतकें अखेर पेन्शन् देणारी खालसा मुलखातली नोकरी उपेक्षणीय नव्हती. तरी पण, आरंभी मिरजेमधील सर्व प्रकारे सुखावह अशी राहाणीच मिरजेस कायम राहाण्याच्या बेतास त्यास पुरेशी वाटली असे मानिलें तरी पुढे स. १८८९ च्या सुमारास मात्र मळेदप्तराच्या दर्शन-स्पर्शनानंतर त्याच्या संशोधनार्थ गाढ अवगाहनाची--निमज्जनाची--त्यांची

अनावर इच्छा हाच मागे चरित्रांत दिग्दर्शित केलेला त्यांचा आकर्षक ( लोहचुंबक ) होय, असे ठाम वाटते. कारण, मग, त्यासाठी त्यानी खेळ टाकिले, कविता रचण्याचा नाद सोडून दिला, मिरजबुधगांवचे पायीं हेलपाटे घातले, जागरणें सोशिलीं, असे एक ना दोन अनंत प्रकार त्यानी केले ! आयुष्याच्या अखेरच्या दिवसांत त्यांनी जी नाटकें लिहिलीं तीच त्यांना अगोदर लिहिता आलीं नसती काय ? परंतु एक लेखक म्हणतात, " नाटकें लिहिण्यात खर्च झालेला वेळ फुकट गेला असे त्यास वाटे ! निरुपाय म्हणून तो उद्योग त्याना करावा लागला !!" असो. ऐतिहासिक कागदपत्राच्या नकला लिहून काढविण्यासाठी व त्याच्या प्रकाशनास्तव त्यानी ऐपतीबाहेर खर्च केला. अशा तऱ्हेनें ऐ. ले सं. साठी अनेक प्रकारे द्रव्यहानि सोसून, शरीरसुखाची होळी करून, सशोधनकार्याव्यतिरिक्त मनरंजनादिकाची पर्वा न करिता, ऐन तारुण्यात वयाच्या ३० व्या वर्षापासून रात्रीच्या रात्री जागून व वेळप्रसंगी तहानभूक सुद्धां मारून त्यानी स्वसंतोषाने व स्वमनाने अंगीकारिलेल्या कार्याची कड, स्वाभिमानाने व स्वावलंबनाने पोंचविण्याच्या पायी स्वत च्या जीविताची कड गाठली ! !

**कार्यांतील उच्च हेतु**—शास्त्रीबुवानी हा सर्व खटाटोप कशासाठी केला ? व सुखाचा जीव दुःखात घालून त्यांनी काय मिळविले ? याचे उत्तर असे आहेः—लहानपणापासून त्याच्या ठिकाणी स्वातंत्र्य-प्रेम व स्वाभिमान हे गुण जणूं उपजतच होते. पत-पंडितादिकांच्या काव्याच्या वाचनाने मराठी वाचनाची त्यांस गोडी लागून स्वभाषाभिमान त्याच्या मनांत जागृत झाला व इतिहासवाचनाने आणि पुण्यपत्तनस्थ स्नेह्यांच्या सहवासाने स्वदेशभक्तीची व देशाभिमानाची ज्योत त्याच्या अंत करणात प्रज्वलित झाली. या मनोवृत्तीचे कमी अधिक प्रतिबिंब त्यांच्या काव्यांत व नाटकांत सर्वत्र पाहावयास

सांपडते. आपल्या पूर्वजांचे सद्गुण, आपल्या देशाचे पुरातन वैभव, आपल्या इतिहासास भूषविणारे प्राचीन वीराचे पराक्रम, इत्यादी-विषयी खरेशास्त्री यास जसा परमावधीचा आनंद होई त्याचप्रमाणें आपला स्वराज्यनाश व त्यास कारणीभूत असे आपल्यांमधील स्वाभिमानशून्यता, आपसात कलह, स्वदेशाभिमानाचा अभाव वगैरे दुर्गुणाबद्दल त्यास पराकाष्ठेचा खेदहि होत असे. तेव्हा सांप्रत स्वजाना-पुढे निदान महाराष्ट्रीय बांधवाच्या नजरेसमोर पूर्वजांच्या अनेकविध पराक्रमाच्या प्रसगाचे, बाणेदारपणाच्या वर्तनाचे वगैरे शाब्दिक पण ऐतिहासिक सत्याच्या कसोटीस उतरणारे उज्ज्वल चित्रपट मांडून व त्याबरोबरच पूर्वकृत दुर्गुणानी चिताडलेल्या आणि स्वनाशास कारण झालेल्या प्रसंगाचेहि वर्णन करून स्वजनाच्या मनात पूर्वज-प्रेमाचे, स्वाभिमानाचें, स्वदेशभक्तीचे स्फुरण उत्पन्न करावे; आणि दुर्गुणासबधी तिरस्कार उत्पन्न करून त्यास त्याचा त्याग करण्यास लावावे याच एका शुद्ध व निर्मल हेतूने त्यानी आपल्या संशोधन-प्रकाशनादिद्वारा मराठी राज्याच्या इतिहासाच्या त्याना शक्य असलेल्या भागाचा-पानिपतोत्तरकालीन ४० वर्षांच्या इतिहासाचा-उद्धार केला. तसेच, इतर संशोधकाच्या ग्रंथाच्या सूक्ष्म अवलोकनानें त्यानी शिवपूर्वकालापासूनच्या मराठी इतिहासावरसुद्धा निबंधलेखन करण्याचा उपक्रम केला होता. परतु त्याच्या मृत्यूमुळे सर्व जेथल्या तेथे राहिले!!

**फलश्रुति**—वासुदेवशास्त्री खरे याच्या चरित्रांतील सार लेखकाच्या मतें थोडक्यांत हें असें आहे. रहस्य म्हणजे चरित्राची फलश्रुति. ती हीच की,

> **"उद्यमेन हि सिद्धयन्ति कार्याणि न मनोरथैः ॥**
> **न हि सुप्तस्य सिंहस्य प्रविशन्ति मुखे मृगाः ॥"**

हें सुभाषित ध्यानांत ठेवून प्रत्येक उत्कर्षेच्छु तरुणाने आपल्या देशाच्या

सांप्रतच्या दुःस्थितीत आपल्या देशाचा इतिहास, तो नको असेल तर स्वतःच्या आवडीप्रमाणे व्यापार, वैद्यक, रसायनशास्त्र, राजकारण, धर्मकारण अगर कोणताहि अन्य विषय घेऊन लोकोपयोगाची व राष्ट्रीय हिताची दृष्टि ठेऊन खरेशास्त्रीबुवांच्या अंगच्या, चिकाटी, दीर्घोद्योग, प्राप्त-स्थितींत संतोषवृत्ति, संकटांशीं झगडण्याचें धैर्य इ. थोर गुणाचा अवलंब करून अंगीकृत विषयाची आमरण सेवा करण्याचें व्रत स्वीकारावे म्हणजे शास्त्रीबुवांच्या सारखा जन्मसाफल्याचा आनंद उपभोगण्याचा दिव्य क्षण ह्या पुढच्या प्रयत्नवाद्याच्या आयुष्यातहि केव्हां ना केव्हा निश्चयानें येईल. असो.

**ईशप्रार्थना**—शेवटी, '**खरे–मंदिरा**'च्या उद्घाटन समारंभाच्या सुप्रसंगीं **श्रीमंत सर बाळासाहेब सरकार** मिरज यानीं जो सुंदर उपदेश केला त्यांतील,

**"त्या थोर पुरुषाच्या ( खरेशास्त्री यांच्या ) स्मारकरूपाने आपल्यापुढें उभी असलेली ही इमारत–हें खरेमंदिर–केवळ दगडांविटांच्या स्वरूपांतच न राहतां त्यांच्याप्रमाणें कर्तृत्वसंपन्न होण्यास पुढील पिढीस ती मार्गदर्शक व्हावी व त्यायोगें शास्त्री-बुवांची अनेक जिवंत स्मारकें पुढील पिढीतून निपजलेली दृष्टीस पडावीं तरच तिचें सार्थक !"**

हे यथार्थ उद्गार भावी पिढीच्या अंतःकरणांत ठसोत, अशी अत्यंत नम्रपणाची प्रार्थना, **गुरुवर्य वासुदेवशास्त्री खरे** यांच्यासारखी आदर्शभूत स्वकर्तव्यनिष्ठ नररत्ने निर्माण करणाऱ्या **दयाघन प्रभूच्या चरणीं** करून आम्ही खरेशास्त्रीबुवांच्या व्यक्तिगत चरित्रापुरती ही वाङ्मयपूजा येथें संपवितों.

---

## परिशिष्ट

# खरेशास्त्रीबुवांचा बंधु-वर्ग



शास्त्रीबुवाना तीन भाऊ होते. त्यापैकी **कृष्णशास्त्री** त्याच्याहून वडील असून **परशुरामशास्त्री** व **चिंतामणशास्त्री** असे अनुक्रमे त्याचे धाकटे भाऊ होते चौघा भावाच्या वयात चार चार वर्षांचे अंतर होते असे मागे जन्मवृत्तान्तात दाखविलेच आहे. शास्त्रीबुवाच्या त्रिवर्ग बंधूचे अल्प-वृत्त पुढीलप्रमाणें आहे.

**थोरले बंधु कृष्णशास्त्री यांची योग्यता**—वडील-वामनशास्त्री-वारले त्या वेळी हे सरासरी १६।१७ वर्षांचे होते कुटुंबाचा गाडा चालविण्याचा भार बहुतेक त्याचेवरच पडला. ह्या वेळी त्याचे स्वशाखेचें अध्ययन पूर्ण झाले असून **रघुवंश** व **भागवत** या ग्रथाची नुकती ओळख झाली होती. परंतु पुढे त्यानी याज्ञिकीचा व सस्कृत भाषेचा अधिक अभ्यास करून **व्याकरण, धर्मशास्त्र, ज्योतिष** इ. विषयांचे ज्ञान सपादन केले. धर्मशास्त्रविषयक भानगडीचे प्रश्न उपस्थित झाल्यास त्यासंबधाने त्याच्या मतास त्या प्रातात मोठा मान असे व त्याचें मत ग्राह्य समजले जाई. श्रीदुर्गेच्या देवालयांतील परंपरागत पुराणहि तेच सागत. ते स्वभावाने तापट व कुटुबात कडक शिस्त राखणारे पण दयाळु असे असत. शेत, बाग व भिक्षुकी याजपासून जी काहीं प्राप्ति त्यास होई तिच्यावर ते काटकसरीने कुटुबाचा सांभाळ करीत. त्याची राहाणी साधीच पण ठाकठिकीची असे. तीत गबाळपणा कोठेंहि दिसत नसे. भिक्षुकीसाठी केव्हा केव्हा बाहेर गावी ते फिरतीवर जात तेव्हा प्रवचनेसुद्धां देत. लोकव्यवहारांत कसे वागावें, किंवा कोणाहि माणसाशी बोलताना, त्या माणसाचे धोरण पाहून त्यास रुचेल असें

बोलून '**जनस्याशयमालक्ष्य**' या न्यायानें त्याचे चित्त आपणाकडे कसें आकर्षित करून घ्यावें व त्याचे ठायीं आपणाविषयीं आदर कसा उत्पन्न करावा, हे त्यास चांगलें अवगत होते. कोंकण प्रांतीं त्यांची कायमची वसती न होतां देशावर कोठे शहर गावांत ते वास्तव्य करते तर त्यांचे गुण प्रकट होऊन त्याचीहि इतर दोघा बधूंप्रमाणे ख्याति झाली असती. वांईचे प्रसिद्ध सोमयाजी **धर्ममार्तंड भाऊशास्त्री लेले** यानी केलेल्या महायज्ञात त्यानी कृष्णशास्त्री यांस मुख्य ऋत्विजांत निमंत्रण दिले होते अध्ययनाच्या दृष्टीने एका अर्थी ते **सव्यसाची** होते. म्हणजे उत्तम वैदिक-यज्ञप्रकरण-हौत्र-जाणणारे व चालविणारे-आणि धर्मशास्त्र-निर्णय उत्तम प्रकारे देणारे शास्त्रज्ञ असे होते सन्मानाने मिळेल त्यात संतोष व निस्पृहपणा या गुणामुळें ' हातचे सोडून पळत्याचे पाठीस लागणे ' त्यांस केव्हाहि रुचले नसावें. पण, त्यामुळे त्याचे गुण लौकिकांत प्रकर्ष पावण्याची संधि आली नाही एवढे मात्र खरे !

**बंधुप्रेम, दुखणें, अंत**—सर्व भावांत कृष्णशास्त्री वयाने वडील खरे परतु ते सर्वांच्या पाठीमागून स्वर्गवासी झाले. विशेषत: चिंतामण-शास्त्री याच्या मृत्यूमुळे तर त्यास अपरिमित दु:ख झालें लहानपणी चिंतामणशास्त्र्यास ते शिकवीतहि असत व चिंतामणशास्त्री त्याच्यावर ' **ज्येष्ठो भ्राता पितु सम** ' अशा भावनेने भक्तिप्रेम करीत. कृष्ण-शास्त्री मिरजेस २।३ वेळा आले होते. येथेंहि त्याचें व वासुदेवशास्त्री यांचे परस्पर बधुप्रेम चागले दिसून येई. परशुरामशास्त्री फार अजारी झाल्यावर कृष्णशास्त्री त्यास गुहागरास घेऊन गेले व अखेरपर्यंत ते त्यांच्याच शुश्रूषेखालीं होते. कृष्णशास्त्री मृत्यूपूर्वी एक वर्ष जवळ जवळ अंथरुणावर पडूनच होते. शके १८४८ साली श्रीदुर्गेपुढें नेहमीप्रमाणें त्यांनीं चातुर्मास्य पुराण सांगितलें. व त्या सालीं **श्रीगीताजयंतीचे** दिवशी मंडळींच्या आग्रहावरून त्यांनीं गीतेवर प्रवचन केलें. ते अजारी

असतांहि प्रहरभर अस्खलित वाक्प्रवाह चालला होता. व्यासपीठावर बसल्यानतर आजाराचे भान नाहीं; अगदीं जशी काही विदेही स्थिति! शके १८४९ च्या चातुर्मासात त्यानी पुराणाची गादी मुलाकडे सोपविली मात्र मुलाच्या आग्रहावरून पहिले दिवशीं भर पावसातून देवळात जाऊन त्यानी दोन तास पुराण सागितले. अजारीपणामुळें भयंकर शोष पडे म्हणून दर पाच मिनिटास दोन घोट पाणी घ्यावें, पुढे वक्तृत्व चालवावें, असे करून तो दिवस त्यांनीं साजरा केला. या दुखण्यातच चिंतामणशास्त्री याच्या निधनाची वार्ता ऐकून त्यानीं जी एकदा हाय घेतली तिनेंच हैराण होऊन चिंतामणशास्त्र्याच्या पश्चात् १७ दिवसातच कृष्णशास्त्री यानी वयाच्या ७३ व्या वर्षी देह ठेविला. आश्विन शु. १२ श. १८४९ शनिवार ता. ८ आक्टोबर १९२७.

**परशुरामभटजी**—वासुदेवशास्त्री ह्याच्यापेक्षां चार वर्षांनी लहान असे त्याचे बधु परशुरामशास्त्री हे होत. हे लहानपणी स्वभावाने फार खोडकर होते म्हणतात. हे उत्तम वैदिक असून ह्याची बुद्धि फार तीव्र होती. इतर वैदिक सामान्यत: आरभापासून शेवटपर्यंत वेदांचे अनुवाक् एकामागून एक असे सारखे सरळ म्हणतात. पण परशुराम-भटजी अनुवाकाच्या शेवटापासून प्रारंभ करून उलटे आरभापर्यंत म्हणत येत असत असे सागतात. वेद म्हणतांना आपल्याला समवयस्क अशा वैदिकापुढे बसून त्यांनी कधीहि वेद म्हटला नाही. नेहमी आपल्यापेक्षा वयाने वडील व अधिक मानार्ह गणलेल्या वैदिकांपुढें बसून वेद म्हणावयाचा असा त्यांचा परिपाठ होता. गुहागरास अजारी असतां अगदी आसन्न स्थितीत ते पडले होते. तरी एके दिवशी बाहेर कोणी अधीत विद्वान् वैदिक पाठांतर म्हणतांना चुकले. त्यांस परशुरामभट्ट यांनी खोलीतून ओरडून सांगितलें, "अहो, चुकलांत; ते पद असें नव्हे, असें म्हणा!" असो. ह्यांना सोंगट्या खेळण्याचा

फार नाद होता. हे श. १८११ चैत्र व. ११।१२ च्या सुमारास ( स. १८८९ ) स्वर्गवासी झाले. यांच्या मागे याची संतति कांही नाही. मरणसमयीं त्याचे वय सारे २६।२७ वर्षांचे होते यांच्या आरोग्यप्राप्ती-साठी व औषधपाण्याकरितां वासुदेवशास्त्री यानी बराच खर्च केला व ह्याच्या मृत्यूनतर बरीच वर्षे यांच्या पत्नी वाराणशीबाई मिरजेसच होत्या. घरात मुले त्यास वाराणशी काकू अगर नुसतें काकू असें म्हणत. साप्रत, त्या इदूर येथे चितामणशास्त्री याच्या मुलाजवळ असतात.

**चिंतामणशास्त्री–अध्ययन**—वासुदेवशास्त्री याचे कनिष्ठ बंधु चिंतामणशास्त्री याचा जन्म श. १७८८ कार्तिक शु. ९ शुक्रवारी १० घटकाच्या अजमासास झाला (स. १८६६ इ.) यांची बुद्धि इतर तिघाहि बंधूहून कोणत्याहि प्रकारे कमी नव्हती. त्यांनी अनेक शास्त्रीय विषयांचे आस्थेवाईकपणाने अध्ययन करून पुणे व बडोदा येथील परीक्षात त्या त्या शास्त्राच्या परीक्षा देऊन त्यातील प्राविण्याबद्दल त्यानी पारितोषिकें-दक्षिणा–मिळविल्या होत्या. विद्यमान महाराष्ट्रीय पंडित मंडळी त्यांस फार मान देत असत लहाणपणापासून त्याची प्रवृत्ति धार्मिकपणाची होती. बागेतील एकादा वाटोळा दगड पाहून आणावयाचा व त्यास शंकराची मूर्ति समजून त्यावर अभिषेक करून त्याची पूजा करावयाची असा त्यास नाद असे तसेच, प्रौढपणी इंदुरास असता आठ वर्षे त्यांनी घरी स्मार्ताग्नि ठेविला होता. त्याची प्रकृति लहानपणापासून अशक्त होती. पण त्यांस पोहतां येत असे व आपण लहानपणी आपल्या एका सोबत्यास कुस्तीत चीत केल्याचें ते मोठ्या आवेशाने वारंवार सागत. अशक्त असले तरी त्यांचे ठिकाणी कष्टाळूपणा व काटकपणा फार असे. हेहि स्वभावाने तापट व आग्रही–हट्टी–असत. उतार वयांत ह्या वृत्तीत बरेच अंतर पडले होते, तथापि, प्रसंगविशेषी ह्या वयांत-देखील केव्हां केव्हां त्याचे उग्र रूप दृग्गोचर होई. चिंतामणशास्त्री-सुद्धां कडक शिस्तीचे भोक्ते होते.

## कै. चिंतामण वामन शास्त्री खरे



जन्म शके १७८८ इंदूर मृत्यु शके १८४९
सन १८६६ सन १९२७

**व्यवसाय**—इंग्रजी शिक्षण पूर्वीपासून एकंदरीत फार महाग पडत असल्यानें चितामणशास्त्री यानीं मनात आणिले असते तरी त्यांस ते सुखेनैव मिळविता येणे कठीण होते. परंतु पौरस्त्य शास्त्रांचे ज्ञान बरेचसें घरच्याघरी बिनखर्चानें त्यास संपादिता येण्याजोगे होतें ते त्यांनी निरलसपणें उद्योग करून संपादन केलें होते घरचें अध्ययन संपल्या-वर ते काही वर्षे सागर्ली येथील सस्कृत पाठशाळेत शिकावयास राहिले होते या वेळीं वासुदेवशास्त्री मिरजेस होतेच. त्याची थोडीबहुत मदत चितामणशास्त्री यास होत असे. अध्ययन सपताच आरंभी त्यांनी नाशिक येथील पाठशाळेत कांही दिवस साहित्याध्यापकाचे काम केले. नतर, पनवेलीस आयुर्वेदीय औषधी-कारखान्यात त्यानी आठ वर्षे नोकरीत घालविली. पुढे १२ वर्षे इदूर येथील वेदशास्त्रशाळेत वैद्यका-ध्यापकाचे काम त्यांनी केले. **स्मृतिकार मनु** याची '**ब्राह्मणानें सेवा-वृत्ति, श्ववृत्ति समजून होतां होईतो तिजपासून दूर राहाण्याचा प्रयत्न करावा**' अशी जी आज्ञा आहे ती पाळण्याचा ते साधेल तितका प्रयत्न करीत इंदूर येथे काम करीत असता त्याच्या खात्याच्या वरिष्ठाकडून त्यांच्या बाबतीत काही अन्याय झाला व तो समजून आला तरी त्याचे निरसन झाले नाही. तेव्हा बाणेदारपणाने ह्यांनी ती नोकरी सोडून दिर्ली. यापुढे ५।६ वर्षे बडोदा संस्कृत कॉलेजात ते वैद्यकाध्यापक व वैद्यकविषयाचे मुख्य परीक्षकहि होते. बडोद्यास त्याच्या ज्ञानाचे द्रव्य-प्राप्तीच्या दृष्टीने बरेच चीज झालें व त्यास तेथे चागली मानमान्यताहि मिळाली. बडोद्यास ते कै. **अप्पासाहेब शारंगपाणी** यांच्या आग्रहा-वरून गेले असें सागतात. नोकरींतील परावलंबित्व आणि अशाश्वतपणा जाणून, स्वतत्र धंद्याची आवड बाळगून ते तो नित्य थोडासा करीत.

**राहाणी**—त्यांची राहाणी अत्यंत साधी व काटकसरीची असे. ती इतकी कीं, अंगांत सदरा व पायांत जोडी घालणें तो थडीवाल्याच्या

निवारणार्थ व खडे काटे लागण्याचा संभव असल्यासच ते घालीत. एऱ्हवीं शिष्टाचार म्हणून ह्या वस्तूंची गरज त्याना भासत नसे. प्राप्तीच्या निम्मे द्रव्य संग्रहीं टाकण्याकडे व आपल्या गरजा शक्य तितक्या कमी करण्याकडे त्याचा विशेष कल असे. '**स्वदेशी व्रताचा स्वीकार, हा हल्लींच्या सार्वत्रिक जीवनकलहांतून सुटण्याचा एक उपाय आहे**' असे त्यास वाटे. **लो० टिळक**, व **म गांधी** याचेविषयी त्यास फार पूज्यबुद्धि असे. परंतु म. गाधी वाटेल त्या जातीच्या माणसाशी सहभोजन करितात असे त्यास कळल्यावर, ते त्यांच्या भेटीस जाणार होते तो बेत त्यानी रहित केला. कारण, मनावर झालेले दृढ संस्कार, जुन्या परंपरागत धार्मिक-सामाजिक समजुतीच्या विरुद्ध आचरण करणाऱ्या म गाधीच्या भेटीस त्यांस जाऊं देईनात. 'पाश्चात्याचे गुण, त्याच्या विद्या, शास्त्रीयज्ञान आणि यंत्रकला ही आपण आपलींशी करून घेतलीं पाहिजेत, परंतु, त्याबरोबरच त्याच्या दोषाचे अनुकरण आपण करिता उपयोगीं नाही; तसेच, हल्ली भौतिक ज्ञान कितीहि वाढलें असले तरी त्याची योग्यता आमच्या प्राचीन जितेंद्रिय ऋषीनीं जें तात्त्विक ज्ञान आम्हासाठी संग्रहित केले आहे त्यापेक्षा फार कमी आहे, असे त्यांचे ठाम मत होतें. त्यांची वागणूक सर्व बंधूंशी प्रेमळपणाची असली तरी कृष्णशास्त्री यानी लहानपणीं जें लालनपालन केलें व विद्या पढविली त्याबद्दल चितामण-शास्त्र्याना त्यांचेविषयीं विशेष कृतज्ञता वाटे. ह्यासाठी आपल्या हिश्शाच्या वडिलार्जित उत्पन्नाचा उपभोग दहा वर्षें त्यांनीं वडील बंधूस घेऊ दिला, व कृष्णशास्त्री इंदुरास आले असतां त्याच कृतज्ञता बुद्धीने ह्यांच्या वयाची पन्नाशी उलटून गेली होती तरी हे त्यांचे पाय चेपीत बसत.

**ग्रंथलेखन—न्यायशास्त्रावर** त्यांनी एक टीकाग्रंथ लिहिला असून **कृष्णयजुर्वेदाच्या भाष्यावरहि** त्यांनीं एक सुलभ ग्रथ रचिला आहे. प्राचीन रसायनक्रियेची मोठ्या परिश्रमानें माहिती मिळवून

तीहि एका ग्रंथांत त्यांनीं एकत्र संग्रहित केली आहे एकंदरींत त्यांना सर्व विषयापेक्षा **वैद्यकशास्त्राची** फार गोडी होतीसें दिसतें त्यांची पठनशक्ति जबर होती, तिचा उपयोग त्यानी वैद्यकशास्त्राचे कित्येक हजार श्लोक मुखोद्गत करण्याकडे केला. राजाश्रय मिळवून किंवा अनेक व्यक्तीच्या संघटित प्रयत्नाने संस्था उभारून आयुर्वेदाची उन्नति केली जावी, व आयुर्वेदात वर्णन केलेल्या रसायनाचे अद्भुत गुण, लक्षावधि रुपये खर्च करून एकदा तरी सशास्त्र प्रयोग करून पडताळून पाहावे, आणि आयुर्वेद शिकविताना त्यातील वनस्पतींचे ज्ञान प्रत्यक्ष त्या वनस्पति दाखवून करून देण्यात यांवे अशी त्याची अन:करणपूर्वक मनीषा होती. स्वत शिकविताना ते या बाबतीत शक्य तेवढे करीत. वनस्पतींच्या नावाची व्युत्पत्ति फोड करून सागत. या व्युपत्तिज्ञानानें त्या वनस्पतीचे गुणधर्म ध्यानात धरणे सुलभ होत असे. अलीकडे '**रसरत्नसमुच्चय**' नावाच्या वैद्यक ग्रथावर टीका लिहिण्याचे त्याचें काम चालू होते. शेवटच्या दुखण्याच्या अजारीपणातसुद्धा हें टीका लिहिण्याचे होईल तितके काम ते स्वत च करीत. स्वतः थकले म्हणजे आपण सागून दुसऱ्याकडून लिहवीत असत. दुखण्यात अंत झाल्यास हें काम अपुरे राहू नये म्हणून आतिशय ओढ करून त्यांनी हे टीकेचे काम आपल्या डोळ्यादेखत सपविलें! हल्ली ही टीका छापविण्याचें काम सुरू आहे. त्याचा अंत शके १८४९ मि. भाद्रपद व. १० स झाला. (ता. २० सप्टेंबर स. १९२७) त्या वेळी त्याचे वय ६१ वर्षांचे होते.

**चौघां बंधूंमधील सामान्य गुण**—चौघेहि स्वतंत्र वृत्तीचे, बाणेदार, आपापल्या विशिष्ट तत्त्वास न सोडता चालणारे, तीव्र बुद्धीचे, अनेक विषयांचे ग्रहण करण्याचे सामर्थ्य बुद्धीत असलेले, महत्त्वाकांक्षी, आपलें वैशिष्ट्य स्थापन करण्याची इच्छा धारण करणारे, आपल्या स्वतःच्या व्यक्तिगत हितापलीकडे कांही बौद्धिक, धार्मिक, लोकोपयुक्त,

सामाजिक हितबुद्धीनें करावयाचे कर्तव्य आपल्याला केले पाहिजे अशी जाणीव असलेले, इतरांस अनुकरणीय असे आपले ठिकाणीं कांही असावें असें वाटणारे, कुटुंबांतील माणसांवर निव्वळ वडीलपणाने अरेरावी न गाजवितां कोणत्याहि गोष्टीची उपयुक्तता युक्तिवादाने त्यांस पटवून देण्याचा प्रयत्न करणारे आणि एकमेकापासून दूर राहात असून देखील दुजा भाव न ठेवितां आपापसांत प्रेमबुद्धि ठेवून परस्परांच्या विचारविनिमयानें वागणारे असे होते.

**वासुदेवशास्त्री व चिंतामणशास्त्री यांची तुलना**—वासुदेवशास्त्री यांच्या मनावर इंग्रजी व मराठी शिक्षणाचे व वाचनाचे संस्कार दृढ झाले असल्यामुळे व त्यांच्या नैसर्गिक मनोवृत्ती जनसमूहास व चालू देशपरिस्थितीस जास्त उपयोगी पडतील अशा स्वरूपाच्या असल्यानें त्याचें कार्य जनतेस सद्यःफलदायी व सहज समजण्यासारखे झाले आहे. उलट, चिंतामणशास्त्री यांचे मुळापासूनचे संस्कार सारे जुन्या पद्धतीचे असल्याकारणानें व शिक्षणहि प्राचीन शास्त्राचेंच घडल्याच्या योगाने, त्यांचे कार्य जुन्या संस्कृत ग्रंथावर टीका लिहिण्यापलीकडे गेले नाही. तथापि, लेखनाची व संशोधनाची हौस व पात्रता आणि त्यासाठी कष्ट सोसण्याची तयारी उभयतांचीहि सारखीच होती

कृष्णशास्त्री यांच्या मुलांपैकीं **दामोदरभट** व **रामशास्त्री** हे वैदिक व शास्त्री असून एक वर्धा येथे व दुसरे घरीं गुहागरास असतात. आणि **गणपतराव** हे बी. ए. व **रघुनाथराव** हे हायकोर्ट वकील होऊन लौकरच ते आपापले उद्योगास लागतील हे सर्व बंधू एकोप्याने राहातात. चिंतामणशास्त्री यांचे एक पुत्र **पुरुषोत्तमराव**, एम्. ए., एल्एल् बी. हे इंदूर येथें शिक्षक आहेत व दुसरे **दत्तोपंत** हे एम्. बी. बी. एस्. असून तेथेच डॉक्टरी करीत आहेत. हे सर्वजण भले व आतिथ्यशील आहेत.

---

# गुरुवर्य वासुदेव वामनशास्त्री खरे
# ग्रंथपरिचय-(उत्तरार्ध)

**प्रकरण—१ लें, काव्यें, २ रें, नाटकें, ३ रें, इतिहासग्रंथ**

## प्रकरण १ लें काव्ये.



# समुद्र—( सन १८८४ )



शास्त्रीबुवाच्या काव्यांपैकी अगदीं १ ले काव्य '**समुद्र**' हे होय. ह्याच्या प्रस्तावनेंत ह्या विषयाच्या निवडीसबंधी दोन शब्द त्यानी लिहिले आहेत. त्यांचा साराशः—" जुन्या कवींनी नद्या, पर्वत, सरोवरें, इत्यादींचीं वर्णनें केलेली आहेत. पण, अकृत्रिम सृष्टीचा राजा समुद्र ह्याचें वर्णन त्यांनी केलेलें आढळत नाही. आज इंग्रजी राज्य झाल्यापासून समुद्र व त्याचे संबंधी इतर अनेक वस्तूचे महत्त्व दिवसेंदिवस आपणांस कळून येत आहे व आपण त्यांचा उपयोग करून घेत आहों. अशा कालीं रसिक वाचकापुढें उपयुक्तता, नाविन्य, व मनोरंजन ह्या हेतूनीं ठेविलेली ही काव्यकृति त्याच्या आदरास पात्र होवो ! " वगैरे. हें काव्य १३२ श्लोकाचें आहे ह्यात लहान मोठी २२।२३ प्रकरणें आहेत. त्यापैकीं कित्येकांना स्फुट काव्ये असे म्हणतां येईल. बहुतेक सर्व प्रकरणे नवीन असून त्यातील विषय इंग्रजी कविता वाचिलेल्या सुशिक्षिताच्या मनास रुचणारे आहेत. विषय नवीन असला तरी काव्यगुणात न्यून पडण्याचें कारण नाही. ( १ ) प्रवाल कीटक, ( २ ) खलाशाचें समुद्रात जाणे, ( ३ ) त्याच्या बायकोचें विरहदुःख, ( ४ ) नौकानयनाची कल्पना व सुधारणा, ( ५ ) समुद्राचा शोध लावणाऱ्या नाविकांचे हाल व साहस, ( ६ ) आगरे व धुळप, ( ७ ) इंग्लडच्या आरमाराचा प्रताप, ( ८ ) साहारा इत्यादि प्रकरणे नवीनच कवितांविषय झालेली आहेत. आम्हांस उत्तम वाटली ती अवतरणें येथे खाली दिली आहेत. तीं ह्या काव्याचें यथार्थ स्वरूप ध्यानी येण्यास पुरेशी होतीलसें वाटतें

ह्या काव्याचा प्रारंभ कवि कुलगुरु श्रीकालिदास ह्यांच्या संस्कृत श्लोकांनें केला आहे. पुढच्या श्लोकांत प्रचंड प्रतापी सागरास, कवीने स्वतःकडे लघुत्व घेऊन लीनतेनें, आपण केलेले स्तोत्र त्यानें शातपणें ऐकून घ्यावें असें प्रार्थिलें आहे. नंतर पौराणिक कथानुरोधानें, इंद्रवज्र-भयाने शरणार्थ आलेल्या पर्वतांस आश्रय देणारा, नाना रत्नाचें आगर, श्रीमन्नारायणाचें वास्तव्यस्थान, वडवा नांवाच्या अग्नीला नित्य पोटात वागविणारा, श्रीरामचंद्राच्या सेतूला आधार, ( श्रीरामचंद्रांनीं सेतुबंधन करून रावणास मारून सीतेस परत मिळविले. परंतु हा प्रचड उद्योग ज्या सेतूमुळें शक्य झाला त्याला आधार तर सारा सागराचा ! ) असें असता श्रीवाल्मीकिमुनि त्याची स्तुति करण्यास विसरले असा त्यास–रामायण कर्त्यास–वास्तविक दोप लावणें, इ. विषय कांही श्लोकात मांडिले आहेत. भर्तृहरींनें एका श्लोकात समुद्रास वरील सर्व गोष्टीपासून व राक्षसांपासूनहि होणारी उपाधि सोसणारा, तात्पर्य, पृथ्वीप्रमाणें भारवाही–सर्वसह–असा वर्णिला आहे. त्याचप्रमाणे व त्याच वृत्तात पण साहित्य मात्र वेगळे–प्रवाळनिर्मित खडक, ज्वालामुखींचे स्फोट, बर्फाचे पर्वत इ. नवलविशेषानी व्याप्त–व ही सारी उपाधि निमूटपणे सहन करणारा असें शास्त्रीबुवांनी त्याच समुद्राच्या सहनशीलपणाचे वर्णन केले आहे. पुढील पद्यात त्यांनी शंकर, कुबेर इंद्र इ देवताशीं समुद्राचें साम्य कसें ते खुबीनें दाखविलें आहे.

**“ हिमनगवसतित्वे निम्नगावल्लभत्वे ।**
**अनुपम धनवत्त्वें रावणाच्या सुहृत्त्वें ॥**
**सकल जलदसेव्या ! राघवाबद्धरागा ! ।**
**‘गिरिश’, ‘धनपती’, तूं ‘स्वर्गलोकेंद्र’, तूं ! ॥१७॥”**

---

१. रघुवंश, सर्ग १३, ह्यात समुद्राचें विशालत्व व नानारूपधारित्व वर्णिलें आहे.
२. ‘इत. स्वपिति केशव कुलमितस्तद्दीयद्विषाम्’ इ. (नीतिशतक).

प्रवाल कीटकांबद्दल, ह्या अत्यल्प जीवांच्या मानवजीवोपकारी कृती पाहून स्तुति, कौतुक व कृतज्ञता पुढील दोन पद्यांत व्यक्त करितात.—

**" समुद्रा, तुझ्या पोटिं हे जीव होती ।**
**प्रवालाख्य ज्यां निश्चयाचीच शक्ती ॥**
**मनुष्यांस राहू नवी भूमि आंत ।**
**श्रमें जीव हे तुच्छही निर्मितात ॥ २७ ॥"**

**" धन्य धन्य जलजंतु सन्मती । जे परोपकृति मात्र जाणती ॥**
**धन्य धन्य तव देह सागरा । त्यांस आश्रय मिळे तुझा खरा ॥ २९ ॥"**

ह्या आणि ' जन्मभूमि ' वगैरे इतर काव्यांत त्यांनीं कोकणचें सृष्टिसौंदर्य वारंवार गायिलें आहे. परंतु श्रीलक्ष्मीचा पिता सागर ह्यास या काव्यांत कवि एके ठिकाणीं सवाल करितात:—

**" तूं रत्नाकर म्हणविसि आपणातें ।**
**कां केलें मग धनहीन कोंकणातें ? ॥ "**

परंतु हेच कवि ' जन्मभूमि ' काव्यांत कोंकण-भू-देवीस अभिमानानें आळवितात कीं, हे माते !

**" निःसत्त्व निर्धन तुला म्हणतात लोक ।**
**वाटे मला लवहि त्यांस नसे विवेक ॥**
कारण, **लक्ष्मीस[1] देइ जननाप्रत वारि-राशी ।**
**सेवार्थ तो सतत सिद्ध तुझ्या पदांशी ! ॥ "**

खरोखरच, ' निरंकुशा कवयः ' म्हणतात तें कांहीं खोटें नव्हे !

या नंतर, देशोदेशींचीं कांहीं गलबतें येऊन उभी आहेत, दुसरी येतांना दिसताहेत; बंदराचे धक्के, अनेक देशींच्या अनेक भाषा बोलणाऱ्या

---

१. समुद्र किनाऱ्यामुळें व्यापाराभिवृद्धि होऊन आज स्वतंत्र राष्ट्राची झालेली आर्थिक उन्नति पाहतां हें विधान लौकिक दृष्टयाहि सत्य आहे.

व नाना तऱ्हेच्या चित्रविचित्र वस्त्राभरणानी नटलेल्या स्त्रीपुरुषांनी गजबजून गेले आहेत व बोटीतील माल उतरून घेण्यांत पटाईत अशा अबोल्या हमालांच्या रांगा मुंग्यांप्रमाणे गर्दीतून आपली वाट काढीत माल गोदामांत नेऊन टाकीत आहेत, इत्यादि प्रकारांची विस्तीर्ण बंदरावरील शोभा काही श्लोकांत कवीनें मोठया कुशलतेने अगदीं हुबेहुब वाचकांसमोर उभी केली आहे. तसेंच, प्रेमळ माता, वृद्ध पिता, तरुण भार्या व लाडकीं मुलें यास–

" आलिगूनि, विचारुनी, नमुनियां, अश्रू पुसोनि स्वये ।
हर्षें चालविती जहाज अपुले टाकून सिंधो ! भये ॥ ४७॥ "

अशा निर्भय खलाशाची पतिविरहाकुल पत्नी आपल्या विरहदुःखाचा परिहार कोणत्या उपायानी करीत आहे ? तर,

"दृष्टी लावुन सारखी तुजकडे सौत्सुक्य दुग्धप्रभा ।
राहे चित्र जशी उभी स्मरुनियां प्राणप्रिया वल्लभा ! ॥
पाण्याते शिवला असेल म्हणुनी पाणी तुझे स्पर्शिते ।
पीते वायु तुझ्यावरील असले सान्निध्य संपादिते ॥ ४९ ॥"

पतिविरहानें वेडावलेल्या कोमल स्त्रीहृदयाची करुणास्पद स्थिति याहून दुसरी कोणती असेल ? यापुटे, काही पद्यात समुद्रावरील तुफानाच्या वेळीं, त्याच्या भयंकर गर्जना, पर्वतप्राय उंच उंच लाटा, अक्राळविक्राळ जलकल्लोळ, म्हणजे वायु आणि वारि या दोन महाभूतांचा स्वच्छंद धिंगाणा, ह्याचें रौद्र–भयानक वर्णन त्यांनी केले आहे. पण, त्यातहि निधडे, वीरवृत्तीचे, बहाद्दर खलाशी कसे वागतात ते पुढील पद्यांत पाहावयास सांपडतेः—

" प्रचंड मुख मृत्युचे निकट दीसतां विस्तृत ।
भयार्त भितरे पहा नखशिखांत हे कंपित ॥

---

१. समुद्र, श्लोक ४०, ४१, ४२. २ समुद्र. श्लोक ६२

**परंतु, किति हात छातिवर धीट ते देउनी ।**
**उभे असति शांत भार परमेश्वरी ठेवुनी ॥ ६९ ॥"**

असो. यानंतर नौकानयनशास्त्र, होकायंत्र, परद्वीपांचे शोध व त्यापासून सुखलाभ, यास्तव युरोपात शास्त्रीय पराक्रम चालू होते त्या वेळी आमच्या इकडे—

"**हिंदूंची धरणी वृके हरिणिशी केली परे घाबरी ।**
**रक्षाया तिस गर्जना करि हरी सह्याद्रिच्या कंदरीं ॥ ८५ ॥"**

तिकडे युरोपीय प्रवासी बर्फात अडकून पडून, अन्नाभावें एकमेकास खाऊन नरभक्षकाच्या हाती जाऊन अगर तुफानात सांपडून स्वदेश-बांधवाच्या भावी सुखासाठीं स्वतःचे बळी देत होते ! ! ह्याच वेळीं 'आंगरे' व 'धुळप' यांचा प्रतापसूर्य असा प्रखर होता की,

"**आंगरे, धुळप, दोनी कुळे । कीर्ति धाडिति दिगंतरीं बळे ॥**
**तत्प्रतापदहनांत जो जळे । तो 'फिरंगि' बघुनि तयां पळे ! ॥९३॥"**

सतराव्या शतकापासून समुद्रस्वामिनी म्हणून जगभर गाजत असलेल्या 'ग्रेट ब्रिटन्' राष्ट्राची देशभक्ति अजूनहि कशी जाज्वल्यपणे जागृत आहे ती पहाः—

"**करील जरि मानभंग भलता तयांचा नर ।**
**असंख्य तरवारि येतिल घरांतुनि बाहिर ॥ ९९ ॥"**

**बायरन्च्या 'चाइल्ड् हॅरोल्ड'** नामक काव्याचे एक उपप्रकरण '**ओशन्**'—महासागर—नांवाचे आहे. त्यापैकी १७९, १८१ व १८२ श्लोकातील कल्पना शास्त्रीबुवानी मराठींत रूपांतरित करून ह्या काव्यांत श्लोक ७५ ते ७८ व श्लोक १३।१४ मध्यें घेतल्या आहेत. जिज्ञासूंनी खालील रूपांतरें मुळाशी ताडून पाहावींतः—

"**न कोणी त्या जाळी, न उदक तया देइ, न रडे ॥ ७५ ॥**

---

**१. श्री. छ. शिवाजी महाराज.** २. समुद्र श्लोक ८९ व श्लोक ९१.

"मनुष्य हा घालिल पर्वतां तळीं ।
नद्यांस किंवा अडवीलही बळी ॥
प्रताप पृथ्वीवर मात्र सर्व तो ।
तुझा किनारा बघतांच कांपतो ॥ ७६ ॥

"लक्षावधी गलबतें फिरतात आठ ।
दिग्भागिही, तुझि अफाट सपाट पाठ ।
नाहीं मनुष्यकृति जी तुजला करील ।
स्वाधीन, तूं फिरसि फीर स्वतंत्रशील ॥ ७७ ॥

"मळविती धुळिला तट पाडुनियां शहरे ।
कांपति ज्यां स्मरतां नृपती अति भीति-भरे ॥
एक क्षणिं रणनौगण गर्वित घोर बळी ।
इच्छिसि तूं तरि केवळ त्यांप्रत नेसि तळी ॥ ७८ ॥"

"राष्ट्रें तुझे जे असती किनारे । विस्तीर्ण संपन्न बलाढ्य सारे ॥
इजिप्त, कार्थेज, इराण ग्रीस । गेले पहा कालवशें धुळीस ॥१३॥"

तथापि, तूं मात्रः—

"ही विस्तृताभूमि असेल जेथ ।
गर्जोनि आहो म्हणणार तेथें ॥ १४ ॥"

असा चिरंजीव, चिरंतन आहेस ! !

**पीर, गादा, बडलबा, खाडा व तिमि** या बलाढ्य, प्रचंड, उपयुक्त, चमत्कारिक व संहारक माशाची अचाट शक्तीचीं वर्णने ऐकेका श्लोकांत कवीने ठेचून भरलीं आहेत. हे साधण्यास देखील कविलाघव व शब्दसृष्टीवर कवीचें प्रभुत्व केवढे असावे लागते ह्याचा अंदाज वाचकांनीच करावा ! हे श्लोक अवश्य वाचून पाहाण्यासारखे आहेत.

---

१. समुद्र. श्लोक १०३ ते १०७.

देशाचे रक्षण, दळणवळणाचे साधन, मोत्ये व राजापासून रंकापर्यंत सर्वांस आवश्यक व आवडता पदार्थ जो मीठ तो देणारा असा उपकारक तर खराच, पण—

[1]" जग सर्व हे सुख कशास पावते ? ।
नसतास तूं तरि कशास वांचते ? " ॥ १११ ॥ "

असा प्रश्न उपस्थित करून—

" आकर्षुनी तव जला घन वर्षतात ।
पृथ्वीवरी सकल वस्तुंस तोषतात ॥ ११२ ॥ "

असा अनुपम उपयोग सागराचा सागून टाकिला आहे या पुढच्या १७ श्लोकात, आमच्या पौराणिक वर्णनाप्रमाणे प्रळयकाळी सारी सृष्टि अवर्षणाने व सूर्याच्या प्रखर तापाने प्रथम भस्मसात् होऊन मग वरून अपरंपार मेघवर्षाव व खालून समुद्रक्षोभ ह्यायोगे सर्वत्र जलमय व्हावयाचे, हा प्रकार गोवून दिला आहे 'मृत्यु' ह्या काव्यात मृत्युरूप पडद्याने जसे व्यक्तीचे तसे ह्या जलप्रलयात जलजवनिकेनें जगाचे नाटक कसे संपते ते सुंदरपणे कवीने गायिले आहे:—

" समाप्त जंव होय नाटक विचित्रपात्रांकित ।
विशाल पडदा पडे दिसत शांतता अद्भुत ॥
समाप्ति जंव होय त्यापरिच या जगन्नाटका ।
प्रचंड तव देह पांघरुण होय त्याते निका ॥ ११५ ॥ "

आणि शेवटच्या पद्यात अनियम्य, अचिंत्यसार, अमर्याद अशा सागरास निर्माण करून त्यास आपल्या बंधनात वागविणाऱ्या अद्वितीय समर्थ परमेश्वरास, " **तुझें स्मरण नित्य आमच्या चित्तांत राहो** " असे कवीने मागणे मागितले आहे.

---

१. मृत्यु. श्लोक ५

# फुटकळ चुटके



## —'जन्मभूमि,' 'गोपिकाबाईचा पुत्रशोक,' 'उज्जयिनी.'—

प्रसिद्धीच्या कालानुक्रमाने **'समुद्रा'** नंतर **'यशवंतराव महाकाव्य'** येतें. पण, ते मोठे असल्याने व स्फुट कविता वेळोवेळी रचिली गेली असून तिचें प्रकाशन मात्र स. १८९१ त झाले असले तरी ह्या स्फुट-कवितापैकी काही महाकाव्याच्या आधीच्या असतील असे संभवतें म्हणून 'फुटकळ चुटक्या'चा येथे प्रथम विचार केला आहे. हे चुटके एकंदर सहा असून सर्वांची मिळून पद्यसंख्या दीडशे आहे. यापैकी 'जन्मभूमि,' 'गोपिकाबाईचा पुत्रशोक,' 'उज्जयिनी,' ही प्रकरणे सरकारी मराठी क्रमिक पुस्तकात घेतली असून निरनिराळ्या शाळांत 'फुटकळ चुटके' हें पुस्तकच कवितेच्या अभ्यासक्रमात नेमिलेले असते. ह्यामुळे ह्यांतील पुष्कळ कविता मुलांच्या तोंडी ऐकूं येते. 'जन्मभूमि' काव्यांत कवीची कोंकणप्रीति विशेष दिसली तरी स्वदेशप्रेमाचे सामान्य लक्षण व मातृभूविरहाने होणारी कोणाहि राष्ट्रभक्ताच्या मनाची तळमळ, ह्यापेक्षां अधिक उत्कटतेने बालबोध भाषेत गायिलेली अन्यत्र क्वचित्‌च आढळेल! तसेच, 'गोपिकाबाईचा पुत्रशोक'-**श्रीमंत नानासाहेब पेशवे** ह्यांच्या पत्नी ह्यांचा हृदयस्फोट करणारा पुत्रशोक—आजहि ज्यास द्रव आणणार नाही असे अंतःकरण विरळाच!! अभिमन्यूप्रमाणें १८।१९ वर्षांच्या वयाच्या आत शत्रूंशी शौर्याने लढत लढत धारातीर्थी देह ठेवणारा **विश्वासराव**, **"तेव्हां गाळिति शत्रु मित्र बघतां ज्याच्या शवा आसवें।"** अशी स्वपराक्रमाबद्दल शत्रूंकडून देखील अश्रूंची खंडणी वसूल करणारा वीरपुत्र, त्यासाठीं कोणती माता शोकविव्हल होणार नाही? निजामअल्ली, हैदरअल्ली, सारख्या कसलेल्या मुत्सद्दी व

पराक्रमी शत्रूस जर्जर करणाऱ्या व **"पानिपतीं बुडालेलें प्रथित वैभव"** अत्यल्प काळांत परत मिळविणाऱ्या **'अद्वितीय द्वितीय सुत माधवा-'** च्या भर ज्वानीतील आकस्मिक मृत्यूमुळें पहिल्या पुत्रशोकाचे अश्रु वाळतात न वाळतात तोंच पुत्रनिधानाचा पुन्हां टाहो फोडण्याचा अनिवार दुःसह प्रसंग त्या माउलीवर ओढवला ! व लागलींच एक वर्षाच्या आंत घरातल्याघरात सख्ख्या चुलतीकडून तृतीय पुत्र **नारायराव** यांचा वध ! ! ! गजान्त लक्ष्मीचें राज्यवैभव उपभोगावयास असता या दुःखशोकाकुल दुर्दैवी मातेनें आपले उर्वरित आयुष्याचे दिवस सन्यासिनीप्रमाणे घालविले ! या बाईच्या मुखीं ही पुढील करुणवाणी योजून शास्त्रीबुवानी करुणरसास अगदी भरते आणिलें आहेः—

**" नवस करिती पुत्रासाठीं कितीक जगीं स्त्रिया ।**
**सुत मज तिघे झाले गेले तिघेहि परी लया ! ॥**
**कितिक गुण ते त्यांचे चित्तीं स्मरून रहूं तरी ।**
**मरण नच ये मी दुर्भाग्या असे भुवनीं खरी ! ! ॥१४॥"**

हल्लीचे **उज्जनी** शहर कवींनी स्वतः पाहिलें होते. ह्याच्या शेजारी एके बाजूस थोड्या अंतरावर असलेल्या विस्तीर्ण मैदानावर प्राचीन **उज्जयिनी नगरी होती** असें सांगतात. या मैदानावर फिरत असता या स्थळाचे पुरातन वैभव व आजची दुःस्थिति एकदम मनात येऊन कोणी स्वदेशाभिमानी पुरुष विषण्ण मनाने हे काव्य गात आहे अशी भूमिका कल्पून, **विक्रमादित्य राजा, त्याची कविसभा, ' विद्याधर्मसुकर्मतत्पर असे ब्राह्मणं' ' तृणवत् जीवित लेखणारे मानधन क्षत्रिय '** इत्यादि चातुर्वर्ण्यात्मक प्रजा, आणि 'यक्षाचा निज वल्लभेस मेघदूताहाती संदेश, **'सीतेचा पतिला निरोप' 'रतिचा तो शोक'** ह्यासारखी कालिदासादि

१. ही सारीं अवतरण वाक्ये बहुतेक खुद्द कवीच्या काव्यांतील शब्दातच मुद्दाम दिली आहेत. २ मेघदूत, रघुवंश, कुमारसंभव, वगैरे

कवींचीं काव्यें प्रत्यक्ष त्या त्या कवीच्या तोंडून श्रवण करणारे भाग्यवान् राजे व सभासद इत्यादींसंबंधी वर्णनें त्यानी थोडक्यांत इतकीं अनुरूप वठविली आहेत कीं, 'काव्य म्हणजे श्राव्य चित्र,' असे कोणी म्हटल्यास ह्या ठिकाणी ते अन्यथा वाटण्याचा संभव नाही.

" प्रातःकाळीं नगर-वनिता कुंकुमाच्या सडयांनी ।
रांगोळ्यांनी अधिकच जयां देति शोभा झटोनी ॥
नाना यानीं धनिक बसुनी जात होते जयांत ।
आतां कैसे दिसति न इथे रम्य ते राजपंथ ? ॥ ५ ॥ "

किंवा—" जेथें नाचति मोर, मंजुळ रवे गातात जेथे पिक, ।
वापींच्या तटि खेळती सुखभरे चक्रांग हंसादिक ।
पुष्पांनीं लवल्या लता तरुवरां जेथे मिठी घालती ।
उद्यानें दिसती न तीं वसति जी क्षिप्रा नदीच्या तटीं ! ॥६॥ "

शास्त्रीबुवांचा सहज असा जो गीर्वाण भाषेशीं विनोद, किंवा तिला महाराष्ट्रीय वेष तेव्हाच द्यावयाचा पण तिचा विरस तर होऊं द्यावयाचा नाही, हे जे त्यांचे कवित्वलाघव ते ह्या काव्यात 'सारम्या नगरी महान् स नृपतिः" इ. संस्कृत पद्याच्या समवृत्त भाषांतरांत चांगले दिसून येते. असो. क्रमिक पुस्तकावर हवाला देऊन वरील तीनहि काव्यांच्या विवेचनाचा संक्षेप केल्याबद्दल सुज्ञ वाचकांनी मला क्षमा करावी.

'**तुजीन आणि वाक्पुष्टा**'—हे फुटकळ चुटक्यातील पहिले प्रकरण आहे. प्राचीन काळी **काश्मीर** देशात एकदा मोठा दुष्काळ पडला असता तेथील सत्त्वधीर व धार्मिक राजा आणि राणी—तुंजीन व वाक्पुष्टा—यांनी स्वतः दुष्काळपीडित प्रजाजनांमध्ये हिंडून व अगणित द्रव्य वेचून प्रजेची दुःखे निवारण केली. हा इतिहास '**राजतरंगिणी**' नामक प्रसिद्ध ऐतिहासिक काव्यांत वर्णिलेला आहे

१. उज्जयिनी. श्लोक १६ वा पहा.

त्यावरून शास्त्रीबुवांनी हे स्फुटकाव्य रचिले आहे.

**" शेते बुडवी, तुडवी लोकांच्या बर्फ जीवनाशेते ।**
**विश्वक्षयार्थ उत्सुक काळाचे हास्य काय भासे तें ॥ ५ ॥ "**

अतोनात बर्फ पडून पिकाचा नाश झाला. लोक अन्नाविणे मरूं लागले. रस्तोरस्ती प्रेते कुजून नरकपुरीचे भयाण व बीभत्स स्वरूप त्या प्रदेशास आलें; कोणी कोणास विचारीना, आयानी लेकरें टाकून दिली ! लाज, कुलाभिमान वगैरे पार गेली ! ! फार काय:—

**" व्याकुळ होय भुकेने पुत्र पडे प्राण चालिले दूर ।**
**ताता ! ताता ! म्हणतां बाप बसे अन्न खावया क्रूर ॥९॥ "**

राजा स्वतः लोकाना अन्ने वाटी, त्यापायी सर्व द्रव्य संपले, आपले विनयादिगुणसंपन्न प्रजाजन मरत आहेत व आपण त्यांचे रक्षक म्हणवीत असून त्याचे दुःख दूर करू शकत नाही, ह्यासाठी—

**" निष्फल जीवित माझे भूमीला भार देह हा जाणे ॥१९॥"**

किंवा, **"निरुपाय मी अभागी आतां निज देह जाळितो दहनीं॥२६॥"**

असे राजा राणीशीं बोलत आहे व धन्य राजे कोणते ते तो वाक्पुष्टेला सांगत आहे:—

**" बघुनि प्रजा सभोती सुखित जशीं काय बालके सान ।**
**ते धन्य ! धन्य ! राजे निजती जे पावुनी समाधान ॥२७॥"**

अशा करुणालहरी त्या दयासागर दीनबंधु राजाच्या मुखावाटे बाहेर येत. राणी आपल्या प्रिय पतीस धीर देत आहे:—

**" जीं जी अवार्य दुःखे सामर्थ्ये न त्यां असे जरि तराया ।**
**थोरांस थोरपण तरि येते कोठून कथन कर राया ? ॥ ३२ ॥"**

---

१. हास्याचा रंग पांढरा असें संस्कृत कवींनीं कल्पिलेलें आहे. येथें बर्फानें काळाचे विध्वंसक कार्य केलें, पांढरें बर्फ तेंच त्या काळाचें हास्य ! अशी कविकल्पना.

**स्त्रीते पतिभक्तिव्रत मंत्र्यांतें स्वामिभक्तिचें व्रत रे ! !**
**रक्षुनि न्यायें लोकां राजा व्यसनार्णवास शीघ्र तरे ॥ ३४ ॥ "**

वरील आर्यांत ग्रथित केलेली तुंजीन राजाची लोकरक्षणाची तळमळ व आजकालच्या राजे लोकाची रीत याचा एकत्र विचार केला तर धन्य राजा तुजीन व धन्य ती राणी वाक्पुष्टा असे आपोआपच कोणाचेहि तोंडून उद्गार निघतील. असो

"**राजावळचे दुष्ट लोक**"—ह्या नावाचे फुटकळ चुटक्यातील आणखी एक लहानसे काव्य आहे. व्यवहारात सामान्य प्रतीच्या श्रीमत लोकाजवळसुद्धा लाथाखाऊ, चेचवट, निलाजरे, तोंडपुजे, लाळघोट्ये, चहाडखोर, मिथ्यास्तुतिपाठक, अपमतलबी लोक जर असतात, तर मग राजांजवळ काय पुसूंच नका ! भल्याभल्याची बुद्धि या लक्ष्मीपुत्रांपुढें लागूलचालनास तयार होते ! ह्या काव्यात कवीला अशा लोकाच्या स्वार्थसाधूपणाचाहि इतकासा खेद वाटत नसून त्याची परिणामी प्रकट होणारी स्वामिद्रोही वृत्ति अगर निमकहरमीपणाच त्यास विशेषत: चव्हाट्यावर आणावयाचा आहेसे दिसते. असल्या दुष्टांची परपरा प्राचीन काळापासून अखंड चालूंच आहे. चारुदत्तासारख्या उदारधीला तो आपद्ग्रस्त होताच ते सोडून दूर सरले ! 'शारदा' नाटकांतला श्रीमंत 'बैलाला घोडा' म्हणता तरी त्याला मान तुकविणारे आणि 'सूर्य मेला' असे वाक्य त्याच्या मुखातून येताक्षणीच डोळयास पदर लावून रडूं लागणारे, परंतु तो चतुर्भुज बनण्याचा लाग दिसताच चहूं दिशांस पागून चालते होणारे लुच्चे त्याच्याजवळ होतेच. असले हे दुष्ट लोक राजाला सल्ला काय देत आहेत पाहा:-

---

१. असल्या लोकांचा भरणा **दुसरे व्यंकटराव नारायण, (इचलकरंजी) व दुसरे बाजीराव पेशवे**, याजवळ होता व त्यामुळें त्यांचा पराकाष्टेचा नाश झाला हे ऐतिहासिक दाखले कवीच्या डोळ्यापुढें असावे.

"जवळ बाळगिती धन जे प्रजा। हरुनि तें करुंया प्रभुजी मजा॥
सकल हे तुमचे जन सेवक। तनुमनावरि आपण मालक॥ ७ ॥"

महाराज, तुम्ही राज्यधुरंधर नसला तरी चालेल, सुखविलास हेच आपले साध्य व ध्येय असावे, शिव! शिव! हे निर्लज्ज लोक राजाला खालील कुविचार निःशंकपणें सुचवित आहेत:—

"भ्रमर ज्यापरि गुंगत हिंडतो। निवडुनी कुसुमे मधु चाखितो॥
नृपतिने वनिताजन शोधिजे। करुनि संग्रह तो उपभोगिजे॥ १०॥

त्यास मद्यपानास प्रवृत्त करण्यासाटी पुढीलप्रमाणे सूचक प्रश्न हे लोक टाकितातः—

"नर [१]तया इह-लोकि न सेवितो।
पिइल काय सुधा परलोकि तो॥ ११॥"

असो या दुष्ट संगतीनें राजे लोक सुख, यश, कीर्ति, इत्यादीस [२]मुकतात, व हे दुष्ट मात्र साधेल तितके दिवस मजा मारून मोकळे होतात! आपत्काळी संकटग्रस्त धन्याकडे ते ढुकूनहि पाहा[३]त नाहीत!! तथापि, ह्यात कांही आश्चर्य नाही. अल्पशिक्षित, अनियंत्रित-सत्ताधारी, मिथ्यास्तुतिलुब्ध आणि परप्रत्ययनेयबुद्धि अशा राजांनीं भरलेल्या या हतभागी देशात असले प्रकार कोठे ना कोठे आजहि घडत असतीलच!

'मृत्यु'—हे अखेरचे प्रकरण ५७ श्लोकाचे असून त्याचे पोटविभाग दहा आहेत. जसे बर्फ पाण्यात वितळून त्याशी एकरूप होतें किंवा फुटलेल्या मडक्याची माती मूळच्या मातीशीं मिळून जाते, तशीच या जगांत दिसणाऱ्या [४]नानाकृति व सुंदर लहानमोठ्या प्राण्याची स्थिति आहे—हे जीव जणूं काय सृष्टिरूप रंगभूमीवर जन्माचा पडदा उघडून ईश्वरदत्त भूमिका यथाशक्ति, यथामति करीत असतात व मृत्यूच्या

१. मद्यास. २. श्लोक १५. ३ श्लोक १६. ४. मृत्यु. श्लोक २.

(ड्रॉपच्या) पडद्यामागे सरून तिची समाप्ति करितात. या नाटकाचा सूत्रधार जगच्चालक–जगन्नायक–परमेश्वर होय. एकाच वेळी असंख्य सुख-दुःख–पर्यवसायी नाटकांची घडामोड एक्याच रंगभूमीवर चाललेली असते ! असे बहारीचे रूपक केलेले दृष्टीस पडते. प्रसिद्ध नाटककार श्रीयुत **श्री. कृ. कोल्हटकर** यांच्या " **प्रभो ! विभो ! हे अगाध किति तव करणी** " इत्यादि पदांतील कल्पनाशी सदृश अशा कल्पना पुढील श्लोकांत आहेत. समान मनोभूमिकेवर आरूढ झाल्यावर दोघा थोर कवींच्या डोक्यातून भिन्न काली व भिन्न स्थली समान कल्पना प्रसवलेल्या पाहून एकादा मानसशास्त्रवेत्ता काय सिद्धान्त बांधील तो बांधो, परंतु सामान्य वाचकास त्याबद्दल क्षणभर मौज खास वाटेल. पुढील शास्त्रीबुवांचा श्लोक पाहा.—

**" लावी सूर्य-शशांक-दीप, पसरी आकाश हा चांदवा ।**
**पृथ्वी सुंदर रंगभूमि सजवी, दावी निजा वैभवा ॥**
**बांधोनी मग जन्म-मृत्यु पडदे तेथे जगन्नायक ।**
**आरंभी प्रभु सूत्रधार जन हो ! संसार हे नाटक ॥ ४ ॥ "**

ह्यापुढच्या दोन[2] श्लोकांत राम, रावण व वानरगण आणि त्यांचे विरोधी राक्षसगण, तसेच कौरव पांडव आणि यादव असल्या बलवानांचाहि अंत करणारा, असें म्हणून सर्वभक्षक काळाचे अपरिमित बलिष्ठत्व त्यांनीं प्रस्थापित केले आहे. तसेच इंद्रादिकांस जिंकणाऱ्या व शंकरासारख्यास ' पळता भुई थोडी ' असे करून सोडणाऱ्यापेक्षा– ' **त्यांहून–मृत्यू बळी** ' असे म्हटले आहे. कोणास कदाचित् आश्चर्य वाटेल, परंतु कित्येक[3] श्लोकांत त्यांनीं मृत्यूचे हितकारित्वहि दाखविले आहे ! ! पण, ते कटु असले तरी सत्य–कथन आहे. सामान्य माणसाची दृष्टि वेगळी व तत्त्वज्ञ पुरुषाची दृष्टि वेगळी, **माल्थस्** नावाचा

१. मृत्यु. श्लोक ५. २. मृत्यु. श्लोक ६।७. ३. मृत्यु श्लोक ८ ते १४.

एक अर्थशास्त्रज्ञ लढाया, दुष्काळ, प्लेग वगैरे रोगांच्या सांथी, या अनर्थांचे एका अर्थानें अभिनंदन करितो, तसेंच कवीनें ह्या पद्यांतून केले आहे:-( १ ) पृथ्वी कितीहि विशाल-लांब, रुंद-असली तरी तिला मर्यादा आहेच. मनुष्ये व इतर स्थलचर प्राणी, जळचरे व पक्षी ह्याच्या वाढीस मृत्यु आळा न घालिता तर कसे अनर्थ झाले असते ! ( २ ) तैमूरलंगासारखे मनुष्यविध्वंसक किंवा साधूंचा छल करणारे दुष्ट, व दुसरे अन्य प्रकारचे घातकी, यास मारून मृत्यु त्याची हिंसा व दुष्कर्में बंद पाडितो. ( ३ ) पुण्यवंताचा व सज्जनाचाहि अंत मृत्यु करितोच; पण त्यायोगे दुर्जनाच्या छळातून त्याची सुटका होते. आणि पुण्यात्म्याच्या सुयशाचा परिमल त्याच्या मरणोत्तर चहूं दिशास अधिकच दरवळूं लागतो, असे त्या श्लोकाचे तात्पर्य आहे, असो. मृत्यूला आपखुषीने, आनंदाने कवटाळणारे, तथापि, त्यामुळे वेडे न ठरता उलट हुतात्मे व पुण्यश्लोक पदवी पावणारे कोण, तें कवि सांगतात:—

**" धारातीर्थि मरूं, विमानिं बसवूं अंकावरी अप्सरा, ।**
**जाऊं स्वर्गतला, सुधारस पिऊं, हा मार्ग वाटे बरा ॥**
**ऐसे ओरडुनी शरीर मरणा युद्धोत्सुके वाहिले ।**
**कोठे स्वर्ग, सुरांगना ! अमृत ते कोणी असे पाहिलें ? ॥२७॥"**[1]

किंवा— **" आप्तांचिया पदरिं घालुन बालकातें ।**
**वंदूनियां गुरुजनां कुल-देवतांते ।**
**लोकें नमस्कृत सती पतिच्या शवाशीं ।**
**घेई चितेवरिच जाळुन आपणासी ॥ २८ ॥ '**

आत्महत्या करण्यास प्रवृत्त झालेल्या जीवाची द्विधा, कातर व अनुकंपनीय स्थिति तेरा श्लोकांत कथन केली आहे. व तिरस्कार, अपमान, दारिद्र्य यांस कंटाळलेला[2] जीव अखेर आत्महत्या करून घेऊन

१. मृत्यु. श्लोक ३४ ते ४६. २. मृत्यु. श्लोक २९ ते ३३.

**‘मतिमंद तो नरकसाधना करी’** असे त्याला कवीने दूषण लाविले आहे. रोगपीडा, दारिद्र्य, वैधव्य, यानी गांजलेल्यांचा विलाप व त्यांची मृत्यूस शरण जाण्याची उत्सुकता आणि त्याची मृत्यूस प्रार्थना व सुहृद्वियोगसंबंधी तीन[१] श्लोक पाषाणहृदयास देखील पाझर फोडणाऱ्या करुणरसाने केवळ कल्लोलमय झाले आहेत —

**“ चिंताक्रांतमुखी असेल गृहिणी, बाळे भुकेली घरी।**
**नाही घांसभरीहि अन्न मुख त्या दावूं कसे मी तरी ॥**
**वेगाडू किति तोड ? निष्ठुर जगीं आतां नको राहणे !।**
**मृत्यो ! दासजनी अनुग्रह करी ! ” ऐसे दरिद्री म्हणे ॥३२॥”**

**“ गेला कांत लया पुन्हां न परते आक्रांत केला तरी।**
**झाला व्यर्थचि जन्म ! कोठुन मला संसारसौख्ये खरी ॥**
**साहूं केवि विडंबनेस ! लपवू हे तोड काळे कुठे ? ।**
**ने बापा ! निजमंदिरास ” विधवा मृत्यूस हे प्रार्थिते ॥ ३३ ॥”**

**“ होतो बाळपणांत खेळत जयांसगे सुखे हांसत।**
**कंठि घालुनि हात मी हितगुजे होतो जयां सांगत ॥**
**हर्षाची उकळी फुटे मम मनी पाहून मित्रां जयां।**
**मृत्यो ! तूं अधमाधमा ! पळवुनी नेलेस कोठे तयां ? ॥४७॥”**

जन्मभूमि व मृत्यु या स्फुट काव्यातील काही वेचे प्रसंगोपात्त मागें व्यक्तिगत चरित्रातहि आलेले आहेतच. करिता, फुटकळ चुटक्यावरील हे विवेचन येथेच आटोपते घेतो.

---

१. मृत्यु. श्लोक ४७, ४८, व ४९.

# अप्रकाशित स्फुट प्रकरणें.

ह्यात शास्त्रीबुवानी केलेली काहीं **संस्कृत कविताहि** आहे. **पटवर्धन कुलप्रशस्ति**' व श्रीमंत सर बाळासाहेब यास 'चित्रकाव्यात्मक मानपत्र' समर्पण केले त्यात साधिलेली अक्षरें ज्यात आहेत असे तीन श्लोक संस्कृत आहेत हे तीन श्लोक फक्त कवीचे चित्रकाव्यरचनाचातुर्य कसे [1]प्रशस्त होते हे दाखविण्याच्या हेतूने खालीं दिले आहेत:—

**" न्यायान्यायविचारदक्षमनलश्रीकं सुधालापितम् ।**
**आधारं विपदाभिभूतमनसां शीलक्षमासागरम् ॥**
**श्रीगंगाधरनामक प्रभुवरं हेरंब ! कामप्रद ! ।**
**देव ! स्वीयकृपाकटाक्षविषयं तं भव्यभाजं कुरु ॥१॥ "**

**" प्रीत्या न्यायान्यायदत्तस्वचेता । नेता धीरो लोकशोकापहारी॥**
**भूया एवं ख्यातनामा महाशो । लोके कीर्तिस्ते सदा वर्धिषीष्ट॥"**

**" महोदारा महाशूरा राजपूज्या भटा यतः ॥**
**पुरा भवं प्रापुरार्या हरिवंशो विवर्धते ॥३॥ "**

गुरुवर्य पंडित अनंताचार्य यांस पत्र—' **गुरुप्रशंसा** '

**" कुर्वन् कीर्तिसुमैः सदापरिमलैर्धन्यां भुवं भारतीम् ।**
**नानाशास्त्रसुविस्तरैर्घनतरैश्छात्रेषु छत्रायसे ॥**
**कारुण्यामृतसत्फलैरवनतोऽप्युच्चैः स्वयं राजसे ।**
**साक्षात्कल्पतरुस्त्वमेव भगवन् कष्टास्पदेऽस्मिन् कलौ ॥ "**

---

१. पहिल्या श्लोकातील एक एक अक्षर प्रत्येक चरणाच्या आरभीं, व पुढच्या २ श्लोकांतील एक एक अक्षर प्रत्येक चरणात तिसरें साधिले आहे, एकंदर श्लोक १९ सर्व चार चरणाचे आहेत. एकदर मिळून १५२ अक्षरे साधिलेलीं आहेत ! ! !

'वृत्तसुधा' वर्तमानपत्राचें ध्येय ( शास्त्रीबुवाकृत ).

" विद्या–महौषधि–विवर्धन–दक्ष–शीलाम् ।
बद्धव्रतां पिशुन-वाक्य-विष-प्रणाशे ॥
चांद्रीं सुधां सुरवरा इव वाग्विलासैं ।
हृद्यां बुधा मधुर–'वृत्तसुधां' पिबन्तु "

**समवृत्त भाषांतरें**—या श्लोकाचें समवृत्त मराठी भाषांतरहि त्यांनी केलेले होते. दुसरा एक संस्कृत श्लोक व त्याचे भाषांतर. 'चंडांशु':—

" गिरि–कुहर–तलं शरणं रे रे खलकौशिका द्रुतं कुरुत ।
अज्ञान–तमो–ध्वंसन–कुशल–करोऽभ्युदयमेति चंडांशुः ७॥"

" जा ! जा ! पळा खळांनो ! घुबडांसम लपुनियां बसा दरित ।
अज्ञान–तमा ध्वंसित उदया चंडांशु येतसे त्वरित ॥ "

'धूमव्याकुलदृष्टि' इत्यादि, प्रियदर्शिका नाटिकेच्या नांदीतील श्लोकाचें भाषांतर त्यांनीं पुढीलप्रमाणें केले आहे —

" पूर्वी लागुन होम–धूम नयन त्रासाप्रती पावले ।
ऐसे शंकर-मौलि–चंद्र-किरण–स्पर्शें समाल्हादले ॥
झाली उन्मुख कौतुके निजपति प्रेक्षावया ती जरी ।
लाजेने वदना बघून विधिला खालीं करी सुंदरी ॥ १ ॥

" तेणे दृष्टि तिची पडे पद–नखीं स्वच्छीं जणों दर्पणीं ।
झाला मत्सर बिंबिता पतिशिरीं पाहूनियां स्वर्धुनी ॥
ता रोमांच थरारले प्रियजनस्पर्शेचि अंगावरी ।
ती पाणिग्रहण-प्रसंगिं कुशला देवो अशी नोवरी ॥२॥ "

भर्तृहरिकृत नीतिशतकांतील 'यदा किंचिज्ज्ञोऽहम्' श्लोकाचें भाषांतर-

" कळे मजसि थोडके परि मदांध मी जाहलो ।
गजापरि, 'कळे मला सकळ' गर्व हा पावलो ॥
परंतु मज संगती जंव बुधां जनांची मिळे ।
कळे 'बहुत मूर्ख मी' ज्वरचि गर्व तैसा पळे ॥ "

' वहति विषधरान् ' वगैरे भामिनीविलासांतील श्लोक —
"भुजंगमां चंदन देतसे स्थळ। धरी शिरीं कज्जल दीप उज्ज्वळ ॥
कलंक राहे शशिमंडळावरी। नृपाचिया दुर्जन राहती घरीं॥ "
असे आणखीहि काही भाषान्तरित श्लोक या अप्रकाशित संग्रहात आहेत. हे बहुतेक श्लोक वर्गांत संस्कृतच्या तासात मूळ श्लोक शिकवीत असता तेथच्यातेथे रचिलेले आहेत. ही गोष्ट लक्ष्यांत घेतली असता त्याच्या सरस शीघ्र-कवित्वाची यथार्थ कल्पना कोणासहि करिता येईल.

संकीर्ण उतारे—स्त्री-शिक्षणः--

" कीं नम्रता, चतुरता, मधुरत्व वाचे।
धैर्य, स्थिरत्व, असती गुण शिक्षणाचे ॥
ते प्राप्त होति जरि सद्गुण बायकांते।
प्रत्येक होइल सुखी न कुटुंब कां तें ?॥ "

अर्वाचीन राजे व कवींची दुर्दशाः—

" [1]आतां गर्जति भूपती धनमदे हेमंत-मेघां-सम।
वाणीते परि त्यांत एक न वसे सन्मान देऊं क्षम ॥
गेले विक्रम-भोज-मुंजे[2] दुसरे त्यांचे सखे शेंकडों।
आतां भारतभूमिच्या कविकुला सन्मान कैसा घडो ? ॥ "

गमतीची उत्प्रेक्षा व मनोहर निसर्ग-शोभा:—

" आला [3]दत्तविधान-वर्ष-दिन जो सर्वांस दे हर्ष तो।
की पर्जन्य-मिषें महेंद्र विपुलां हर्षाश्रुते वर्षतो ॥
शेते, माळ, मळे, वने, उपवने, शोभा तयां अद्भुत।
शालू हा हिरवाच पांघरुन भू-देवी बसे हांसत ॥ "

---

१. मित्र गोविंदशास्त्री बापट यास लिहिलेल्या पद्यमय पत्रातील. २ विख्यात भोजराजाचा चुलता (आपटेकृत सं इं कोश). ३. श्रीमंत सरकार बाळासाहेब मिरजकर यांच्या दत्तविधानाचा वाढदिवस.

गरीब शेतकऱ्याचा आनंद.--

" गरिब कुणबि सोडी नांगरा आजि सैल ।
रंवथ करित त्याचे बैसले स्वस्थ बैल ॥
भंवति बसति त्याचीं बायको-लेकरे ती ।
निरखुन सुखि, होते तन्मना पूर्ण शांति ॥ "

नदीतीरावर केलेल्या दीपोत्सवास पाहून[1]:—

" कांहीं दीपक जे नदीतटि तटाकाच्या तटी लाविले ।
बिंबे सुंदर सांठवीति जपुनी त्यांचीच पोटीं जले ॥
दीपोत्साह सुरम्य भूमिवरती होतो असे पाहुन ।
राणीच्या जणुं दीप लावि वरुण प्रीत्यर्थ पाण्यांतुन ॥ "

देशोद्धाराची चिरंतन लागलेली तळमळ[2]:—

" सेवूं जन्म-मही विवर्धन करूं प्राचीन शास्त्रे, कला; ।
हिंदूंच्या तकलूं करूं शिथिलही चिंता-व्यथा-शृंखला ॥"

पटवर्धन वीर व बापू गोखले यांचे पराक्रम:--

" याच कुळीं अमित भटीं जन्म घेतले ।
युद्धामधि शौर्यबळें ख्याति पावले ॥
स्वामीचे कार्य करूं प्राण खर्चिले ।

× × × ×

राष्ट्राचा काल असा नष्ट जाहला ॥
शौर्यबळें पुरुष जयीं ख्याति पावला ।
अटकेवरि कटक-भटीं पूर्ण दाविला । "

× × × ×

" गेला लोकीं चमकुन हिरा राज्य जातां मराठी ।
दावोनीयां निजरिपुजनां शेवटीं शौर्यधाटी ॥

१. ' व्हिटोरिया राणीची जुबिली. ' २. श्रीमंत बापूसाहेब कुरुंदवाडकर यास पत्र.

**जो धैर्याचा उदधिच गमे इंग्रजां धाक ज्याचा**
**धारातीर्थी मरुन पडला 'गोखला' वीर साचा ॥"**

अशी विविध विषयांवरील कविता शास्त्रीबुवांच्या या अप्रकाशित स्फुट-संग्रहात आहे. '**साहेबांची भूपाळी**' हे काव्य 'एका नामदार रावबहादुरास उद्देशून रचिलेली उपहासोक्ति' आहे असे खुद्द शास्त्री-बुवांनीच म्हटले आहे 'साहेबचरणारविंदी मिलिंदायमान' होणारे नामदार रावबहादूर (क्वचित् अपवाद वगळला तर) आता फारसे कोणी उरलेले नाहीत. म्हणून त्या उपहासोक्तीचा चुरचुरितपणा आता विशेष भासत नाही. खि. वा. '**व्हिक्टोरिया राणीची जुबिली**' हें काव्यहि चांगलेच आहे. पण, त्या 'जुबिली' समारंभाच्या वेळचा ब्रिटिश् राजवटीविषयीचा नितात आदरभाव आजच्या जनमनांत वागत नाही, म्हणून त्या प्रसंगीची स्तुति-स्तोत्रे आता शिळीशी वाटतात. तथापि, त्यांतली एकदोन पद्यें वरील उताऱ्यात घेतलेलीं आहेत.

---

# यशवंतराय महाकाव्य (सन १८८८)

## —सामान्य स्वरूप आणि या तऱ्हेच्या काव्यरचनेचा हेतु—

प्रकाशनकालानुक्रमाने पाहता 'यशवंतराय महाकाव्य' ही खरेशास्त्री याची दुसरी काव्यकृति होय. हे काव्य १७२६ श्लोकाचे असून ह्याचे चोवीस सर्ग आहेत. शास्त्रीबुवाच्या काव्यात आर्या किंवा इतर दोन चरणी वृत्त थोडे; बहुतेक कविता चार चरणी विविध वृत्ताच्या श्लोकात असावयाची. त्यानी '**वैतालीय**' व '**अश्वगति**' ही दोन

---

१. या वृत्ताचा मराठींत प्रथम उपयोग रा. रा बजाबा बाळाजी नेने यानीं आपल्या 'सैरंध्री' नाटकात केला आहे. (खरेशास्त्री.)

संस्कृत वृत्ते मराठींत नवीन प्रचारांत आणिलीं. वैतालीय वृत्त करुण-रसास कसे पोषक असतें हे 'रघु० सर्ग ८, अजविलाप' वाचणाऱ्याच्या सहज ध्यानांत येण्यासारखे आहे. आपल्या काव्यास 'महाकाव्य' असे नांव घेतल्यावरून विद्वानांस ते कदाचित् खपणार नाही, असे मनांत येऊन '**घटानां निर्मातुस्त्रिभुवनविधातुश्च कलह**' असे संस्कृत कविश्रेष्ठांच्या तुलनेनें कवीने स्वतःकडे लघुत्व घेतले आहे. त्यायोगें या महाराष्ट्रीय कविवराचा विनय व शालीनता व्यक्त होत आहे. वस्तुतः काव्यरत्नावलीकार[1] म्हणतात त्याप्रमाणे 'मराठी भाषेत महाकाव्य नाहीं' हा आक्षेप ह्या काव्याने दूर झाला दक्षिणा प्राइझ् कमिटीने ह्या ग्रंथास मोठे बक्षीस देऊन खरेशास्त्री याचा गौरव केला. '**निबंधचंद्रिकेंत**'[2] याचे कथानक व कित्येक उत्तारे देऊन चंद्रिका-कारांनी त्यास प्रसिद्धि दिली. तसेच, ह्यांतील, '**सूर्यास्त**' व '**चंद्रोदय**' ही वर्णने 'स्फुटकाव्ये' म्हणून सरकारी क्रमिक पुस्तकांत घेण्यांत आली असून हल्ली मुंबई विश्वविद्यालयाच्या बी. ए. च्या अभ्यास-क्रमांत हे काव्य विराजमान होऊन आधुनिक विद्वानांच्या आदरासहि ते पात्र झालें आहे. ह्या काव्यामधून अनेक विषयांसंबंधी आढळणारी स्फुटे निवडून काढून त्यांचा एका पुस्तकांत स्वतंत्र संग्रह केल्यास '**काव्य-रत्न-करंडका**' सारखा तो एक सुंदर ग्रंथ होईल.

या काव्यास 'महाकाव्य' असें संबोधण्यात कवीचा एक व्यापक हेतु आहे. ते लिहितात, "संस्कृत[3] काव्यांत साहित्यशास्त्राप्रमाणे 'महाकाव्य' हा काव्यरचनेचा एक स्वतंत्र प्रकार आहे आणि त्या

---

१. का. र. जून १९२४ च्या अंकांतील खरे मृत्युलेख पहा. २ त्या काळांत रा. रा. रामचंद्र भिकाजी जोशी यांनीं चालविलेलें मासिक. ३. यशवंतराय महाकाव्य प्रस्तावना पृ. ५.

प्रकाराचे हे काहीसें अनुकरण आहे. ह्यात महाकाव्याच्या लक्षणांप्रमाणे नद्या, पर्वत, अरण्ये, चंद्रसूर्यांचे अस्त व उदय, राजसभा, द्यूत, युद्ध, ऋतु इत्यादीची वर्णने करण्यास कवीस संधि सांपडत्ये. संविधानक विस्तीर्ण कल्पून मनुष्यस्वभावाची निरनिराळीं रूपे वाचकासमोर आणिता येतात. एका सर्गांत एकाच वृत्ताचे श्लोक असावे असा प्रायः नियम असल्याने पद्यरचनेकडे, एका वृत्ताच्या ८।१० कविता रचून होतांच कवीचा लय लागून जातो." कविता सोपी करण्याच्या उत्सुकतेमध्यें इतर काव्याप्रमाणे यातहि मराठी भाषेतले अगदी प्रचारातले शब्दसुद्धा त्यानीं योजिले आहेत. हे काव्य कमिटीने पास केल्यावर तीन वर्षांनी छापिले गेले !

**संविधानकासाठीं कवीनें कल्पिलेली भूमिका**—ह्या काव्यांत वर्णिलेले कथानक इ. स. १७३५ ते १७५७ पर्यंत घडले असे कल्पिलेले आहे ह्यात कांही ऐतिहासिक व्यक्तीचा नाम-निर्देश आलेला आहे हे खरें, तथापि तेवढयावरून ह्यास ऐतिहासिक मात्र म्हणता येणार नाही. कवीचा मुख्य हेतु तत्कालीन हिंदु समाजाची लोकस्थिति-निरनिराळया प्रांतातील हिंदूंची परस्पराविषयींची मनोभावना-दाखविण्याचा आहे. इतके मोठे गुंतागुंतीचे परतु अत्यंत मनोवेधक कथानक रचून त्यावर काव्य करण्यांत कवीनें कादंबरीकाराचें रचनाचातुर्यहि प्रकट केले आहे. साम्यच दाखवावयाचे झाल्यास इ. स. १५४० मध्ये उदय पावलेला ग्रथकार, 'मलिक-महमद-ज्यायसी'-एक फकीर-यानें गौडी भाषेत रचिलेल्या '**पद्मावत**' नामक काव्यग्रंथाचे नाव सांगता येईल चितोडची धैर्यशाली रजपूत

---

१. स. १८८५. २. **ज्यायसी** व त्याचें काव्य **पद्मावत** याची ही माहिती महाराष्ट्रीय ज्ञानकोश, शरीरखड विभाग १८ वा, (म) पृ. ६५ वर आहे.

वीरस्त्री राणी **पद्मिनी** हिचे चरित्र कोणा स्वाभिमानी हिंदूस अज्ञात असेल? मात्र, ज्यायसीने या कथानकास पद्मावत काव्यात वेदान्ती पेहेराव दिलेला आहे! सारांश, नामसादृश्याने ऐतिहासिक भासणाऱ्या ज्यायसीच्या काव्यात वेदान्त शिकाविण्याच्या प्रयत्नात मूळच्या अद्भुत व तेजस्वी प्रसंगाचें तेज मात्र नष्ट झालें असेल! असो. यशवंतराय महाकाव्यांत व्यक्तीची कांहीं नावें व कित्येक स्थलकालाचे उल्लेख ऐतिहासिक आहेत इतकेच. या ऐतिहासिक पांघरुणाखालीं शास्त्रीबुवांनीं त्या काळच्या हिंदुसमाजस्थितीचे चित्रपट रंगविले आहेत. रजपूत व मराठे ह्या दोन शूर व आपापल्यापरी स्वधर्मनिष्ठ जाति खऱ्या, परंतु दोघांनाहि समान अशा मुसलमान शत्रूकडून पोंचलेल्या भयंकर जाचणीगांजणुकीचा प्रतिकार करण्यासाठीं एकधर्मभावनेनें प्रेरित होऊन आपसात ऐक्य करण्याची बुद्धि त्यास कधी झाली नाहीं! ह्याबद्दल कवीला मोठा खेद वाटत असून तो या काव्यात ठिकठिकाणी आढळून येतो. त्याचप्रमाणें कवीचा देशाभिमान, त्याचे पूर्वजपराक्रमाविषयी अलोट प्रेम, आणि त्याच्या आपसांतील कलह व देशाभिमानशून्यता या दुर्गुणासंबंधीं त्याचा निरस्कार या काव्यात जागजागी व्यक्त झालेला आहे. ह्या काव्यात ज्या परिस्थितीचा उपयोग संविधानक सजविण्यास करून घेतला आहे त्या व्यापक लोकपरिस्थितीचें यथार्थ स्वरूप ध्यानांत येण्यासाठीं प्रस्तावनेंतील खुद्द कवीच्या लेखातलीं याविषयींचीं कांहीं वाक्यें[२] खालीं देतो.

" शिवाजीचें बळ महाराष्ट्रवीराच्या देशाभिमानावर व धर्माभिमानावर अवलंबून होते. बाळाजी बाजीरावाचें बळ पगारावर व लुटीच्या द्रव्याच्या आशेवर लढणाऱ्या मराठी शिपायांच्या भाल्यांवर अवलंबून होते. "

---

१. अल्लाउद्दीन मोह, पद्मिनी सद्बुद्धि, चितोड देह, इत्यादि. २. यशवंतराय म. का. प्र. पृ. १, २, ३ पहा. हीं विधानें ग्रँट्डफ्वरून केलेलीं दिसतात.

" शिवाजी शत्रूंशीं लढण्यास आपणास शक्ति यावी म्हणून लूट करीत असे. पेशवे लुटीसाठी लढाई करीत."

" शिवाजी, सभाजी, राजाराम व ताराबाई यांनी स्वतंत्रतेच्या बाण्याने वागून मोंगल बादशाहीशी वैर चालविलें. परंतु शाहूपासून पुढे होणाऱ्या मराठी राज्याच्या अधिपतींनी दिल्लीपतीशी चाकराच्या नात्यानें वागून कधीं युक्तीने व कधी दाडगाईने त्यांपासून नवीन देश व नवीन हक्क मिळविले."

"बादशहाच्या दरबारीं मराठ्याचे प्राबल्य झाल्यावर त्याच्या नावावर त्यांनी रजपूत वगैरे लोकास फार त्रास दिला."

" बाळाजी बाजीरावाच्या कारकीर्दीत मराठी सरदारांत अंतःस्थ वैमनस्ये फार माजली होतीं."

अर्थात् 'मराठ्याची रजपुताशी अन्यायाची व निर्दयपणाची वागणूक, मराठ्यांचा दिल्लीपतीशीं संबंध, आणि भाऊचा होळकराशी द्वेष, (सदाशिवराव भाऊ व मल्हारराव होळकर) या तिन्ही गोष्टीचा प्रस्तुत काव्याच्या संविधानकात उपयोग करून घेतला आहे.' ह्यातील नायक यशवंतराय याचे ठिकाणी, मराठा व रजपूत शूर शिपायांचे अंगी असणारे गुण '**इमानदारी**' व '**जशास तसें**' हे एकत्र कल्पिले आहेत. वर्णनानुरोधाने प्रसंगोपात्त जरी ह्या काव्यात शांत, भयानक, शृंगार, अद्भुत, रौद्र, करुण व क्वचित् हास्य इ. रस साधिले आहेत तरी ते अनुषंगानें आहेत. एऱ्हवी, सर्व काव्य मुख्यतः वीररसप्रधान आहे. या प्रकरणाच्या शेवटी दिलेल्या निवडक उताऱ्याचा नीट बोध व्हावा म्हणून, एकाद्या रम्य हृदयंगम कादंबरीसारखे परंतु जरा गुंतागुनीचे असलेलें या महाकाव्याचे कथानक यापुढे अमळ विस्ताराने दिलें आहे.

**यशवंतराय महाकाव्याचें रम्य कथानक**—सुभेदार मल्हारराव होळकर भरतपूरच्या जाट राजाबरोबर लढत असतां मराठ्यांचा पराभव

होऊन पळापळ झाली. त्या धामधुमीत आनंदराव डफळे नावाचा मराठा सरदार व त्याची अतिशय लाडकी, मातृविहीन, एकुलती एक, रूपवती कन्या **कमला** यांची चुकामूक झाली. इकडे एके गावीं भरतपूरच्या राजाच्या कैदेत असलेला कोटा शहरचा सावकार किसनदास याची करुणा येऊन, प्रवास करीत भटकत भटकत तेथे यदृच्छया आलेल्या आनंदरावाने पहारेकऱ्यांशी थोडी झटापट करून किसनदासास कैदेंतून सोडविले. हे सदयतेचे कार्य करीत असता आनंदराव स्वत: पकडला जाऊन कैदेत अडकला ! ! ' तूं संपत्तिमान आहेस, तिचे अनेक सदुपयोग तुला करिता येतील ते तूं कर, असे किसनदासास सांगून आनंदरावाने त्यास दानाचे परोपरीचे सुप्रकारहि सुचविले. नंतर किसनदास कोट्याकडे निघून गेला. बंदिवासांत असता स्वभावत: स्वातंत्र्यप्रिय असलेल्या आनंदरावाच्या मनात खालील सारखे विचार घोळत असत:—

**" खोलीच माझे जग त्यांत मी धनी ।**
**स्वातंत्र्य स्वप्नामधि मात्र ये मनीं ॥ १९।५२ "**
**" कारागृहीं मात्र कुडी वसे, मन ।**
**देशांतरा दूर करीत लंघन ॥ १९।५४ "**
**" त्या कोठडीच्या खिडकीतुनी वरी ।**
**पाहे तदा घार दिसे नभोऽतरी ॥**
**स्वच्छंद पंखा पसरून चालली ।**
**माझ्या मनी मत्सर–बुद्धि जाहली ॥ १९।५८ "**

पुढें चौदा वर्षांनी त्या दु:खमय बंदिवासामधून युक्तिप्रयुक्तीने आपली सुटका करून घेऊन आनंदरावाने आपल्या प्रिय कन्येचा पुष्कळ शोध केला; पण व्यर्थ ! कांही पत्ता लागेना. शेवटी तो बैरागी होऊन तीर्थयात्रा करीत फिरूं लागला !

---

१. यशवंतराव महाकाव्य, सर्ग १९ श्लोक ३२ ते ३६.

इकडे कमला बिचारी पळ काढीत चाललेल्या शिपायांसह दक्षिणेंत परत येत असता वाटेत अरवलीच्या पहाडांतील वाटमाऱ्या भिल्ल 'बादल' याच्या हातीं सापडली. हें वर्तमान शत्रूच्या मुलखातून जाताना 'जगदेवराव पवार' असे नामांतर करून माळव्यात जाणाऱ्या मल्हारराव होळकरास कळलें. त्याने आपल्या सैनिकास मराठ्याचा बाणा'—

**' कन्या स्त्रिया आमुचिया परांनी । न्याव्या अशा शुद्ध धरून रानी ॥**
**बाणा मराठा अमुचा असून । ध्यावे कसे हे तरि आयकून? ॥२०।३९॥'**

असा सांगून भिल्लाबरोबर लढाई करण्यास प्रेरित केलें; आणि आपण भिल्लाचा पराभव करून त्याने कमलेस सोडविलें. ह्या झटापटीत मल्हाररावाला २।३ जबर जखमा लागल्या. कमलेने त्याची उत्तम प्रकारें सेवाशुश्रुषा केली. मल्हाररावाच्या वाढत्या आरोग्याबरोबर गुण व स्वभावसाम्य ह्यामुळे त्याच्या व कमलेच्याहि मनात एकमेकांविषयीं प्रेमबुद्धि वाढत जाऊन ती गंधर्व-विवाहात परिणत झाली ! आणि पुढे कालेकरून कमला गर्भवती झाली.

एकदा, मल्हारराव आपल्या मुक्कामापासून चार दिवसाच्या वाटेवर शिकारीस गेला असता, दक्षिणेत बाजीरावसाहेबांचे निजामाशी युद्ध सुरू होते, तिकडे टाकोटाक निघून येण्याबद्दल पेशव्याचे त्यांस आज्ञापत्र आले त्यावरून "धन्याच्या आज्ञेपुढे मराठे सरदार घरादाराचा मोह धरीत नाहींत, मी निजामाबरोबरच्या युद्धात धन्याच्या सेवेस ताबडतोब जात आहे, माझे खरे नाव मल्हारराव होळकर; तुझ्या गुणरूपांस

---

१. मल्हाररावानें भिल्लाशीं लढताना आपल्या लोकास उद्देशून केलेलीं भाषणें अत्यंत वीरश्रीयुक्त आहेत—सर्ग २० श्लो ३७ ते ४१, भिल्लास उद्देशून श्लोक ४६ ते ५०. २. कमलेची प्रार्थना, सर्ग २० श्लो ८९ ते ९८. मल्हाररावाची शपथ स. २० श्लो० १०६ ते ११३ सर्वच वर्णनें बहारीचें हृदयगम आहे.

भुलून, जात चोरून मीं तुला फसविले ह्याबद्दल तूं मला क्षमा कर! विजयी होऊन लौकरच मी तुझ्या भेटीस येत आहे." असे पत्र एका स्वाराच्या हाती कमलेकडे पाठवून मल्हरराव परभारे धन्याच्या सेवेसाठी निघून गेला. हा स्वार भरतपूरच्या राजाच्या शिपायाच्या तावडींत सांपडून कैदी झाला¹. मल्हारराव बऱ्हाणपुराकडे गेला तो लौकर परत आला नाहीं कमलेने त्याची पुष्कळ दिवस वाट पाहिली ह्या अवधीत ती प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. तिची चाकरमाणसे धनी परत येत नाहींसे पाहून एकामागून एक तिला सोडून निघून गेली! अखेर निराश होऊन कमला बिचारी एकटीच आपले तान्हें मूल घेऊन दक्षिण-प्रांती येत असता मार्गांत तिचे फार हाल झाले. पण पुढे सुदैवाने ती कोट्यास आली तेथे तिला किसनदासाचा आश्रय मिळून ती अंशतः सुखी झाली. किसनदासाने मुलीप्रमाणें तिचे पालन केले ही बाई व मूल घरी आल्यापासून आपली खूप भरभराट झाली. तेव्हा हा या मुलाचाच पायगुण असें मानून शेटजींनी त्याचें नाव **यशवंतराय** असें ठेविलें. मुलाचा उपजत अंकुर पाहून त्याने त्याला पट्टा खेळणे, नेम मारणे, घोडयावर बसणें, इत्यादि युद्धोपयोगी शिक्षण दिले. व्यवहारांत लागणाऱ्या विद्यांमध्येहि तो प्रवीण झाला. यशवंताचा गोड स्वभाव, धैर्य, विनय, दृढनिग्रह इ. गुणांनी किसनदासास व कोटा शहरांतील लोकांसहि तो फार प्रिय झाला होता. शेटजींनी आपल्या अंतकाळी यशवतास आपल्या सर्व संपत्तीचा वारस केलें. ह्या वेळी तो सुमारे २२।२३ वर्षांचा असून नेकीनें व प्रतिष्ठेनें व्यवहार चालवी. ह्याच वेळीं कोट्याच्या राज्यकारभारात त्यास मन घाळावे लागले, तो प्रकार असाः—

---

१. त्यानें आपण कोट्याचा सावकार असें सागण्याचा बाहाणा केला तोच बाधक झाला. त्याला किसनदास समजून पकडण्यात आलें हा योगायोग!!!

कोटा प्रांतांत पूर्वी रजपूत राजांचा अम्मल होता. परंतु सांप्रत मोंगलानीं आपला अम्मल तेथे बसविला होता. या संधीस, दिल्लिरखान नावाचा मुसलमान सुभेदार कोटयास असून प्रजेस मुसलमानाचा भारीच उपद्रव असेः--

" झाला तिथे कहर कोण तयास सांगे ।
मानी मनी जळति सत्कुलवत रागे ॥ १।१५ "

" द्रव्य प्रजेजवळचे लुटण्यास याने ।
केले जुलूम भलते अधमाधमाने ॥ १।१६ "

" नेल्या स्त्रिया, मुलि, सुना, किति चारुगात्री ।
त्याने स्वये शिरुन पौरगृहांत रात्रीं ॥ १।१९ "

असो. कोटा येथें जुन्या रजपूत राजकुळातील भूषणसिंग नामक एक पुरुष हिंदु रहिवाशास अत्यंत पूज्य वाटून ते त्यास मोठाच मान देत. त्यास लीलावती व अयमसिंग अशी दोन मुले होती. एकदा दिल्लिर-खानाच्या प्रेमातल्या दाउद नावाच्या हलकट माणसाने भूषणसिंगाच्या घरात शिरून जबरदस्तीने त्याच्या सुंदर पत्नीस भ्रष्ट करण्याचा प्रयत्न केला तिने अब्रूसाठी आत्महत्या केली हा सर्व प्रकार अर्थात् भूषण-सिंग घरात नसताना झाला. भूषण ह्याने त्या घोर कृत्याचा सूड उगविण्याची पराकाष्टा केली. दिल्लिरखानाने दाउदाच्या पाठपुराव्यास पाचशें पठाण पाठविले ! तथापि, एकटा भूषण त्यांशी शिकस्तीनें लढला ! ! लढता लढता भूषण मरून गेला. पठाणांनी त्याच्या घरास आग लावून देऊन ते त्याचे प्रेत शहरच्या रस्त्यामधून ओढून नेऊं लागले ! ! ह्यायोगे कोट्यात मोठी खळबळ उडून गेली. शहरचे लोक त्वेषानें पठाणाशी लढूं लागले, तेव्हा सुभेदाराने बंडाच्या भयाने पठाणांस परत बोलाविले. भूषणसिंग व यशवंतराय यांचा परस्पर चांगला स्नेह असल्यामुळे या अनर्थ-प्रसंगी भूषणाने आपली मुले

'लीला' व 'अभय' यास यशवंताच्या हवाली करून त्यास संभाळण्यास सांगितले लीला चौदा वर्षांची असून सुस्वरूप होती. तिच्या बापाजवळ तिच्यासाठी मागणी घालण्याचे यशवंताच्या मनांत वरचेवर येई, आणि भूषणसिंगास हे त्याचे हृद्गत कळते तर त्यानें त्यास तत्काळ अनुमति दिली असती इतका त्याचा यशवंतावर लोभ होता.

कोळ्यामधील लोक मोगली सत्तेला अगदी कटाळले होते, व स्वतंत्र होण्याचा त्यांनी यापूर्वीच कट केला होता. 'भूषणा'सारख्या परमपूज्य पुरुषाच्या छळाने ह्या कटास विशेष जोर चढला. 'मित्राच्या नाशाचा सूड घ्यावा व कटात शिरून दुष्ट शत्रूंच्या जाचातून मातृभूमीची मुक्तता करावी' असे यशवंताच्या मनात वारंवार येई. ह्या विचारास त्याच्या आईने—कमलाबाईनें—पुष्टि देऊन त्या वीरकन्या, वीरपत्नी, वीर-जननीने त्यास पुढील शब्दांनी प्रोत्साहन द्यावें:—

**"जन्मास जे भुवनि वीरकुळांत येती।**
**त्या स्वस्थता घरि बसून कुठून येती?॥**
**कर्तव्य साधुजनसमत ते तयांचे।**
**लोकोपकार-सुख-रक्षण पाहण्याचे ॥ २।७१"**

**"आईल कीर्ति करुनी जरि बाळ माझा।**
**लावून नश्वर शरीर अशाच काजा॥**
**नेले न जोवरि अचित्य सुखांत काळे।**
**तत्कीर्तिदेह बघुनी निववीन डोळे॥ २।७३"**

कटवाल्यांच्या विनंतीवरून यशवंतराय त्यास जाऊन भेटला. त्यांनी त्यास आपला मुख्य पुढारी नेमिले. आपल्या रजपूत अनुयायास देशभक्तीचा, स्वकर्तव्याचा, उत्तेजनपर बोध ऐतिहासिक दृष्टान्तांनी करिताना, राष्ट्रीय दृष्टया पुण्य कशास म्हणावे व राष्ट्रीय पातकांची फळे कशी दुःखकारक असतात ह्याचे विवेचन तो पुढील पद्यांत करीत आहे:—

**" देशबांधव तुम्ही सगळे मम । देशमुक्तिकरितां करितां श्रम ॥**
**हेच पुण्यकर युक्त तुम्हां असे । यास पूर्ण मम संमति येतसे॥ ३।३३"**

**" आळशी बसुन शांत गृहांतरीं ।**
**झोप ही धरिलि आज दिनावरी ॥ ३।३७"**

**" भासली न परतंत्रपणा बिडी ।**
**दे अतां परम कष्ट घडोघडी ॥३।३९"**

नंतर या लोकास युद्धाची तयारी करण्यास सांगून रायाने सुरक्षिततेसाठी भूषणसिंगाची मुले जोधपुरास पाठविलीं व रजपूत राजास मोंगलाविरुद्ध उठण्यास त्याने प्रबोधक पत्रे लिहिली दिल्लिरखानास कटाची गुणगुण लागताच 'ह्या बंडाचा बीमोड करण्यासाठी सैन्याची मदत पाठवावी' म्हणून त्यानें दिल्लीस बादशहास पत्र लिहिलें. त्याने परत निरोप पाठविला की, " आम्हापाशी मदतीस पाठविण्यास फौज नाहीं, परतु आमचे दोस्त पेशवे सरकार याचे बलाढ्य सेनापति मल्हारराव होळकर ह्यास साठ लक्ष रुपये देऊं करून कोट्याचे बंड मोडून रजपुतास शासन करावे व खंडणी वमूल करावी असा करार करून देऊन मदतीस पाठविलें आहे."

ह्या बादशाही निरोपाप्रमाणे मल्हारराव कोट्यावर चालून आला व शहरास मराठा सैन्याचा वेढा पडला. लोक घाबरले !! मल्हारराव स्वत: वेषांतर करून बातमी काढण्यास शहरात आला असता सावध व धूर्त यशवंतरायाने त्याला ओळखून सुद्धां उदार मनानें त्यास परत त्याच्या छावणींत जाऊ दिले. यापूर्वी एकदां, जमल्यास लाच देऊन, किंवा दिल्लीपतीच्या सामर्थ्य-वर्णनानें भिववून, कटामधून रायास फोडावें, नाही पेक्षा त्यास दगा करावा, अशा मतलबाने 'आपल्या जिवास अपाय होणार नाहीं' असे रायाकडून अभय वचन घेऊन दिल्लिरखान त्याच्या

---

१. हा संवाद उत्तम आहे. सर्ग ८ श्लोक ४० ते ६०.

वाड्यात भेटीस आला सामदानादि उपाय हरल्यावर संकेताप्रमाणे खानाचे लोक रायावर तुटून पडणार तोच रायाचे रजपूत भाई 'दोहन' प्रभृति एकदम सशस्त्र प्रकटे होतांच खान घाबरला. पण आपण अभय दिले आहे, या इमानास जागून रायाने खानास सुरक्षित परत जाऊं दिले ! ! इकडे पेशव्यांस 'आपण मराठा सैन्य परत बोलवावे' अशी विनंति करण्यासाठी रायानें आपला चतुर व विद्वान् गुरु अनंताचार्य यास पेशव्याकडे वकील म्हणून पाठविले. सदाशिवरावभाऊ व होळकर याचें वांकडे असल्यामुळें अनंताचार्यांनी भाऊंकडे संधान बांधिले नानासाहेब पेशवे भाऊंच्या सल्ल्यानेच वागत. पेशव्याना, वकिलाने समजाविलेल्या हकिकतीवरून यशवंतरायाचे वर्तन हिमतीचें वाटून मोठा सन्तोष झाला. आणि 'लढाई बंद करून यशवंतरायास कोट्याच्या राज्यपदावर बसवून त्याशी सख्य करावे,' असा हुकूम पेशव्यानी होळकरास पाठविला ! व रायास काही जहागीर देऊं करून वेळी प्रसंगी त्यानें आपल्या सैन्यात सरदारी करावी असे ठरविले.

दरम्यान दिल्लिखानाने 'बादल' भिल्लाला यशवंतरायावर मारेकरी योजून पाठविले. रायाने बादलाशी द्वंद्वयुद्ध करून त्यास[2] ठार केले. मरतां मरता या दुष्कर्मास आपणास त्या खानाने प्रवृत्त केल्याचें बादलानें कबूल केले. यामुळें क्रोधसंतप्त होऊन रायाने बादलाच्याच वेषात, मराठ्याच्या छावणीतच खानाचा तंबू होता त्यात शिरून खानाच्या अनंत अपराधाबद्दल त्याने त्यास देहान्त प्रायश्चित्त दिले ! ! ! जणूं काय यश आपल्या हातचेच आहे अशा घमेंडीत राहून खान किती बेसावधपणे वागत होता हें पुढील पद्यावरून कळेल.

---

१. हें वर्णन वीररसप्रधान आहे. सर्ग ६ श्लोक ८२ ते ९६. २. या प्रसगीं रायाचा उदार स्वभाव उत्तम व्यक्त झाला आहे. एकदर प्रसंग मोठा गभीर आहे. सर्ग ११ श्लोक ४७ ते ५४.

" कोंचावरी खान खुशाल बैसला ।
हुका मुखा लावुन ओढितो भला ॥ ११।८८ "
" तो मद्यपाने बहु धुंद दिलिर ।
पाहे पुढे बादल जोडुनी कर ॥ ११।८९ "

खाँसाहेब बादलवेषधारी यशवतास ओळखूं शकले नाहीत आणि त्यांचे अनुचरदेखील सारे तसेच ! बेफिकीर, बेदाद, बेपर्वा ! ! त्या वेळी खाँसाहेब वेषधारी बादलास—खुद्द रायासच—विचारितातः—

" कां आणिले नाहिस शत्रुचे शिर ? ।
झाले मला जे असते सुखाकर ॥ ११।९३ "
" स्वच्छंद मी त्यावर बा ! न नाचलो ।
नाही स्वलोकीं स्तुतिपात्र जाहलो ॥
मीं पाठवीलें असते तया शिरा ।
भाल्यास टोचून सखे दिगंतरा ॥ ११।९४ "

पेशव्याचा हुकूम पोचण्यापूर्वी मल्हाररावाने सुरुग लावून कोट्याचा पुरातन भक्कम तट पाडून शहरात घुसून कापाकापी, जाळपोळ, पाडापाड, धरपकड, करून अगदी कहर माडिला ! ! तटावर तोफांचा मारा आरभी केला होता. तथापि, त्याचा कांहीएक उपयोग झाला नाही. यावरून केलेल्या मार्मिक उत्प्रेक्षा पाहा.—

" नेत्रकटाक्षीं पाहे जैशी रंभ ।बुधा शुका मोहूं ॥
ब्रह्मानंद-परायण परि तो योगींद्र काय वदतो हूं ? ॥ १०।१७"
" तैशाच मराठ्यांच्या तोफा भंगावया तटा बघती ॥
पोक्त वयें वृद्ध असा·स्थिर साहे तट विडंबना मग ती॥१०।१८"
"कीं गलबलाट ऐकुनि पोरींचा कोप पावला वृद्ध ॥
धिक्कारुनि डौलाने राहे जाग्यावरी उभा क्रुद्ध ॥१०।१९"
"आपटून दिनरात्र गोलक । जाहल्या तटिं खुणा भयानक ॥
तो जनांस निजदुःख दावितो । डागलां महिष काय भासतो॥ १५।२०

रजपूत लोक समागमे घेऊन यशवंतराय मराठयाशीं निकराने लढला. परंतु होळकराच्या प्रचंड सेनासमुद्रापुढें कोटयातील मोजक्या लोकांचा निभाव लागणे शक्य नव्हते. इतर रजपूत राजाचे सहाय्यहि कोणत्याच प्रकारे मिळालेले नव्हते. व यापुढेहि ते मिळण्याची काही अशा दिसेना.

तेव्हा, निरुपाय होऊन यशवंतराय, आपल्या रजपूत स्नेह्यांच्या आग्रहामुळें एकटाच जोधपुराकडे निघून जात असता मल्हाररावाने त्यास पकडण्यासाठी पाठविलेल्या लोकांच्या हातात सापडला.[१] ते लोक रायास धरून परत होळकराच्या छावणीत नेत असता मार्गांत त्यास एक बैरागी भेटला. त्या बैराग्यास रायाचें इत्थंभूत वर्तमान समजताच, 'उद्यां तुला आनंद भेटेल' असे रायास सांगून तो बैरागी रातोरात होळकराच्या छावणींत येऊन मल्हाररावास भेटला हा बैरागी म्हणजे तीर्थयात्रा करीत फिरणारा आनंदराव डफळेच होय. पहिल्या पराभवाच्या वेळी एकमेकांची ताटातूट झाली त्या वेळेपासून आतापर्यंत घडलेली परस्पराची हकीकत समजून उभयतांहि परस्पराच्या दुःख-संकट-प्रसंगाच्या स्मृतींनी मधून मधून क्षणमात्र विव्हल होत. पण, सांप्रत प्रत्यक्ष भेट झाल्यानें '**एति जीवन्तमानंदो नरं वर्षशतादपि।**' या वचनात म्हटल्याप्रमाणे ते दोघेहि हर्षभरित झाले मल्हाररावाला तर प्रिय कांता कमला जिवंत आहे व तिचा पुत्र तोच कोटयाचा पुढारी प्रथित-पराक्रम यशवंतराय होय, हे ऐकून हर्षातिरेकानें वेड लागण्याची पाळी आली !! अखेर यशवंतरायाची सुटका, कमलेस पति, पुत्र, पिता, ह्याच्या अनपेक्षित एकदम भेटी व कोट्याच्या लोकांस स्वातंत्र्य-प्राप्ति होऊन सर्वांस आनंद झाला.

---

१. यावेळी भिल्लानी केलेली कपटयुक्ति विस्मयजनक आहे. यशवंत ह्या प्रसंगीं परोपकार करण्याच्या प्रवृत्तीमुळे त्याच्या कपटजालात अडकला सर्ग १६ श्लोक ३४ ते ४० व ५२ ते ६३.

वकिलीत यशस्वी झालेले अनताचार्यहि पुण्याहून परत आले आणि ज्या हुकमाने इतर प्रसंगी मल्हाररावास अतिशय चीड आली असती त्यासंबंधी मल्हारराव--

" म्हणे :—मला हर्ष असा कसा दिला ? ।
सदाशिवे साधुन डाव आपला ! ! ॥ २४।२६ "

" अनिष्ट माझे दिनरात्र चिंतिता ।
नसून इच्छाहि करी महा हिता ॥
समुद्र झुंजे गिरिशीं कधीं कधीं ।
अनर्घ्य रत्नें विखरी शिळांमधी ॥ २४।२७ "

" मला जरी वागवितो अरीसम ।
सदाशिव प्रीतिस पात्र हा मम ॥
सुतास माझ्या यशवतराजया ।
समृद्ध केले करिता मदप्रिया ॥ २४।२८ "

असो. यशवंत कोट्याचा धनी होणार हे ऐकून तेथील नगरवासी अतिशय संतुष्ट झाले. तथापि, न्यायी व परमोदार रायाने जोधपुराहून भूषणसिंगाचीं मुले परत आणवून त्याने अभयसिंगास कोट्याच्या गादीवर बसविलें व त्यास पूर्वी दिलेला पुढील आशीर्वाद त्यानें आज खरा केला:—

" तोफा आगमनोत्सवार्थ सुटती भेरी भरे वाजती ।
गाती मंगल गीत बंदिजनही वारांगना नाचती ॥
अंबारीवरि पौर वर्षति फुले सोन्यारुप्यांचीं सुखे ।
येणे यापरि जन्मभूमिस तुझे होणार बा ! कौतुके ॥ ४।४७"

उलट, अभयसिंगानेहि लीलावतीचे मनोगत जाणून आणि मंत्री-प्रधानांच्या अभिप्रायास अनुसरून कृतोपकारार्थ रायाचे अल्पमात्र उतराई व्हावें या हेतूने लीलेचें पाणिग्रहण करण्याविषयी त्याने नम्रपणें

रायास प्रार्थना केली. रायानें मोठ्या आनंदानें ह्या गोष्टीस रुकार दिला हें सांगावयास नकोच. यशवंतरायाचें हे श्लाघनीय भाग्य भाटादिकांनीं खालील श्लोकांनी गायिलेः—

[1]" त्वद्बाण दंडि बलगर्वित शत्रु भारी।
तूं कालिदास असुनी भवभूति-धारी ॥
श्री-हर्ष दायक अम्हां सकलां सुबंधो ! ।
साष्टांगपात करुनी तुज लोक वंदो ॥ २४।३७"

" अग्न्यत्रिपुत्रविधिशंकरशंभुजांहीं ।
जीं दोन तीन आणि चारहि पांच साही ॥
वाटे मुखे धरिलिं जाणुन याच भावा ।
एक्या मुखे तव गुणस्तव केवि व्हावा ! ॥ २४।३८ "

असो. ह्याप्रमाणें कोट्यात स्वराज्य झालें, कमला व मल्हारराव माळव्यांत निघून गेली, आनंदराव आपल्या नावाप्रमाणे सर्वत्र आनंदी-आनंद करून पुन: तीर्थाटनास गेले, लीलावतीसह यशवंतराय सर्वांस स्फूर्तिदायक असा संदेश अगर प्रत्येक आर्यपुत्राचे ध्येय —

" निशाण भगवे करीं धरुनि रामदासार्पित ।
स्वराज्य पसरीन मी करिन पूर्वजां तर्पित ॥
बलाढ्य यवनांसवे झगडतां जिथे अर्पिला ।
स्वदेह मम पूर्वजीं मजसि तोचि जागा भला ॥ २४।५६"

असे असावें व मीहि ह्यास अनुसरून वागेन असें सांगून आणि आपल्या प्रिय मित्राचा निरोप घेऊन आपल्या जहागिरीवर जाऊन पेशव्याच्या सेवेस सादर झाला.

---

१. ह्या श्लोकांत, बाण, दंडी. कालिदास भवभूति श्रीहर्ष व सुबंधु ह्या नामांकित संस्कृत कवींचीं नांवें अर्थहानि न होऊ देता साधिलीं आहेत.

**यशवंतराय महाकाव्यांतलि निवडक वेंचे**—ह्या काव्यांत व्यक्तीच्या रूपवर्णनाचे, निरनिराळ्या निसर्गशोभांचे, शहरें व अरण्यें ह्यांसंबंधींचे जागजागीं विखुरलेले वेंचे व इतर नानाविध विषयांवरील मनोरम पद्यरचना विपुल आहे. वाचकांच्या जिज्ञासेस्तव त्यांपैकीं कांहींचे लहान लहान उतारे येथे घेतलेले आहेत

संविधानकामध्ये आलेल्या कांही ठळक व्यक्तींची रूपे:—

**यशवंतराय** :—" रम्याकृती नयन सुंदर थोर काळे ।
त्यांतून तेज भंवते बघतां झळाळे ॥
बाहू बळी सरळ नाक कपाळ थोर ।
छाती विशाळ विलसे तनुवर्ण गौर ॥ २।१८ "

**मल्हारराव** :—" घारीप्रमाणे बहु तीक्ष्ण नेत्र ।
बांधा बळी उंच शरीर गौर ॥
छातीमधे रुंद मुखीं उभार ।
अंगावरी शोभति आठ वार ॥ ८।३९ "

**कमला** :—" गोरा सुवर्ण न सुवर्णन होय ज्याचे ।
आकर उंच मुख वर्तुळ होय तीचे ॥ २।६२ "
" होते जरी तिजसि वर्ष न चाळिसावे ।
दुःखे उतार वय तीस परी दिसावें ॥ २।६३ "

पण, हीच कमला मराठे शिपाई वाड्यांत शिरलेले पाहून रागावते व ती सशस्त्र होऊन त्यास प्रतिबंध करिते तेव्हा:—

" डोळे सुंदर लाल ओठ हलती गालांस लाली चढे ।
काळे कज्जलतुल्य केश रुळती खांद्यावरोनी पुढें ॥
क्रोधे शब्द फिरे हत्यार तळपे हातीं अशी आकृति ।
जाती नेत्र दिपून पाहुन मग स्वस्थानिं ते थांबती ॥ २२।६७

बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे:--

"बापाप्रमाणें अति रम्य मूर्ति। होती तयाची बहु शांत वृत्ति॥
काळे तया किंचित थोर डोळे। जे धूर्ततादर्शक तेज खेळे॥ १३।३२"

"सुदैव ते दावित थोर भाळ।
बाहू तयाचे दिसती विशाळ॥
उभार आकार न पुष्ट भासे।
नाना असा त्या दरबारिं बैसे॥ १३।३३"

लीलावतीची मुग्ध प्रेमदृष्टि:--

"लीलावती न वदली वचनास कांहीं।
खालीं सलज्ज मुख घालुन रम्य राही॥
ती एकदांच यशवंत-मुखास पाहे॥
लाजे पुन्हां किंतिक सुंदर दीसताहे॥ ४।३४"

"लज्जा जरी करि तिच्या रसनेस बद्ध।
वक्तृत्व सर्व नयनेच करी प्रसिद्ध॥
की प्रेम, लाज, भय, काळजि हे विकार।
दृष्टींत त्या प्रकट होउन राहणार॥ ४।३६"

स्वारांच्या घोड्याचें अगदी अनुरूप असे वर्णन:—

"उभारून डोळे वरी नीट कान।
वरी तोंड खिंकाळती जे करून॥
जरी वीस चालोनियां कोस आले।
तरी अश्व हे थोर वेगे निघाले॥ ९।४"

"तिरासारिखे एक रेषेत जाती।
तसे नीट जातील वाटे दिगंतीं॥
जमीनीस लागेल पाऊल कैसे।
हवेतून नेती मनुष्यास भासे॥ ९।५"

कोट्यामधून दिल्लिरखान पळून गेला त्या वेळी पळत सुटलेल्या मुसलमान स्त्री-पुरुषाची धांदलः—

“ रिपुस्त्रिया घेउन बालके करीं ।
पथांत येती पडती पदांवरी ॥
रडूनियां प्रार्थिति जीव-रक्षणीं ।
वरी पहाती भयलोल दृष्टिनीं ॥ ७ ।१६ ”

“ मनोहर श्रीयुत गात्र कांपते ।
विलोचनीं लोचन-वारि चालते ॥
धडाडला धाक उडे उरःस्थळ ।
दिसे जयांची मुखकांति विव्हळ ॥ ७।१५ ”

ह्या लोकांस यशवंतरायाचे अभय-वचन —

“ पुरांत जे म्लेच्छ अजून राहती ।
न कष्ट होतील तयांस संप्रती ॥
परंतु जाण्यास इथून ज्यां मन ।
सुखेंच जावोत न त्यांस बंधन ॥ ७।१९ ”

चांदण्या रात्रीची शोभा व चंद्रबिंबावरून उत्प्रेक्षाः—

“ पारिजात फुलले सुर-काननीं ।
हीं फुले विलसती गमले मनीं ॥
की हिरेजडित सुंदर सुंदरी ।
भूषणे विमलकांति निशा धरी ॥३।४ ”

“ उंचसा गगन-मंडप थोर हा ।
बांधुनी रुचिर आवडिने पहा ॥
रात्र पाजळुन दीपक तारका ।
वाट पाहि पतिची अति उत्सुका ॥ ३।६”

" मोडी करी जो भुवन क्षणामधीं ।
दुग्धांबुधी तो घुसळी स्वये विधी ॥
हा ठेवितो काढुन यत्नपूर्वक ।
आकाशपात्रीं नवनीतगोलक ॥११।७१ "

" पाटांतुनी निर्मळ पाणि वाहते ।
त्यांतून चंद्रप्रतिबिंब शोभते ॥
डोळयांवरी अद्‌भुत तेज तो पडे ।
पाराच हा लोळत चालिला पुढे ॥ ११।७४"

श्रीशिवाजीमहाराजाच्या किल्ल्यावरून केलेल्या कल्पना:—

" गरुड तो शिवभूपति यांवरी ।
रचुन दुर्ग पहा घाटीं करी ॥
तिथुन घालुन झेप दिनोदिन ।
लुटित देश करी रिपुमर्दन ॥ १२।३० "

" शिव अचाट अशी करणी करी ।
स्वरिपु जिंकुन थोर यशा वरी ॥
म्हणुनि तत्स्मरणार्थ असे भले ।
विजय-दर्शक खांबच रोविले ॥ १२।३२ "

जुन्या काळी पुण्यांत लोक कसे होते¹:—

"धरुनियां तरवार सखी करीं । भरुन चंदन रक्त तनूवरी ॥
रणवनीं यशहंस धरावया । रसिक वीर तयार पुण्यांत या ॥ १२।४२"

"फिरुन आठ दिशांस सुपंडित । करुनि खंडित सद्गुण मंडित ॥
विविध शास्त्रवनांतिल केसरी । दुरुन येउन राहति या पुरीं ॥१२।४३"

"मधुर, निर्मल, सौम्य, सरस्वती । सुकवि जे वदनांतुन काढिती ॥
करिति संतत संत सुवर्णन । लुटुन नेति पुण्यांतुन या धन ॥१२।४४"

---

१. नव्या पुण्याचें वर्णन मागें चरित्रात आलें आहे तें येथूनच घेतलेलें आहे.

चित्रकाव्य आणि हास्यरस --

"अल्ला रहीम बिसमिल्ला[1] असा करिति गिल्ला समस्त यवन ।
मल्लां चढे स्फुरण हल्ला करूं म्हणति कल्लाच जाय उडुन ॥
सल्लालन-प्रमति बल्लाळभूपभट मल्लांस घालिति कर ॥
सल्लाभ मानुनिच सल्ला विचारिति न मल्हार घे पथकर॥११।९९"

"पोटें पराने फुगवून तट्ट । खुशाल येथे बसतात भट्ट ॥
हे मठ्ठ बुद्धींत, शरीरिं लठ्ठ । दानालयीं दाविति घट्ट हट्ट॥१३।१५"

तुमुल युद्ध झाल्यानंतरचे भयानक वर्णन:--

"रस्त्यांत राशि पडल्या प्रेतांच्या परि न शत्रु घालविले ॥
जाऊन चंबळेच्या उदकीं रक्तप्रवाह कालविले ॥ १४।८७"

"गोळे धडाड पडती एकसरे तोफ देत दर बाजे ॥
बहुधा यमें उघडिले नगरीचे आज सर्व दरवाजे ॥ १४।८८"

"जों जो तट कोसळतो तो तो तो धडधडाट रव घडतो ॥
दु:खा येति उमाळे कीं जाणो तट पुन: पुन्हां रडतो ॥१४।६८"

"कांहिं उंच मजले सुखावह । तोफमार न साहुन दु:सह ॥
कोंसळून पडतात भूमिला । शत्रुच्या नमिति काय पावलां ॥१५।२५"

मल्हाररावाची बाळपणची स्मृति-गुराखी मुलाचे सुख:--

"वाटे पुन्हां होउन मी लहान । आहे गुरें राखित गात गान॥
तापी नदीचे बहु रम्य तीर । आहेत तेथे कुरणेहि गार ॥ २०।७०"
माझ्या सुखी शांत दुधाळ गाई । घेऊन मी त्या कुरणांत जाई ॥
पांवा मुखीं लावुन वाजवीत । मी बैसलो धेनुस रंजवीत ॥ २०।७१
"पाणी जिथे सुंदर गार गोड । मी पोहण्याचे पुरवीन कोड ॥
सोडून कांखेमधली शिदोरी । मी बैसलो कोण मला विचारी॥२०।७२"

---

१. समुद्र काव्यातील २१ वा श्लोक याच भासल्याचा आहे.

अरवलीच्या पहाडातील वनशोभाः—

" भोवतीं आरवली-गिरी-दरी ।
कमणूक बघतां वनें करी ॥ १५।६६ "
" गौर गोंडस कळे विकासते ।
लाजवीति युवती-कपोल ते ॥ १५।६८ "

" इंद्रनीळसम नीर सुंदर। धांवताल खडकांत निर्झर ॥
आपटून दगडांत पाझरे । वारि हे पसरले जणो हिरे॥१५।७०"
"ग्राम्य-वन्य-फल-पुष्प-शोभित। वृक्ष भूमिस लवून पावत ॥
पाहुणाच यशवंत ये घरा। देति त्यास मुजराच हा खरा ॥१५।७१"

रानातील पशूंची तारांबळः—

" उड्डाण घेति हरणे मग ताडताड ।
धांवून भीत वृक होति तरूंस आड ॥
आवेश रानडुकरांस परंतु आला ।
ते गर्जती उडविती वरती धुळीला ॥ १६।२१ "
" रोरावले बनकरी थडकास देती ।
कोल्हेकुई करुनि दूर पळून जाती ॥
भ्याला पळे तरस लंगडशाहि घाली ।
गर्दी अशी उठुन एकच रानिं झाली ॥ १६।२२ "

वीरमाता कमला पुत्रविरहाने व्याकुळ होते. तिचा शोकः—

" यशवंत धरी अशी गती। तुज आधार कुठें सरस्वती ?॥
सुभगे ! कमलालये ! तुला। वर कोठून मिळे असा भला ॥२२।५२"
" विनया परदेशिं जा फिर। करुणे ! स्वर्गपथास तूं धर ॥
रणशौर्य पळो जगांतुन। करितें कीर्तिस कोण बंधन ? ॥ २२।५३"

---

१. वने बघतां ( यशवत ) करमणूक करी.

आठ दहा भिल्लांशीं लढणारा एकटा यशवंतराय:--

[1]" तो वीर्यशालि हिसकाहिसकींत धाडी ।
चौघांस दूरवर भूमितळास पाडी ॥
लातेत सांपडुनही पडती कितीक ।
ही शक्ति पाहुन अरी धरितात धाक ॥ १६।५९ "

किंवा, " तो एकदांच उठले सगळेहि भिल्ल ।
चालून जाति धरिती यशवंत मल्ल ॥
झिंजाडि देउन तयां ढकलून दूर ।
बाहेर जाउं बघतां करि मार्ग शूर ॥ १६।६२ "

आनंदराव डफळे साधु बैरागी वेषात:--

" माथा जटा पिंगट जूटबद्ध । रुद्राक्ष कंठी श्रवणांत नद्ध ॥
शोभा धरी भस्म ललाट-देशीं । आकाशगंगा गगनांत जैशी ॥ १७।१३"
" नाना प्रकारे तप आचरून । तीर्थाटने संततही करून ॥
लागे दिसूं दिव्य शरीरकांति । पाहून ती नेत्र दिपून जाती॥ १७।१६"
" अंगावरी घेउन दिव्य-शाल । व्याघ्रासनीं बैसतसे खुशाल ॥
चाले मुखीं मंत्र पवित्र कांही । रुद्राक्ष-माला फिरवीत राही॥ १७।१७"

अनंताचार्य वकील प्रवास करीत असता:--

" झळक मंदिल सुंदर डोकिला । धवल वेष शरीरिं खुले भला ॥
असुन शांत सुकांति मुखावरी । वय उतार शरीर बळी परी ॥ १२।१२"

" सकळ शास्त्रविचारपरायण ।
सुवचनां करिता हरिता मन ॥ १२।१३ "

" द्विज अनंत असा सकलांपुढें ।
दवडवी स्वहया दुडक्या पदें ॥ १२।१४ ॥ "

---

१. हे वर्णन वाचीत असता होरेशस्मधील •वीर-वर्णनाचे स्मरण होतें.

रजपूत स्त्री-पुरुषाचे धैर्य व शौर्य:--

" स्त्री बोलली पतिस-' मार पठाण सार ।
साहित्य साग करण्यास मला सख्या रे ' ॥
बंदूक देइन भरून तुझी कट्यार ।
आणीन साग तुज काय रुचे हत्यार ' ॥ १।५० "

" रक्तबिंदुहि तनूंत उरेल या । जाउं जोवरि अम्ही न पुरे लया ॥
तोंवरी तुजसवें करुं राहणें । अर्पिली तनु, धने अणखी मनें ॥३।४५"

" झुजणार मर्द करणार कीर्तिला ।
अति शूर जाणति न मृत्यु भीतिला ॥
बसले तिथे अचल काय पर्वत ।
करि इंद्र ज्या समयिं पक्ष खंडित ॥ १८।४० "

" जमीनीस कोटयांतल्या रक्त वाहूं ।
मरूं जागच्याजागिं येथेच राहू ॥ ९।३६ "

" तुम्हां वाटलें दावितां भीति मात्र ।
पळूं टाकुनी हातचें काय शास्त्र ? ९।३७ "

रायाच्या वाडयांत दिल्लिरखान दगा करण्याच्या कपटबुद्धीने आला असतां यशवंतरायाचा सावधपणा व धूर्तता.--

" सिंहाप्रमाणे करि गर्जनेला ।
वाडा तयानेंच घुमून गेला ॥ ६।८१ "

" मारी बळे लात दणाण वाजे ।
' या वीर हो ! ' जों यशवंत गर्जे ॥ ६।८६"

"गेल्या दुभंगून महालिं भिंती ।तिथें दिसूं लागति आंत मूर्ती॥६।८७"

"केला गदारोळ महाभटांनीं । विकोश केल्या तरवारि त्यानीं॥६।८८"

या प्रसंगीं खानाचें मरण केवळ रायाच्या औदार्यामुळें टळलें ! !

मल्हाररावाचे यशवंतरायाविषयी वात्सल्यभावयुक्त उद्गारः—

" हंसावे, बोलावे, क्षणभरि बसावे न निचळ
रडावें, रांगावे, दुडुदुडु पळावे हि चपळ ॥ २१।३७"

" तुला अंकीं माझ्या बसवुनि शिकूं साह्य करणे ।
तुवां केल्या प्रश्नां परिसुनि विचित्रांस हसणे ॥
तुवां जे मागावे धरुन हठ त्याते पुरवणें ॥
न होते हें दैवी म्हणुनि गमते व्यर्थच जिणे ॥ २१।३८"

सुखदुःखमिश्रित स्मृतिकथा चालू असताः--

" विविध मिळति जैसे रंग एके ठिकाणीं ।
पसरिति निज कांती एकमेकांवरोनी ॥
परि न उणिव येते तत्प्रभेला तयाने ।
सकळ खुलति एका ठायिं तें कोण वाने ! ॥ २३।२६ "

संस्कृत कवींच्या कल्पनाचें सुंदर रूपांतरः--

" ज्या ठायीं बसुन बलाढ्य सिंह गर्जे ।
तो सिंहध्वनि भुवनांतरांत गाजे ॥
तो, त्याचे कुलजहि, जाति काळ चाले ।
या ठायीं वसति करीति आज कोल्हे ॥ ५।१५ "

" हत्तीते कमलांतल्या मृदु अशा जो तंतुंनी बांधिता ॥
झंजावात धरून एक समयीं जाळ्यामधें कोंडिता ॥ ५।५३ "

" अशा गोष्टी तेथे स्मरुनि करिती मागिल कथा ।
निशा गेली सारी हळुहळु कथा त्या न सरतां ॥
उजाडाया झालें, अरुण उगवे, कांति पसरे ।
सुटे वारा पक्षी किलबिल करीती सुखभरे ॥ २३।४४ "

साधुपुरुषाचा उपदेश:—

“सरळ सुरस साधी साधुची पोक्त वाणी ।
अमृत मधुर आणी शांत सद्भाव-खाणी ॥ २३।३३ ”

“ किति जरि जागि दुःखे येउनी वर्षतात ।
प्रभु जपत मनुष्यां द्यावया हर्ष तात ॥
परि सहज न होतो ईश्वराचा प्रसाद ।
स्मरण मनिं तयाचे पाहिजे नित्य गाढ ॥ २३।३७ ”

“ प्रभुकर निज भक्तां रक्षण्याला समर्थ ।
अनय सहन त्याते लेश नाहीच होत ॥
सतत भय निवारी संकटी वाट दावी ।
किति तरि करुणा त्या ईश्वराची वदावी ! ॥ २३।३८ ”

दिलिरखानाने घातलेले दिल्लिपतीचे भय व त्यास रायाचें उत्तर :—

“ कां तू बळे कोपवितोस सिंह । जाणूनि कां ओढिसि हव्यवाह ? ”
दर्पांध सर्पास न भीसि काय ? । ऐशा कृतीने वदशील हाय ! ॥ ६।४० ”

“ माझी असे जन्ममहीच माता । अत्यंत ती पूज्य अम्हां समस्तां ॥
येतां तुम्ही तीस विटाळ झाला । तो पाहिजे दोष अशेष गेला ॥ ६।६१ ”

“ स्थानीं जया पुण्यद यज्ञ व्हावे । धर्मासही उज्ज्वल रूप यावे ॥
ते दूषिले बांधुनियां मशीदी । हे शल्य कैसे मज दुःख नेदी ।। ६।६२ ”

“ स्वातंत्र्य माझे मजला मिळाले । झालो दरिद्री तरि काय गेले ? ॥
मेलो तरी मत्सम अन्य लोक । होतील देतील तुम्हांस शोक ॥ ६।७४ ”

स्वराऱ्याचे निशाण —

“ बघावया सुंदर केवि ते दिसे ।
पुरांतली धांवति वृद्ध माणसे ॥
सुखाश्रु येतात अलोट लोचनीं ।
स्वराज्य सौख्यें भरती पुन्हां मनीं ॥ ७।२३ ”

**उपसंहार**—वर घेतलेले उतारे, ह्यात नाना प्रकारच्या काव्य सौष्टवाचा समावेश करावयाचा असल्यामुळे अगदीं तुरळक आहेत म्हटलें तरी चालेल. काव्याच्या रसिक अभ्यासकाना अशली आणखी विपुल सामग्री या महाकाव्यांत सांपडेल हे सागावयास नकोच येथे दिलेल्या उताऱ्यांवरून वाचकाच्या ध्यानी येईल की, शास्त्रीबुवाच्या कवितेचा ओघ शरदतूतील नदीप्रवाहासारखा प्रशस्त, स्वच्छपणामुळें प्रसन्न, अखंड व संथ असा चाललेला असतो. शब्दालंकारापैकी अनुप्रास अगदी पदोपदीं आढळतो. पण, तो इतका सहज साधलेला असतो की, त्या योगे काव्यात कृत्रिमतेचा भास कोठेच होत नाहीं तसेच उपमा, उत्प्रेक्षादिकात नुसते जुन्याचे कनुकरण नसून नवीन कल्पनाहि बहुत आहेत. उदाहरणार्थः—तारकास पारिजातक फुलाची, चंद्रास सोण्याच्या गोळयाची, पाटांतून वाहणारे व चंद्राच्या प्रतिबिंबामुळें चमकणारें निर्मल निर्झरोदक त्यास लोळत जाणाऱ्या पाण्याची, आणि यशवंतरायाचा आमूलाग्र वृत्तान्त ऐकत असता आनंदाश्रु ढाळणाऱ्या आनंदरावाच्या पांढऱ्या शुभ्र दाढीतील केसांवर अडकून राहिलेल्या अश्रूंस अनुलक्षून, कार्तिकातील शुष्क तृणाग्रावर थबकून स्फटिक-लोलकांप्रमाणे शोभणाऱ्या दंवबिंदूंची दिलेली उपमा—ह्या साऱ्या उपमा बहुतेक नवीनच, तथापि, त्या समर्पक व मनोहर नाहीत असे कोण म्हणेल?

साहित्यशास्त्राच्या दृष्टीने ह्या महाकाव्याचें आणखी अनेक अंगांनी विवेचन होणें अवश्य व शक्य असलें तरी ती गोष्ट अधिक जबाबदारीची, श्रमसाध्य व म्हणून काहीशी आवाक्याबाहेरची समजून प्रथमच, आम्ही गुरुवर्यांच्या ग्रंथांचा परिचय फक्त करून देण्याचे ठरविलें आहे. शिवाय, वरील वेचे वाचीत असता होणारा आल्हाद या रुक्ष शास्त्रीय चर्चेपेक्षां खात्रीने किती तरी पटीनें अधिक ठरणार! जसे, प्रत्यक्ष जिलबी खात असता तिचा स्वाद अनुभवण्यास खाणारास ती करितात

कशी हे माहीत नसलें तरी कांही हरकत येत नाही. मात्र, त्याने आपल्या घरी आपण हे पक्वान्न करावयाचें असे मनांत आणिलें तर ह्या माहितीची उठाठेव करणे त्याला प्राप्त आहे ह्यांत तिळप्राय शंका नाही. तथापि, एकाद्यानें त्या पदार्थाच्या बनावटीची सारी प्रमाणे पाकशास्त्राधारें तोंडपाठ करून सुद्धां आणखी उणीव राहातेच! ती म्हणजे 'हातगुण पाहिजे.' नाही तर काय उपयोग? काव्यासंबंधीचा हा हातगुण म्हणजे 'सहजस्फूर्ति,' हिला सहजासहजी कोण कसा स्वाधीन करून घेणार? साराश, सर्वसाधारण वाचकवर्गास ह्या साहित्यचर्चेचा फारसा उपयोगहि असत नाही; असो.

या काव्यामध्ये काव्यगुणाबरोबरच वर्ण्यविषयहि मनोवेधक आहेत हें लक्ष्यांत ठेविले पाहिजे रायाचे औदार्य, पराक्रम, स्वाभिमान, स्वदेशप्रीति हे सद्गुण, अनंताचार्यांचे वाक्चातुर्य, गंधर्वविवाहापूर्वी कमला व मल्हारराव याच्यांत परस्पर झालेल्या आणाशपथा, कार्तिकमासामधील शेतें व मळे याच्या शोभा, पुणे शहराचें वैभव व पेशव्यांच्या दरबाराचा थाट, मराठ्याचें शौर्य, रजपुतांचे सत्य-पालन, मुसलमानाचा बेमुर्वतखोरपणा व चढेल स्वभाव, आणि आनदराव डफळ्यांची परोपकारादि सत्प्रवृत्ति ह्या सर्व गोष्टी वाचकाच्या मनावर उत्कृष्टपणे ठसाव्या अशा रीतीने या काव्यांत रंगविलेल्या आहेत. तात्पर्य, 'हे कानाला गोड लागते,' 'हे मनाला आल्हाद देते, 'येथे अंतःकरणवृत्ती उचंबळून येतात, थरारतात, क्षुब्ध होतात,' किंवा 'हा अमुक प्रसंग वाचीत असतां चित्त संतोष पावते, तल्लीन होतें,' इत्यादि गौरवयुक्त निर्देशक वाक्यांच्या आडमापांनी मोजिलेलें या महाकाव्याचे विवेचन सुज्ञ वाचकांस रुचो अशी आशा प्रकट करून हें प्रकरण येथे पुरें करितों.

# गुणोत्कर्ष (सन १८८५)

**कथानक**—श्रीशिवाजीमहाराज इ. स. १६७९ साली कर्नाटकांतील स्वारी संपवून स्वदेशीं परत येण्यास निघाले. वाटेत तोरगलच्या मुक्कामीं त्यास समजलें कीं, मोगल कोल्हापूर प्रांतीं आले असून त्यास पन्हाळयाचा किल्लेदार गणपतराव व आपला मुलगा संभाजी हे फितूर झाले आहेत. तेव्हा स्वतः शिवाजी, प्रल्हाद निराजी व हिरोजी असे तिघे वेषांतर करून त्या प्रांतीं आले आणि बाकीचें सैन्य पुढें पाठविण्यात आलें. हे तिघे वेषांतर करून पन्हाळयाच्या आसपास फिरत असतां त्यांची व गणपतरावाची गाठ पडली. गणपतरावानें शिवाजीस ओळखिलें; तेव्हा भिऊन तो पन्हाळगडावर पळून गेला. आणि तेथे संभाजीमहाराज होते त्यास हे वर्तमान त्यानें कळविलें व मसलत केली की, मोगलांची मदत घेऊन शिवाजीस पकडावें. इकडे शिवाजीमहाराज व त्यांचे दोघे विश्वासू चाकर, 'पुढें काय करावें' असा विचार करीत असतां त्यांस असें सुचलें कीं, जवळच वडगांव नांवाचा तटबंदीचा व ठाण्याचा गांव आहे तेथे जाऊन राहावें. ते तिकडे जाण्यास निघाले तों जिवाजीपंत देशपांडे नांवाचा वडगावचा सन्मान्य गृहस्थ व शिवाजीचा स्वामिभक्त सेवक त्यास भेटला. त्याच्याकडे महाराजांनी 'धर्म्या' असें नांव घेऊन नोकरी धरिली व बाकीचे दोघे मोरोपंत पिंगळे याजकडे हें वर्तमान कळविण्यास निघून गेले.

मोगल ह्या प्रांतीं आल्यापासून जिवाजीपंतानें आपली मालमत्ता आणि आपला मुलगा व सून—कृष्णराव व राधाबाई—ह्यांस सुरक्षिततेसाठीं पन्हाळगडावर नेऊन ठेविलें होते. राधाबाई सुस्वरूप असल्यानें तिच्यावर

गणपतराव व त्याच्या कुसंगतीमुळे संभाजी ह्यांनी पापदृष्टि ठेविली ! ह्या हेतूपायी त्यांनी त्या पतिपत्नीस कैदेत घातले ! ! आणि संभाजी राधाबाईस वश करण्याचा प्रयत्न करूं लागला. तथापि, ती महापतिव्रता, एकनिष्ठ, त्यामुळें संभाजीचे प्रयत्न निष्फळ झाले. तिकडे गणपतराव मोंगलांची कुमक घेऊन वडगांवावर चालून गेला. पण 'धर्म्या'—वेषधारी शिवाजीनें प्रथम आश्चर्यकारक गोलंदाजी करून नंतर गांवाच्या दरवाजाशीं उभे राहून एकटयाने शेकडो मोंगल कापून काढिले ! ! अखेर धर्म्या व जिवाजीपंत गणपतरावावर चालून गेले. जिवाजीपंतास जखमी करून गणपतराव त्या वेळी कसा तरी तेथून निसटला. अशा प्रकारे, हे सारे कपटनाटक फसले. आपली फजीती झाली आणि आपल्यावर आपल्या पुण्यप्रतापी वडिलाचा रोष होणार या भीतीनें संभाजी अगदी गांगरून गेला. तरी, गणपतराव कसला वस्ताद ! त्याने संभाजीस फिरून भर दिली की, "कृष्णराव व राधाबाई यांस सोडून देऊं व आपण स्वत: भिऊन गड सोडून पळालो असें भासवूं; आणि मग कृष्णराव-राधाबाईच्या पाळतीवर राहून त्यांस वाटेत गांठून कृष्णरावास ठार करूं व राधेला पळवूं ! ! " अशी मसलत करून त्यांनीं त्या उभयतास मार्गांत गाठले कृष्णरावाशीं संभाजीने द्वंद्वयुद्ध केलें. कृष्णरावास मूर्च्छा आली व संभाजीस जखम लागली होती, ती बांधण्याचें निमित्त करून गणपतरावाने संभाजीचे हातपाय जखडून टाकिले ! ! मूर्च्छित स्थितीतच कृष्णरावास ठार करण्यास तयार होण्यात त्या नीच नराधमास मुदलीच लाजलज्जा वाटली नाही ! राधाबाईच्या उज्ज्वल पतिभक्तीची परीक्षा मात्र या प्रसगानें चांगलीच कसास लागली. गयावया करून पदर पसरून, प्रार्थनालापांनी सुद्धा जेव्हां गणपतरावास द्रव येईना तेव्हां कृष्णरावाच्या अंगावर पडणारा त्याच्या शस्त्राचा घांव निवारण व्हावा म्हणून अखेर तिंने आपलें अंग पतीच्या अंगावर टाकिलें.

अशा निर्वाण प्रसंगी शिवाजीमहाराज तेथे येऊन पोचले. त्यांनीं गणपतरावास कैद केलें; संभाजीस बंधमुक्त केले आणि कृष्णरावाच्या शुश्रुषेची त्यांनी व्यवस्था करविली. लौकरच मोरोपत पिंगळेहि आलेच. त्यानी मोंगल सरदार रणमस्तखान यास करवीर प्रांतांतून हांकून लावून तेथे मराठयाचा अंमल पूर्ववत् निर्वेध केला. शिवाजीमहाराजानी जिवाजीपंत, कृष्णराव व राधाबाई यांस इनामें दिलीं आणि गणपतरावास देहान्त शासन देण्याचे त्यानी योजिले होते. परंतु जिवाजीपंताने त्यास वाढवून लहानाचा मोठा केला असल्यामुळे त्यास त्याची दया येऊन त्याने महाराजांपाशी रदबदली केल्यावरून गणपतरावास जिवे न मारितां त्यास बिरवाडीच्या किल्ल्यात जन्मभर कैदेंत ठेवण्याविषयी महाराजाची आज्ञा झाली.

**विशेष विवेचन**—या नाटकाचे पर्यवसान, पातिव्रत्याचा विजय व दुर्जनास दंडन अशा इष्ट व प्रिय गोष्टी घडून येऊन आनंददायी झालें आहे. मैत्रीच्या मिषाने भोळ्या लोकास दुर्जन कसे फशीं पाडतात आणि चागल्या स्वभावाचा मनुष्य देखील कुसंगतीमुळें निंद्य कर्मास कसा प्रवृत्त होतो आणि कितीहि संकटें आली तरी निश्चयी स्त्रिया प्राणाची सुद्धा पर्वा न करिता पातिव्रत्य कसे राखितात व त्यास ईश्वर कसा सहाय्य होतो ह्या गोष्टी या नाटकांत शास्त्रीबुवानी प्रामुख्याने दाखविल्या आहेत. आपला हेतु त्यांनी किती उत्तम तऱ्हेने साधिला आहे हे वरील कथानकावरून वाचकांना कळून येईल. जिवाजीपताची स्वामिनिष्ठा व दयालुत्व, आलेल्या संकटास तोंड देण्याचें धैर्य व उत्साह वडगांवच्या लोकात उत्पन्न करण्याचें त्याचें सामर्थ्य; शिवाजीमहाराजांची देशभक्ति, कर्तव्यदक्षता, युक्ति, प्रसंगावधान, ‘ सावधानता सर्व विषयीं, ’ आपले उद्देश तडीस नेत असतां वैयक्तिक मानापमान व आपली उच्च पदवी

बाजूस ठेवण्याची तत्परता व न्यायनिष्ठुरपणा, संभाजीचा भाबडेपणा, कामुकता, हे दोष पण त्यांबरोबरच अभिजात पुरुषाच्या ठिकाणीं असणारी कुकर्माबद्दलची थोडी तरी लाज व मनाचें औदार्य, राधाबाईचें लोकोत्तर पतिप्रेम आणि ईश्वरनिष्ठा, इत्यादि सद्गुण व कृतघ्न, स्वामिद्रोही, मित्रद्रोही, विश्वासघातकी, परस्त्रीचा अभिलाष धरणारा व उलट्या काळजाचा गणपतराव, वगैरे पात्रांच्या अंगच्या सद्गुण-दुर्गुणाचा परिपोष त्यांनी उत्कृष्टपणे केला आहे. नाटकांतील स्थल, काल व कित्येक पात्रें यांच्या नावांवरून हे नाटक ऐतिहासिक आहे हें उघड आहे तथापि, कांहीं पात्रें व प्रसंग काल्पनिक आहेत. नाटकरचना ४०।४५ वर्षांपूर्वीची असल्यामुळे सांप्रतच्या रंगभूमीवर क्वचितच दृष्टीस पडणारी सूत्रधार-विदूषकांची जोडी व ते विद्यार्थ्यांनी करावयाचे असल्यानें स्त्री-पात्र फक्त एकच असणे या दोन गोष्टी आजकालच्या नाटकांहून ह्यांत भिन्न दिसतात

पहिल्याच प्रवेशांत सूत्रधार-विदूषक संवादानें कथावस्तुनिर्देश झाला असून पुढे प्रत्येक प्रवेशांत कथानक क्रमशः विकास पावत आहे. ह्यातील अगदीं आणीबाणीचा प्रसंग म्हणजे वडगावावरील छापा होय. गणपतरावाच्या दुष्ट कपटाचा कळस, संभाजीस बांधण्यात व मूर्च्छित कृष्णरावावर शस्त्र चालविण्यास त्यानें उद्युक्त होण्यात झाला. परंतु शिवाजीमहाराजांच्या अकल्पित आगमनाने त्याचा कपटव्यूह ढांसळून तो एकदम दुर्गतीच्या गर्तेत कोसळला ! ! अशा तऱ्हेने सज्जन-परित्राण होऊन सर्वत्र आनंदीआनंद झाला या नाटकांत वीररस प्रधान असून करुणरस अंगभूत आहे, पन्हाळगडावरील निसर्गशोभा बहारीने वर्णिली आहे,[2] शिवाजीराजांचे आत्मगत भाषण देशभक्तिपूर्ण

१ कोल्हापूर येथील राजाराम कॉलेज अगर हायस्कूलमधील विद्यार्थ्यांसाठीं रचिलें. २ गुणोत्कर्ष पृ. ४.

असून पुत्र संभाजी याच्या दुर्वर्तनाने होणाऱ्या दुःखशोकामुळें व विशेषेंकरून तो मोंगलांस फितूर झाल्यानें त्याच्या अंतःकरणांतील क्षुब्धतेने व व्याकुळतेने कारुण्यपूर्ण झालेले आहे. तसेंच, प्रस्तुत नाटकात विनोदाची छटा ठिकठिकाणी असून 'चतुर्भुज' आणि 'जीवशिवऐक्य' या शब्दांवरून केलेल्या कोट्या चांगल्या आहेत. गणपतरावाने संभाजीला बांधिले त्या वेळी, "तुला तुझा बाप शंभू म्हणतो व तुझ्या बापाला लोक सांबाचा अवतार समजतात, मी तुला बांधून चतुर्भुज करितो-शंकराला विष्णु करितो" अशी त्यानें संभाजीची कुचेष्टा केली! जिवाजी-शिवाजीच्या भेटीवरून सुचलेली अर्थानेच जीवशिवऐक्याची दुसरी वेदान्ती कोटी आहे ती समर्पकच आहे.

गुणोत्कर्षाचे[1] भरतवाक्य स्वदेशभक्तांच्या गुण प्रशंसेने भरलेले व सतत सर्वांनी गावें असे आहे —

'जे जे सन्मार्गवर्ती सदय हृदय जे लोकबंधु स्वभावें ।
पाहोनी देशबंधु व्यथित व्यथितसे चित्त ज्यांचेंहि व्हावें ॥
उद्धारूं हिंदुधर्मा सतत झगडतां देह ज्यांचे झिजावे ।
काळीं काळीं महात्मे पुरुष महिवरी धीर जन्मास यावे ॥"

ज्या सुप्रसंगी[2] हे नाटक जन्मलें त्याच्या आधीच्या कुप्रसंगी प्रसिद्ध 'बर्वेप्रकरणी'—दे. भ. टिळक-आगरकराचे देशभक्तियुक्त धैर्य प्रकट झालेच होतें, त्यास अनुलक्षून हे रचिले असावे कीं काय कोण जाणे! स्कॉट् नामक इंग्लिश् कवीच्या 'अॅव्हॅनो' नांवाच्या कादंबरीतील टार्किल्स्टन् किल्ल्यावरील छापा, ब्लॅक् नाइट्च्या वेषांतला राजा रिचर्ड् व त्याच कवीच्या 'लेडी आफ् दि लेक' ह्या काव्यांतील फिट्झ् जेम्स् आणि रॉड्रिक् डू यांचे द्वंद्व-युद्ध, या गोष्टींचें बरेंचसें साम्य

---

१. गुणोत्कर्ष पृ. १८।१९ व पृष्ठ ३२. २. कै. श्रीशाहू छत्रपतिमहाराज यांचे दत्तविधानप्रसंगी.

अनुक्रमे वडगांवची लढाई, वेषांतरित राजा शिवाजी आणि कृष्णराव-सभाजींचें द्वंद्व-युद्ध याशीं असल्याकारणाने हें स्कॉट्चे अनुकरण असावे असें कोणी म्हणतात परंतु आम्हास तसे वाटत नाही. कारण, शास्त्रीबुवांनी गुणोत्कर्ष रचिलें त्या वेळी, त्यांस इंग्रजी विशेष येत नव्हतें. पण क्षणभर हे अनुकरण आहे असे गृहित धरल्यास दुसरी एक गोष्ट मान्य करावीच लागेल, ती ही की, मूळच्या इंग्रजीमधल्या कथाप्रसंगास त्यांनीं दिलेला मराठी वेष इतका बेमालूम साधला आहे की, ' हे अमक्याचें अनुकरण आहे, ' असे मुद्दाम सांगितल्यावांचून कोणाच्या लक्ष्यात येणार नाही.

---

## तारामंडळ

**प्रस्तावना**—हें नाटक जरी ऐतिहासिक म्हणजे इतिहासात नमूद असलेल्या एकाद्या विशिष्ट कथेस किंवा व्यक्तीस उद्देशून लिहिलेलें नसले तरी ह्यातील दोन तीन पात्रांची विलक्षण वाटणारी नांवे व एक दोन ठळक गोष्टी इतिहासांत आढळणाऱ्या अर्थात् शक्य कोटींतल्या आहेत असे खुद्द शास्त्रीबुवांनी या नाटकाच्या प्रस्तावनेंतच दाखवून दिले आहे. तसेंच, या नाटकाचे संविधानक बाराव्या अगर तेराव्या शतकांतले आहे असे कल्पिलें असल्याचेंहि त्यांनी या प्रस्तावनेत सांगितलें आहे. या नाटकातील दुर्जनसिंगाचे गुणोत्कर्षां-तील गणपतरावाशीं कांहीं कांहीं बाबतींत साम्य आहे. गणपतराव प्रत्यक्ष विवाहित अशा एका परस्त्रीवर पापदृष्टि ठेवितो तर दुर्जनसिंग, जिनें मनसा व वचसा विक्रमसिंगास वरिलें होते अशा शालिनीचा अभिलाष धरितो. दोघेहि आपल्या धन्याशीं निमकहराम होऊन

शत्रूस मिळतात व प्रसंगीं त्यांस जिवे मारण्यास देखील उद्युक्त होतात. गुणोत्कर्षाप्रमाणे याहि नाटकात वेषांतराचा उपयोग करून अगदी आणीबाणीच्या वेळीं अद्भुतता उत्पन्न केली आहे ही गोष्ट मरणाची शिक्षा होऊन मारला गेला अशी ज्या इतबाररावाविषयीं ठाम समजूत त्याच्या आकस्मिक प्रकट होण्यानें ध्यानांत येण्याजोगी आहे. जसा सभाजी गणपतरावाच्या कपटजालांत सापडला होता तसाच तारामंडळातील राजा महामंडलेश्वर हा भोळसर स्वभावामुळे कावेबाज दुर्जनसिंगाच्या कपटप्रयोगास बळी पडला होता. गुणोत्कर्षाचे प्रयोजन वेगळें असल्याने त्याला जी बंधनें होतीं तीं तारामंडळास नसल्यामुळें ह्यात अधिक स्त्री-पात्रे व श्रृंगाररसाची भर घालता आली. स. १९०६।७ च्या सुमारास किर्लोस्कर मंडळी 'सुमति'[1] नावाचें नाटक करीत असे त्यातील सुमति नामक प्रधान व त्याचा प्रतिस्पर्धी स्तवराज –त्याच दरबारांतील एक क्षुद्र खुशामत्या–याचें साम्य तारामंडळांतील इतबारराव व दुर्जनसिंग याच्या भूमिकाशी बरेंच जमतें ! ह्यात दुर्जनसिंगाने तारामंडळ-हाराची चोरी इतबाररावावर घातली तर त्यातील स्तवराजाने सुमतिपुत्र 'विनय' व राजपुत्र 'संतपन' याच्यामधील क्षुल्लक वादाचा फायदा घेऊन त्यायोगे सुमतीचा नाश व आपले भाग्य साधण्याचा प्रयत्न केला ! मात्र सुमतीचा खरा प्रतिस्पर्धी 'जगमति' यानें या परिस्थितीचा आपल्या कपटनीतीस उपयोग करून घेऊन सुमतीच्या राजकारणावर मात करण्याचा कसून प्रयत्न केला तो परिणामी फसला !! हे सुमति नाटकाचे पर्यवसान आहे. तथापि, तारामंडळातील शालिनी-विक्रम या जोडीने अभिजात श्रृंगाराची जोड तारामंडळास मिळून 'सुमती'पेक्षा तें जास्त लोकप्रिय झाले हे सांगावयास नकोच आहे.

---

१ ले. शंकर विष्णु कुलकर्णी, बी ए, ह्यानी स. १९०४ मध्ये रचिलें.

**कथानक**—उत्तर कर्नाटकांत देवीपट्टण नावाचे एक राजधानीचें शहर होतें. तेथे दोन अडीच महिन्याच्या अवधीत तारामंडळाचा कथाभाग घडून आला आहे. महामंडलेश्वर हा देवीपट्टणाचा नूतनाभिषिक्त राजा होता. त्याचा सेनापति इतबारराव याचा मुलगा विक्रम व कोशपाळाची मुलगी शालिनी यांचे परस्परांवर फार दिवसांपासून प्रेम जडलेले होते. परंतु शालिनीची आई राजकन्या असून मानी व तोऱ्याने वागणारी होती, आणि तिच्या बापाजवळचा तारामडळ नामक बहुमोल रत्नहार सामंत नांवाच्या एका शेजारच्या राजानें लुटून नेला होता. यासाठीं तो हार परत मिळवून देईल त्यासच शालिनी द्यावयाची असा तिचा हट्ट होता. दुसरे, शालिनी आपल्याला मिळावी अशी महत्त्वाकांक्षा इतबाररावाच्या पदरच्या एका क्षुद्र बुद्धीच्या सामान्य नोकरानें –दुर्जनसिंगाने–धरिली होती. या दोन गोष्टीमुळें विक्रम-शालिनी-विवाहास मोठाच अडथळा झाला

इतबाररावानें सामंतावर स्वारी करून तारामंडळ परत जिंकून आणिला होता. परंतु लुटीपैकीं हा महत्त्वाचा जिन्नस इतबाररावानें आपल्या घरी ठेवून घेतला आहे वगैरे बनावट मजकूर महामडलेश्वर राजाच्या थिल्लर मनांत भरवून देऊन इतबाररावास देहान्त शिक्षा करविणें, त्याची व मंत्रिमंडळांतील कोशपाल, दुर्गपाल इ. त्याच्या स्नेह्याची धनदौलत जप्त करवून स्वत:साठी महामंडलेश्वराचे सर्वाधिकारित्व मिळविणे व तारामंडळ हारहि संपादन करणे इतक्या गोष्टी साध्य करून घेऊन दुर्जनसिंगाने आपल्या मतें शालिनीच्या प्राप्तीची सर्व सिद्धता केली. तथापि, शालिनीचें मन जिंकणे हें केवळ कठिणच नव्हे तर अगदी अशक्यच होतें. कारण विक्रमसिंगावरचे तिचे प्रेम अढळ, निस्सीम, निर्व्याज व शुद्ध असे आहे, ही गोष्ट दुर्जनसिंगाहि पूर्णपणें जाणून होता जुन्या राजमंडळापैकी कोणीसुद्धां दुर्जनसिंगास

अनुकूल नव्हता. विक्रम हा अतिशय पराक्रमी व पितृभक्त तरुण वीर शालिनीच्या प्राप्तीच्या संबंधांत त्याचा जबरदस्त प्रतिस्पर्धी होता. आणि प्रीताई नावाची अनुभवी म्हातारी दाई ही विक्रमशालीनीचें कल्याण चिंतणारी मोठी हुषार व हिकमती बाई होती. हिने वेडीचें सोंग घेऊन ब्रम्हसमंधाप्रमाणे दुर्जनसिंगाचा पिच्छा पुरविला होता ! भामिनीला 'तारामंडळ आपण देऊं' असे सांगून तिच्याकडून शालिनीच्या भेटीची परवानगी मिळवीपर्यंत दुर्जनसिंगाचा विजय झालासा दिसतो पण, पुढे क्रमशः ( १ ) शालिनीने त्याचे तोंडसुद्धा पाहाण्याचे नाकारिलें ! त्यामुळें त्याचा पाणउतारा झाला. ( २ ) 'बापाचा वध करणाऱ्या व तुझा तेजोभंग करण्यासाठीं तुला पाहरेकऱ्याची हलकी चाकरी करावयास लावणाऱ्या राजाला तू ठार कर !' ही त्याची मसलत विक्रमानें न ऐकिल्यामुळे इतबाररावाप्रमाणे विक्रमाची वाट लावण्यास सापडावी हा दुर्जनाचा डाव तर फसलाच[२], परतु उलट त्याचें कपट-कारस्थान काहीसे बाहेर फुटले. येथे त्याचा राजनैतिक पाडाव झाला. ( ३ ) पुढें एके रात्रीं मार्तंडभटासारख्या लोभी भिक्षुकाच्या मदतीनें गुप्तपणें विवाह उरकावा हा दुर्जन व भामिनीचा बेत लग्नाच्या ऐन प्रसंगीं शालिनीऐवजी वेडीपिशी प्रीताईचें[३] दुर्जनाच्या गळी पडून फसला ! ! हा त्या दुर्जनाचा तिसरा पराभव झाला. आणि ( ४ ) यानंतर तो उघडपणे सामंतास[४] जाऊन मिळाला व त्याच्या बाजूनें महामंडलेश्वरावर त्याने चाल केली. यायोगें, त्याच्या नैतिक अधःपाताची व दुष्टाचरणाची परमावधि दिसून आली !

याच वेळीं यवन सरदाराच्या वेषांत इतबाररावांनींहि मोठी मर्दुमकी गाजविली पूर्वी आपल्या प्रिय पित्यास दिलेल्या वचनानुसार विक्रमाने

---

१. अं. ३, प्र. ३, पृ. ७४, २. अ. ३, प्र. ४, पृ. ८०; ३. अं. ४, प्र. ३. पृ. ९५, ४. अं. ४ प्र. ३. पृ. १०३, ५. अं. ५, प्र. १, पृ. १०५.

स्वामिभक्तिपूर्वक महापराक्रम करून दुर्जसिंगापासून महामंडलेश्वराचें संरक्षण करून त्यानें दुर्जनास ठार केले. या त्याच्या उदात्त चारित्र्यानें राजास इतबाररावाच्या थोरपणाचे स्मरण होऊन कृतज्ञताबुद्धीने त्यानें त्याचे सेनापतिपद विक्रमाला दिलें. तसेंच विक्रमाच्या पराक्रमानें तारामंडळ परत मिळाला हे वर्तमान स्वत: राजाकडून भामिनीला समजलें. राजाच्या सुप्रसन्नतेमुळें तारामंडळ विक्रमास मिळून त्याच्याच अनुमतीने त्याने तो शालिनीच्या गळयांत घातला हट्टी भामिनीची आता समजूत निघाली व विक्रम-शालिनी-विवाह होऊन सर्वांस आनंद झाला. सद्गुणी इतबार-रावाच्या स्मरणामुळे आता वारंवार कष्टी होणाऱ्या राजास, दुर्गपाळानें मित्रवात्सल्यामुळे स्वतः गुप्तपणे जिवंत राखिलेल्या इतबाररावास दरबारांत आणून भेटविलें. या महानंदाच्या स्मरणार्थ राजाने इतबाररावास महामंत्री असे पद दिले आणि "यापुढे आपण आपले मंत्री व राज्यांतले महाजन यांच्या समतीनें राज्यकारभार चालवूं" असे प्रजेस आश्वासन दिलें. अशा प्रकारे नाटकाचा शेवट स्वामिभक्ति, देशभक्ति इत्यादि थोर सद्गुणांच्या विजयात झाला

**विशेष विवेचन**—एकंदरीत गुणोत्कर्षापेक्षां तारामंडळाच्या रचनेस लेखकास अधिक स्वातंत्र्य असल्यामुळें हें संविधानक विस्तृत व उठाव-दार झालें आहे. तारामंडळात उत्कट स्वामिभक्ति व पराकाष्ठेचा स्वार्थ-त्याग या सद्गुणांचा परिपोष प्राधान्येकरून दाखविला आहे. यांतील मुख्य रस गंभीर व शात असून वीर, करुण, शृंगार हे रस अनुषंगानें आहेत शालिनी व विक्रम यांचा विवाह घडवून आणण्याच्या कामी लहानपणापासून त्यांची दाई असलेल्या प्रीताईनें वेड पांघरलेलें आहे. तिच्या वेडसरपणाच्या चेष्टांमुळें नाटकांत आरंभापासून अखेरपर्यंत वारंवार हास्यरसास उकळी फुटते. तसेंच मार्तंडभट व बेशकराव या पात्रांनीहि मधून मधून विनोदाची भर पडत राहाते. तारामंडळ नांवाचा

हार भामिनीबाईस—शालिनीच्या आईस—जांवयाकडून मिळाला पाहिजे ह्या अटीमुळें शालिनी आणि विक्रम यांच्यामधील प्रेमाची विवाहात परिणति होण्यास मोठी अडचण उपस्थित होते. ह्यामुळे नाटकाचे इष्ट साध्य ‘ तारामंडळ-हाराची प्राप्ति ’ हेंच ठरून त्यास तारामंडळ असें नांव देण्यात आले आहे. स्वत: शास्त्रीबुवांनी यांतील प्रतिपाद्य विषयासंबंधीं पुढीलप्रमाणे उद्गार काढिले आहेतः—“ यांत एका देशभक्ताचा अपूर्व स्वार्थयाग, देशभाक्ति आणि पितृभक्ति यात विरोध आला असतां दुसरीने पहिलीचे साचिव्य पतकरिल्यामुळे झालेले सुपरिणाम, भगवद्भक्तीचे साफल्य, सत्यव्रताचा बाणा, श्रीमंतीचा तोरा, दुर्जनाचे गूढ, निष्ठुर दौर्जन्य इत्यादि गोष्टी मनोवेधक प्रकाराने दाखविलेल्या आहेत. ” असो या नाटकाची भाषा जोरदार व कवित्वपरिप्लुत आहे.

स्वामिनिष्ठ व स्वार्थत्यागी इतबारराव, पराक्रमी व पितृभक्त विक्रम, एकदा मनानें वरिलेल्या पतीवर त्याच्या प्रतिकूल व विपरीत परिस्थितींत देखील अखंड अनन्य प्रेम करणारी शालिनी आणि प्रीताईसारखी प्रेमळ व निःस्वार्थी दाई, असलीं माणसें जगात सापडणें अगदी अशक्य नसलें तरी हजारात, लाखात एक या प्रमाणात आढळावयाची हे कांहीं खोटें नाही. मात्र भामिनीसारख्या हटवादी, खुळचट, तोऱ्याने वागणाऱ्या आणि स्वतःच्या शाहाणपणाच्या घमेंडींत लुच्च्या लोकांच्या भूलथापास फसणाऱ्या स्त्रिया जगांत पुष्कळ असतात ! नाटकातील तारामंडळहाराची वासुकीशी केलेली तुलना व राज्यपदावर नुकत्याच आरूढ झालेल्या अननुभवी राजास जंगलामधून नवीन धरून आणिलेल्या हत्तीची दिलेली उपमा आणि दुर्जनसिंगास जिथें तिथे छळणाऱ्या प्रीताईस त्यानें आपल्या पाठीस लागलेली ब्रह्मसमंधाची

१. तारामंडळ पृ. १९. २. ता. मं. पृ. २५.

बाधा असें म्हणणें ही सादृश्यें अगदी यथार्थच आहेत. इतबाररावानें कोशपाळास दिलेलें स्वामिभक्तिपूर्ण उत्तर, त्यास राजानें देहान्त शासनाची शिक्षा फर्माविल्यानंतर त्यनें केलेलें भाषण व विक्रमास शेवटचा निरोप देतांना केलेला उपदेश हे प्रसंग स्फूर्तिदायक व अंतःकरणांत खळबळ उत्पन्न करणारे आणि उद्बोधक असून इतबार-रावाच्या भूमिकेचा एकंदर उठाव हरिश्चंद्र, चारुदत्त इत्यादि धीर गंभीर पुरुषांप्रमाणें सत्त्वसंपन्न आहे.

---

## चित्रवंचना ( संगीत )



**कथानक**—शास्त्रीबुवानी लिहिलेलें हे पहिले सगीत नाटक होय. यांतील हेतु पूर्वीच्या दोन नाटकांइतका उदात्त नाही. "लग्नांच्या बाबतींत हल्ली राजे लोकांत जी रूढि पडली आहे ती मोडलीच पाहिजे; आणि तिच्या जागी प्रीतिविवाह सुरू झालेच पाहिजेत." अशा हेतूचे दर्शक असें हे नाटक आहे. पुरुष-पात्रांच्या संख्येच्या मानाने ह्यात स्त्री-पात्रें पुष्कळच आहेत. माधव, कंक, जालंधर, प्रभाकर, याच्या प्रासंगिक प्रवेशांखेरीज सारे स्त्रीराज्यच ! या नाटकांतील नायिका-गुर्जरदेशाधिपति युगंधरमहाराज यांची कन्या प्रभावती—हिचा स्वभाव सरळ आणि शील उच्च दर्जाचें असून नायक मालवदेशींचा उज्जयिनी येथील राजपुत्र माधव हा केवळ साधा राजपुत्र नसून गुणपरीक्षा व पराक्रम इत्यादि सद्गुणांनीं मंडित आहे. प्रभावती—माधवांच्यामधील प्रेमाची स्वाभाविक वाढ होत असतां त्याला तीव्र विरोध करणारी एक व्यक्ति पुढें आली ती

---

१. ता. मै. अं. १. प्र. ५. २. ता. मं. अं. २, प्र. १, पृ. ३९ ते ४१. ३. ता. मं. अं.२, प्र. २. ४. चित्रवंचना पृ ७.

प्रभावतीची सखी मदयंती होय. प्रभावतीनें तिचा स्वभाव पूर्णपणे न ओळखून तिला आपले स्थान दिल्यामुळें ती त्याचा दुरुपयोग करून आपल्याविरुद्ध भलताच फायदा घेण्याचे साहस करील असे प्रभावतीच्या मनींमानसींसुद्धा कधीं आले नाहीं! कारण, एक तर मदयतीचें लग्न या पूर्वीच एका धनिकाशी ठरलेले होते आणि "दोनें[1] सख्यांमध्ये फूट पाडणे प्रत्यक्ष कामदेवास देखील अशक्य आहे." असे प्रथमारंभीच प्रभावती–मदयंती यांच्यामध्ये झालेल्या सवादात मदयंतीने प्रभावतीला प्रतिज्ञेने सागितलें होतें. पण, हीच मदयंती पुढें प्रभावतीची पुरती वैरीण बनली असा कामदेवाचा प्रभाव!!

मदयंती अनुदार मनाची, व निर्व्याज प्रेमाच्या गोष्टी या निव्वळ गप्पा आहेत असे मानणारी होती. आपले साध्य साधण्यासाठीं कोणत्याहि साधनांचा उपयोग करण्यांत न्याय, अन्याय, सखिप्रेम किंवा विश्वास-घातासराखें घोर पातक या कशाचाहि विचार करण्यास स्वार्थापुढे ती तयार नव्हती! शिवाय, तिची दृष्टि अगदीं व्यावहारिक व हिशेबी असल्याने ती म्हणे, "स्त्रीने[2] पतीवर जें प्रेम करावयाचें ते काही त्याच्या चरणीं लीन होऊन राहाण्याकरिता नाही करावयाचें तर समाजांत आपली प्रतिष्ठा वाढावी, संपत्ति, ऐषआराम यांचा उपभोग घेण्यास सापडावे, आपले मन नित्य ख्यालीखुशालींत असावे आणि मनाप्रमाणें हौस-मौज करायला मिळावी, एवढयाच हेतूनें देवाजवळ पति मागावयाचा व त्यावर प्रेम करावयाचे!!" वाङ्निश्चयविधीनें ती ज्या पुरुषाची धर्मपत्नी झालेली होती तो तिचे हे सर्व मनोरथ पुरविण्यास समर्थ आहे अशी तिची समजूत होती. परंतु तो पुरुष दरोडेखोर आहे असे तिला कळून आल्यामुळे त्याच्या संगतींत, समाजात मानमान्यता वाढणे वगैरे आपले हेतु कसे साधणार? या विचारानें तिचें मन खट्टू झाले व त्या

१. चित्रवंचना, पृ. ५ वरील संवाद वाचा. २. चि. वं. पृ. ३.

पुरुषावरून ते पार उडाले! तिचा पति मात्र तिच्यावरील आपला हक्क सोडण्यास मुळीच तयार नव्हता ! !

अशा स्थितीत कुमार माधवाची परीक्षा पाहाण्याच्या हेतूने प्रभावतीनें आपले सोंग मदयंतीस देऊन आपण स्वतः तिची सखी मदयंती झाली. या निमित्तानें प्रभावतीचा पोषाक, आसन, मुकुट आणि शिक्कामोर्तबसुद्धा मदयंतीच्या ताब्यात येऊन राजकुमार माधव याच्याशी उघडपणे सलगी करण्यास तिला अनायासे सवड सापडली. आता ती विचार करूं लागली:-

[1]" **मानस कां हे । संशय मम जयि घेई ॥**
**अधीर कां होई । नेत्र माझा सुरा ॥**
**वीर विजयी खरा । तरुणां मारी लोळवि पायां ॥ ध्रु. ॥**
**भुलवूं कुमारा । संभ्रम मम सारा ॥**
**मदन-लीला-प्रसारा । बरा हा नेत्र माझा सुरा ॥"**

असो. याप्रमाणे निश्चय करून माधवाच्या प्रथम भेटीच्या वेळेपासून त्याचे प्रेम संपादन करण्याची खटपट मदयंतीने चालविली! पण, या अतिप्रसंगाचा परिणाम असा झाला की, या पहिल्याच भेटींत ती माधवाच्या मनातून उतरली. आणि वेषधारी मदयंतीवर-खऱ्या प्रभावतीवर-च माधवाचें मन बसले कारण तिच्या अगच्या विनय, लज्जा, शीलवान्‌पणा इत्यादि स्वभावसिद्ध गुणामुळे त्याचे मन सहजच आकर्षिले गेले. आणि कुमाराच्या मनास लागलेला वेषधारी सखीच्या प्रेमाचा हा वेध उत्तरोत्तर वाढतच गेला. यानंतर एकदां, वेषधारी राज-कन्येचा-खऱ्या मदयंतीचा-[2]एका दरोडेखोराशीं काही संबंध आहे असे लक्ष्यात येतांच तिचें सर्वच आचरण माधवास अत्यंत तिरस्करणीय वाटूं लागून त्यानें तिला वरण्याचे साफ नाकारिले! आणि पुढे एके प्रसंगीं तर तिच्याविषयी त्यानें तिच्यादेखत अतिशय अनादर दाखविला!!

---

१. चित्तवंचना, पृ. १९. २. चि. वं. पृ ६५.

पुढे आमोदसुंदर उद्यानांतील कामदेवापुढे प्रभावती, मदयंती व त्यांच्या इतर सख्या याचा नाच झाला त्या वेळी तो पाहाण्यास आलेल्या कुमार माधवास प्रभावतीनें आणि प्रभावतीस माधवानें फुलांच्या माळा घातल्या हे पाहून मदयंतीची तीव्र निराशा झाली. तेव्हां तिच्या हातीं असलेल्या राजकन्येच्या मुद्रेचा उपयोग करून अखेर राजसैनिकांच्या सहाय्यानें माधवास ठार करण्याचा अधमाधम विचार तिने मनांत आणिला[1] ! ह्या कुविचाराप्रमाणें तिने सर्व सिद्धता करून ठेविली होती. येथे तिच्या दुष्ट स्वभावाची परम सीमा झाल्याचें दिसून येते. पण, इतक्यांत त्या ठिकाणी–तिच्या संकेतस्थळी–जालंधर व त्याच्या मागून प्रभावती–खरी राजकन्या–यांच्या अकल्पित आगमनाने मदयंतीची पुरती फजीती झाली ! कारण, जालंधरास पाहिल्याबरोबर सैनिकाची तर गाळणच[2] उडून गेली. तथापि खऱ्या प्रभावतीच्या येण्याने दोन राजकन्यांपैकी आपण कोणाचा हुकूम मानावा अशी कांही तरी सबब काढून " आम्हांस सरकारचा हुकूम नाहीं " असे म्हणत म्हणत सैनिकांनी तेथून पोबारा केला ! आणि जालंधराच्या सांगण्यावरून त्याच्या लोकांनी मदयंतीस कैद केले. जालंधर[3] हा वस्तुतः दरोडेखोर नसून प्रभावतीच्या बापाच्या–युगंधरराजाच्या–राज्यांतला 'धर्मनिधि' नांवाचा एक खानदानी सरदार होता. त्याची जप्त झालेली जहागीर व काढून घेतलेली सरदारी युगंधरमहाराजाकडून त्याची त्यास परत देवविण्याचें माधव-प्रभावतींनी त्यास आश्वासन दिले व ही गोष्ट महाराज करीपर्यंत आमचा विवाहसमारंभ तहकूब ठेवूं असे सांगून जहागीर सुटण्याच्या संबंधांत त्या उभयतांनी जालंधरास निर्वाळा दिला. प्रभावतीनें मदयंतीबद्दल जालंधरापाशीं " तूं तिला बरेपणानें वागवीत जा," अशी

---

१. चि. वं. पृ. १०७. २. चि. वं. पृ. ११६।११७. ३. चि. वं. अं. ५. प्र. २ पृ. ११९।१२०.

रदबदली केली ती त्यानें मान्य केली. आणि अशा प्रकारे सर्वजण सुखी होऊन नाटकाचा शेवट गोड झाला.

**विशेष विवेचन**—प्रभावती-मदयंतीच्या स्वभावांतील विरोध आणि स्वरूपांतील साम्य या गोष्टींमुळें संविधानकास खुलावट आली आहे. स्वरूपसाम्याने एकमेकींस आपली स्थाने बदलणे सुलभ झालें. परंतु स्वभावांची देवघेव करितां न आल्यामुळे होणारा घोंटाळा प्रभावतीच्या सावधानतेमुळें व माधवाच्या गुणग्राहकतेमुळें टळून कथानकाचा शेवट इष्ट असा झाला. माधव व जालंधर यांनीं प्रभावती व मदयंती या अत्यंत भिन्न स्वभावाच्या स्त्रीपात्रांपासून स्त्रीहृदयाचा ठाव घेतला असल्याने त्यांचे त्याबद्दलचे अनुभव परस्परांहून किती भिन्न उतरले हे त्यांच्याच तोंडच्या पुढील पद्यांवरून वाचकाच्या चांगले ध्यानीं येईल.

माधव म्हणतोः—

[1]"**कोमल हृदया शीलोदारा । धरातल–रमा ती आर्या ॥ ध्रु०॥**
**प्रेमधनाची खाणी-रमणी । स्त्रीजनीं गुण-गणना–स्मरणी ।**
**वरिन सुकृत–योगे ती भार्या ॥ १ ॥"**

जालंधराचा अनुभवः—

[2]"**कपट-नाटक–नटी । मोह-मदिरा-घटी ।**
**स्वैर ही गोमटी । पुरुषा नटवि विटवि ॥ ध्रु० ॥**
**युव-मनोदारिणी । नयन-विष-धारिणी ।**
**शुभ-गति-निवारिणी । दुरुनी सुकवि चुकवि ॥"**

जालंधर हा दरोडेखोर दिसतो खरा, परंतु या मूळच्या संभावित गृहस्थाची सरदारी युगंधरराजाने अन्यायानें काढून घेऊन त्याचा सरंजाम जप्त केल्यामुळें तो या वाम मार्गांत शिरला होता. तथापि, माधवाविषयीं

---

१. चिं. वं पृ. ६५. २. चिं. वं. पृ. ६४.

त्याला आदर वाटत असून आपल्या वाग्दत्त वधूच्या हातून अकुलीन-पणाचें व दुष्ट आचरण घडूं नये या उद्देशानें वेळोंवेळीं मोठ्या दक्षतेनें तो अवश्य ते उपाय योजीत असे. यावरून त्याचा अभिजात कुलीनपणा व्यक्त होतो पण त्याच्या वर्तनाचा त्याच्या धंद्याशीं मेळ कसा नाहीं असे कुतूहल नाटकाच्या आरंभापासून अखेरपर्यंत मनांत राहातें व उत्तरोत्तर त्याच्याबद्दल आदरभाव वाढत जातो.

माधवाचा अनुचर कंक हा काय किमतीचा माणूस होता हें त्याच्या खालील उद्गारावरून कळून येईल. राजकन्येच्या खुशामतीस्तव तो सांगतो:—" आम्हा दरबारी लोकाचा सांप्रदाय असा आहे की, राजे लोकांच्या तोंडावर किंचित् हास्य दिसलें कीं, आम्ही जोराजोरानें खो खो खो हंसत असतों; आणि त्याची किंचित् सचिंत मुद्रा दिसल्याबरोबर आम्ही ओक्साबोक्शी रडत असतों......... यांत मनाचा काय संबंध आहे [१] हें नुसते सुखदुःखाचे पोकळ प्रदर्शन आहे, पोकळ प्रदर्शन ! अगदी कोरडे ठणठणीत प्रदर्शन ! अशी वेळी अवेळीं प्रदर्शनें करून दाखविण्याचा आम्हा मुत्सद्दी लोकांचा सांप्रदाय सनातन आहे " या सांप्रदायी मुत्सद्द्याची प्रभावतीच्या चपला नांवाच्या चतुर दासीनें या नाटकांत जागजागी खूप फजीती उडविली आहे ! ! कंक हें पात्र या नाटकातील हास्यरसाचे उगमस्थानच आहे. ह्यावरच जेथे तेथें विनोद बहरला आहे. जालंधरामुळे व मदयंतीच्या शेवटच्या कारस्थानानें थोडासा रौद्र व करुण रसहि ह्यांत अनुषंगाने आलेला आहे. क्रोधाविष्ट जालंधर मदयंतीला विचारितो, " डाकिनी ! सांग तुला काय शासन करूं [२]

**मदोद्धत विकट डाकिनि नटलिस नरी ।**
**कपट–पटल–पिहित–दुरित–विलसित ॥ ध्रु० ॥**

---

१. चि. वं. पृ. ७६. २. चि. वं. पृ. ११७.

सलिलिं काय बुडवूं ? गगनिं काय उडवूं ।
अतलिं दडवुं । अनवधि तुज रडवूं ? ।
तिमिर-कुहरिं करुनि चरण निगडित ॥ ध्रु० ॥

हालाहल विषासहि लाजविणारें मदयंतीचें कटुतम अंतःकरण व अनन्य पतिप्रेमानें आर्द्र झालेला प्रभावतीचा नवनीत-मृदुल मधुरभाव यांच्या एकत्र दर्शनानें क्षणमात्र प्रेक्षकांच्या विचारसागरावर परस्पर विरुद्ध विकारांचें तुफान वादळ उसळून राहातें, असो. बाकी सर्वत्र, ह्यांत शृंगार-रसच प्रधान आहे. प्रभावती-मदयंती यांच्यामधील वेषांच्या अदला-बदलीनें कुमार माधवाची चित्र-विलक्षण, वंचना-फसवणूक, करण्याचा नायिकेनें जो प्रयत्न केला त्यास उद्देशून या नाटकास 'चित्रवंचना' हे नांव प्राप्त झाले आहे.

शास्त्रीबुवांच्या संगीत नाटकांतील पदाच्या सोप्या व सरळ रचनेसबंधी मागें चरित्रात उल्लेख आलाच आहे.[2] नाटकांतील पात्रांच्या संभाषणांत श्लेषादि शब्दालंकार विपुल योजिलेले असून पदांतहि त्यांचा अनेक ठिकाणीं उपयोग केलेला आढळतो. स. १९१६ साली 'संदेश' पत्राच्या एका अंकांत संविधानकाच्या मूलभूत कल्पनेवरून "हे मूळ नाटक 'भास' कवीनें केले असून तेंच 'चित्रवंचना' नांव देऊन शास्त्रीबुवांनी मराठींत उतरलें आहे." अशी कोणी टीका केली होती. परंतु या विधानाचा स्पष्ट निषेध करून थोरल्या शाहूमहाराजांच्या बखरीतील एका गोष्टीवरून ह्याची कल्पना आपणास सुचली असें शास्त्रीबुवांनीं या नाटकाच्या प्रस्तावनेंत या टीकेस उत्तर दिलें आहे.

---

१. चि. वं. अं. ५ प्र. २ पृ. ११४ ते ११६. २. हें चरित्र पूर्वार्ध पृष्ठ १३४ पहा.

# कृष्णकांचन ( संगीत )

**परिस्थितीचा परिणाम**—हे शास्त्रीबुवांचे दुसरे संगीत नाटक स. १९१७ साली प्रसिद्ध झालें. या नाटकावर तत्कालीन दोन गोष्टींचा परिणाम झालेला दिसतो लो. मा. टिळकांचें गीतारहस्य नुकतेंच प्रसिद्ध झालेलें होतें. त्यांतील निष्काम कर्मयोगाच्या आचरणाचा उल्लेख या नाटकांत आढळून येतो. राष्ट्रधर्माच्या उदात्त कल्पना नवीन प्रकारें उद्दीपित करणाऱ्या या नाटकाच्या प्रस्तावनेत शास्त्रीबुवांनीं राष्ट्रधर्माबद्दल जो थोडासा खुलासा केला आहे त्यावरून हे उघड दिसतें की, त्यानीं ज्याला राष्ट्रधर्म असे म्हटले आहे तो हाच कीं, "गीतेतील[1] आत्मौपम्य-बुद्धीची दृष्टि व्यक्तिमात्राने राष्ट्राच्या सुखदु:खावर खिळली पाहिजे." आणि हाच राष्ट्रधर्माचा विषय या नाटकात प्रामुख्याने वर्णिला आहे. दुसरी गोष्ट, या वेळीं युरोपात महायुद्ध सुरू होतें व बऱ्याच युरोपियन् राष्ट्रांचा एकटा एक शत्रु जर्मनी याच्या अंतस्थ कारस्थानाविषयीं सुशिक्षित लोकामध्येहि अनेक प्रवाद सुरू असत. 'जर्मनीची पाताळयंत्रें' या नांवाचे एक पुस्तक या संधीस छापलें गेले होते. तात्पर्य, अशा कपट-कारस्थानाचा खेळ या प्रसंगामुळे त्यांच्या नाटकाचा विषय झाला असावा. पण, असली चाणक्यनीति—किंवा 'कणिकनीति' म्हटल्यास जास्त शोभेल !—बाहेरूनच सुचली असे जर म्हणावयाचे तर ती या पूर्वीच्या संस्कृत व मराठी नाटकांतूनहि कां सुचली नसेल? शास्त्रीबुवांच्या डोळ्यां-पुढें हें नाटक लिहितांना कपटपटु मोगल सम्राट औरंगजेब हा वावरत

---

१ "राष्ट्राचें हिताहित व सुखदु:ख आत्मौपम्यानें जाणणें, राष्ट्राच्या बचावासाठीं कोणताहि स्वार्थ गमावण्यास न भिणें, हा राष्ट्रधर्म होय."

—खरेशास्त्री, कृष्णकांचन प्रस्तावना.

होता. कारण, प्रस्तावनेत ते लिहितात:-" विजापूरचा अल्पवयी पादशहा सुलतान शिकंदर याची बहीण पादशहाबिबी, ही औरंगजेबाच्या मनांतून सून करून घ्यावयाची होती. पण, त्याचें म्हणणें विजापूरच्या राजाच्या अधिकाऱ्यांनी न ऐकल्यामुळे औरंगजेब हट्टास पेटला व त्या राज्याचा विध्वंस करण्यास उद्युक्त झाला. त्या वेळी आपल्यासाठीं भावाच्या राज्याचा नाश होणे योग्य नाहीं हे समजून ती उदार अंत:करणाची शहाजादी पादशहाबिबी आपण होऊन मोगल सैन्याच्या स्वाधीन झाली, ही इतिहासप्रसिद्ध गोष्ट हे सविधानक सुचण्यास कारण झाली." या नाटकांतील राष्ट्रधर्मविषयक तत्त्वज्ञान, गुंतागुंतीचें संविधानक, प्रबोधक भाषासरणी वगैरेसंबंधीं विचार केल्यास हे नाटक ह्या पूर्वींच्या त्याच्या तीनहि नाटकापेक्षां सरस आहे.

**कथानक** —वैवर्त देशाचा राजा सारंगदेव याची बहीण उज्ज्वला व दुर्गकांताराचा सरदार प्रद्योत यांचें परस्पर निस्सीम प्रेम असलें तरी आपल्या वाडवडिलाचे धोक्यांत असलेले राज्य कैवर्त देशाचा राजा कृष्णदेव याच्या कपटपाशातून कसें सुरक्षित ठेवावयाचे या चिंतेंत उज्ज्वला रात्रंदिवस चूर असल्यामुळें, ते शत्रुभयापासून मुक्त करीपर्यंत ती प्रद्योताशीं विवाहबंधनांनीं बद्ध होण्यास तयार नव्हती. तिचे हे उदात्त विचार प्रद्योताला सर्वस्वी मान्य असून या कामीं तिला सहाय्य करण्याची त्यानें प्रतिज्ञा केली होती. उज्ज्वलेचा हा राष्ट्राभिमानाचा बाणा सर्वविश्रुत झाला होता. कृष्णदेवाची कृष्णकारस्थाने चाललीच होती. विशेषत: 'द्रव्येण सर्वे वशा:' या न्यायाने लांच देऊन फितूर करण्याचा त्याचा सपाटा दांडगा होता! अखेर सारंगदेव व कृष्णदेव यांची लढाई होऊन सारंगदेवाचा पराभव झाला; तेव्हां, कृष्णदेव, 'उज्ज्वला माझ्या स्वाधीन होईल तरच मी लढाई बंद करीन' असे म्हणूं लागला. त्या वेळीं

१. कृष्णकांचन पृ. ८.

आपल्या एकटीच्या देहासाठीं भावाने राज्य हरवावें अगर हजारों सैनिकाचे प्राण जावे, किंवा देश शत्रूच्या हातीं जाऊन त्याची नासधूस व्हावी, या अनर्थपरंपरेपेक्षां मी स्वत: आपण होऊन कृष्णदेवाच्या स्वाधीन व्हावें, असें मनात योजून उज्ज्वला आपल्या योजनेस प्रद्योताची संमति विचारीत होती. अर्थात् प्रद्योतासारख्या पराक्रमी वीर पुरुषास आपल्या प्रिय वल्लभेस शत्रूच्या स्वाधीन होण्यास संमति देणें लांछनास्पद वाटलें यांत कांही नवल नाहीं. यासंबंधी उज्ज्वला व प्रद्योत यांच्यामध्ये पुष्कळ भवति न भवति होऊन शेवटी उज्ज्वलेनें सांगितले, "देशांसाठीं ग्राम टाकावा; ग्रामासाठीं कुल टाकावें, कुलासाठी मनुष्य टाकावें अशी नीति आहे. मग माझ्या एकट्या व्यक्तीसाठीं सर्व राज्याची होळी करावी ही गोष्ट नीतिसंमत कशी ठरेल? पुढें तिनें मायामोह, ममता, यांच्या पाशांविषयीं पुष्कळ तात्त्विक विचार प्रद्योतापुढें मांडून त्याची संमति मिळविली. त्या प्रसंगीं प्रद्योतहि अनुमतिदर्शक स्वरात म्हणाला:- "पूर्वी भारतीय युद्धात 'बंधुबांधवांच्या उच्छेद करूं की क्षात्रधर्म सोडूं' अशी अर्जुनाला विवंचना पडली असतां 'तूं क्षात्रधर्म सोडू नको' असा बोध श्रीकृष्णानी त्याला केला त्याच सद्गुरु श्रीकृष्णजीची मला प्रेरणा होत आहे कीं, देशोच्छेद टाळण्यासाठी तूं या वेळी क्षात्रधर्महि बाजूला ठेव!" असो.

यानंतर उज्ज्वला कृष्णदेवास शरण गेली! तरी तिचा स्वाभिमान कायम होता. तिने कृष्णदेवास विनविले की, "मी स्वीकारिलेल्या दास्याला कचरते असे आपण समजूं नये. तर माझ्या ह्या दास्याचा स्वीकार करून आपण माझ्या बधूला व देशाला भयापासून मुक्त करावे." ती परतंत्र झाल्यामुळे तिला स्वतःच्या इच्छेविरुद्ध एका काळ्याकुट्ट विद्रूप माणसास वरावें लागले त्या वेळी ती म्हणते "...... देश म्हणजे

१. कृ. का. अं. ३. प्र. ६ पृ. ९९. २. कृ. का. पृ. ९९. ३. कृ. का. पृ. १०१. ४. कृ. का. पृ. ११०. ५. कृ. का. पृ. ११३.

तरी परमेश्वराचे विराट् स्वरूपच होय. हे कृष्णा, या माणसाच्या गळ्यांत मी माळ घालण्याचे कृत्य करित्यें हें पाप आहे की पुण्य आहे हे मला समजत नाही. हें कर्म मी तुलाच समर्पण करित्यें ! याच्या पापपुण्याचा धनी तूंच हो !" या नाटकांत दाखविलेली राष्ट्रविषयक आत्मौपम्य बुद्धि किंवा निष्कामकर्मयोग यासंबंधीं हाच महत्त्वाचा प्रसंग होय. कृष्णदेवाचा हस्तक पण उज्ज्वला व प्रद्योत यांचेहि अभीष्ट साधूं इच्छिणाऱ्या नरवाहनाने युक्तीनें प्रद्योतासच वरीलप्रमाणें कुरूप वेषांत पुढे आणिले. कृष्णदेवाची बायको राणी सुमंगला व मेहुणा कांचन यांच्या संतोषास्तव उज्ज्वलेला या कुरूप पुरुषास वरावयास भाग पाडिलें आहे, असा नरवाहनानें वरकरणी केलेला बाहाणा होता. अंतर्यामी उज्ज्वलाप्रद्योतांचे कल्याण साधावयाचे हाच त्याचा हेतु होता. सुमंगलेच्या इच्छेप्रमाणें उज्ज्वलेनें कांचनाला वरण्याचें नाकारिले म्हणून त्या दोघांचा तिच्यावर मोठा राग होता परंतु शेवटीं उज्ज्वला ही आपली चुलत बहीण आहे असे त्यांच्या लक्ष्यांत आलें. पुढें आपण वरिलेला विद्रूप व काळाकुट्ट चित्रभानु हा प्रद्योतच आहे असे उज्ज्वलेलाहि समजून आले आणि सारंग-देवास वैवर्त देशाचे राज्य मिळून नाटकाचे पर्यवसान आनदांत झालें.

**विशेष विवेचन**—कैवर्त देशाचा राजा कृष्णदेव हा अनेक कारस्थानें केलेला अनुभवी मुत्सद्दी होता. म्हातारपणामुळे लढाईचा व्याप त्यानें सोडून दिला होता; व त्या वयास अनुरूप अशा देवभक्तीच्या लहरी त्याच्या मनांत उठत असत. त्याच्या तोंडी घातलेले पुढील पद कोणाहि साधुसताच्या पद्यसंग्रहांत खपण्यासारखे प्रेमळ व प्रासादिक आहे.

**[1]" सतत मना ! भज यदु-पति-चरणा ।। ध्रु० ।।**
**दुनिया झूटी तुज वाचविना । कोण चुकाविल जनि-मरणा ।। १ ।।**
**काळव्याळा कोठुन करुणा । शरण सख्या जा भय-हरणा ।।२।।"**

१ कृ. कां. पृ. १३.

त्याचे शरीर जर्जर झाले असलें तरी राज्यवृद्धीची त्याची महत्त्वाकांक्षा अजून तरुणच होती. आपण वैवर्त देशाच्या राजाचा माडलिक असतां त्याने युक्तिप्रयुक्तीने आपले राज्य वाढविलें. असे करितांना त्या देशाच्या भैरवदेव नामक राजास अन्यायाने मारून त्याची मुलें गुप्त रीतीनें ठेवून वाढवून त्याने त्याची कांचन व सुमंगला अशीं नावे ठेविली. पुढे कांचनास त्यानें आपला अमात्य व सुमंगलेस पट्टराणी केले. परंतु वैवर्त देशाच्या राजघराण्याशी असलेलें, त्यांचे नाते त्याने गुप्त ठेविलें होतें. व तें तसे ठेवण्यात त्याची मुत्सद्देगिरीच होती. कारण हे नाते उघड केले असते तर, काचनाच्या मनांत उज्ज्वलेशी लग्न लावावयाचे होते, तो बेत त्यानें व सुमंगलेनेंहि सोडून दिला असता. व सारंगदेवाशी लढाईहि उद्भवती ना ! ! हें नाते गुप्त ठेविल्याने सर्व गोष्टी कृष्णदेवाच्या अपेक्षेप्रमाणे घडत गेल्या. त्याने एके ठिकाणी आपल्या पाताळयंत्री राजनीतीचें फारच मार्मिक वर्णन केले आहे. तें असें:—" ऐका हातानें शत्रूचा न कळत गळा कापीत असावें तर दुसऱ्या हाताने त्याचे तोंडहि गोंजारीत असावे ! लोकाना तर, त्याचा कापलेला गळा दिसूं नये ! आणि तोंड गोजारलेलें मात्र दिसावे ! ! गळा कापताना यदाकदाचित् शत्रु सावध होऊ लागला तर हे सारें तुझ्या सुखाकरिता करितो अशी त्याची समजूत घालावी ! "[1] अशा बिकट कारस्थानी पुरुषास सुद्धा उज्ज्वलेची देशभक्ति पाहून कबूल करावे लागलें की, " राष्ट्रधर्माच्या चिंतामणीपुढे कृष्णकाचन मृत्तिकेसमान आहे हें जगाचा अभ्युदय करणारे ज्ञान मला नवीनच प्राप्त झाले ! "[2]

उज्ज्वलेचा भाऊ सारंगदेव हा शूर, देशाभिमानी, उत्साहजनक भाषण करणारा असा होता. परंतु तो व्यसनी, चढेल व निष्काळाजी होता. सुमंगला ही कृष्णदेवाची म्हातारपणची बायको; ह्यामुळें ती नवऱ्याला

१. कृष्णकांचन पृ. ६४. २. कृ. का. पृ. १३८.

जुमानीत नसे. तिच्या तोंडाचा पट्टा एकसारखा चाललेला असावयाचा! कांचनाचें उज्ज्वलेशीं लग्न होण्यास माझीच हरकत आहे असें कृष्णदेव बोलतांच, तिने तेवढया आधारावर ती आपली सवत होणार अशी इमारत बांधिलीच! हा तिचा मत्सराग्नि वाढत चालला; आणि त्याचे पर्यवसान उज्ज्वलेचा छळ होण्यांत झाले! सुमंगलेचा भाऊ कांचन हा तरुण, अविचारी, हेकट, पराक्रमशून्य व बडबड्या होता. अमात्यपद लाभल्यामुळें त्यास स्वर्ग दोन बोटे उरला होता! दुय्यम प्रतीच्या पात्रांत खद्योत, कज्जला व त्याची मुलगी मल्लिका, नरवाहन व त्याचा मुलगा चंचरीक हीं येतात. खद्योत हा सारंगदेवाचा मोर्चेलवाला; तो देखील कृष्णदेवाच्या कृष्णकाचनाने-लांचेच्या द्रव्यानें—दूषित झालेला होता तो दुष्ट व मूर्खहि होता. त्यानें आपल्या भार्येस—कज्जलेस—दिलेले[१] साहित्य-शास्त्रावरील पाठ हास्यरसोत्पादक आहेत. बाकींचीं तीन पात्रें प्रद्योत व उज्ज्वला ह्यास अनुकूल आहेत. मल्लिका, उज्ज्वलेची दासी असून चंचरिकाशी तिचे लग्न जुळणार होतें. या नाटकांत शब्दावर कोट्या, पुराण–कथाचा निर्देश, उपमारूपकादि अलंकार व ठसठशीत भाषा यांनीं मोठें सौष्टव आलेलें आहे. या नाटकातील दोन स्वतंत्र प्रवेश[२] केवळ हास्यरसोत्पादक असल्यानें इतर नाटकांहून यात विनोदाची खूपच रेलचेल झाली आहे. इतरांच्या नाटकांतून इतका कोट्यांचा संग्रह एकत्र क्वचित्‌च आढळेल! यांतील एका प्रवेशांत पोलीस[३]चौकशीच्या पद्धतीची केलेली नक्कल अगदी हुबेहुब वठली आहे! कृष्णदेव आणि सारंगदेव यानी आपापल्या सैनिकांस व सरदारांस युद्धाविषयीं दिलेल्या आज्ञा ज्या भाषणात आहेत तीं भाषणे[४] आवेशयुक्त व वीरोचित उत्साह उत्पन्न करणारी आहेत सारंगदेवाच्या भाषणांत प्रद्योतरायाच्या पराक्रमाबद्दल परस्पर स्तुतिस्तोत्रे ऐकावयास

१. कृ. का. अं. ३, प्र. ५. २. कृ. कां. अं. १. प्र. ३. व अं ३ प्र. ५.
३. कृ. कां. पृ. ९२. ४. कृ. कां. पृ. ५७।५८. व कृ. का. पृ. ७१.

येतात. वीरवृत्ति व उज्ज्वलेच्या सुटकेसाठी स्वीकारिलेलें दैन्य या दोन मनोवृत्तीमध्यें हेलकावे खात असलेल्या प्रद्योतरायाचे भाषण अत्यंत वक्तृत्वपूर्ण आहे.

"दुष्ट मारा सुष्ट तारा। प्रभु वदे वाणी ॥
योध हे जो मनीं जाणी। त्यास रक्षी चक्रपाणी ॥"

या पदावरूनहि हे नाटक रचिताना गीतेंतील विचार नाटककाराच्या मनांत घोळत असावे हें या नाटकाच्या प्रारंभीं ध्वनित केलेलें अनुमानच दृढ होतें. 'कृष्णकांचन' या नामवाचक सामासिक शब्दाचे विग्रह, राजा कृष्णदेव आणि अमात्य कांचन, कृष्णाचें काचन किंवा कृष्ण म्हणजे कपटयुक्त किंवा लांच दिलेले म्हणून पापमय असे कांचन-द्रव्य, असे १।३ संभवतात. परंतु तिसरा अर्थच शास्त्रीबुवास अभिप्रेत होता असे कृष्णदेवाच्या 'मतिबळाचें आगळेपण' त्यानीं नाटकाच्या सुरवातीच्या एका पद्यांत गायिले आहे त्यावरून व खुद्द कथानकात त्या कपटकांचनाचा जो प्रभाव त्यानीं दाखविला आहे त्यायोगे वाटते.

---

## शिवसंभव

**कथानकः**—हें नाटक महाप्रतापी स्वराज्यसंस्थापक श्रीछत्रपति शिवाजीमहाराज यांच्या जन्मकथेसंबंधी आहे. एकदां शहाजीराजे व जिजाऊ आनंदानें बोलत बसलीं असतां जिजाऊने राजांस लडिवाळपणानें सांगितलें कीं, "मला स्वप्नांत देवीनें दर्शन देऊन 'मी फळ देतें तें घे' असा शुभ आशीर्वाद दिला व देवी भवानीमाता अंतर्धान पावली." हें बोलणें चालले होतें इतक्यांत कोणी तपस्तेजोनिधि स्वामी

---

१. कृ. का. पृ. ५९. २. शिवसंभव पृ. ६.

येऊन त्यांनीं स्वप्नांतील दृष्टान्ताचे स्मरण देऊन शहाजीच्या हातीं नारळ-प्रसाद प्रत्यक्षच दिला. उभयतांनी स्वामीस वंदन केले. स्वामींनीं आशीर्वाद दिला की, " हे फैल देवीस अर्पण करून प्रसाद भक्षण करा म्हणजे तुम्हांला पुत्र होईल. तो पुत्र सिंहासनाधीश्वर सार्वभौम राजा होईल, आणि त्याची कीर्ति अनंत कालपर्यंत हे भूमंडळ गात राहील." शहाजी भोसले व लुकजी जाधवराव यांच्यामध्ये पूर्वीपासून वांकडेपणा होता ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध आहे. लुकजी मोगलांस जाऊन मिळाला होता. तो स्वतःस बादशाहीचा एकनिष्ठ सेवक म्हणवी, आणि भोसले व निंबाळकर याच्याशी मुळीच संबंध ठेवीत नसे. तथापि, त्याच्याशीं समेट करून घेण्याचें प्रयत्न हरप्रकारे शहाजीनें केले होते. परतु त्याचा कांहीं एक उपयोग न होतां उलट भाडण विकोपास जाऊन दोघांचें वैमनस्य वाढतच गेले. अर्थातच शहाजी-जिजाऊंला मिळालेला देवीचा वरप्रसाद वगैरे गोष्टी लुकजी झूट समजत असे. आणि भोळ्याभाबड्या लोकांस असल्या भाविकपणा उत्पन्न करणाऱ्या भूलथापा देऊन त्याना फसवून आपल्या बाजूला वळवून घेण्यासाठी शहाजीने हे सगळे थोताड मांडिले आहे—खूळ माजविले आहे—असे तो जाधवराव म्हणे

याच सुमारास दिल्लीचा मोगल सरदार इसामिया महाराष्ट्रांत आला होता. निजामशाही बुडवावी, व शहाजीला जमीनदोस्त करावे, हे दोन हेतु धरून तो दक्षिणेंत आलेला होता. परंतु वरील दैवी प्रसादाचे वर्तमान त्यास समजल्यानंतर या दोन हेतूंखेरीज, जिजाऊस मारावें किंवा निदान कैद तरी करावें या तिसऱ्या हेतूची त्यांत भर पडली ! यास्तव इसामियानें जाधवरावास सुचविले की, 'जिजाऊस आणवून शिंदखेडास ठेवून घ्या.' जाधवरावास हे पसंत नव्हतें. पण, मोगलांस खुष करण्यासाठी ती गोष्ट त्याने आपली बायको म्हाळसा इच्याकडून

१. शि. सं. पृ. ९. २. शि सं. पृ. २६।२७.

करविली. प्रथम जिजाबाईस दग्याचा कांहीं संशय आला नाहीं. तथापि, शहाजी धूर्त ! त्याने रायबा व त्याच्या विश्वासातले ४।५ सेवक पठाण-स्त्रियाच्या वेषाने तिजबरोबर संरक्षणार्थ पाठविले होते !! जिजाबाई शिदखेडास आल्यावर ती गरोदर असल्यामुळे एके दिवशीं तिचे डोहाळे पुरविण्याच्या निमित्तानें म्हाळसाबाई व इतर स्त्रिया यानी मोठ्या समारंभानें जिजाऊची ओंटी भरून तिच्या हौसेप्रमाणे त्यानीं जिजाऊवर छत्रचामरादि सर्व राजचिन्हे धरिलीं होतीं. या समारंभात म्हाळसाबाईनें एक गोड, रसाळ व मातेच्या प्रेमळपणाने ओथंबलेले असे गाणे म्हटले असा प्रसग शास्त्रीबुवानी रंगविलेला आहे. हें गाणे इतके लोकप्रिय झालें आहे कीं, महाराष्ट्रात जेथे जेथे या नाटकाचे प्रयोग झाले तेथे तेथे बायकामुलीना ते पाठ येत असते. आणि तसेच ते स्त्रीजनाच्या मुखीं दीर्घकाल टिकण्याच्या योग्यतेचे आहे.

[२] **"आजि हौस जिजीची पुरवा । हठ गर्भवतीचा पुरवा ॥ ध्रु० ॥**
**सित छत्र तिच्या शिरिं धरवा । सित चामर सुंदर फिरवा ॥**
**गज-शिबिका-यानीं मिरवा । नव भव्य महोत्सव करवा ॥ १ ॥**
**पाचु-हार चुडा हिरवा । हिरवा शालु वेणिंत मरवा ॥**
**शृंगार थाटुनी बरवा । प्रिय सखिची ओटी भरवा ॥ २ ॥ "**

ही गोष्ट इसामियास समजतांच, '[३] छत्रचामरांचा मान एकट्या दिल्ली-पतीचा ! ' असें असतां हे मराठे उन्मत्त होऊन त्यांनी ही राजचिन्हें आपल्या सुनालेकीचीं खेळणी केल्याबद्दल त्यास राग आला, आणि जाधवरावास तो खूप रागे भरला. जाधवरावानें आपल्या घरीं चाललेला हा प्रकार पाहतांच संतापून त्याने जिजाऊची ओटी उधळिली ! जिजा-बाईला आपल्या दैवी गर्भाचा झालेला हा उपमर्द सहन न होऊन ती शाहाजीकडे जाण्यास निघाली. जाधवरावानें तिला अटकेंत ठेवण्याचा

१. शि. सं. अ. २ प्र. ४. २. शि. सं. पृ. ६३ ३. शि. सं. पृ. ५६.

इरादा धरिला ! जिजाऊने बापास पुष्कळ प्रकारें सांगून पाहिले, पण व्यर्थ ! शेवटीं अगदीं हातघाईवर प्रसंग आला तेव्हां रायबा प्रकट होऊन त्यानें लुकजीस त्याच्या भावासह ठार करण्याची भीति घातली ! आणि ' हिला मी अटक करीन तर माझे सप्त पूर्वज नरकात जातील ' अशा अर्थाची जाधवरावाकडून रायबानें आणभाक[1] करविली ! यानंतर, जाधवरावानें जिजाऊस शहाजीकडे सुखरूपपणे जाऊं दिलें.

पुढें लौकरच इसामिया व जाधवराव यांच्या फौजा एकत्र होऊन ते दोघे दौलताबादेवर चालून निघाले. शहाजीस याची बातमी असल्याने तो निजामशहासह दौलताबाद सोडून जुन्नर, वांई, या मार्गाने माहुलीकडे येऊं लागला. मिय्या व जाधव त्याच्या पाठीवर होतेच. अखेर माहुलीच्या किल्ल्यास त्यांच्या सैन्याचा वेढा पडला व शहाजी किल्ल्यांत कोंडला गेला. तथापि, रात्री काळोखात मोगलास झुकाडी देऊन शहाजी निजामशहासह तेथून निसटला ! निजामशहाच्या मनांत शहाजीविरुद्ध विकल्प उत्पन्न करण्यासाठीं जगदेवरावाने[2] शहाजीच्या नावचे एक पत्र लिहिले. त्यांत, 'शहाजी निजामशहास दगा करण्याच्या बेतात आहे ' असा संशय निजामशहास येईल असा मजकूर होता. हे पत्र निजामशहाच्या हातीं पडेल अशी त्यानें तजवीज केली होती. त्याचा शत्रूस इष्ट[3] असा उपयोग व्हावयाचा, परंतु शहाजीने शपथ करून निजामशहाची दिलसफाई[3] केली. याच वेळी जिजाबाई थकली-भागलेली त्या मुक्कामास येऊन पोंचली गरोदर धर्मपत्नीचें संरक्षण करावे की स्वामिभक्ति आचरावी अशा विचारांत शहाजीचे मन क्षणमात्र गोंधळून गेले. स्वामिनिष्ठा संभाळण्याकरितां शहाजीस निजामशहासह पळत राहणे भाग होतें. म्हणून जिजाईच्या मदतीस दोनशे माणसें ठेवून तिनें शिवनेरीस जावें असें सांगून तो निघून गेला. मिय्या व जाधवराव पाठलाग करीतच

१. शि. सं. पृ. ७३. २. शुकजीचा भाऊ. ३. शि. सं. पृ. ९९ ते १०२.

होते. तेव्हां वीरपत्नी व वीरसू जिजाऊ, रायबावगैरेंच्या विनवणीस न जुमानितां हट्टाने तेथेच थाबली तिचा हेतु इतकाच की, थोडा वेळ तरी शत्रूची फौज थोपवून धरून शहाजीला पळण्यास अधिक अवसर मिळावा. शत्रूची फौज नजीक आली. शहाजीच्या दोनशे शिपायांनीं लढण्याची शिकस्त केली ! सर्वांच्या पुढें होऊन जिजाऊने निरकमख्याने अचूक तीर मारून मोंगलाचा निशाणाचा हत्ती घायाळ केला ! मिय्या व जाधव पुढें येऊन पाहतात तो हा सारा पराक्रम जिजाईचा ! त्या-बरोबर लुकजीस प्रेमाचे भरतें आले ' व 'जिजाईस धरिले असता आपण विरोध करणार नाही ' असें इसामिय्यास त्याने वचन दिले होते, या स्वतःच्या मूर्खपणाबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. इतक्यात म्हाळसाबाई वगैरे मंडळी स्वारीत होती तीहि तेथें आली आणि पुढे काय करावे यासंबंधे त्याच्यात वाटाघाट सुरू असता आघाडीच्या सैन्यार्ची तिकडे शहाजीने दाणादाण केल्याच्या बातम्या येऊं लागल्या. अर्थात् जिजाईचा नाद सोडून मोगल सैन्यास तिकडे जाणे भाग पडले रायबा जखम लागून घायाळ होऊन पडला होता, त्याच्यासाठी पाणी शोधण्याकरितां जिजाबाई त्या अरण्यांत भटकत होती. तशात वारा, पाऊस, काळोख यांनींहि गर्दी केली ! अशा संधीस इसामिय्या परत तेथें आला त्यास जिजाऊने बाण मारिला, पण त्याने मिय्याला नुसती जखम झाली. अशा बिकट प्रसंगीं जिजाऊने जगदंबेचा धावा केला, इतक्यांत चमत्कार असा झाला की, पूर्वीचे फल देणारे स्वामी अकस्मात् पुढे येऊन उभे राहिले ! त्यांनीं तिला तीर्थ दिले व एक तरवार[२]हि त्यांनीं कुबडीतून काढून जिजाईच्या हातात दिली व शिवनेरीपर्यंत तिला पोचविण्यास स्वामी तिच्यासह सोबतीस निघाले. इसामिय्या पुनः आला जिजाईनें त्याच्याशी तरवारीचे दोन हात केले; या झटापटीत मिय्याची तरवार तुटली व त्यास

१. शि स पृ. ८५. २. शि स. पृ १३३.

जिजाऊच्या तरवारीचा जोराचा वार लागून तो कोलमडून खालीं दरींत जाऊन पडला! अशा प्रकारें सर्व संकटाचा परिहार होऊन जिजाई शिवनेरीस सुरक्षित पोचली. शहाजीस विजय मिळून त्यानें निजामशहास पुन्हा दौलताबादेच्या तक्तावर नेऊन बसविले. असे जिकडेतिकडे आनंदाचे साम्राज्य प्रसार पावत असता जिजाऊ प्रसूत होऊन श्रीशिवरायाचा जन्म झाला. या जन्मोत्सवाच्या वेळच्या सुखसोहळयांत हें नाटक समाप्त होते. या नाटकाच्या शेवटीं शास्त्रीबुवानी महाराजाच्या जन्माचा 'पाळणा' रचून घातला आहे. हे गाणेहि स्फूर्तिदायक असून चिरंतन होण्यासारखेच आहे —

**" जो जो जो जो रे । शिवराया ।**
**सुख पावो तव काया ॥ जो जो जो जो रे ॥ ध्रु० ॥**
**धर्मध्वज कडकडला । जन गडबडला । मोह महार्णवि पडला ॥**
**तो तूं ताराया । असहाया । येसि महाराष्ट्रा या ॥ जो जो०॥१॥**
**रिपु पापमति ॥ दिशिं दिशि उठती । त्राहि त्राहि जगा करिती ॥**
**त्यांते वाराया । निज ठायां । येसि महाराष्ट्रा या ॥ जो जो० ॥२॥"**

**विशेष गोष्टी**—या नाटकाच्या संविधानकास इतिहासाचा व बखरीचा बहुतेक सर्वत्र आधार आहे. एकदोन किरकोळ गोष्टी व स्वामी, इसामिय्या आणि कमालखा ही पात्रे कल्पित आहेत असा नाटकाच्या प्रस्तावनेत स्पष्ट खुलासाच केला आहे. ह्यात वीररसाचे प्रसंग अनेक आहेत. कमालखा हें एक विनोदी पात्र आहेच. हा इसम गाजेकस असून त्याने गाजाच्या तारेत अगर गाजा मिळण्याची आशा दिसताच मोगलाच्या छावणीतल्या गुप्त बातम्या दोन तीन वेळा रायबापुढे भकून बोलून टाकिल्या आहेत! हा इसामियाचा हेर; तोंडाचा मोठा शूर; पण अगदी शेदाडशिपाई! शहाजीराजे शूर, स्वराज्याभिमानी, धोरणी मुत्सद्दी व देशभक्त होते. जिजाईदेखील तशीच असून शिवाय

मानी स्त्री आणि प्रतिव्रता साध्वी, सेवकजनाशीं अत्यंत दयाळु[1] अशी होती. उभयतां पतिपत्नींत चांगले प्रेम होते. लुकजी जाधवराव शूर, मानी, उदार, सत्यवचनी, पण संतापी आणि मोगलाशी स्वामिभक्तीनें वागणारा असा होता. या पात्रांच्या स्वभावातील विशेष गोष्टीहि इतिहासास सोडून नाहीत. म्हाळसाबाईचे मुलीवरचें—जिजाईवरचें—प्रेम आणि जांवयावरचा लोभ ही स्त्रीस्वभावास साजेशीच आहेत. रायबा अत्यंत विश्वासू व इमानी आहे. या सर्व पात्रांचा स्वभावपरिपोष इतर नाटकांतल्याप्रमाणेच चांगला साधला आहे. जिजाईच्या दैवी गर्भाच्या वाढीस आरंभापासून प्रसूतिकालापर्यंत जाधवराव व इसामिय्या याच्याकडून संकटे उपस्थित करण्यात आली. जिजाऊ या मानवी—सुलतानी—अरिष्टांशी धैर्यानें झगडत असता दैवी—अस्मानी-अरिष्टांची[2] त्यात भर पडली. आणि तोच या नाटकांतला महत्त्वाचा आणीबाणीचा प्रसंग होय. परंतु जगदंबेच्या कृपाप्रसादानें स्वामी प्रकट होऊन सर्व विघ्नाचा निरास झाला, आणि त्या क्षणापासून पुढे सर्वच गोष्टी सुरळीत होत गेल्या.

---

## उग्रमंगल ( संगीत )

**कथानक**—रतनपूरचा राजा लक्ष्मणसिंग व राणी पद्मावती ही दोघें सकलगुणमंडित, पराक्रमशाली व उदार मनाची असून राणी विनयवती व स्वाधीनभर्तृका अशी होती. एकदां, पद्मावतीची विद्यार्थीदशेतील मैत्रीण—माणिकदुर्गाच्या भीमसिंग नामक राजाची मुलगी—दुर्गावती तिला भेटावयास आली होती. बोलता बोलता ' आपला बाप भीमसिंग पद्मावतीच्या पतीवर म्हणजे लक्ष्मणसिंगावर स्वारी करण्याच्या बेतात

---

१. शि. स. पृ १३२. २ वादळ, वारा, पाऊस वगैरे. शि. सं. पृ. १२८.

आहे असे ती बोलली. पण, यापूर्वीच ही वार्ता पद्मावतीच्या कानांवर पडली होती. राजकारणांत दोघींचीं मते अगदी भिन्न! एक सामवादी तर दुसरी दंडवादी–एक संधिवादी पण दुसरी विग्रहवादी–किंवा विशेष स्पष्ट सांगावयाचे म्हणजे " जशास तसे " वागणारी होती. तथापि, त्यांच्यामधील या तीव्र मताविरोधामुळे त्यांच्या स्नेहांत किंचित् सुद्धां कमीपणा येणारा नव्हता. आणि अशी दोघींची पक्की खात्री असल्या-कारणाने राणी पद्मावतीने दुर्गावतीच्या विनंतीवरून तिच्या साम किंवा संधिवादास विजय मिळणार असेल तर मिळो या बुद्धीने, आपली मुद्रिका दुर्गावतीच्या स्वाधीन केली. परंतु त्याचक्षणीं आपण आपले ' जशास तसे ' हे तत्त्व सोडण्यास मुदलीच तयार नाहीं असें पाद्मवतीने तिला निक्षून बजाविलें!

इकडे, गणकाचार्य नावाच्या ज्योतिषाने लक्ष्मणसिंगासंबंधी पद्मावतीस असे भविष्यकथन केले होते की, "[२]लक्ष्मणसिंगमहाराजांस आठवा मंगळ आला असून हा क्रूर ग्रह ह्या–अष्टम–स्थानीं असेपर्यंत महाराजांवर अनर्थपरंपरा ओढवेल. आणि या ग्रहाच्या कुयोगामुळें महाराजास मृत्यूचें देखील भय आहे![१] व त्यातून ते जगले वांचले तर त्यास द्विभार्यायोगहि आहे" राणी पद्मावतीस अर्थात् ह्या दोनहि गोष्टी अत्यंत अप्रिय असल्यानें त्या चुकविण्यासाठी हा दीड महिन्याचा अनिष्ट काल संपेपर्यंत लक्ष्मणसिंगाचें मन नृत्यगायनादि विषयात रमवून राजकारणाच्या महत्त्वाच्या व भानगडीच्या गोष्टीचा आपल्या पतीस विसर पाडावा असे तिनें ठरविले. आणि प्रधान–मंत्री यांची देखील महाराजांशी गांठ पडूं नये अशी तिने व्यवस्था केली. त्याचा परिणाम असा झाला की, लक्ष्मणसिंगाकडे कोणाचीहि दाद कशी ती लागेना! त्याच्या राज्याच्या सरहद्दीजवळची शेंकडो गांवे भीमसिंगाचा मुलगा

१. उग्रमंगल पृ. ७ २. उ. म. पृ. १०.

हिरासिंग यानें लुटून जाळून उद्ध्वस्त केली ! तरी ह्याचें वर्तमान लक्ष्मणसिंगास नाहीं असे झालें. आर्त प्रजेने शेंकडों अर्ज पाठविले, प्रजाजनांनीं मत्री–प्रधानांच्या भेटी घेतल्या, दुःखी प्रजेचे प्रतिनिधि प्रत्यक्ष राजधानींत येऊन महाराजांना भेटण्याची पराकाष्ठा करून राहिले. अखेर त्यांनी पाहारेकऱ्याबरोबर दंगा करून नृत्यगायनाच्या बैठका चालत तेथे जाऊन आरडाओरड केली. त्या वेळी लक्ष्मणसिंगास स्वतःची चूक लक्ष्यांत येऊन तो प्रजाहितदक्ष राजा कर्तव्यपरायण झाला. त्याने ताबडतोब स्वारीची सिद्धता करविली व स्वत. जातीनिशी हिरासिंगाच्या सैन्यावर चालून जाऊन त्याने त्याचा मोड केला. पण हिरासिंगाने त्याला मेजवानी देण्याच्या मिषानें बोलावून विश्वासघाताने कैद करण्याचा घाट घातला. व त्याप्रमाणे त्याचा दुष्ट बेत, लक्ष्मणसिंगाच्या दुर्दैवाने–अगर ग्रहदशेने म्हणा पाहिजे तर– सिद्धीसहि गेला !

राणी पद्मावतीनें आपल्या भर्त्यास यशःप्राप्ति व्हावी म्हणून सर्व राज्यैश्वर्याचा त्याग करून चंद्रशेखराची आराधना मनोभावे व देहदंडनपूर्वक चालविली होती. लक्ष्मणसिंगास शत्रूंनी दगा करून पकडले असें कळताच शत्रूचे पारिपत्य करण्यास ती स्वतः निघाली. तिकडे हिरासिंग, नीचपणाने मिळविलेल्या विजयाने शेफारून जाऊन गाफिलपणानें सगळ्या सैन्याला रजा देऊन, स्वतः देखील अगदी बेसावधपणाने राहूं लागला. ह्या त्याच्या बालिश वागणुकीबद्दल त्याच्या वृद्ध अनुभवी दिवाणाने त्यास वेळीच इषारा दिला होता. पण त्याचा कांही एक परिणाम त्या अविवेकी राजपुत्रावर झाला नाही ! त्या पोराच्या

---

१. उग्रमंगल पृ. २८ वरील लक्ष्मणसिंगाचें भाषण पाहा. सामान्य राजधर्माचा आदर्श असेंच तें भाषण आहे. प्रजावत्सल राजाची प्रजेसंबंधीं खरी तळमळ व त्याची स्वकर्तव्याविषयींची जाणीव किती प्रखर असली पाहिजे हें त्या भाषणांत चागलें व्यक्त होत आहे.

असल्या रंगेल व छांदिष्ट स्वभावाचा फायदा घेऊन पद्मावतीने आपल्या निवडक लोकांनिशी–नर्तकी व तिचे साजिंदे अशा वेषांत–हिरासिंगाच्या गोटांत शिरून पाहतां पाहता हिरासिंगास बंदिवान् केले[1] आणि लक्ष्मणसिंगमहाराजास सोडा नाही तर आपण माणिकदुर्गावर स्वारी करूं असा भीमसिंगास तिने निरोप पाठविला. तेव्हां तिला फसविण्यासाठी व आपली कन्या दुर्गावती हिच्या आग्रहावरून तिच्या समाधानाकरिता, भीमसिंगानें लक्ष्मणसिंगास बंधमुक्त केल्याचा बाह्यात्कारी ब्राह्मणा केला. पद्मावतीने तर लढाईचा मारे धूमधडाका चालूं ठेविला होता. सबब, तिच्या समजुतीस्तव भीमसिंगानें असा आव आणिला की, ' आपण एक दरबार भरवून लक्ष्मणसिंगास सन्मानानें सोडणार आहोत. ' परंतु त्यात सुद्धा सभास्थानाचें प्रवेशद्वार ठेगणें करून तरी निदान लक्ष्मणसिंगास आपल्यापुढे मान वाकविण्यास लावून त्याचा अपमान केल्याचा क्षुद्र आनंद अनुभवावा असा डाव भीमसिंगाच्या मनांत होता ! परंतु त्याची ही गांवढळ कृति लक्ष्मणसिंगास उमजल्याखेरीज राहिला नाही. अर्थात् त्यानें दरबारांत शिरतांना मान न वांकवितां शरिराची उलटी कमान करून प्रथम आपले पाय प्रवेशद्वाराच्या आंत ठेविले ! त्यामुळें भीमसिंगाने केलेला नमस्कार सहजच त्याच्या पायांस केल्यासारखा झाला. गुरूची विद्या गुरूसच फळली ! ! सारांश, त्या समयीं भीमसिंग फार खजिल होऊन अतिशय चिडून गेला. त्यायोगें उभयपक्षात दरबारांतच लढाई जुंपली ! सामवादी दुर्गावतीने तेथें मध्यें पडून ती सोडविली. तथापि हें अपमानशल्य खुनशी भीमसिंगाच्या मनांत इतके जांचत राहिलें कीं, " लक्ष्मणसिंगानें आपण होऊन मला प्राणाम करावा अशीच घटना घडवून आणीन ! आणि तशी न आणीन तर मी प्राणत्याग करीन ! ! " अशी त्याने घोर प्रतिज्ञा केली.

---

१. उ. मं. अं. ३, प्र. ४.

इकडे लक्ष्मणसिंगाच्या मुक्ततेसाठीं पद्मावतीचे प्रयत्न सुरूच होते. शेवटीं भीमसिंगाने पद्मावतीशी करार केला की, दोघांनींहि आपापल्या पाच लोकासह एकमेकांची भेट घ्यावी व मग काय ठरेल त्याप्रमाणे उभयपक्षांनी वागावे. या प्रसंगी भीमसिंगाने लक्ष्मणसिंगास भेटीच्या ठिकाणापासून जवळच एका टेकडीवर त्याचा कडेलोट करण्याच्या तयारीनें आणून उभे केले होते. आपण सांगूं त्या अटीवर समेट करण्यास पद्मावती कबूल झाली तर बरें; नाही पेक्षां, ' तुझ्या नवऱ्याचा कडेलोट करितों ' असा धाक घालून तिला संधि करण्यास भाग पाडावे असा त्याचा बेत होता. 'या भेटीच्या मिषानें काही घात करण्याचा भीमसिंगाचा डाव नसेल कशावरून ?' अशी शंका पद्मावतीस आल्यावांचून राहिली नाहीं. म्हणून तहाची वाटाघाट चालू असता आपल्या सैन्यानें भेटीच्या जागेच्या वरच्या बाजूस माणिकदुर्गावर टेहळणी ठेवावी अशी तिनेहि व्यवस्था केली. ठरल्याप्रमाणे भेटीच्या वेळी भीमसिंगाने पद्मावतीस दहशत दाखविली व क्षणमात्र, तिच्या चित्तात दुःखाचें काहूर उठून राहिले ![1] परंतु ती दुसऱ्याच क्षणीं पाहाते तो तिच्या सैनिकांनी टकमकीपासून मांगाना हांकून लाविले होते. यानंतर पद्मावतीने तिच्या कैदेत असलेल्या हिरासिंगास तोफेच्या तोंडी बांधून भीमसिंगाच्या पुढें आणून उभे केलें ! यापूर्वी, भीमसिंगाच्या नांवची हिरासिंगाने लिहिलेली खोटीच पत्रे त्यांस पाठवून तिने हिरासिंगाच्या खऱ्या स्थितीचा थाग भीमसिंगास लागूं दिला नव्हता. उलट, यापैकी अखेरचे पत्र, ऐन वेळी हिरासिंगाच्या सैन्याची मदत आपल्याला येऊन पोचणार आहे अशा आशेच्या मजकुराचे होतें ! पणि आतां भीमसिंगाच्या डोळ्यासमोर प्रत्यक्ष असा विपरीत देखावा !! ह्यायोगे भीमसिंगाच्या तोंडचे पाणी पळाले. तो गयावया करूं लागला पुत्रमोहाने व्याप्त होऊन मुलाला जीवदान मिळावे म्हणून तो पद्मा-

१. उ. म. अं. ४, प्र. ४.

वतीच्या पायाहि पडला ! ! लक्ष्मणसिंगास तर पद्मावतीच्या लोकांनीं मघाच सोडवून घेतलें होते. आता भीतसिंगाच्या मनश्चक्षूंपुढे त्याची ती घोर प्रतिज्ञा पिशाच्चासारखी भेसूरपणे नाचूं लागली ! भीमसिंगाच्या मोहबतीखातर, ' हिरासिंगाचें काय करावे हे आतां लक्ष्मणसिंग-महाराजच ठरवितील ' असें म्हणून भीमसिंगाचा पुत्रशोक पद्मावतीने तात्पुरता दूर केला व लक्ष्मणसिंगमहाराजांची कृपा संपादन करण्या-विषयीं भीमसिंगास बजावून सांगून पद्मावती तेथून निघून गेली.

बापाच्या प्रतिज्ञापूर्तीस्तव दुर्गावतीनें अशी तोड सुचविली कीं, ' लक्ष्मणासिंगाशी आपलें लग्न लावून द्यावे म्हणजे लक्ष्मणसिंग जांवई या नात्याने सासऱ्यास-भीमसिंगास-आपोआपच प्रणाम करतील ! ' पण ह्या युक्तीस तरी पद्मावतीच्या संमतीखेरीज लक्ष्मणसिंग कशी मान्यता देणार ?[१] करिता त्याची व पद्मावतीची भेट होण्यापूर्वी दुर्गा-वतीनें पद्मावतीकडून मागें मागून घेतलेली तिची मुद्रिका तिच्या संमतीची खूण म्हणून लक्ष्मणसिंगास दाखवून त्याला आपल्याला वरण्याविषयी तिने प्रार्थना केली. दुर्गावतीचा प्रेमळ स्वभाव, तिचा निःस्वार्थीपणा, सरळपणा इत्यादि गुण पूर्वी एक दोन प्रसंगी लक्ष्मण-सिंगाच्या प्रत्ययास आले असल्याने व पद्मावतीची समति दर्शविणारी मुद्रिका पाहून लक्ष्मणसिंग दुर्गावतीस वरण्यास सिद्ध झाला. पुढे पद्मावतीस हे समजल्यावर व दुर्गावती, भीमसिंग, लक्ष्मणसिंग, याच्या मुखातून या घटनेचे सारे कोडें उलगडले गेल्यानतर तिलाहि त्याबद्दल वैषम्य न वाटता उलट मोठा आनदच झाला. ग्रहघटित द्विभार्यायोग चुकत तर नाहीच, मग इतर कोणापेक्षा सखी दुर्गावती सवत झाली याचें तिला समाधानच वाटले. शिवाय दुर्गावतीचा गोड स्वभाव तिच्या सुखास आड येणारा नव्हता. दुर्गावतीने केवळ आपल्या सामवादाच्या

१. उ. मं अ. ५, प्र. २।

विजयासाठीं व पित्याच्या प्रतिज्ञापूर्तीस्तव ही घटना घडवून आणिली. तथापि, पद्मावती ह्यामुळे कष्टी होईल तर आपलें आयुष्य चंद्रशेखराच्या सेवेंत तपस्विनीप्रमाणें घालविण्यास ती राजी होती. परतु अशा निःस्वार्थी सर्वांच्या मनांत कांही संकोच राहूं नये या बुद्धीनें पद्मावतीने दुर्गावतीचा हात पुनः आपण स्वतः लक्ष्मणसिंगाच्या हातांत घातला. हिरासिंगाचीहि मुक्तता झाली हें आतां सागावयास नकोच. दुर्गावतीच्या स्वार्थत्यागानें व विचित्र बुद्धिकौशल्याने लक्ष्मणसिंगाचा स्वयमेव केलेला प्रणाम भीमसिंगास लाभला, त्यामुळे प्राणत्याग करण्याची किंवा तसें न केल्यास ' सप्त पूर्वजांना दुर्गतीत पडावे लागणार ' ही त्याची भीति नाहींशी होऊन सर्वांनाच परमावधीचा आनंद झाला. या आनदसमयी गणकाचार्यांची मुलगी कलावती आणि पद्मावतीचा सेवक विद्याधर याचाहि विवाह राणी पद्मावतीने घडवून आणिला आणि नाटकाची परिसमाप्ति मंगलमय झाली.

**उपकथा**—गणकाचार्य हा लक्ष्मणसिगाच्या पदरी फलज्योतिष सांगणारा एक आश्रित होता. तो धनलोभी असून त्याची पहिली बायको वारली असल्यामुळे दुसरे लग्न करण्यास तो उत्सुक असे, व महाराज लक्ष्मणसिंगाप्रमाणें आपल्याला सुद्धा द्विभार्यायोग आहे असेंहि तो भोळसरपणें समजत असे. एकदां विद्याधराचा बाप 'घटखर्पर' असे टोपण नांव घेऊन गणकाकडे आला. त्याने आपल्या मुलास स्त्रीवेष देऊन व त्याचे मोहिनी असे नांव ठेवून त्यास आपल्याबरोबर आणिलें होतें. आणि 'आपण ही मुलगी आपल्या मुलासाठी एकहजार रुपायांस विकत घेतली आहे; हिला तुमच्या इथें कांही दिवस ठेवून घ्या.' असे घटखर्पर त्यास सांगत होता. त्याचा मतलब गणकाच्या ध्यानांत आला नाही. तो मनात मांडे खात होता की, युक्तिप्रयुक्तीने आपण मोहिनीला आपली बायको करूं अशा बेताने त्याने मोहिनीला ठेवून घेतलें; त्यायोगे यापूर्वीच

१ उ. म. अ. २ प्र. ४.

प्रेमबद्ध झालेल्या कलावती-विद्याधरांस आपलें प्रेम दृढ करण्यास ही आयतीच संधि मिळाली ! गणकाचार्य आपला बेत साधण्याचा प्रयत्न करीत असतां मोहिनीवेषधारी विद्याधरानें त्याच्याकडून अलंकार मात्र उपटले ! आणि प्रेमचेष्टा करीत असतां त्याच्याशी दांडगाई केली. परंतु, घटखर्परानें उलट गणकाचार्यावरच या आगळिकीबद्दल कोतवाल-चावडींत फिर्याद मांडिली ! ! तेव्हा आपली अधिक शोभा व्हावयाला नको म्हणून गणकाचार्याने आपली मुलगी कलावती, मोहिनीच्या बदली घटखर्पराच्या मुलास-विद्याधरास-देण्याचे कबूल करून भांडण मिटविलें ! या उपकथानकाने नाटकात विनोदाची व हास्यरसाची खूप भर पडली आहे व मुख्य कथानकाबरोबर दरेक अंकात त्याचाहि क्रमशः विकास होत गेला आहे. एवढयाचसाठीं तें येथें विस्तारानें दिले आहे. या उपकथेतहि ' जशास तसें ' ह्या तत्त्वाचा विजय दाखविला आहे.

**विशेष गोष्टी**—या नाटकातील पात्रापैकी पद्मावतीची भूमिका सर्वांत श्रेष्ठ दिसते. ती पतिव्रता, देवभक्त, श्रद्धाळु, शूर, मोठी धोरणी, ललितकलाभिज्ञ व विश्वासू मैत्रीण आहे. दुर्गावती बुद्धिमान्, देशभक्त, पितृभक्त, सत्याग्रही अशी आहे. दोघींमधला तात्त्विक मतभेद आरंभी स्पष्ट केलाच आहे. परंतु त्यामुळें त्यांच्या प्रेमांत लवमात्र न्यून पडले नाही. भीमसिंग कुटिलनीतिविशारद, दुराग्रही, बढाईखोर आणि स्वसामर्थ्याचा फाजील विश्वास धरणारा आहे. लक्ष्मणसिंग प्रजावत्सल, शूर, मानी, सरळ व गुणज्ञ आहे. हिरासिंग पोरकट, थिल्लर चैनी, गाफीलपणानें वागणारा, एकंदरींत राजकारणाच्या गंभीर व खोल विचारास निरुपयोगी आहे. दिवाणजीचा पोक्त सल्ला न ऐकतां स्वतःस दरबारी म्हणविणाऱ्या स्वार्थसाधु तोंडपुजे लोकांच्या नादीं लागून तो मूर्खपणाने वागला ! गणक-घटखर्परादि पात्रांचा विनोदावांचून विशेष कांही उपयोग नाटकांत दिसत नाहीं. मात्र गणकानें राणीस ज्योतिष सांगून

---

१. उ. मं. अं. ३, प्र. ३. २. उ. मं. अं. ४, प्र. १.

संविधानकास प्रारंभ करून दिला आहे, ही गोष्ट सत्य आहे. कोतवाल-चौकशीचा फार्स, स्त्रियांचे अलंकार व गायनादि कला ह्यांसंबंधीं शब्दांवरून केलेले श्लेष व गणकाचा द्रव्यलोभ, विषयलंपटपणा वगैरे गोष्टींनी विनोदाचा क्षेत्रविस्तार चांगलाच झाला आहे. लक्ष्मणसिंगाच्या सहवासात असतां पद्मावती केवळ सुकोमल शृंगारलतिका शृंगाररसपुष्ट वाक्पुष्पांनी बहरलेली दिसते. तीच भीमसिंगासारख्या रणकर्कश कठोर शत्रूशी बुद्धीने व बलाने झगडतांना कालाच्या कराल करवालाप्रमाणें मर्मभेदी भाषणानीं साक्षात् रुद्रदेवतेकडून रौद्र रसाचा वर्षाव करीत आहेशी भासते. ह्या नाटकात वीररस मुख्य व अनुषंगानें शांत व करुण इ. रसहि साधिलेले आहेत. तसेच ह्यांत एक विशिष्ट गोष्ट दिसून येते ती ही की, एकाद्या प्रवेशाच्या प्रारंभावरून त्याचा जो शेवट होईल अशी प्रथम कल्पना होते त्याच्या अगदी उलट प्रकार प्रत्यक्ष घडून येतो. त्यामुळें प्रेक्षकांचीं मने विस्मयोत्फुल्ल होऊन प्रवेशाच्या पुढच्या परिणामाविषयी त्यांचे कुतूहल वाढत असावे असे वाटते. टकमकीखालीं घडवून आणिलेला भेटीचा योग व त्याच्या पोटात भीमसिंगाने रचिलेला दुष्ट व्यूह एकदम ढासळल्यामुळे त्याची झालेली तीव्र निराशा व उलट हिरासिंगाच्या नाशाची अकल्पित भीति आणि अखेर पद्मावतीच्या कारस्थानाचा अपूर्व विजय ह्या गोष्टी अत्यंत अद्भुत व मनोवेधक आहेत.

या नाटकात गीतारहस्य, सत्याग्रह, ‘ शठं प्रतिशाठ्य ’ अनत्याचार कीं, अत्याचार गनीमी कावा, इत्यादिकांचा—सारांश, हे नाटक लिहिलें त्या समयी आपल्या देशांत सर्वत्र चालू असलेल्या राजकीय पक्षोपपक्षाच्या वादविवादांतील नाना मतमतांतराचा—या कथानकद्वारां

१ उ. मं. पृ ८८. २ उ. मं. पृ. ५३।५४. ३ उ. मं. अं. १, प्र. २. ४ उ. मं. अं. १, प्र. ४. ५. उ. मं. अं. ४, प्र. ४. ६. उ. मं. पृ. ४२. ७. उ. मं. पृ. ८४. ८. उ. मं. पृ. ५९. ९. उ. मं. पृ. ८३. १०. पृ. ३५.

ऊहापोह झाला असून त्यात नाटककाराच्या मनाचा कल स्पष्टपणें "[1] ये यथा मां प्रपद्यंते ताँस्तथैव भजाम्यह" या भगवदुक्तीकडे झुकता आहे—नव्हे, प्रत्यक्ष तें वचन त्यांनी विजयी लक्ष्मणसिंगाच्या मुखांतून वदविलें आहे. तथापि, दुर्गावतीचा साम—सत्याग्रहहि बराच यशस्वी झाल्याचे या संविधानकांत दाखविलें आहे. मात्र तो सत्याग्रह लाडक्या लेकीनें बापाजवळ धरिलेल्या हट्टाच्या स्वरूपाचा आहे. परतंत्र राष्ट्रांतील जित लोकांनी अधिकारमदानें धुंद झालेल्या जेत्यांशीं केलेल्या अनत्याचारी सत्याग्रहाच्या स्वरूपाचा तो नाही! असे जरी आहे तरी सत्याग्रही दुर्गावतीच्या अतुलनीय आत्मबलाचे व स्वार्थत्यागाचे कौतुक करून धन्य दुर्गावती! धन्य दुर्गावती!! अशी तिची प्रशंसा गायिल्यावांचून नाटककारास राहावलें नाही! भीमसिंगाची घोर प्रतिज्ञा, ती शेवटास न गेल्यामुळें सप्त पूर्वजांस मिळणारी दुर्गति टाळण्यासाठी कटयार खुपसून घेऊन प्राणत्याग करण्याचा त्याचा निर्धार, त्याच्या हातची ती कटयार हिसकून घेऊन तिच्या खुणेने लक्ष्मणसिंगास भेटीचा निर्वाणीचा निरोप पाठवून दुर्गावतीने त्यास बोलावून घेणें, आणि "[2] माझा स्वीकार न कराल तर हीच कटयार भोसकून घेऊन मी आत्महत्या करीन!" असा तिनें लक्ष्मणसिंगास ऐकविलेला आपला कठोर निश्चय, ह्या उग्र प्रसंगांचा परिहार लक्ष्मण-सिंग व दुर्गावती याच्या पाणिग्रहणाने—विवाहमंगलानें—झाला, कटयार हें लढाईचे हत्यार, सबब ती उग्र वस्तु आहे; परंतु क्षत्रियांच्या कुलधर्मा-नुसार त्यांच्या लग्नसमारंभांतील ते महत्त्वाचें उपकरण आहे, [3] उग्र आहे, पण मंगलहि आहे—मंगलसूचक, मंगलकारक आहे, असे दुर्गावतीनेच म्हटले आहे; त्यावरून या नाटकांचें नांव '[4] उग्रमंगल' असें ठेविलें आहे.

---

१. उ. मं. पृ. ११२. २. उग्रमंगल. पृ ११३. ३ उ. म. पृ. ११४.
४. उग्र=क्रूर (क्रूरस्थानीं) आहे मंगल=मंगळग्रह ज्यामध्यें असाहि विग्रह संभवतो.

## प्रकरण ३ रें. इतिहास-ग्रंथ.



# नाना फडनविसांचें चरित्र ( सन १८९२ )



हें चरित्र प्रसिद्ध झाले त्या वेळच्या लोकांत पेशवाईच्या अखेरच्या कित्येक व्यक्तीसंबंधी काही वेड्यावांकड्या समजुती झालेल्या असत. त्याला कारणे काय होती हे सांगण्याचा तादृश उपयोग नाही इतकें मात्र खरे की, असल्याच काहीं खोट्या समजुती किंवा प्रवाद नानाच्या बद्दलहि रूढ झालेले होते. एक पक्ष त्याच्या चागुलपणाविषयी व विशेपतः बुद्धिमत्तेसंबंधी इतका एका टोंकाला गेलेला असे कीं, 'बिरबल व बादशाहा' याच्या गोष्टीसारख्या अक्कलहुशारीच्या कसल्याहि गोष्टी तो नानांच्या नावावर दडपून देई! उलट, दुसरा पक्ष नानाच्या कामुक वृत्तीबद्दल त्याच्यावर नाहीं नाहीं तसले घाणेरडे आरोप करी!! हा सारा खेळ वस्तुत दुसऱ्या बाजिरावसाहेबाच्या हस्तकानीं नानाच्याविरुद्ध दुष्टपणाने पिकविलेल्या कंड्यांचा होता[1]. शास्त्रीबुवांनीं लिहिलेल्या या चरित्रानें नानाच्या खऱ्या गुणावर व अलौकिक मुत्सद्दीपणावर चागला प्रकाश पाडिला. त्याची ईश्वरनिष्ठा, मातृभक्ति, धर्मावरील श्रद्धा व सत्य-प्रीति या सद्गुणासंबंधी विश्वसनीय गोष्टी या चरित्रांत सप्रमाण दिल्या आहेत. तसेंच, स्वतःच्या अनिवार विषयवासनेविषयी त्यास होणारा खेद व पश्चात्ताप व तन्निवारणार्थ त्यानी अतिरुद्राचे प्रखर अनुष्ठान केलें यावरून त्याची सच्छीलपणासंबंधींची कळकळ या चरित्रांत चागली व्यक्त झाली आहे. "नाना अतिशय भित्रे होते" "तरवार पाहिली कीं, त्यांस कांपरें भरत असे" इत्यादि समजुतीहि चुकीच्या आहेत. कारण,

---

१. आश्चर्य हें कीं, ग्रँट्डफसारख्या चोकस इंग्रज इतिहासकारानें या कंड्यांच्या खरेखोटेपणाबद्दल विशेष शोध न करितां त्या खऱ्या मानिल्या!!

सन १७५८ साली ह्मणजे ते १६ वर्षांचे असता पेशव्यांसमागमे श्रीरंगपट्टणाच्या स्वारीत होते. पानिपतच्या लढाईंत ऐन ' भाऊगर्दींत " ते भाऊसाहेबाच्या सन्निध होते. त्या वेळीं त्याचें वय अवघे एकोणीस वर्षांचें होते ! सन १७८६त बदामी येथे टिपूशी लढाई चालू होती तीत नाना समरभूमीवर स्वतः हजर राहून बदोबस्त[1] राखीत होते. सन १७९५ मध्ये खर्ड्याच्या स्वारींत नाना स्वतः होतेच. साराश, भित्रेपणाचा त्यांच्यावर हा वृथा आरोप आहे.

तथापि, नाना तरवारबहाद्दर नव्हते, एवढें म्हणणे वाजवी होईल. त्यांच्या कल्पक बुद्धीने रचिलेल्या मोठमोठ्या कारस्थानात त्यास प्रथम महादजी शिंद्याचें व शिंद्याच्या मनात नानाविषयी मत्सर उत्पन्न झाल्यावर मग हरिपंत फडके व पटवर्धन सरदार याचे पाठबळ मिळून त्यांच्या युद्धविषयक मसलती तडीस गेल्या. म्हणून थोरल्या माधवरावसाहेबांच्या पश्चात् मराठी राज्याचा गाडा यशस्वीपणे सुमारें २५।३० वर्षे एकट्या नानानी हांकिला. राज्यास शिस्त लावून देणे, नानासाहेब पेशव्यांच्या वंशजांशी एकनिष्ठ स्वामिभक्तीनें वागणे, मराठी राज्याच्या स्थैर्यासाठी, अभिवृद्धीसाठी व उत्कर्षासाठीं झटणे, या गोष्टी साधण्याचा नानांनी आटोकाट प्रयत्न केला व आपल्या कारकीर्दींत त्यानीं त्या पुष्कळ अंशानें साधल्याहि. ऐ. ले संग्रह भाग ५ ते ९ मध्यें मुख्यतः 'खूब शर्तीनें राज्य राखणाऱ्या' नानाच्या बुद्धीचेच वैभव दिसून येतें. श्रीमंत थोरले बाजीरावसाहेब, नानासाहेब व थोरले माधवराव यांच्या पाठीमागें राज्यकारभारात त्यांचे धोरणच पुढे चालविणारे असे नाना फडनवीस हे एकच पुरुष होऊन गेले. थोरल्या माधवरावानंतर मराठी राज्याची निभावणी इतकी वर्षे केवळ नानांमुळेच झाली. ह्या

१ ही हकीकत बॉबे टाइम्समध्यें अगदी अलीकडे प्रसिद्ध झाली आहे. ता. २८।१।२७ पान ८ पहा. या, लढाईंत इंग्रज रेसिडेंट मॅलेट हाहि हजर होता.

गोष्टी ह्या चरित्रामुळे चांगल्या कळून येतात. तथापि, हे चरित्र प्रसिद्ध झाल्यास आज ३०।३५ वर्षें झाली. अर्थात् या काळांत नवीन उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक माहितीची भर घालून तें सुधारून वाढवावें असें शास्त्रीबुवांस वाटत असे. आता ते काम त्याच्या चिरजिवांनी केले आहे.

---

# अधिकार-योग

## अथवा

## ‘ नानांस फडनाविशी अधिकार कसा मिळला ?’( स. १९०८ )

शास्त्रीबुवाचे सारेच ऐतिहासिक निबंध–प्रबंध किती मार्मिक, मनोरंजक व ऐतिहासिक शुद्ध माहितीनें भरलेले असतात, याबद्दलची साक्ष अनेक विद्वानांच्या अभिप्रायावरून पटतेच. तथापि, या सर्व निबंधांत ‘ नानाचा अधिकारयोग ’ हा निबंध उत्तमोत्तम आहे असें म्हटलें पाहिजे. याच्या उत्तम वाविषयी स्वत: शास्त्रीबुवा वारंवार मोठ्या आत्मविश्वासानें उद्गार काढीत ! सखारामबापू, नानाचे चुलत भाऊ मोरोबादादा फडनवीस, वगैरे प्रतिस्पर्ध्यांची कारस्थाने विफल होऊन पेशवाईंतील खरी सत्ता नानांच्या हातीं येईपर्यंतचा त्यांच्या कारकीर्दीचा पूर्वार्ध, महत्त्वाचे अस्सल कागदपत्र व आख्यायिका यांच्या आधारे या निबंधांत कथन केला आहे. दिल्ली येथील पेशव्यांचा वकील दामोदरराव हिंगणे याशी झालेल्या नानांच्या पत्रव्यवहारावरून नानांचें मातृप्रेम, स्वधर्मनिष्ठा व ईश्वरभक्ति ही ह्यांत चांगली व्यक्त होतात. थोरल्या माधवराव पेशव्याची तरुण पत्नी श्री. सौ रमाबाईसाहेब यांजकडील विडयाच्या पानाचा खर्च नानांनी नामंजूर केला अशी कदर ! त्या वेळीं श्रीमंत पुण्यास नसून कर्नाटकांत हैदरअल्लीबरोबरच्या मोहिमेवर गुंतले होते.

तिकडून श्रीमंत परत आल्यावर ही तक्रार त्यांजपुढें आली. पण त्यांनीं 'नानांचें करणेंच रास्त' असा निकाल दिला ! श्रीमंत नारायणराव पेशवे यांच्या मूर्खपणाबद्दल नानांनीं केलेली त्यांची कानउघाडणी,[1] पटवर्धन व हरिपंत फडके यांच्यावर नानांचा विश्वास व त्यांचें नानांस मनोभावें सहाय्य, श्रीमंत गंगाबाईसाहेब यांच्या गर्भाच्या संरक्षणार्थ पुरुषोत्तमदाजी पटवर्धनांची योजना व दाजीचें इमान, तोतयाचें बंड, इंग्रजांची राघोबादादास मदत, पण, पुढे नानाशीं प्रसंग पडतांच इंग्रजांचे वेड पांघरणें, नाना इंग्रजाचा स्वभाव व लबाडी खूप जाणून होते म्हणून ते इंग्रजाशीं किती सावधपणाने वागत, इत्यादि इत्यादि गोष्टी या निबंधाच्या वाचनाने उत्कृष्टपणे समजून येतात. नानाच्या चरित्राच्या सुधारून वाढविलेल्या आवृत्तीत या निबंधांतील माहितीची फार मोठी भर पडली आहे. हा निबंध वेळास येथे वाचल्यानंतर[2] सुमारें एक वर्षाने छापून प्रसिद्ध झाला.

---

## हरिवंशाची बखर ( स. १९०९ )

हरभटजी बावा पटवर्धनांच्या वंशजाची हकीकत त्याचेच वंशज कै. बाळाकृष्णराव हरिहर पटवर्धन आत्रेकर यांनी लिहिली तीच 'हरिवंशाची बखर' या नांवानें प्रसिद्ध होती. ती खरेशास्त्री यांनी छापून प्रकाशित केली. व स्थलकालनिदर्शक भरपूर टिपा, इतर ऐतिहासिक पुस्तकांप्रमाणेंच या बखरीतील मजकुरावर देऊन तीमधील कथांचा खरेपणा त्यांनीं अधिक निश्चित केला यात गोविंदे[3] हरि, गोपाळरावें[3] गोविंद

---

१. श्रीमंत नारायणराव यानीं एकदां बोथाटी खेळत असतां नानाचें पागोटें बोथाटीनें पाडून ते हासले. नानांनीं इषारा दिला कीं, मी कारकून; माझें पागोटें पडलें तरी चिंता नाही. मात्र श्रीमंतांनीं आपलें संभाळावें! २. नानांचा ८वा वार्षिक उत्सव. या निबंधाचा सारांश त्यावेळीं (मार्च १९०७) केसरींतहि आला होता. ३. मिरज.

व वामनराव[1] गोविंद, शिवाजी[2] केशव, कोन्हेरराव[2] व निळकंठराव हे बंधुद्वय, पुरुषोत्तमराव[3]दाजी, परशुरामभाऊ[4] इत्यादि अद्वितीय पटवर्धन कुलोत्पन्न वीरमणीच्या कथा दिलेल्या आहेत. शिवाजी केशव अतिशय स्वाभिमानी ! पालखीत बसण्याच्या निमित्ताने भावजयीने केलेला अधिक्षेप[5] सहन न होऊन नागपुरास भोसल्याकडे गेले. आणि तेथें शिलेदारी करून स्वपराक्रमावर पालखी व तीत बसण्याचा बहुमान त्यांनीं मिळविला ! दुसरी गोष्टः–हैदराबरोबरच्या लढाईंत निळकंठराव पडले. दहावे दिवशी पिंडास काकस्पर्श होईना तेव्हा त्याचे धाकटे बंधु कोन्हेरराव यानी पुढे होऊन प्रतिज्ञा केली की, " भाऊ, दादा, हा कोन्हेर पडशाखोकल्याने अंथरुणावर पडून मरणार नाही. तुमच्याप्रमाणे हैदराशी लढता लढतां मरेल ! " आणि पुढें तसेच झालें !! तिसरे, पुरुषोत्तमदाजी चतुर, मुत्सद्दी, साहसी व पराक्रमी होते. त्याच्या प्रामाणिकपणाविषयीं नाना–बापूसारख्या कारभाऱ्याची खात्री अशी की, "कोट रुपये पुढें ठेविले तरी इमान सोडणार नाहीत." यानीं बाल–पेशवे सवाई माधवराव याचे गर्भापासून[6] तो ते मोठे होईपर्यंत परोपरीने संरक्षण केल्याच्या कथा यात अनेक आहेत. राघोबादादाचा एकंदर पटवर्धनावर राग फार, पण भर दरबारांत दादासाहेबांनीं केलेल्या शिष्टाचाराच्या अतिक्रमाबद्दल दाजींनी त्यांचा उघड निषेध[7] केला ! हे पाहून दरबारांतील

---

१. मिरज २. कुरुदवाड ३. मंगळवेढें. ४. तासगाव ५ त्रिंबकराव हरि कुरुदवाडकर याची बायको पार्वतीबाई हिच्यासाठी कृष्णेवर स्नानास जाण्याकरिता तयार असलेल्या पालखींत शिवाजीराव बसले असता बाई बोलली, " भाऊजी, पालखी संपादून तीत बसलें तर खरें ! " ६. श्री गंगाबाईसाहेब गरोदर असल्यापासून कारभाऱ्यांनीं त्याच्या संरक्षणाचें काम दाजींवर सोंपविले. पुढे दरबारातहि दाजी बालपेशव्यास जवळ घेऊन बसत. त्यांनी दादासाहेबाच्या पक्षांतील अनेकांपासून श्रीमंतासं वाचविलें. ७. दादासाहेबानीं गारद्यास प्रथम तुरे दिले, मग इतर मानकरी यास दिले. दाजींनीं सर्व मानकरी भाजकडून तुरे परत टाकविले !

इतर सर्व मानकरी आश्चर्यचकित झाले. चवथे, परशुरामभाऊंचे पराक्रम तर भारतीय योद्धयाप्रमाणे अद्भुत ! त्यांची वर्णने ऐ ले. संग्रहांतहि आलेली आहेत. शास्त्रीबुवा या पुस्तकाच्या प्रस्तवनेच्या शेवटी लिहितात, "पुरुषोत्तमरावासारखे मोहोरे पूर्वीच्या काळी महाराष्ट्राच्या इतिहासप्रसिद्ध शेकडो शिलेदार घराण्यांत निर्माण झाले होते, व त्यांच्याच पराक्रमावर रामेश्वरापासून अटकेपर्यंत विस्तार पावलेले मराठी साम्राज्य चालत होते ! ! आणि म्हणूनच हिंदुस्थानच्या इतर भागांत या महाराष्ट्र देशास '' **शिपाई लोकांची विलायत** ' हें नाव प्राप्त झाले होते. अशा मोहोऱ्याच्या बखरी लिहून ठेविलेल्या नाहीत, किंवा लिहून ठेविलेल्या असल्यास त्या छापून प्रसिद्ध होत नाहींत ही मराठी इतिहासाची फार मोठी हानि होय !!!"

---

## इचलकरंजी संस्थानचा इतिहास (स. १९१३)

या ग्रथापैकी पहिली सुमारे दोनशे पृष्ठे घराण्याचा संगतवार इतिहास व पुढें दीडशे पृष्ठे पत्रे व यादी असा मजकूर छापलेला आहे. मूळ पुरुष नारो महादेव हे कापशीकर घोरपड्याच्या मूळच्या ' मराठा ' घराण्यांत ' ब्राह्मण ' वारस हिस्सेदार कसे झाले हा वृत्तान्त मनोरंजक व स्फूर्तिदायक तर आहेच; पण हल्लीच्या जातिविषयक वादांत अजीबात विसरण्यांत येनें ते तत्त्व म्हणजे ' गुणाप्रमाणे स्थान ' किंवा गुणाविकासास वाव देणे, याचें हें एक नमुनेदार उदाहरण महाराष्ट्राच्या इतिहासांत विराजमान होऊन राहिले आहे. या घरण्यात विधवा स्त्रियावर राज्यकारभाराचा भार पडणे व कोल्हापूरकरांशी नेहमी कटकटी चालूं राहाणें या नित्याच्या आपत्ती होत्या हे पाहून खेद वाटतो. एक पराक्रमी पुरुष

व्यंकटराव नारायण. यांनीं चिमाजीआप्पांबरोबर पोर्तुगीजांवर वसईच्या वेढयांत मोठा पराक्रम गाजविला होता. बाळाजी विश्वनाथ पेशवे यांची मुलगी अनूबाई यांस दिली होती. लग्नात कापशीकर घोरपडे याच्या घराण्यांतील स्त्रिया गोषांत असणाऱ्या, त्याच मानकरिणी-मुख्य विहिणी, त्यानी हट्ट धरून वधूपक्षाकडील—पेशवे याजकडील--स्त्रियास बुरखे घ्यावयास लाविले ! अशी एक गमतीची आख्यायिका[1] या पुस्तकात दिली आहे. या व्यंकटरावांच्या पश्चात् (स १७४५ नतर) अनूबाईंना चाळीस वर्षे स्वतः कारभार हाकावा लागला ! मुलगा व नातू याच्या अंगीं म्हणण्याजोगें कर्तृत्व नव्हते. नातू व्यंकटराव (दुसरे) हे अत्यंत व्यसनीहि होते. स. १८२७ नंतर सगळया कारकीर्दी दत्तकाच्या ! त्यात नेहमीं परवानगीची भानगड ! या घराण्यावर करवीरकरांचा रोष असण्याचें कारण, मूळ घोरपडे व इचलकरंजीकरहि स्वतःस सातारकर महाराजाचे अंकित म्हणवीत[2] व ते खरेंच होतें. करवीरकरानी सेनापति घोरपडे व त्याचेच धोरण चालविणारे इचलकरंजीकर याम आपले अंकित करण्याचे, निदान त्याचा नाश करण्याचें योजिले होते. परंतु अनूबाई यांनी पाण्यासारखा पैसा व पुष्कळ मनुष्यबळ खर्ची घालून करवीरकरांस तोंड दिले. पटवर्धनानी पूर्वापार ऋणानुबंधास[3] स्मरून ह्या घराण्यास नेहमीच कुमक केली. या पुस्तकामधील अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणजे 'मराठा संस्थानिक मंडळ' निर्माण कसें झाले व तें निर्माण

---

१. ही आख्यायिका व सुभेदार मल्हारराव होळकर याची, हरिवंशाच्या बखरीत आलेली मगळवेढेकर पटवर्धनाकडील मेजवानींचे वेळची त्याच्या दिलदारपणाची हकीकत ह्यामधील तत्कालीन ब्राम्हण व मराठे याची खेळीमेळी वागणूक व आजचा ब्राम्हण-ब्राह्मणेतर वाद पाहून सखेद आश्चर्य वाटतें. २. घोरपडे यांस सेनापतित्व व सरजाम सातारकरांकडून मिळालेला होता. ३. हा ऋणानुबंध हरभटजीबावा पटवर्धनापासून जडलेला होता

करणाऱ्या सातारकर थोरल्या शाहू छत्रपतींच्यापश्चात् अवघ्या ५०।६० वर्षांत त्याची दुर्दशा का झाली, या संबंधे केलेला विस्तृत ऊहापोह हा होय. त्याचा संक्षिप्त वृत्तान्त पुढें एके प्रकारणी स्वतंत्रपणें दिलेला आहे.

---

## प्रो. लट्ठे व परशुरामभाऊंची छत्री ( स. १९१४ )

ही एक टीकात्मक लेखमाला[१] आहे. प्रो लट्ठे यानी कै. प्रो बाळजी प्रभाकर मोडक याच्या ' कोल्हापूर राज्याचा इतिहास, उत्तरार्ध भाग ' या ग्रंथांतील विधानाचा अनुवाद करून अगर प्रमाणभूत हकीकत म्हणून त्याचा स्वीकार करून त्यांआधारे, परशुरामभाऊंची करवीरकरांशी पट्टणकुडी मुक्कामीं अखेरची लढाई होऊन भाऊ मारले गेले, त्यांचे दहन कोणी केले वगैरेसंबंधी लेख[३] लिहून कांही भ्रामक मजकूर प्रसिद्ध केला, व भाऊ, त्याचे चिरंजीव व पटवर्धनांचा कारकून नारो हरि करंदीकर यांच्या वर्तनावर कांही आक्षेप घेतले त्याचा परिहार शास्त्रीबुवांनी या लेखमालेच्या द्वारे केला. आक्षेप असे होते —

( १ ) परशुरामभाऊंनी करवीरकर महाराजावर मारेकरी घातले !

( २ ) भाऊंचे उभयता चिरंजीव भितरेपणाने व अधमपणाने आपल्या जखमी पित्यास समरभूमीवर टाकून पळून गेले !

( ३ ) महाराजांनीं भाऊंस मारविले म्हणतात ही गोष्ट खोटी आहे.

( ४ ) पटवर्धनांचा कारकून ' भाऊंच्या प्रेतास अग्निसंस्कार आपण केला अशी फुशारकी मारतो. पण वस्तुतः तो महाराजांनीं आपल्या लोकाकडून करविला.

---

१. इचलकरंजी स इ. पृ. ६२ ते ६६ व ९४ ते ९८ पाहा. २. ज्ञानप्रकाश, नवंबर व दिजंबर स. १९१४. लेखांक १ ते ६. ३. मनोरंजन. मे १९१४.

यांपैकी पहिला आरोप तर अत्यंत भयंकर व भाऊंसारख्या प्रतिष्ठित सरदारावर अधमपणाचा कलंक आणणारा आहे हा आरोप ज्या बखरीच्या आधारें केला आहे त्या बखरीच्या खरेखोटेपणाबद्दल ऐतिहासिक सत्य माहितीच्या आधारें चिंधडयान्चिंधडया उडवून देताना शास्त्री-बुवांच्या लेखणीची धार इतकी तीक्ष्ण झाली आहे की, तिचा येथील तिखटपणा त्यांच्या लिखाणांत अन्यत्र कोठे दृष्टीस पडेलसे वाटत नाही. परंतु हा दोष शास्त्रीबुवाचा नसून असल्या भिकार, कवडीमोल, गचाळ खर्डेवजा बखरीस भलतेंच ऐतिहासिक महत्त्व ( चुकून का होईना ) देणाऱ्या प्रोफेसरद्वयाचाच आहे हे उघड आहे. प्रो. मोडक यांना बखर-काराने भाऊंवर केलेल्या या किळसवाण्या, नीच आरोपाबद्दल थोडी तरी खंति वाटली आहे कारण, त्यानी आपल्या ग्रंथाच्या पृ. १६५ मधल्या टिपेंत, "भाऊंनी ही गोष्ट आपण करविली हें असंभवनीय वाटते" असे म्हटले आहे. ( पुढे ऐ. ले. संग्रहाच्या ११ व्या भागात, "गुलाब-खान रोहिला नावाच्या महाराजाच्या नोकराने आपल्या थकलेल्या पगाराच्या बाकीमुळे चिडून जाऊन महाराजांवर हल्ला केला! व मारेकरी घातल्याचा आरोप मात्र भाऊंवर निष्कारण आला!!" अशा अर्थाचा मजकूर छापला आहे.) असो. बाकीच्या तीनही आरोपांत वरीलप्रमाणेंच बिलकुल तथ्यांश नाही असे त्यानी बाह्य प्रमाणांनी सुद्धा सिद्ध केले आहे. 'इचलकरंजी संस्थानचा इतिहास' या ग्रंथाच्या शेवटीं पत्रे दिली आहेत त्यांपैकी पत्रें नं. २३।३४ हीं कुरुंदवाड दप्तरांतील अस्सल बरहुकुम पत्रें आहेत[1]; हींच तीं प्रमाणे होत. हीं पत्रे प्रो. मोडक यास पाहावयास मिळतांच[2] त्यानी तीं शास्त्रीबुवांस दिली व आपली चूक त्यांनीं प्रांजलपणे त्यांजवळ कबूल केली हे सर्व या टीकात्मक लेखमालेपूर्वीच

१. इचलकरंजी सं इ. पृ. २९९. २. श्री पुरुषोत्तम गणेश पटवर्धन, जमखिंडी यांचेकडून मिळाली. पुढें कुरुंदवाडास मूळ पत्रेंहि सापडलीं.

घडून आले होते. प्रो. लठ्ठे यांनीं आपल्या या चिमुकल्या ऐतिहासिक लेखांत करवीरकर महाराजपक्षास अनुकूल व पटवर्धनपक्षास प्रतिकूल असे मोठें आकाडतांडव केले होते. परंतु सन १७९८ तल्या करवीरकराच्या कऱ्हाडाच्या बाजूच्या हालचाली व पुढच्याच सालात झालेली पट्टणकुडीची लढाई यांसंबधी कागदपत्रांचे पुरावे शास्त्रीबुवाच्या जवळ विपुल व चोख असल्यानें त्यांनी प्रो. लठ्ठे याच्या लेखांतील सत्यशोधकी थाटाच्या विधानांचा नुसता धुव्वा उडवून टाकिला ! ! ! ही टीकात्मक लेखमाला पुस्तकरूपानें स्वतंत्र छापून प्रसिद्ध झाल्यास आजहि तिचे ऐतिहासिक महत्त्व इतिहासाच्या अभ्यासकांस फार आहे.

---

## ग्रँट् डफ्च्या चुकांचे हस्ते (स. १९१५।१६)



डफ् साहेबांनी मराठयांचा इतिहास लिहिला आहे. त्यांत त्याच्या गैरसमजुतीमुळें, माहिती देणारानी चुकीची माहिती दिली असण्याच्या संभवामुळें, परकी लोकांचा इतिहास लिहितांना जी सावधानता व चित्ताची निर्विकारता ठेवणे अवश्य असते ती कांहीं प्रसंगी सदर साहेब यांस ठेविता न आल्याने किंवा जेत्या लोकाकडून जित लोकाचीं भूतकाळच्या वैभवाचीं स्मारकें—लेख, वस्तु, वास्तु इत्यादि—ज्या बेफिकीर वृत्तीनें राखिलीं जातात तसली बेफिकीर वृत्ति त्या साहेबांच्या ठिकाणीं क्वचित् प्रसंगी प्रबळ झाल्याने, त्यांच्या इतिहासांत पुष्कळ चुका होऊन गेल्या आहेत. या चुका दुरुस्त होणे अवश्य आहे असे ध्यानी येऊन या कामासाठीं ' भारत इतिहास सं. मडळ पुणें ' या संस्थेंतील अनेक अधिकारी इतिहासभक्तांनीं शके १८३६ मध्यें ( बहुधा ) एक कमिटी नेमिली. तीत कै. साने, व कै. खरेशास्त्री हेहि होते. शके १८३७

( स. १९१५।१६ )मध्यें खरेशास्त्री यानी त्यासंबंधी आपला निबंध मंडळापुढें वाचून नंतर तो 'ग्रँट् डफच्या चुकांचे हप्ते' ह्या नावानें 'मराठा' पत्रात लेखमाला देऊन प्रसिद्ध केला अशी माहिती मिळते. शास्त्रीबुवांच्या स्वभावात असा एक गुण होता कीं, कोणाच्याहि अंगच्या योग्य गुणाची योग्य किंमत त्याला द्यावयाची. ग्रँट् डफ हे केवळ परकीय एवढ्यासाठीं त्यांस नावे ठेवणें शास्त्रीबुवास पसंत नव्हते उलट, ग्रँट् डफ साहेबाविषयी ते असे म्हणत कीं, "पाहा! परकीयांची ज्ञानलालसा केवढी जबरदस्त! मराठे लोक हे ग्रँट् डफ साहेबाचे कोण? पण, त्याचा इतिहास छापून प्रसिद्ध करण्यासाठी इकडची जुनी दप्तरें वगैरे तर त्यानी शोधिलीच, आणि वरतीं त्याच्या प्रकाशनार्थ लागेल तेवढा खर्च करण्यास देखील त्यानी मागे पुढें पाहिले नाही!!" सारांश, डफ् साहेबांबद्दल त्यास मोठा आदर वाटे

तथापि, संशोधकाचें कार्य एका तऱ्हेनें मोठे बिकट असतें लोकांत माहीत नसलेला इतिहास, जुने कागदपत्र शोधून त्याआधारे सांगणे तितकेसे कठीण नाही. पण एकदा लोकांत रूढ झालेली ऐतिहासिक कल्पना संशोधनातील उपलब्ध प्रमाणानीं खोटी ठरत असली तरी त्या रूढ कल्पनेला खोटी म्हणणे व त्यापेक्षाहि तिच्या जागी नवीन सत्य गोष्ट स्थापित करणे अत्यंत दुर्घट असते. व अशा प्रसंगीच संशोधकाचा निःपक्षपातीपणा व सत्याभिमान प्रत्ययास येत असतो. या न्यायानें स. १९१५ पर्यंतच्या त्यांच्या सुमारे २५ वर्षांच्या संशोधनात, डफ् साहेबांनी केलेल्या ऐतिहासिक विधानाविरुद्ध त्याना ज्या गोष्टी उमगल्या त्या त्यानी ह्या लेखमालेच्या हप्त्यामधून क्रमशः लोकांपुढे मांडिल्या. येथें एक गोष्ट सांगावीशी वाटते की, शास्त्रीबुवांच्या ऐतिहासिक वाङ्मयांत तरी उत्तरोत्तर ते जास्त निर्भय व बाणेदार होत गेलेले दिसतात.

---

१. केसरीमराठासंस्थेचें इंग्रजी साप्ताहिक.

निदान नाना फडनवीस यांच्या चरित्रांत डफ् साहेबांविषयी त्यांनी बरेच जपून लिहिले आहे तथापि 'इचलकरंजी संस्थानचा इतिहास' ह्यांत पृ. २७ वर 'व्यंकटराव[1] नारायण' च्या जागी 'नारायणराव' 'कृष्णाजी[2] परशुराम'चे जागी 'कृष्णाजी भास्कर' अशा नावाच्या चुका टिपेत दाखविल्या आहेत. "पृष्ठ[3] १०९।१० वर' चिकोडी व मनोळी हे करवीरकराचे दोन तालुके पेशव्यांनी पटवर्धनाकडे कर्जफेडीकरितां देवविले' असे असता 'ते करवीरकराकडून जबरीने काढून पेशव्यांनी पटवर्धनांस दिले,' 'रामचंद्र गणेशाच्या' जागी 'रामचद्र हरि' व 'या रामचंद्र हरीचा येसाजी शिंद्याने पराभव केला' इत्यादि अनेक चुका डफ्नें एका प्यारिग्राफात केल्या आहेत" असे म्हणून त्यांनी आश्चर्य प्रकट केले आहे. 'मालोजी व शहाजी' या निबंधांत, "मुर्तुजा[4] निजामशहाच्या वधाचा घोटाळा ह्या साहेबानी दिलेल्या माहितीवरून झाल्याचे, आणि तुकाबाईशी शहाजीचे लग्न झाल्यामुळे जिजाबाई रुसली, किंवा तिला नवरा विचारीत नाहीसा झाला वगैरे" चुकीची माहिती दिल्याचे शास्त्रीबुवानी दाखवून दिलें आहे. ह्याचप्रमाणे आपल्या सर्व ऐतिहासिक ग्रंथांत जरूर तेथें डफ् साहेबांचे दोष दाखविण्यास त्यानी आळस केलेला नाही अशा प्रकारे चुका काढिल्याने ऐतिहासिक माहितीचें शुद्धीकरण होते व ते तसे होणें अवश्य आहे असेच कोणाही विचारी माणसास वाटेल. [उपर्युक्त मूळ लेखमाला वाचावयास न मिळाल्यामुळें तिच्यासबंधी येथें अधिक काहीं सागतां येणें शक्य नाही ]

---

१. ग्रँट् डफ्चा इतिहास पृ २०९. २. सदर पृ. १८९, परशुराम त्रिंबक प्रतिनिधीचे पुत्र कृष्णाजी परशुराम. ३. सदर पृ. ४०० वरून. ४ मालोजी व शहाजी निबंध, पृ १३।१४, डफ् पृ. ४५. ५. मा. व श. पृ. १८, डफ् पृ. ५५.

# चालूं भाषेंतील ऐतिहासिक शब्द ( स. १९१८ )

भा. इ. सं मंडळाच्या षष्ठसम्मेलनवृत्तामध्ये हा निबंध छापला असून यांतील माहिती अतिशय मनोरंजक आहे. हे शब्द देण्याचा हेतु अशाच तऱ्हेनें आणखी अनेक शब्दाची व्युत्पत्ति शोधक व जिज्ञासु मनुष्याने लावण्याचा प्रयत्न करावा असा त्यानी सांगितला आहे. या निबंधात दिलेल्या शब्दापैकी पहिले २५ वर शब्द फक्त घोडेस्वार, घोडा व त्याचे आनुषंगिक पदार्थ इत्यादींवरून बनलेले आहेत. त्यापुढचे तीस एक शब्द किल्ले लष्कर, हत्यारे वगैरेशी संबद्ध असून, बाकीचे दिवाणी, न्याय-मनसुबी, राजादिकाच्या चैनी, पोषाक व व्यापार-उदीम, चलन, असल्या बाबीवरून साधिलेले प्रचारात आले आहेत. त्यापैकी बरेच शब्द मूळ अर्थाला सोडून अगदी निराळ्या अर्थानें हल्लीच्या—चालू—भाषेत वापरले जात आहेत त्याची व्युत्पत्ति समजून मौज वाटते. उदाहरणार्थ :—

| अनुक्रम संख्या | शब्द | मूळ अर्थ | रूढ अर्थ |
|---|---|---|---|
| १ | करोल | बदूकस्वार | धडेखडे, तत्पर, अगदीं तयार, भक्कम, ( मनुष्य ) |
| २ | जगी | जग=लढाई, जंगी = लढाऊ, लढाईसबंधीं | जगी = मोठी, थाटाची (मेजवानी, मिरवणूक इ०). |
| ३ | धोशा | अरबाचें निशाण, किवा नौबत, साहेब-- नौबत. | सपाटा, गडबड, अभ्यासाचा धोशा = घोकण्याची गर्जना, आरडाओरड. |
| ४ | हूल | बिनीची बिनी, आघाडीची आघाडी | बाजारगप्प, खोटी बातमी, |
| ५ | गुळें | शत्रूस भिऊन पळालेला गाव कोठें आश्रयास गेल्यास त्यास गुळें म्हणत. | समूळ नाश, पुरी फजीती. गुळेकरी = दुष्काळपीडित लोकांची गांवगन्ना भटकत फिरणारी टोळी. |

| अनुक्रम सख्या. | शब्द. | मूळ अर्थ. | रूढ अर्थ |
|---|---|---|---|
| ६ | बैदा. | कर्नाटकी पेढाऱ्यांचा हल्ला. | भानगड. |
| ७ | कडेलोट. | कड्यावरून ढकलून देणें | पराकाष्ठा कडेलोटाच्या जागेस ' टकमक ' असे म्हणतात पण व्यवहारात टकमका पाहतो=घाबरून किंवा आश्चर्यानें पाहतो |
| ८ | माखजन. | खजीना | कोंकणात संगमेश्वर तालुक्या-पैकीं एका गावाचे नाव |
| ९ | चादरात | पगाराचा दिवस | चैन, उपरोधिक अर्थानें नाश |
| १० | पचाईत | पचांनी केलेला निकाल. | संकट, भानगड |
| ११ | फर्माश | आज्ञा | फर्माश=उत्तम ( माल ) किंवा यथास्थित चोप-मार-वगैरे |
| १२ | ढालगज | निशाणाचा हत्ती ढाल=निशाण, गज=हत्ती | उलाढाली, कारभारी, उपद्यापी (पोर,बायको वगैरे). |

शब्दांची व्युत्पत्ति पाहिल्यानें कित्येक वेळा ऐतिहासिक शोधास मदत होते मराठींतल्या ' सुतक[1] ' अथवा इंग्रजींतल्या 'डन्स[2]' ( मूर्ख ) सारख्या शब्दाचे मूळचे उत्कृष्ट अर्थ व त्यांच्या अगदी विरुद्ध

१. मूळ शब्द सूतक=जनन, जननसबधी ( कुटुंबांतील अशुद्धता इ. ). रूढार्थ प्रसिद्धच आहे. २. युरोपीय मध्ययुगातील ( Middle Ages ) एका तत्त्वज्ञानी पुरुषाचें नाव ' डन्स् ' असें होतें. बायबलमधील अद्भुत कथावर त्याचा विश्वास असे. त्याच्या अनुयायास ' डन्सर्स् ' म्हणत. ते आपल्या मताविषयीं आग्रही असत. धार्मिक सुधारणांस ते विरोध करीत. (Brewer's Dictionary of Phrase and Fable. ) या शब्दाची आमच्या कडील 'आर्ष' शब्दासारखी अवस्था झाली आहे ! ! !

असे रूढ झालेले अपकृष्ट अर्थ पाहून चमत्कार वाटतो. व हे अर्थ इतके कसे बदलले या जिज्ञासेमधूनच कांहीं ऐतिहासिक माहिती निघण्याचा संभव असतो. प्रस्तुत निबंधातील चर्चेस घेतलेल्या शब्दात एक विशेष दिसून येतो तो हा कीं, दीडशे वर्षांपूर्वी महाराष्ट्रभर वावरत असलेल्या वीरवृत्तीसबंधी गोष्टींत त्याचा उगम आढळतो. व ह्यामुळेच त्यास निबंधकारांनी ऐतिहासिक म्हणजे इतिहास दाखविणारे शब्द असे म्हटले असावें.

---

## 'मराठे व इंग्रज' या ग्रंथाचा उपोद्घात (स. १९१८)

हा शास्त्रिबुवांच्या हातचा एक स्वतंत्र व महत्त्वाचा ऐतिहासिक निबध आहे असे म्हटलें तरी चालेल. ह्यात त्यानीं मराठ्यांच्या इतिहासाविषयीं व मराठ्याच्या अगच्या गुणदोषाविषयीं आपली स्थिर झालेली मते त्याच्या कारणासह विस्तारपूर्वक वाचकापुढे ठेविली आहेत. या त्याच्या मतास तीस वर्षांवर केलेल्या इतिहासाच्या सशोधनामुळें व अभ्यासामुळें बळकटी आलेली आहे. कै. प्रो हरिभाऊ लिमये यांनी या ग्रंथावर टीका[1] करिताना इतिहास लेखकांचे दोन वर्ग कल्पिले असून त्यापैकी मुसलमान व इंग्रज यासारख्या परकी दुराग्रही लेखक वर्गास मराठ्यात सारे दोषच दिसले व त्यांस लुटारू, बंडखोर, अशी विशेषणें लावून त्यानी जगभर मराठ्यांची नालस्ती करण्याचा प्रयत्न केला; तर दुसऱ्या फाजील स्वाभिमानी स्वकीयांस मराठे सर्वगुणसंपन्न दिसतात, आणि मराठ्यांचें राज्य गेले त्याचे सारेंच खापर ते इंग्रजांच्या माथी मारतात, असें हरिभाऊंनी म्हटलें आहे. ह्यापुढे ते म्हणतात,

---

१ विविज्ञानविस्तार अक १० व ११ सं. १९१८.

"या दोघांच्याहि लिहिण्यापासून खरा इतिहास हाती लागणें मुष्किलीचें आहे. पूर्वजांसंबधें योग्य आदरभाव मनांत बाळगून निःपक्षपाती न्यायाधिशाच्या दृष्टीने पूर्वजांच्या गुणावगुणांची छाननी करणारांच्या हातूनच खरा इतिहास लाभेल उपोद्घात लेखक खरेशास्त्री व मूळ ग्रंथकार श्री केळकर यांनी 'मराठे व इंग्रज' हे पुस्तक लिहिताना हीच दृष्टि अंगिकारिली आहे याबद्दल आम्ही त्याचें अभिनंदन करितो."

या पुस्तकाच्या उपोद्घातांत 'मराठी राज्य कशाने बुडाले?' असा प्रश्न उपस्थित करून त्यासंबधी अनेक अंगांनी साधक बाधक चर्चा शास्त्रीबुवांनीं केली आहे. (१) संस्था-प्रधान कारभार करण्याच्या संवयीचा अभाव, (२) शिस्त नसणें, (३) तोफखाना व पायदळ यांत सुधारणा न करणे, (४) उलट या दोनहि बाबतींत परकीय लोकांवर अवलंबून राहाण्याचा वेडेपणा करणे, (५) सरंजामी पद्धत आणि (६) मुख्यतः, मध्यवर्ती सत्तेची ढिलाई, (७) मराठा-संस्थान-मंडळांत उत्पन्न झालेली बेकैदी व (८) कोणी कोणी म्हणतात त्याप्रमाणे 'जातिभेद मराठ्यांच्या राजकारणास नडला' ह्यात कितपत तथ्य आहे इतक्या अंगभूत कारणांची वाटाघाट करून 'जातिभेदाचा अडथळा' या एका कारणाखेरीज खरेशास्त्री यांनीं बाकींच्या कारणांच्या बाजूनें अस्तिपक्षीं निर्णय दिलेला आहे. उपोद्घाताच्या अखेरच्या परिच्छेदात मराठ्यांच्या अंगचे कांहीं दुर्गण त्यांनी 'अप्रियस्यतु पथ्यस्य' अशा दुर्लभ वक्त्याची भूमिका पतकरून स्पष्टपणे सांगितले आहेत! ते म्हणजे-

---

१. 'म. व इं.' उपोद्घात, पृ. १० पहा. "पठाण, अरब, रोहिले, रागडे, यांना पगार सातापासून दहा रुपयेपर्यंत आणि मावळ्याना पगार तीन किंवा चार रुपये! ह्या परदेशी लोकानीं आमच्या मोहिमा कराव्या आणि मावळ्यानीं आमची कोठी, देवघर आणि बायका-पोरें संभाळावी!!" वगैरे मजकूर अगदीं अंतःकरणास पीळ पाडणारा आहे.

देशाभिमान–शून्यता, समूहरूपानें कार्य करण्याची नालायखी, स्वार्थ-साधनाची बेसुमार हांव, आळस, हेळसांड, दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिण्याची संवय इ. होत. " पूर्वी स्वराज्य होते ते याच दुर्गुणामुळे गेलें हे समजून जर आम्ही सावध झालों नाहीं, तर नवीन स्वराज्य मिळून सुद्धा व्यर्थच आहे. हाच इतिहास–डिंडिमाचा घोष प्रत्येकाच्या कानीं घुमत राहिला पाहिजे ! " हा त्यांचा खडखडीत इषारा स्वोन्नती-साठी झटणाऱ्या आम्हीं सतत नजरेसमोर ठेवणें हितावह आहे.

---

## मालोजी व शाहाजी ( स. १९२० )

या निबंधांत मालोजी व शहाजी यांच्या चरित्राविषयीं चर्चात्मक विवेचन करून या चरित्रांचा व विशेषेकरून शहाजीच्या चरित्राचा शिवाजीच्या अभ्युदयाशीं किती निकट संबंध आहे ते शास्त्रीबुवांनीं दाखविले आहे. मालोजीच्या चरित्रास बखरीखेरीज दुसरा आधार नाही. तशी स्थिति शहाजीच्या चरित्राची नसून, प्रो. यदुनाथ सरकार यांनी केलेले मुसलमानी इतिहासाचे तर्जुमे व त्यांवर त्यांनी लिहिलेले चर्चात्मक लेख आणि कै. राजवाडे यांनीं छापिलेले ऐतिहासिक खंड ह्यामधून शहाजीसंबधी पुष्कळ विश्वसनीय व साधार माहिती मिळते. मालोजी, शहाजी व शहाजीचे चुलत भाऊ परसोजी, खेळोजी वगैरे मोठे पराक्रमी व कर्तृत्ववान् होते. खेळोजी यासमोगलांच्या फौजेत पांच हजार स्वारांची मनसबदारी होती. शिवाजी महाराजांचे आजोळ म्हणजे जाधव घराणे. यांत लुकजी जाधवराव यांची मोंगल दरबारांत किती मानमान्यता होती तें प्रसिद्धच आहे. लुकजीची बायको–शिवाजीराजांची मातामही–गिरजा-बाई ऊर्फ म्हळसाबाई–हिचे धैर्य व प्रसंगावधान अलौकिक होतें. हमीद-

खान नावाच्या बदमल्लागार वजीराच्या चिथावणीवरून निजामशहानें लुकजीस दौलताबाद येथे भेटीस बोलावून विश्वासघातानें मारेकरी घालून पुत्रपौत्र–आप्तेष्टासह ठार मारविले!! (स १६३० आगष्ट जेधे शकावली.) या प्रसंगीं न डगमतां धैर्य धरून म्हाळसाबाई, आपल्या उरलेल्या लोकासह, आपली ग्राडबिशाद आवरून लादून शत्रूच्या देखत देखत शिंदखेडास परत आली ! !

शिवाजीमहाराज व श्रीसमर्थ रामदासस्वामी याची भेट स. १६७२ पर्यंत झाली नव्हती असे कित्येकाचे म्हणणें आहे. परंतु स. १६३१ च्या सुमारास शहाजीची छावणी नाशिकाजवळ होती व स्वामींचे अनुष्ठान संपून ते तीर्थयात्रेस जाण्याच्या विचारांत होते. या वेळीं स्वामीच्या दैवी शक्तीची ख्याति चहूंकडे पसरली होती. अशा महा सत्पुरुषाचे दर्शन घडण्याचा सुयोग शहाजीसारखा भाविक, धर्मशील गृहस्थ साधणार नाही हे संभवनीय वाटत नाही, असे या निबंधांत म्हटले आहे. हे अनुमान खरे धरिल्यास समर्थ रामदासस्वामी याचा संबंध भोसले-कुळाशी शिवाजीच्या जन्मानंतर वर्षेदीडवर्षांतच आला व तोहि प्रत्यक्ष शहाजीशी, असे असता, स्वामीची व शिवाजीची भेट ह्यानंतर चाळीस वर्षांत एकदासुद्धा झाली नसेल असे कसे होईल? या निबंधामधील दुसरी विशेष गोष्ट म्हणजे शास्त्रीबुवांनी शिवाजीमहाराजाच्या जन्मतिथीसबंधीं केलेली चर्चा होय. या चर्चेचा निष्कर्ष असा की, त्यानीं स. १६३० मार्च—फाल्गुन वद्य ३ शके १५५१—ही शिवाजीची जन्मतिथि ग्राह्य धरिली. व त्यानी स्वतः या निबंधात जागजागी शिवाजीच्या वयाचा उल्लेख जन्म शक १५५१ धरून त्या अनुरोधानेच केलेला आहे.

शहाजीच्या बाणेदारपणाविषयीं ते लिहितात–" राज्य करणे व युद्ध करणे हा शहाजीचा कुळधर्मच होता. शहाजीला आपल्या क्षात्रियत्वाची पूर्ण जाणीव असून तो क्षात्रवृत्तीचा मोठा अभिमान वाहात असे

व त्यांत भूषण मानीत असे. " शहाजहानास सामील होऊन विजापूरच्या बादशहानें त्याच्याशीं दगलबाजी केल्याबद्दल तो मनांतून अगदीं संतापला होता व विजापूरकराने दक्षिणेतला पुणें, सुपे वगैरे व कोकणांतील आपला मुलूख काढून घेऊन त्या ऐवजीं कर्नाटक-प्रांती आपणांस डाबून टाकिल्याबद्दल त्याला अतिशय विषाद वाटे. म्हणून हें गमावलेलें आपले राज्य—स्वराज्य—परत मिळविण्याचा व्यवस्थेशीर प्रयत्न शिवाजीकडून त्यानें करविला, असा सिद्धान्त बांधून त्याच्या पुष्ट्यर्थ त्यानी या निबंधाच्या अखेरीस अनेक मुद्दे वाचकापुढे मांडिले आहेत. त्यांचा इत्यर्थ इतकाच की, शिवाजीच्या यशस्वितेची संगति, केवळ अवतारवादानें म्हणजे अकस्मात् आकाशातून कोसळल्यासारखी किंवा भूविवरामधून एकदम वर उठल्याप्रमाणे न लाविता, एकदोन पिढ्यांच्या शिस्तवार प्रयत्नाची फलश्रुति जमेस धरून मग महाराजांचे लोकोत्तर धैर्य, दिव्य पराक्रम, देशाभिमान, धर्माभिमान, दीनदुबळ्या स्वजनाची दया, परवशतेचें दुःख व ते दूर करण्याची पराकाष्टेची तळमळ, सावधानता, आणि अचुक यत्न, इत्यादि गुणाच्या समुच्चयवादानें ती लाविली पाहिजे.

" प्रतिपच्चंद्ररेखेव वर्धिष्णुर्विश्ववंदिता ।
शहासूनोः शिवस्यैषा मुद्रा भाति यशस्विनी ॥ "

अवघ्या ८।१० वर्षांच्या बाल—शिवाजी—राजाची ही स १६४०तील स्फूर्तिदायक मुद्रा! शहाजीराजे स्वतः जिवंत असतां शिवाजीच्या नावची स्वतंत्र मुद्रा कां ? या प्रश्नावर त्यानी सूचित केलेले विचार मनन करण्याजोगे आहेत. शिवाजीचे वड बापाच्या मर्जीविरुद्ध नसून बापाच्या व त्याच्या कृतीत एकसूत्रीपणा, संगनमत व एकापुढें एक अशी स्वाभाविक कार्यकारणपरंपरेची वाढ होत गेली आहे असा त्यामधून त्यांनीं सारांश

१. 'मुद्रा भद्राय राजते' असा पाठ अन्यत्र आहे

काढिला आहे. शहाजीच्या हातचा लेखी पुरावा ह्यासंबंधांत कांहींच कसा मिळत नाहीं [2] या शंकेवर, " गूढ कारस्थानें ही मुळीं पांढऱ्यावर काळें करण्याचे विषयच नव्हत. अत्यंत विश्वासू माणसांबरोबर निरोपानिरोपीं या गोष्टी चालावयाच्या, " असे समर्पक उत्तर शास्त्रीबुवांनी दिलेलें आहे.

---

## कांहीं किरकोळ निबंध व स्फुट लेख

(१) सरदार परशुरामभाऊ पटवर्धन यानीं आपल्या विधवा झालेल्या बालवयी कन्येच्या 'पुनर्विवाहासंबधीं रामशास्त्री याची संमति मिळविली व काशीहून शास्त्रार्थ आणविला' असें पुनर्विवाहवाद्यांचे म्हणणें आहे. ह्यावरहि बऱ्याच वर्षांपूर्वी शास्त्रीबुवांनीं वर्तमानपत्रांतून उत्तर दिले होतें. त्यांतील मुद्दा अर्थात्च ' पुनर्विवाह करणे चांगलें की वाईट' हा नसून सुधारकपक्षाने आपल्याला अनुकूल अशी एकादी गोष्ट एकाद्या गतकालीन थोर पुरुषाच्या नावावर मोडत असली तरी तिचें खरेखोटेपण पारखून पाहिल्याशिवाय ती पुराव्यांत दाखल करणे चांगले नव्हे, एवढाच आहे. (१) भाऊंनीं आपल्या बालविधवा कन्येच्या पुनर्विवाहाबद्दल रामशास्त्र्यास संमति विचारिली, ( २ ) त्यांनीं ती दिली व (३) भाऊंनीं काशीहून शास्त्रार्थ आणविला, या तीनहि गोष्टींचा मागमूस मिरज, मळा, कुरुंद-

---

१. मालोजी व शहाजी पृ. ३३ परिच्छेद २ रा २. केसरी किंवा ज्ञानप्रकाश. (साल स्मरत नाहीं.) 'Rise of the Maratha Power' मध्यें पृ ३१० ते ३१३ वर निगुडकरकृत परशुरामभाऊच्या चरित्राचा उल्लेख व त्यावर कै. न्यायमूर्ती रानडे यांची टीका सुधारकांस अनुकूल अशी आहे. शास्त्रीबुवाचें या विषयींचें साधार व विस्तृत विवेचन त्याच्या ' अधिकार—योग' या पुस्तकात पृ ११६ वर टिपेंत नमूद केलेलें आहे

वाड व इचलकरंजी या चार संस्थानांच्या जुन्या दप्तरांत आम्हांस कोठें मिळाला नाही. यावरून या गोष्टी निराधार आहेत असें सिद्ध होते, असें ते म्हणतात शिवाय त्यावेळी ( स. १७६८ ) भाऊंच्या घरगुती अगर लष्करी कारभाराचा वडीलपणा त्यांजकडे आलेला नसून त्याचा भार अनुक्रमें त्याचे चुलते व मातुःश्री आणि चुलत भाऊ गोपाळराव याजवर होता. आणि भाऊ स्वतः मोठे धर्मनिष्ठ व आचारसंपन्न होते. २ रे, ही गोष्ट सं. १७९० मध्ये घडली असे कोणीं लिहिले आहे. पण, तेव्हा भाऊंच्या या मुलीचें वय २९ वर्षांचें असून तिचा नवरा मरून २२ वर्षें झालेली होतीं ! ! शिवाय मुख्य प्रश्न असा आहे की, त्या काळच्या धार्मिक, सामाजिक स्थितीचा विचार केल्यास भाऊंसारखा विख्यात व पदवीस चढलेला ब्राह्मण सरदार रूढ धर्माचाराविरुद्ध शुद्ध बंडासारखे वाटणारे विचार उघडपणे शास्त्रीपंडितांपुढे मांडितो, ते त्याला संमति देतात, आणि त्यांच्याच घराण्याच्या सागरतुल्य पत्रसंग्रहामध्ये त्यासंबंधी ब्र सुद्धा कोणी काढीत नाहींत, व एका अवाक्षराने देखील कोठेंच कांही लिहिलेले आढळत नाही हे कसे ? इतकी महत्त्वाची गोष्ट असतां तिच्यासंबंधीं गवगवा न होतां ती गुप्तच कशी राहिली ? या प्रश्नाचें उत्तर अद्यापि कोणीं दिलेले नाही. असो. "**पटवर्धनी इतिहासाविषयीं ते ( शास्त्रीबुवा ) 'वेदश्रुति' च होते.**" हे एका नामांकित विद्वानाचे उद्गार याठिकाणी वाचकानी अवश्य ध्यानात ठेवावे.[२]

(२) इंदूर येथे प्रसिद्ध होणाऱ्या 'मल्हारी-मार्तंड' पत्राने देवी अहल्याबाई यांच्या राजकीय धोरणासंबंधीं शास्त्रीबुवानीं प्रकट केलेल्या विचारां-

---

१. स १७९० साल चूक आहे कारण, रामशास्त्री प्रभुणे स. १७८९ मध्यें वारले. (श. १७११ आश्विनमास पंत प्रधान यांची शकावलि पृ. ३४) ते १७९० मध्यें शास्त्रार्थ कसा देणार ? २. केसरी, खरे मृत्युलेख ता. १७।६।२४.

वर टीका केली होती. या टीकेस सदर पत्रातूनच शास्त्रीबुवांनी उत्तर देऊन आपल्या विधानाचे समर्थन केले होते असे ऐकिवांत आहे. सदरहू टीके-प्रतिटीकेचे लेख प्रत्यक्ष पाहाण्यांत आलेले नाहीत. देवी अहल्याबाई ह्यांच्या अतुल चारित्र्याविषयी व धर्मशीलपणाविषयीं कोणाचा मतभेद असणें शक्य नाहीं. परंतु मराठी साम्राज्यातील एका मोठ्या स्वतंत्र जहागिरीची–मांडलिक राज्याची–धनीण या नात्याने बाईंच्या साम्राज्यविषयक कर्तव्याच्या राजकारणातील कसुरीची उणीव त्यांच्या धर्मकारणांतील थोरवीनें कोणी भरून काढूं लागला तर ते कोणास पटेल, कोणास कदाचित् पटणार नाही. शास्त्रीबुवा झाले तरी बाईंच्या –साम्राज्यांतर्गत मांडलिकाच्या–राजकीय जबाबदारीसंबंधींच कांहीं अंशी प्रतिकूळ बोलले असावे असा आमचा तर्क आहे. (२) **'वसईचा तह'** या महत्त्वाच्या विषयावरील आपले विचार त्यांनी एका [1]व्याख्यानात सांगितले होते परतु ते निबंधरूपाने कोठे प्रसिद्ध झालेले नाहीत.

---

## ऐतिहासिक--लेख-संग्रह भाग १ ते १२

**( सन १८९७ ते १९२४ )**

ऐ. ले. सं. भाग १ ते १२ पैकीं पहिले ४ भाग बहुतेक थोरले माधवराव पेशवे याच्या कर्तृत्ववर्णनानें व्यापिलेले आहेत. एका मार्मिक इतिहासवाचकाने असें म्हटले आहे की, "ग्रँट्डफनें ज्यांच्या वर्णनास १०।२० पेक्षा अधिक पृष्ठे खर्चिली नाहीत व जुन्या बखरीतून तर एक दोन पृष्ठे देखील मजकूर ज्यांच्यासंबंधाने आलेला नाही त्या थोरल्या माधवरावांचे वृत्त कथन करणारे ऐतिहासिक कागद-

---

१. सांगली सिटिस्कूल स. १९२३ मधील व्याख्यान.

पत्र ऐ. ले. संग्रहांत सुमारे २००० पृष्ठे व्यापून राहिले आहेत !" यावरून बोध इतकाच निघतो की, शास्त्रीबुवाच्या संशोधनानें महाराष्ट्राच्या इतिहासात प्रचंड भर पडली आहे. या भागातच फडनविशीचा म्हणजे पेशवाईतील मुख्य सत्तेचा अधिकार नानाच्या हाती कसकसा आला ते क्रमवार समजत जाते. दुर्दैवी पेशवे नारायणराव यांचा उद्वेगजनक अंत झाल्याचा वृतान्तहि या भागातच येतो असो. या पुढील ५ भागांत—९ व्या भागाच्या अखेरपर्यंत—नानाची मुत्सद्देगिरी व पाटीलबावांची तरवार याचा पराक्रम दिसून येतो पाटीलबावाच्या मृत्यूपूर्वी काही वर्षे ते व नाना याच्यात बिघाड आला होता. तेव्हापासून नानाची कारस्थाने सिद्धीस नेण्यास परशुरामभाऊंची तरवार त्याच्या उपयोगास आली हरिपंत तात्या फडके हे पराक्रमी व चतुर सेनापति नानाचे कायमचेच सहाय्यकारी होते. स्वत: पेशवे श्रीमंत सवाई माधवराव हे अल्पवयी असल्यामुळें राज्यरक्षणाचा भार मुख्यत: नानावरच पडला. व नाना, त्याचे सहकारी मुत्सद्दी आणि पराक्रमी सरदार ह्यानी नानाच्या नेतृत्वाखाली तो भार बहुत शर्तीने सांभाळिला. यानंतर १० व ११ या दोन भागात नानांच्या आपत्ती, रावबाजीच्या कारकीर्दीची सुरुवात व त्यांचे खेळ्ये कारभारी–अग्या वेताळी हस्तक–याचे नंगे नाच यांचा प्रारंभ होतो. तथापि प्रसंगी रावबाजीना सुद्धा नानांचें सहाय्य घ्यावें लागले व त्यामुळे त्याची सुटका झाली आजपर्यंत–२५ वर्षांहून अधिक कालपर्यंत–आपणच जोपासून वाढविलेलें राज्य कसे तरी टिको या सद्बुद्धीनें नानांनी आपले अनिष्ट करणाऱ्या रावबाजीचे कारभारीपण पतकरून खुल्या दिलाने त्यांचे सहाय्य

१. शास्त्रीबुवाच्या घरच्या चरित्रविषयक टांचणात हा मजकूर आहे. हें टाचण शास्त्रीबुवा जिवंत असता त्याच्या एका प्रेमळ स्नेह्यानें काही वर्षांपूर्वी तयार केलेलें आहे.

केलें ! आणि १२ व्या भागांत नानांचा मृत्यु व बाजीरावसाहेबांचे चाळे इत्यादींविषयीं मजकूर आहे. या संक्षिप्तपणें वर्णिलेल्या वरील प्रमुख विषयांस धरून अनेक प्रकारच्या राजकीय उलाढालींच्या हकीकतीची सहस्रावधि पत्रे प्रकरणशः विस्तृत प्रस्तावनासह या बाराहि भागांत शास्त्रीबुवांनीं प्रसिद्ध केलेली आहेत.

## मराठे व मराठी इतिहास यांविषयीं त्यांचा अभिमान

ऐ ले सग्रहामधून ज्यांचे वृत्तान्त छापले गेले आहेत, त्या इतिहास-प्रसिद्ध महाराष्ट्रीय थोर व्यक्तींविषयीं किंवा सामान्यतः मराठे लोक व त्यांचा इतिहास यांसबधी शास्त्रीबुवाना केवढा अभिमान होता हें होता होईल तो त्यांच्याच शब्दांत यापुढें सांगितले आहे:--

" ज्यानी रामेश्वरापासून अटकेपर्यंत भगवा झेंडा नाचविला, ज्यांनीं गिलचे, रोहिले, पठाण, शीख रजपूत, रांगडे इत्यादि शूर लोकाच्या फौजा शेकडो वेळा लढाईंत गांठून, मारून, तुडवून धुळीस मिळविल्या, दूरदूरच्या प्रातात मानी व प्रतापी राजांची सिंहासने ज्यांच्या विजय-दुदुभीच्या नादाने दर वर्षास हदरू लागत, त्या महाराष्ट्र-वीरांनी काय काय पराक्रम केले ते लिहून ठेवण्याचे काम सुद्धा आम्हांपैकी कोणाच्या हातून अजून झाले नाही ! ते काम कित्येक इंग्रज ग्रंथकारांनी केले आहे ! परंतु सदरहू इंग्रज ग्रंथकारांनी आपले इतिहास इंग्रजांसाठी लिहिले असल्यामुळें त्यांतून आम्हांविषयी माहिती त्रोटक असावयाची व तींत जिकलेल्या लोकाची बाजू पुढें न येता फक्त जिकणाऱ्याचीच बाजू दाखविलेली असावयाची, हें कोणाहि विचारी मनुष्याच्या लक्ष्यांत येण्याजोगे आहे.........काव्येतिहाससंग्रहामुळे मराठी इतिहासाचे आस्थेनें पर्यालोचन करण्याची इच्छा बऱ्याच लोकांच्या मनांत जागृत झाली, दुर्दैवानें काव्येतिहाससंग्रह बंद पडला ! तथापि त्यावेळेपासून

तेंच काम पुढे सुरू ठेवण्याविषयी मधून मधून प्रयत्न कित्येकदां झाले व हल्लीहि होत आहेत. परतु हे काम जितक्या नेटानें व आस्थेने व व्यवस्थेनें व्हावयास पाहिजे तितकें ते होत नाही ही गोष्ट निर्विवाद आहे.''

" परशुरामभाऊ,, नाना फडनवीस, व हरिपंत फडके या त्रिकूटाच्या अनेकविध कारस्थनांचीं व त्यांपैकी त्या दोघा सरदारांचीं, स्वाऱ्यांतील स्वहस्तलिखित अशी ती साग्र व सुसगत मजकुराची पत्रे वाचू लागले म्हणजे त्या थोर पुरुषांनीं स्वदेशासाठीं कशा हालअपेष्टा भोगिल्या, कसे पराक्रम केले, मोठमोठ्या संकटांतून कसा बचाव करून घेतला या सर्व गोष्टींचे हुबेहुब चित्र डोळ्यांपुढें उभे राहून वाचक तल्लीन होऊन जातो. व हल्लीच्या काळाचा त्यास विसर पडून तो त्या पत्र लिहिणाऱ्यांच्या सुखदु:खांचा विभागी होतो ! साराश काय की, ज्यानी कारस्थाने लढविलीं व पराक्रम केले व पाहिले त्यांनीच लिहिलेला हा पेशवाईच्या ( पानिपतोत्तरकालीन ) ४० वर्षांचा अस्सल इतिहास ऐ. ले. संग्रहद्वारा प्रसिद्ध केला जात आहे.''–( सन १८९७ ऐ. ले. सग्रह भाग १ )

" सर्व दर्जाचे लोक ( सरदार, मानकरी, अष्टप्रधान व खुद्द महाराजांनी दिलेल्या जहागिरींचे व वतनवाडीचे मालक ) वर सांगितले आहेत त्या सर्वांचा सांभाळ होऊन त्यांचें ऊर्जित व्हावें, त्यांचे परस्परांत कलह होऊन रयतेची पायमल्ली न व्हावी व ती रयत निर्भय व संतुष्ट राहावी, म्हणून शाहू महाराजांनी मराठी–साम्राज्य 'शिवस्व' म्हणून पेशव्याच्या हवाली केले. थोरल्या मुलावर संसाराचा व कुटुंबाचा भार सोंपवून एकाद्या मनुष्याने महायात्रेस जावें त्याप्रमाणें महाराजांनीं पेशव्यांवर राज्य सोपवून कैलासवास केला ही जबाबदारी ओळखून पेशव्यांनी हें ' शिवस्व ' यथाशक्ति साभाळिलें यांत काय संशय ? त्यांनी कोणाच्याहि दौलतीचा अभिलाष केला नाहीं; अपराधावांचून कोणास शासन केलें नाही; सामर्थ्याने उन्मत्त होऊन कोणास पायांखालीं

तुडविलें नाही, राजापासून रंकापर्यंत सर्वांचे मानमरातब व सरंजाम यथास्थित चालविले, हें त्यांस मोठें भूषणास्पद आहे महाराजांनीं भोंसले–गायकवाडास अधिकार दिला असता तरी याहून अधिक त्यांच्या हातून खचित झाले नसते ! नाना फडनवीस हयात होते तोंपर्यंत पेशवाईचे हे सर्व कायदे निर्बाधपणे चालले. ''

— स. १९१३ इचलकरंजी संस्थानचा इतिहास, पृ. ९५।९६.

''त्यावेळी पटवर्धनाचे घराणे तेजस्वी होते. प्रत्येक स्वारीत १६।१७ पुरुष घरचे असत. हे सर्वच लहानमोठ्या योग्यतेचे व इतमामाचे सरदार होते. पण कधी कोणात कुरकूर देखील होत नसे. मग तक्रारी फितूर, व भांडणे याचें नाव कशाला ? वडिलांविषयीं मर्यादा, आपसात एकजूट आणि पुढाऱ्यावर पूर्ण विश्वास या तीन गोष्टीचे बाळकडूच सर्वांस मिळाले होते. सर्वांची प्रीति व द्वेष, ग्रह व आग्रह, मसलतींचीं धोरणे व वागणुकीच्या तऱ्हा एकच. अशा संघशक्तीच्या जबरदस्त जोरावर कसेहि संकट पडलें तरी ते डगमगत नसत. व पाहिजे ती मसलत पार पाडण्याचे सामर्थ्य त्यामध्ये होते. यांत नवल काय ? एक मेला कीं, त्याच्याच तालमेंत तयार झालेला दुसरा त्याचे काम बजावण्यास तयार आहेच. ''—( ऐ. ले. संग्रह भाग १ पान ११०. )

## पटवर्धनांचें महत्त्व व कामगिरी

'' **महोदारा महाशूरा राजपूज्या भटा यतः ।**
**पुरा भवं प्रापुरार्या ' हरिवंशो ' विवर्धते ॥** ''–(खरेशास्त्री.)

या चाळीस वर्षांच्या इतिहासांत पटवर्धनांचें नांव प्रामुख्याने सर्वत्र आढळते. पानिपतच्या समरभूमीवर मराठी राज्यातल्या मोहोरा–पुतळ्या फार हरवल्या असें अलंकारिक रीतीनें एकानें म्हटलें आहे ह्या मोहोरा

---

१. नागपूरकर भोंसले हे त्या वेळीं पेशव्यांशीं मोठी स्पर्धा करणारे होते.

पुतळ्यांची—रणधीर, वीर—पुरुषांची—कमतरता पटवर्धन घराण्यांतील वीर-श्रेष्ठांनीं भासूं दिली नाही. उत्तरेकडील राजकारण जरी बहुतेक शिंद्यांनीं आंवरलें होते तरी मराठी साम्राज्याची मुख्य सत्ता दक्षिणेत महाराष्ट्रात होती. व तिच्या तीन बाजूंस निजाम, हैदर व त्याच्यामागून टिपू, आणि करवीरकर ह्या विरोधी सत्ता होत्या. त्यांखेरीज पाळेगार देसाई व बेरड वगैरे याचा उपद्रव दक्षिणेच्या बाजूने पोचत असे. या सर्वांचा बंदोबस्त आणि वेळप्रसंगी इंग्रजांकडून होणाऱ्या विरोधाचा परिहारसुद्धा पटवर्धनांना करावा लागत असे. तथापि निजाम, हैदर–टिपू व करवीरकर याचे धकेचपेटे नित्याचे होते व ते सोसून या तीन बाजूंनी मराठी सत्ता सांवरून धरल्याचें श्रेय बहुतांशी एकट्या पटवर्धन-कुलासच दिले पाहिजे. गोविंदराव हरि, रामचंद्र हरि, शिवाजी केशव हे थोरल्या बाजीरावसाहेबाच्या वेळीच प्रसिद्धीस आले होते. नानासाहेब पेशव्याच्या कारकीर्दीत बाजीरावाच्या वेळचे अनुभवी पुरुष म्हणून गोविंद हरीची गणना होई. थोरल्या माधवरावाच्या वेळी गोविंद हरि स्वत. वृद्ध झाले होते तरी आपले पुत्र गोपाळराव यास ते सल्लामसलत आणि अडीअडचणीत धैर्य देत असत गोपाळराव स्वतः व पर्यायाने सर्व पटवर्धन मंडळी, माधवरावाचे पक्षपाती, ह्यास्तव राघोबादादा पेशवे त्याचा द्वेष करीत. राघोबादादा व माधवराव यांचें प्रथम बनत नसे. पण मध्यंतरीं चुलतेपुतणे एक झाले होते. त्या सधीत मिरजेवर स्वारी करून व मिरजेच्या किल्ल्यावर मारागिरी करून राघोबादादानीं पटवर्धनाचे वैर उगविण्याचें साधून घेतले ! राघोबादादांच्या जिगजिगी-मुळें गोपाळराव रागावून काहीं दिवस निजामाकडे निघून गेले होते. ह्याबद्दल त्यांना त्या काळात व आताहि कोणी दूषणें लाविली आहेत. परंतु खुद्द निजाम असे म्हणे की “ **यांस पेशव्यांची माया तुटत**

---

१. मागें ज्याची पालखींत बसण्यासंबधीं गोष्ट आली आहे ते

**नाही** " यापेक्षां गोपाळरावांच्या स्वामिनिष्ठेचा कोणता पुरावा पाहिजे ? गोपाळरावांना आपल्या कर्तृत्वाविषयीं मोठा अभिमान असे. यासंबंधी एक गमतीची गोष्ट ' हरिवंशाच्या बखरी'त आहे. त्या काळ'त 'राव' शब्द आजच्या इतका स्वस्त नव्हता ! कारकुनी पेशाच्या फडनविशी दर्जापर्यंतच्या मुत्सद्दयांस देखील 'पंत' हे उपपद लावीत. गोपाळरावांचा मुक्काम एकदां पुण्यास असता, आपल्या नांवापुढे ' राव' पद योजून स्वतःस संबोधणाऱ्या गोपाळराव ताबवेकर नांवाच्या बडया सावकराच्या घरची वरातीची मिरवणूक त्यांनी बंद पाडिली ! दुसरे दिवशी माधवराव पेशव्यांच्या दरबारात ही फिर्याद आली. त्या प्रसंगीं पेशव्यांच्या आज्ञेवरून गोपाळराव यानी खुलासा केला की, " आजकाल पेशवाईत 'राव' तीन ! एक, आपण म्हणजे श्रीमंत माधवराव पेशवे, दुसरे मुरारराव घोरपडे, व तिसरे गोपाळराव पटवर्धन ! ! " असे आपलें नांव विनयाने सूचित केले. या उत्तरानें माधरावांचे समाधान झाले. ह्या गोपाळरावांनी हैदराबरोबरच्या लढायात चांगले पराक्रम गाजविले होते. परंतु, मराठी राज्याच्या दुर्दैवाने रावसाहेब पेशव्याप्रमाणें गोपाळराव पटवर्धनहि अकालीच वारले !

**' मिरज प्रकरण '** ( सन १८९८ ) व **' हैदरअल्लीवर तिसरी स्वारी '** ( सन १९०१ )—हीं पुस्तके मुख्यतः पटवर्धनांच्या इतिहासासंबंधींच आहेत असे म्हटल्यास चालेल. यांपैकी **'मिरज प्रकरण'** हें ऐ. ले संग्रह मासिक, वर्ष १ लें, अंक ५. ६, ७ यतून वेगळे काढून पुस्तकरूपाने प्रसिद्ध केलें होते. यांतील कथानकाची कालमर्यादा स. १७६२ नवंबर ते स. १७६३ फेब्रुवारी. वरील परिच्छेदांत मिरजेवरील स्वारीची हकीकत आलीच आहे. " कांही दिवस गोविंद हरि यांनी मिरजेचा किल्ला लढविला. गोपाळरावांची कुमक वेळेवर येऊन

पोचली नाही, व गोविंद हरीचे मराठे शिलेदार पेशव्यांस फितूर झाले-निदान त्यानी पेशव्यांविरुद्ध लढण्याचे साफ नाकारिलें; आणि अखेर तह होऊन हें प्रकरण मिटलें." इ. मजकूर ह्यांत आहे. '**हैदरअलीवर तिसरी स्वारी**' हे प्रकरण ऐ. ले. संग्रहाच्या ४ थ्या भागामधील आहे. तेच पुस्तकरूपाने निराळे छापून प्रसिद्ध केले होते. ह्या स्वारीचा भार गोपाळरावप्रभृति पटवर्धन वीराच्या पराक्रमावर विशेष होता. असो. ही दोनहि पुस्तकें हल्ली विकत मिळत नाहीत.

गोपाळरावाचे बंधु वामनराव व पांडुरंगराव हे उभयतांहि शूर असून हैदरवगैरेवरील मोहिमांवर गेलेले होते. तसेंच कुरुंदवाड घराण्यांतील कोन्हेरराव व निळकंठराव या बंधूंच्या पराक्रमासंबंधी एक गोष्ट मागें दिलीच आहे. पुरुषोत्तमरावदाजी हे एक प्रकारे सव्यसाची होते. कारण, श्री व सरस्वतीप्रमाणे, बुद्धिवैभव व पराक्रम हीं एकत्र अशी निदान त्या काळी तरी कांहीं थोड्याच पुरुषात नांदत होती. त्यांतच पुरुषोत्तमदाजीची गणना केली पाहिजे. आणि या गुणसमुच्चयामुळेच त्यांनी पुष्कळ प्रसंगीं राघोबादादा व आनंदीबाई यांजकडून गुदरलेल्या संकटांमधून पटवर्धन भाऊबंदाना व सवाई माधवराव पेशव्याना निभावून नेलें. यानंतर, परशुरामभाऊ पटवर्धन यांनी (शेवटचा किंचित् अपवादात्मक काळ सोडून) नाना फडनविसांना अनन्यभावाने मदत केली. पुढें रामचंद्र परशुराम व चिंतामणराव पांडुरंग ( हेच थोरले आपासाहेब सांगलीकर ) हेहि पेशवाईच्या पडत्या काळांत मराठी सत्ता सावरून टिकविण्याच्या कामी शक्य तितके झटले. सारांश, बहुतेक तीन पिढयांचे सारे पटवर्धन सरदार पेशवाईच्या अखेरच्या चाळीस वर्षांत तिच्या कल्याणासाठी—पर्यायाने मराठी राज्याच्या संरक्षणासाठी व उत्कर्षासाठीं—नानासाहेब पेशव्याच्या गादीनशीन वंशजांशी एकनिष्ठ स्वामिभक्तीने वागले असे हा इतिहास सांगत आहे.

## फडनवीस व पाटीलबावा

पेशवाईचा कारभार सर्वस्वी कारभाऱ्यांच्या अंगावर पडला त्या वेळेपासून—म्हणजे, नारायणराव पेशवे यांची स्त्री गंगाबाई गरोदर असल्याकारणाने तिच्या नांवाची द्वाही फिरवून सुदैवाने तिला पुत्र झाल्यास तो वयांत येईपर्यंत, मराठेशाहीतल्या 'बारभाई' नामक कारस्थानांत सामील असलेल्या कर्त्या पुरुषानीं एकचित्ताने राहून, स्त्री-बुद्धीनें चालणाऱ्या दादासाहेबांस कारभारांत हात घालूं न देतां नानासाहेब पेशव्याच्या वंशजांचे ऊर्जित करावयाचें असे ठरले त्या वेळेपासून—नाना फडनवीस आणि महादजी शिंदे ह्यांच्यात वितुष्ट असेल असे वाटत नाही. शिंदे व होळकर दूर उत्तर प्रातात असल्यामुळें प्रथमारंभी—बारभाईचें कारस्थान उभे राहिले त्यासमयी—त्याना त्यात सामील करून घेणे अशक्य होतें. पुढे गंगाबाई प्रसूत होऊन सवाई माधवरावाचा जन्म झाला व राघोबादादास पेशवाईची गादी मिळण्याचा संभव नाहीसा झाला त्यासमयीं दादासाहेब, निजमावरील मोहिमेत गुंतले होते, त्याच्या मनांत आलें कीं, शिंदे-होळकरांच्या सहाय्यानें पुण्यावर स्वारी करावी. म्हणून ते नर्मदापार होऊन शिंदे-होळकरांस भेटले व त्यांनींहि दादासाहेबास यथाशक्ति मदत देण्याचे कबूल केलें. कारभारी बापू व नाना यानीं दादासाहेबांची समजूत काढण्याचा परोपरीनें यत्न केला त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. परंतु शिंदे व होळकर यांना वश करण्यात त्यास बरेच यश आलें व दादासाहेबांचा पक्ष शिंदे-होळकरांनी सोडून दिला.

उत्तरेकडील राजकाणांत शिंदे दिवसेंदिवस प्रबल होत चालले होते. दिल्लीच्या बादशहाच्या दरबारांत शिंद्यांचें तेज उत्तरोत्तर वाढूं लागलें होते. दिल्लीकर बादशहा नामधारी बनले होते. व बादशाहींतल्या

१. हे परिच्छेद (प्यारिग्राफ), नानाच्या चारित्राच्या आधारें लिहिले आहेत.

निरनिराळ्या सुभ्यांचे अम्मलदार आपापली सत्ता स्वतंत्र व बळकट करूं लागले होते अर्थात् मुख्य बादशाही सत्तेशी सगळे बेपर्वाईनेंच वागत. अशा तऱ्हेने डळमळूं लागलेली मध्यवर्ती मोगल बादशाही सत्ता, आपल्या स्थिरतेसाठी प्रसंग पाहून मराठ्याच्या मदतीचा उपयोग करून घेऊं लागली होती ! अशी मदत देण्यास उत्तर हिंदुस्थानात शिंद्या-वाचून दुसरा कोणी नव्हता. गाइकवाडांनी राजकारणाचा विशेष व्याप यापूर्वीच टाकिला होता, व त्याच्यात गृहकलह माजून राहिले होते असे दिसते. होळकर राजकारणात शिंद्यांबरोबर एकमताने कधीं वागत, कधी वागत नसत. पानिपतच्या लढाईच्या आधीपासूनच हे वितुष्ट त्याच्यात पडले होते. रजपुतांची सत्ता आटोपण्याचे शिंद्यांनी मनात आणिले तर होळकर त्यास विरोध करीत ! याचा अर्थ, होळकर रजपुताशीं अगदीं स्नेहभावानें वागत होते असा मात्र नव्हे होळकराची कर्तबगारी स्वतंत्रपणे अशी फारशी दिसून येत नाहीं शिंदे जेव्हां दिल्लीस उत्कर्ष पावत होते तेव्हां होळकरशाहीत ( १ ) देवी अहल्याबाई ह्या आपल्या पुण्यशील चारित्र्याने व अपूर्व धर्मकृत्यांनी लौकिक सपादन करीत होत्या, आणि ( २ ) तुकोजीराव होळकर हे दौलतीचा कारभार पाहात असत. ते मोठे शूर व पराक्रमी होते. परंतु शिंद्यांप्रमाणें त्यांनी स्वतंत्र-पणे स्वाऱ्या–शिकाऱ्या अगर मुलुखगिरी केल्याचे इतिहासांत नमूद नाहीं. त्याना सरदारी देवविण्यांत नानांचा बराच उपयोग झाला होता. तरी ते केव्हां केव्हा नानांच्या विरुद्ध शिंद्याच्या मसलतीत सामील झाले होते. तथापि, एकंदरींत पाहाता तुकोजीराव होळकर हे शिंद्यांपेक्षां नानाशी अधिक सहकार्य करीत यात संदेह नाहीं.

" शिंद्यांनी १०।१२ वर्षे एकसारखे खपून सर्व बादशाही आपल्या स्वाधीन करून घेतली होती. त्यांनी बादशहाच्या शत्रूंचा नायनाट करून पंजाब, बंगाल व अयोध्या ह्या प्रांतांखेरीज बाकीचा

सर्व उत्तर-हिंदुस्थान आपल्या ताब्यात आणिलें ! ” महादजी शिंदे हे अलौकिक पुरुष होते यांत शंका नाहीं. या रणशूर, सद्वर्तनी, धर्मनिष्ठ पण महत्त्वाकांक्षी बहादराने थोरल्या शिवाजी महाराजाची अप्रकट आणि थोरल्या शाहूमहाराजांची प्रकट इच्छा परिपूर्ण केली. या मध्यंतरी लोटलेल्या बारा वर्षांच्या अवधीत एकमेकापासून दूर असल्यामुळें नाना आणि महादजी यांजमध्यें थोडा मानीव बेबनाव उत्पन्न होण्याचा संभव होता. “ खुद्द पुण्यास राहून नानांचा कारभार माझ्या मदतीवांचून चालला आहे. त्यापक्षीं, माझा दिल्लीकडील उत्कर्ष त्यांना कितपत महत्त्वाचा वाटतो कोणास ठाऊक ? ” असे शिंद्यांना वाटलें असेल; तर, “ उलटपक्षीं आपल्या पराक्रमाने दिगंत कीर्ति गाजविलेले महादजी शिंदे आमच्या पुण्यातील कारभाराची मुर्वत ठेवतील कीं नाही कोण जाणे ” असे नानासहि वाटण्याचा संभव होता. आणि सन १७९१ मध्ये शिंदे पुण्याकडे येण्यास निघाले, ते ता. १३ जून स. १७९२ रोजी वानवडीवर येऊन दाखल झाले ते अठरा महिने पुण्यास होते. त्या अवधीत पुण्यास जे जे प्रकार घडले त्यावरून परस्परात वितुष्ट उत्पन्न झाले होतें इतकें निश्चित ठरतें. श्रीमतांची भेट झाली त्यावेळी पाटीलबावांनीं श्रीमंतांच्या पायावर डोई ठेविली आणि श्रीमंतांनीं भेटतेसमयी आपल्या गळ्यांतील मोत्यांची माळ पाटीलबावांच्या गळ्यांत घातली. पाटीलबावांची विनम्रवृत्ति पाहून सामान्य जनास सकौतुक आनंद वाटला. परंतु मुत्सद्द्याच्या मनाची स्थिति काही वेगळी झाली असावी. पुढे पाटीलबावांनीं बादशहाकडून मिळविलेली बहु-

---

१. हें व या पुढील कित्येक अवतरणें प्रो. भानु याच्या लेखांतून घेतली आहेत. ( चतुर्थ सम्मेलन वृत्त भा ३ सं. मं. शके १८३८ पृ. ८३ ते ९७. ) या लेखांत ऐ. ले. सं. मधील अनेक पत्रांचे व शास्त्रीबुवाच्या लिहिण्याचेच आधार घेतले आहेत. व अनेक ठिकाणीं टिपेंत त्यांचे पत्रांक दिले आहेत.

मानाची सनद पेशव्यांनीं स्वीकारावी अशी विनंती केली. " हा बहुमान मोठासा नव्हे, पेशवे सातारकर महाराजांचे चाकर, " इ. वाटाघाट होऊन पाटीलबावा कार्यकर्ते सेवक, त्यांचा आग्रह विशेष; सबब, साताऱ्याहून परवानगी आणवून हा बहुमान स्वीकारण्याचे श्रीमंतानीं ठरविले. या वकील-ई-मुतालिकीच्या हक्कानें हिंदुस्थानांत होणारी दर्शनी महती या दृष्टीने पेशव्यानी हा मान घेतला, हें चांगलें झालें. खऱ्या महत्त्वाच्या दृष्टीनें त्यात कांहीं विशेष नव्हतें, इतकाच विरोध दाखविणाऱ्यांच्या मनांतील आशय. ह्यांत खरा विरोध वगैरे काही नसून नानांनीं आपला आग्रह सोडून समारंभ साजरा केला भेटी-परत-भेटीचे समारंभ आटोपल्यावर पुढें लौकरच हिंदुस्थानांतील शिंद्यांच्या बारा वर्षांच्या कारभाराची वाटाघाट सुरू झाली. नाना शिंद्यांच्याजवळ १२ वर्षांचा हिशेब मागू लागले. मध्यवर्ती सत्तेने हिशेब मागणे यात गैर ते काय होतें ? पण, आपल्या अपूर्व कामगिरीने आपण मध्यवर्ती सत्तेच्या नियंत्रणाच्या कक्षेच्या बाहेर गेलों आहों असे वाटूनच की काय महादजीनी नानाच्याजवळ सर्व राज्याचा हिशेब मागितला ! आणि येथे नानांचें व महादजींचें खरे भांडण जुंपलें. शेवटीं महादजी फौजबंद सरदार; त्यांचा उपयोग राज्यरक्षणास जितका होईल तितका आपल्या बुद्धिबलाचा होईलच असे नाही असा विचार करून नानांनीं श्रीमंता-कडून काशीस जाण्याची ता. ३१ आक्टोबर स. १७९२ रोजी परवानगी घेतली. महादजी शिंदे नानांची योग्यता ओळखून होते. म्हणून शिंद्यांनी नानांच्या काशीस जाण्याच्या बेतास जोराचा प्रतिरोध केला.

पेशव्यांच्या बखरींत " श्रीमत नौकाक्रीडा करीत असतां एकांतात महादजीने कारभाराच्या गोष्टी काढिल्या तेव्हां ' नाना माझे उजवे हात

---

१. या समारंभाचें सुंदर वर्णन ऐ ले. संग्रह पत्र नं. ३४८२ त आहे.
२. उर्वरित पत्रें ऐ ले. संग्रह नं. १३२६।२७.

व पाटील तुम्ही माझे डावे हात,' असे श्रीमंतांनी महादजीस सांगितलें." अशी कथा आहे. इतर कोणी वडीलधारें माणूस नसणाऱ्या श्रीमंतांनीं आपल्या दुसऱ्या लग्नाचीहि वधू 'नानाच्या विचारास येईल ती निश्चित करावयाची,' असे ठरविल्याचे रघुनाथराव कुरुंदवाडकर यांच्या पत्रांत लिहिलेलें[1] आहे. ह्याचप्रमाणे आणखी १।२ राजकारणी प्रकरणांवरून सुद्धा श्रीमंत नानांच्या धोरणाने वागतात हीं गोष्ट शिंद्यांच्या नजरेस आलेली होती, असो. अखेर "राजकारस्थानी नानांचे व रणधीर वीर पाटीलबावाचे निखालस ऐकमत्य[2] झालें. हा योग हरिपंत तात्यांनीं जमवून आणिला. दोघेहि समंजसच. निजाम, टिपू, हिंदुस्थान, इंग्रज वगैरे संबंधात कसें वागावे व मराठी पादशाहीचे परंपरागत धोरण कायम राखण्यास प्रत्येकानें काय करावयाचे हे ह्या वेळीं ठरले असावे." नानांचें व शिंद्यांचे ऐक्य झालेले ऐकून "निजामाचें[3] दरबार भ्यालें. पण, इंग्रज जोरावर, ते भ्याले नाहीत." प्रस्तुत मुख्यत्वें सागण्याचा मुद्दा हा नसून मुख्य गोष्ट ही कीं, ह्या ऐक्यानें पेशवाईमधील बुद्धीचे व तरवारीचें ऐक्य होऊन या विरोधपरिहारानें पेशवाईला–किंबहुना मराठेशाहीला–जोरदार वळण लागणार अशीं चिन्हें दिसूं लागली. फडनविसानी व पाटीलबावानीं स्वतःच्या मानापमानाकडे दुर्लक्ष्य करून मराठेशाहीच्या हितार्थ थोर मनानें परस्परांस सहाय्य करण्याचे मनात आणिलें ही मराठी इतिहासांत अपूर्व गोष्ट झाली. या महत्त्वाच्या हकीकतीस पोषक पत्रें शास्त्रीबुवांच्या सशोधनात आली असून ऐ. ले. संग्रहांत तीं प्रसिद्धहि झालेली आहेत.

---

१. ऐ. ले. सं पत्र. न. ३५०२ मार्च १७९३. २. ऐ. ले सं. पत्र नं. ३६३६. ३. हें अवतरण प्रो भानु याच्या लेखातलेंच आहे. प्रो. भानु यानीं आपल्या उपर्युक्त लेखाच्या शेवटीं पत्रें नं. ३५०६।०७ ह्यांचा उल्लेख मुद्दाम केला आहे.

नानाविरुद्ध महादजी या वादात कित्येकांनी नानांवर अनेक वृथा आरोप केले आहेत एका ग्रंथकाराने "पेशव्याचे राज्यात जे इंग्लिश लोकाचे प्राबल्य होत गेलें तें केवळ नाना फडनविसाचे मित्रपणामुळे झाले." "नाना फडनविसास आपल्याशिवाय दुसऱ्याचे वर्चस्व अगदी सहन होत नव्हते हे प्रसिद्ध आहे व त्यानी या दुष्ट बुद्धीने मोठमोठे सरदार लोकास जेर केले होते." वगैरे विधाने केली आहेत. परंतु, 'भले बुद्धिचे सागर नाना' हे अनेक प्रसंगीं, राजकारणात आकाशपाताळ एक झाले तरी बिलकुल डगमगले नाहीत असलें त्याचे बुद्धिकौशल्य पाहून शास्त्रीबुवा लिहितात :—

"एका केवलमर्थसाधनविधौ सेनाशतेभ्योऽधिका ।
नंदोन्मूलनदृष्टवीर्यमहिमा बुद्धिस्तु मागान्मम ॥"

असे म्हणणाऱ्या आर्य चाणक्याचें स्मरण झाल्याशिवाय राहात नाही !" नानाच्या बुद्धिमत्तेची योग्यता व पाटीलबावांच्या तरवारीची मातब्बरी ते उभयता परस्पर पुरती ओळखून होते हे वरील विवेचनात स्पष्ट झालेच आहे वरील पक्षपाती लोकास खरेशास्त्री यानी एक इषारा देऊन ठेविला आहे तो असा :—"नानाची व्यर्थ निंदा केली म्हणजे त्या मानानें पाटीलबावाची योग्यता अधिक वाढत्ये असे नाहीं. दोघाचेहि अलौकिक गुण, दोघेहि आपआपल्यापरी मराठी राष्ट्र अभ्युदयाच्या शिखरास नेण्यास झटत होते. त्या दोघामध्ये कशीहि स्पर्धा असली तरी मराठे लोकास दोघाचीहि चरित्रें सारखीच प्रिय व दोघाचीहि नावे सारखीच पूज्य असली पाहिजेत." नाना फडनविसांच्या चरित्रात पृ. ८६ ते पृ. १०५ पर्यंत "नानाफडनविसांची पत्रे" या नांवाचें एक स्वतंत्र प्रकरण छापिलेले आहे. त्या सर्व पत्रांच्या वाचनानंतर असे वाटते की, शिंद्याच्या

१. सरंजामेकृत शिंदे-घराण्याचा इतिहास, पृ. ३७. २. नाना फडनविसाचें चरित्र, पृ. १४३।४४.

मनांत नानांविषयी कांहीं विकल्प येऊन ते दरेक पत्रीं नानांस उरेंबुरे लिहीत असतां, नाना मात्र, मराठशाहीच्या कल्याणावर अढळ दृष्टि ठेवून त्यांस परोपरीने आळवीत आहेत –"[1] पाटीलबावांचे वांकडें व्हावें हें चित्तांतहि नाहीं. अखत्यार इंग्रजांचे मसलतीचा पाटीलबुवांवर आहे. कोणेहि प्रकारे मसलत चांगली शेवटास जावी, पाटीलबावांस यश यावे, भाऊपणा दिवसेंदिवस अधिक चालवावा, हीच इच्छा आहे." "[2]घरांतील गोष्ट तर एक आईची लेंकरे. संदेह टाकले म्हणजे स्वच्छताच आहे. नवे जडावें लागत नाही" इत्यादि. हा बहुतेक पत्रव्यवहार सवाई रावसाहेबांच्या जन्मानंतर स. १७७६ते १७८२ मधला आहे. नंतरची हकीकत वर आलीच आहे या नाना–महादजीसंबंधांत विस्ताराने लिहिण्यास पुष्कळच अवसर आहे, व या प्रकारणी नवीन नवीन वादाचे मुद्देहि पुढे येत आहेत. परंतु त्याचा येथें विचार करणे अशक्य आहे.

## [3]नाना आणि इंग्रज

" पेशव्यांच्या राज्यात जे इंग्लिश लोकांचें प्राबल्य होत गेलें ते केवळ नाना फडनविसांच्या भित्रे-स्वभावामुळे झालें " असा एक आरोप नानांच्यावर एका ग्रंथकाराने केल्याचा उल्लेख मागच्या प्रकरणांत आला आहे तो कितपत खरा आहे याचा विचार या प्रकरणांत करावयाचा

१. नाना फडनविसाचें चरित्र,पृ.९२. २. नाना फडनवीस चरित्र पृ.९९.
३. हें प्रकरण नानाचें जुनें चरित्र व नवें चरित्र ह्याच्या आधारें लिहिलें आहे नवें चरित्र लिहिताना रा. यशवतराव यानी नानाचा अधिकारयोग व ऐ. ले संग्रहाचे सर्व भाग व खेरीज अलीकडील इतर संशोधित ऐतिहासिक माहिती विचारात घेऊन ते लिहिलें आहे. तात्पर्य, ह्यातील विचार ३०।४०वर्षां-पूर्वींचे नसून आजचे आहेत मात्र सागण्यास अभिमान वाटतो कीं, आजहि शास्त्रीबुवांच्या मूळच्या विधानांत सांगण्यासारखा फरक झालेला नाहीं.

आहे. नाना भित्रे होते कीं धैर्यनिधि होते--कसल्याहि घोर आपत्तीत त्यांची बुद्धि मेरुपर्वताप्रमाणें अचल राहात असे कीं, वावटळीत सापडलेल्या पालापांचोळ्याप्रमाणें गांगरून तात्काळ ती वाऱ्यावर लागे--याचे साधार विवेचन मागील एक दोन प्रकरणात आलेले आहेच. नानांनी स्वत तरवार हाती धरिली नसली तरी स. १७८६ साली बदामीच्या लढाईंत ऐन तोफेच्या माऱ्यांत ठोकलेल्या तंबूंत बसून रण-मैदानावरील हालचालीचे नियमन ते करीत होते. 'कि कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिता:' असल्या राजकारणाच्या कर्माकर्मांच्या कचाटींत नित्य गवसलेले असून व साऱ्या हिंदुस्थानांतील भिन्न स्वभावाच्या अनेक दरबारामधील अनेक मुत्सद्द्याशी संबंध पडला असता एकाद्या पहाडा-मधून आपला मार्ग फोडीत चाललेल्या पाणलोटासारखी त्याची बुद्धि मोरोबादादांच्या कारस्थानापासून तो महाडच्या कारस्थानापर्यंत त्याच्यावर व पर्यायाने मराठी राज्यावर गुदरलेल्या लहान मोठ्या संकटाशी टकरा खात होती. त्यांतलेच एक संकट हिंदुस्थानात इग्रजी सत्तेची वाढ होत जाणें हे होतें. परंतु खरेशास्त्री लिहितात कीं," मराठी राज्यास उतरती कळा लागली असूनहि केवळ आपल्या अतुल बुद्धीच्या प्रभावामुळेच इंग्रजांसारख्या अनिवार्य शत्रूस वीस वर्षेपर्यंत नानानी मराठी राज्यांत पाय ठेवूं दिला नाही ! !"

नाना इंग्रजांना पुरते ओळखून होते व होता होईल तो त्याचा जेवढा कमी संबंध मराठी राज्याशीं येईल तेवढे बरे अशा धोरणानेच ते वागत. जर हा संबंध अजीबात त्यास टाळितां येता तर बरें झाले असते, पण जेव्हां हा संबंध त्यास जोडावा लागला तेव्हा तो अपरिहार्य म्हणूनच जोडावा लागला. कारण त्यावेळी कलकत्ता व मद्रास येथे इंग्रजांनी आपले पाय तिकडील राजकारणांत पक्के रोविले होते, व आता मुंबई-कडेहि राघोबादादांचे मध्यस्थ या नात्याने पुणें दरबारांत प्रवेश होण्याचा

लाग दिसतांच इंग्रज ह्या संधीचा फायदा घेण्यास चुकले नाहीत. अशा तऱ्हेने नानास मनांतून अप्रिय, अनिष्ट व पुढे मागे मराठी राज्यास अपायकारक वाटणारा इंग्रजाचा संबंध प्रथम पेशवे दरबाराशी आला. तथापि ते इंग्रजांचा फारसा बडेजाव ठेवीत नसत. उलट, सेट ल्युबिन् नावाचा फ्रेंचांचा वकील, जेव्हा काहीं अटीवर 'पुणे दरबारास इंग्रजांविरुद्ध आम्ही ( फ्रेंच ) मदत करण्यास तयार आहो' वगैरे बोलणे करण्यास आला तेव्हा नानानीं मुद्दामच त्यास मोठ्या मानमरातबाने वागविले, ह्याबद्दल इंग्रज वकिलाने मुंबईच्या गव्हर्नराकडे अगदी जळफळाटाने गाऱ्हाणे केलें[१] तसेच, नानानीं इंग्रज वकिलास[२] एकदा बजावून दिले की, आम्ही साऱ्याच गोऱ्या लोकास पुण्याबाहेर काढून लावणार आहों. आमचा जसा एक कारकून मुंबईस असतो तसा तुमच्यातर्फे तुम्हीं एकादा कारकून येथे ठेविला म्हणजे झाले! बारमहा तुम्ही येथें राहाण्याचे काय प्रयोजन आहे?

'सालबाईच्या तहाच्या वेळी' शास्त्रीबुवा लिहितात, "नानाच्या[३] मनात इंग्रजास अत्यंत दीन करून त्याजकडून साष्टीसुद्धा सर्व मुलुख सोडवावयाचा होता. (साष्टी सोडावयाची नाही हा इंग्रजाचा हट्ट होता.) व हैदरअलीकडील खडणीची रक्कमहि वसूल करावयाची होती. म्हणून, ते इंग्रजाशीं बोलण्यांत असा डौल घालीत कीं, हैदर व आम्ही एक, इंग्रजाशी तह करणे झाल्यास आम्ही हैदराच्या संमतीनें करूं. इकडे, हैदराच्या वकिलास ते धाक घालीत की, पाहा, हैदराने आमची बाकी चुकती केली तर बरे आहे, नाहीतर आम्हीं इंग्रजांशीं तह करू." या-

---

१. नाना फडनवीस जुनें चरित्र पृष्ठ. ५८, नवें चरित्र पृ. ६२ (Selections from State Papers. Bombay, p. 289). २. सदर जुनें चरित्र पृ ५९ (Selections from State Papers, Bombay, p. 302) ३. जुनें चरित्र पृ. ८०.

प्रमाणे त्यांनी—नानांनी—चाळवाचाळवी चालविली असता गार्दर्दीचा[1] वकील साष्टी देण्यास देखील कबूल झाला होता." परंतु अखेर हा तह शिंद्याच्या मार्फत ठरला. ह्याच सुमारास कर्नल क्यामॅक व कर्नल मूर हे शिंद्याच्या राज्यात धुमाकूळ माजवून बसले होते. त्यांस लढाई बंद करून परत जाण्यास लावण्यासाठी व दिल्लीकडील आपलें राजकारण चालविण्यास आपला मार्ग निर्वेध व्हावा या हेतूनें शिंद्यांनी हा तह ठरविला. त्यांत साष्टी इंग्रजांकडे राहाण्याचे ठरले; आणि आणखीहि दोन तीन कलमे राजकारणाच्या दृष्टीने नानास नापसंत अशी या तहात ठरली. पाटीलबावांच्या मुर्वतीस्तव व दिल्लीच्या राजकारणावर नजर देऊन नानांनी या तहास मोठ्या कष्टाने मान्यता दिली. तथापि, साष्टी गेल्याचे दुःख त्यास फार वाटे. एका पत्रात ते लिहितात, [2]" मौजे वेळास हा गांव आमचा वतनी आहें. तो इंग्रजाकडे कोकणात बाणकोटाखाली आहे, तो सोडवून घ्यावा असे मनांत होतें. परंतु साष्टी सरकारची सुटली नसता आपला गाव सोडवून घ्यावा हे ठीक नाही ! "

इंग्रजांची दृष्टि किती दूर आहे व या तहाच्या कामी त्यांचे आतले पेंच काय आहेत हे शिंद्यांपेक्षां नाना फडनविसास चांगलें कळत होतें. ते म्हणत की " इंग्रज[3] हे मोठे मसलती असून या भरतभूमीचे आक्रमण करण्याचा त्याचा विचार आहे. त्यांस दाबात ठेवण्यास एक मराठ्याचे राष्ट्र मात्र समर्थ आहे. हे त्यास पक्के माहीत आहे, व याकरिताच मराठी राष्ट्रांत फांटाफूट[4] उत्पन्न करण्याचा त्यानी प्रयत्न चालविला आहे. "

---

१. कर्नल गॉडर्ड इंग्रजाचा सेनापति बोरघाटात लढाई चालू होती तिकडे होता. २. जुनें चरित्र पृ ७३, नवें चरित्र पृ. १०४. ३. जुनें चरित्र पृ. ८१. ४. या बाबतीत नाना एकदा नागपूरकर मुधोजी भोंसल्याचा दिवाण देवाजीपंत यांजपाशीं बोलताना 'इंग्रज बहादुराच्या मनात दादासाहेबास पुढें करून दाक्षिण घ्यावी असें आहे' असें स्पष्ट म्हणाले होते. (ना भों. बखर पृ. १२६.) टीप पुढें चालू:—

हिंदुस्थानांत व हिंदुस्थानाबाहेरहि इंग्रज, फ्रेंच व इतर गोरे लोक ह्यांच्या काय चळवळी चालल्या आहेत इकडे नानांचे लक्ष्य असे. 'फ्रेंचांचा सरदार बुसी हा फ्रान्स देशाहून फौज घेऊन मॉरिशस बेटास आला;' 'युरोपांत फ्रेंच, डच, पोर्तुगीज हे इंग्रजावर उठले आहेत' असलीं देखील वर्तमाने त्यास कळत; व परराज्यांतल्या गुप्त बातम्या राखून त्यांचा जो फायदा स्वराज्यासाठी झटणारे सर्वच मुत्सद्दी घेत असतात तोच नानाहि जागरूकपणे घेत असले पाहिजेत यात संदेह कोणता ?[१]

सालबाईचा तह घडून येण्यापूर्वी दाक्षिणेत व उत्तरेकडे—माळव्यात—इंग्रजाशीं लढाया सुरू असतां नाना व शिंदे याच्यामध्ये जो पत्रव्यवहार चालला होता त्यावरून नानांचे इंग्रजासंबंधी काय धोरण होते ते स्पष्टपणे समजून येते.—

[२]( १ ) अशी विक्षेपाच्या मजकुराची पत्रे वाटेच्या गर्दीमुळें इंग्रजाकडे धरली गेली असल्यास ( इंग्रज ) काय मनांत आणितील याचाहि विचार करावा

[३]( २ ) " माघारे जाऊं द्या म्हणून इंग्रजांचा संदर्भ आला आहे, त्यास ते दगाबाज आहेत. त्याचे कदापि ऐकूं नये सदर्भ लावून फौज चोहोंकडे गेली म्हणजे मागती चाल करितील. आयते मैदानांत सांपडले आहेत. पारिपत्य होय ते करावे. "

[४]( ३ ) " इंग्रज दगाबाज आहेत...तिकडील इंग्रजाचे संदर्भ वगैरे येतील ते कदापि ऐकूं नयेत पारिपत्यच व्हावे. तिकडील मैदानहि मोठें

---

जुनें च. पृ. ६४, न. च. पृ. ९९. पेशव्यांच्या घराण्यात गृहकलह उपस्थित होण्याचा सभव आहे काय या शोधात इंग्रज माधवरावांच्या वेळेपासून होते. (Selections from State Papers, Bombay, Page 142.)

१. जुनें चरित्र पृ १७१. २. जुनें चरित्र पृ. ९३. ३. जुनें चरित्र पृ. १०१. ४. सदर पृ. १०२.

आहे-इकडील मैदान वडगांवासून पूर्ण बारा कोस एक पैक्याची अडचण भारी, यास मात्र लाचार आहो. श्रीमंतांचे दैव आहे चिंता नाही."

तहाचे बोलणे सुरू करण्यापूर्वी नाना, शिंदे यांस इशारा देतात:—

[3]( ४ ) "इंग्रजाशी तहनामा करणे तो फार विचार करून करावा लागतो. त्यांचे बोलण्यात व लिहिण्यांत एका अक्षरांत फार पेच असतात. पुरती माहितगारी येथे आहे. पाटीलबावांस ही माहितगारी सर्व असावी याकरितां पूर्वी येथून हप्टनच्या तहनाम्याच्या नकला व कलमाकलमाचे अर्थ सविस्तर लिहून पाठविले होते.......असो. इंग्रजांशी तहनामा करणें त्यास पुढील मागील गुणदोष फार पाहावे लागतात व एक एक अक्षरास जपावें लागते याकरिता पूर्वील व हल्लीं लिहिले हे अर्थ सविस्तर मनांत चांगले आणून करावे."

[4]( ५ ) हैदरखान वारले तेव्हा इंग्रज शेर होतील. हैदरखानाचे चिरंजीव टिपू आहेत त्यांचा दाब व कर्तृत्व कसे पडेल कळत नाहीं. या करिता इग्रजाचा तह लवकर पक्का व्हावा. याउपर विलंब लावू नये एखादा पेंच बसल्यास वाईट पडेल. याकरिता सूचना लिहिली आहे..... हैदरखानाचा दाब इग्रजांवर मातब्बर होता यामुळे इग्रज खानास वचकत होते.'

अशी आणखी अनेक पत्रे आहेत. या सर्व पत्रावरून शास्त्रीबुवा लिहितातः—" ज्योंप्रमाणे स्वच्छ आरशात एखाद्या वस्तूचे प्रतिबिंब दिसावे त्याप्रमाणे येथे (या पत्रांत) नानाच्या मनोगताचा शानदार ठसा उमटलेला आहे! जे जे कोणी नाना फडनविसावर कुटिलत्वाचा, मत्सराचा, किंवा महत्त्वाकांक्षेचा आरोप करीत असतील त्यानीं हे नानाचे लेख लक्ष्यपूर्वक वाचून पाहावे, म्हणजे त्यांच्या दुराग्रहाचे निरसन झाल्याशिवाय राहणार नाही.". ....आणि " या पत्रांच्याद्वारें मन मोकळे-

१. जु. च. पृ. १०३. (नवें चरित्र पृ. १०७) २. जुनें चरित्र पृ. १०४
३. सदर जु.च. पृ. ८८.

करून इंग्रजांच्या लढाईचा ओघ जसा जसा अनुकूल किंवा प्रतिकूल दिशेने वाहात गेला त्याप्रमाणें उत्साह, भीति, निराशा, चिंता इत्यादि मनोविकार स्पष्टपणे प्रकट करणारा, पेशवाईच्या सरदारास कधी उत्तेजन देऊन, कधी व्याजोक्तीने ताडन करून, कधी आर्जवेंकरून इंग्रजांशीं लढण्याकरितां उद्युक्त करणारा व आपल्या स्वामिभक्तीने उद्दीपित अशा अंतःकरणाची त्यावर छाप पाडणारा, बुद्धि बळाच्या डावाप्रमाणे इंग्रजांनी कोठे कांही चळवळ केली असता तिजवर तत्काळ तोड करणारा, असा हा चौकस, सावध, दूरदृष्टि फेकणारा, नानाफडनवीस निराळाच होय !"

सं. १७९९ च्या नवंबरमध्ये विलायतच्या बादशहाचे एक फर्मान स्वीकारण्याविषयी दुसऱ्या बाजीरावसाहेबास इंग्रजानी विनंति केली. मात्र, तें स्वीकारिताना पाळावयाच्या पाच अटी त्यानी श्रीमंतास कळविल्या:-

( १ ) या फर्मानाचा स्वीकार करण्यासाठी श्रीमंतानी मुद्दाम बाहेर डेरे द्यावे व तेथे दरबाराचा समारंभ व्हावा. ( २ ) आम्ही फर्मान घेऊन येऊं तेव्हा श्रीमंतानीं आम्हास सामोरें यावे. ( ३ ) मागे वकील मुतलखीच्या वेळेस फर्मानवाडीचा समारंभ झाला होता तसा याहि वेळेस थाटमाट व्हावा. ( ४ ) आम्ही फर्मान दरबारात हजर करूं तेव्हां सन्मानार्थ श्रीमंतानी उभे राहून ते हाती घ्यावे. ( ५ ) त्या प्रसंगानिमित्त खुशालीच्या शंभर तोफा माराव्या. ह्या सबंधात श्रीमंतांनीं नानाचा सल्ला विचारिला. राज्यकारभाराची आस्था नानास आतां बिलकुल राहिली नव्हती. तरी पेशवाईचा अभिमान त्याच्या मनात जाज्वल्य होता. त्यानीं इंग्रजाचा कावा ओळखून पाच कलमाची उत्तरे सांगितलीं ती अशीं -"१।२।३, फर्मान घेण्याकरिता मुद्दाम डेरे देणे वगैरे सन्मान फक्त दिल्लीपतीखेरीज पेशवे सरकार कोणासहि देत नाहीत. मागें माधवराव बल्लाळ याच्या वेळी असेच विलायतच्या बादशहाचें फर्मान

१. नवें चरित्र पृ. २५६.

घेऊन माष्टीन आला होता. त्यानें नेहमींच्या दरबारात तें आणून दिलें तसेच याहि वेळीं द्यावे. (४) श्रीमतांनी पत्र उभे राहून घ्यावे असे इंग्रज म्हणतात, तर जेव्हा श्रीमंत दरबारात जातील तेव्हां बसण्यापूर्वी इंग्रजांनी त्यास पत्र द्यावे म्हणजे झाले! श्रीमंतानीं ते पत्र घेऊन वाचण्याकरिता मुनशीच्या हवाली करावें. (५) हा खुशालीचा विशेष प्रसंग समजून शंभर तोफा माराव्यात असे इंग्रज म्हणतात. पण तसे करण्याचे कारण नाही. खुशालीच्या इतर सामान्य प्रसंगाप्रमाणें तोफाचे वीस बार मात्र करावे." या बाबतीत इंग्रजानीं पुष्कळ जिकीर केली. तथापि त्याचें कांही चाललें नाही. अखेर नानाच्याच म्हणण्याप्रमाणे ता. ७।१।१८०० रोजी विलायतच्या बादशहाचे फर्मान वाचण्याचा समारंभ घडून आला.

'टिपूविरुद्ध इंग्रज' या वादात नानानी टिपूचा पक्ष कां धरिला नाही असा एक प्रश्न उपस्थित करण्यांत येत असतो, त्याचा जातां जाता थोडक्यात विचार करून हे प्रकरण संपवूं. टिपूचा बाप हैदर व पेशवे यांच्यामधील कटकटी फार जुन्या--स. १७५८ पासूनच्या--होत्या. व या बापलेकांनी दक्षिणेच्या बाजूने धारवाडपर्यंत मराठ्यांच्या मुलखास ३०।४० वर्षें सतत भारी उपद्रव दिला. हैदर स. १७८२ त मरण पावला. त्यानें पेशव्याचा जो मुलुख घेतला होता त्यापैकी नरगुंद हे संस्थान त्याने राखिले होते, पण टिपूच्या[१] मनांत हे ब्राह्मणी संस्थान बुडवावयाचे होतें म्हणून तो त्या संस्थानिकांजवळ जबर खंडणी मागूं लागला. नरगुंदकरांच्या वतीने नानांनीं रदबदली चालविली तेव्हा टिपूने त्यांचे म्हणणें तुच्छतेनें धिक्कारून टाकिले, विश्वास दाखवून नरगुंदकरांस कुटुंब सुद्धा कैद केले व हाल हाल करून ठार मारिले[२], जणूं काय पेशव्यांस आपण मुळीच जुमानीत नाही हें दाखविण्यासाठीं कृष्णा

१. जुनें चरित्र पृ. ११६. २. जुनें चरित्र पृ. ११७.

नदीच्या पलीकडील जिंकलेल्या मुलखात त्यानें बलात्काराने पुष्कळ हिंदु लोकांच्या सुंता करविल्या, या अपमानापेक्षां मरणे बरे असे समजून दोन हजार ब्राह्मणांनी आत्महत्या केली ! ही वर्तमाने नानांस समजतांच त्यांस मानस्वी राग आला.

आज आपल्या देशात एकराष्ट्रीयत्वाची कल्पना लोकात पुरती पसरली असून, हिंदु व मुसलमान दोनही समाज परकी अमलाखालीं सुखदु:खाचे समभागी असता व वजनदार पुढारी हिंदुमुसलमान ऐक्याची हाकाटी जवळ जवळ अर्धशतक करीत असतांहि गेली ५।४ वर्षें आपण अनुभव काय घेत आहो ? शिवाय, राष्ट्रीयदृष्ट्या हर्षविषादाच्या किंवा आपपरभावाच्या आजच्या कल्पना वेगळ्या, अव्वल इंग्रजीतल्या वेगळ्या, तर अर्थात् नानाच्या वेळच्या यांहूनहि वेगळ्या असणारच. नानांच्या हाती सत्ता होती, आणि टिपूचे वरील कृत्य जुलमीपणाचें व परधर्मद्वेषाने केलेले होते, त्यांचे शासन, त्याचे दमन करण्याचा नानास न्यायतः हक्क होता. उलटपक्षीं असली कांही भीति इंग्रजांपासून त्यास त्या वेळी वाटत नव्हती. तथापि, इंग्रजांवरील आपला नक्ष कायम राखण्यासाठीं टिपूस अजीबात न बुडवितां त्याची सत्ता आपल्या दाबाखालीं राखून जिवंत ठेविता आली तर पाहावी ह्याविषयीं शक्य तो प्रयत्न करण्यास नाना चुकले नाहीत[1] मराठी सत्ता वाढविणे, निदान आहे तेथें ती सुस्थिर करून राखणे हे नानांचे ध्येय होते. या कामीं निजाम, टिपू, इंग्रज ह्यांपैकी जुळेल त्या साधनाने 'काडीने काडी झाडावी' अशी त्यांच्या राजकारणाची रीत स्पष्ट दिसते. तिघेहि शत्रूच ! त्यात नरम—गरम पाहून जरूर लागेल त्याप्रमाणें त्यांनी कोणाशी कधी संधि तर कोणाशीं विग्रह केला. ह्यात बिघडले काय ? इंग्रजांचा धूर्तपणा त्यांनीं पुरतेपणी ओळखिला होता. ह्याची प्रमाणे इतकी विपुल मिळत

१. जुनें चरित्र पृ. १२४।२५. नवें चरित्र पृ. १३५.

असतां एक ' टिपूविरुद्ध इंग्रजां 'च्या मसलतींत ते शिरल्यामुळें त्यांस इंग्रजांचा कावा कळला नाहीं असें म्हणणें म्हणजे त्यांच्या साऱ्या चातुर्यपूर्ण कारकीर्दी ( Wise rule ) वर ' टाकाऊ असा शेरा मारणेंच होय ! ! ! नानांनीं इंग्रज किंवा फ्रेंच या परद्वीपस्थांवर कायमचा विश्वास असा कधींच टाकिला नाहीं. शिंद्यांनीं तसा विश्वास या लोकांवर टाकून त्यांच्या देखरेखीखाली कवायती पलटणें तयार करविली.[1] त्यांत रजपूत, रांगडे, पठाण, रोहिले, शीख वगैरे सतरा जातींच्या[3] लोकांची भरती असे. त्यांच्या मनांत स्वराज्य, स्वधर्मविषयक अभिमानास फारसे अधिष्ठान नसे त्यामुळे फंदफितूर, त्याच्यात ताबडतोब होत असे. आणि खुद्द पाटीलबावाच्या वेळीं जरी नाही तरी त्याच्या पश्चात् 'पेरॉन' नामक फ्रेंच सरदाराने दौलतराव शिंद्यास दगा दिल्याची गोष्ट प्रसिद्धच आहे ! !

## प्रधानाधिष्ठित-संयुक्त-संस्थानिक-मंडळाचें राज्य

' इचलकरंजी[4] संस्थानच्या इतिहासांत या संबंधात दिलेली माहिती पुढें एके प्रकरणी येईल' असें मागे लिहिले आहे ती यापुढे दिली आहे. तिजवरून या संयुक्त-संस्थानिक-मंडळाची काहीं कल्पना येईल हा मजकूर संपूर्ण जशाचा तसा न देता त्यापैकी महत्त्वाचा वाटला तेवढाच भाग येथें उतरून घेतला आहे.

---

१. गोऱ्या लोकानीं कवायत शिकवून तयार केलेल्या शिपायास गारदी असें म्हणत. या गारदी लोकावर नानांचा मुळीच विश्वास नसे जुनें चरित्र पृ. १७१. २. स. १७८७त जयपुराजवळ लालसोट येथें रजपूत व पठाणाशी जें युद्ध झालें त्यांत शिंद्यांच्या लष्करातले हेच लोक फितूर झाले ! ! यासबधीं शिंद्याचे उद्गार:— " हिंदुस्थानवासीयाच्या विश्वासावर गेलो त्याचें फळ पावलो ! " नवें चरित्र पृ. १३८. ४. इचलकरजी स इतिहास पृ. ६२ ते ६६ व पृ. ९४ ते ९८.

" आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाचा व त्यांनी स्थापिलेल्या राज्याचा ( सातारकर थोरल्या ) शाहूमहाराजास पराकाष्ठेचा अभिमान होता. ते राज्य वृद्धिंगत करण्याविषयीं त्याचा उत्साह वर्णनीय होता. ते उदार, शूर, धार्मिक व प्रजावत्सल होते याबद्दल वाद नाही. पण एवढे गुण अंगीं असले म्हणजे राजाच्या हातीं राज्य राहतें असे मुळीच नाही. राज्य हें करणाऱ्याचे आहे, भोगणाऱ्याचे राज्य नाही. स्वसुखाविषयी निरपेक्ष होऊन राजाने प्रत्येक महत्त्वाच्या राजकार्यांत शरीर व मन शिणवावे तेव्हाच त्याचे प्रभुत्व कायम राहातें. पहिल्या तीन महाराजाप्रमाणे स्वारीत हजर राहून अंगमेहेनत व दगदग सोसून सरदार व फौज कह्यात ठेवणे हे त्याचे कर्तव्य होते पण ते त्यास झेपत नव्हतें व आवडतहि नव्हते ! राज्य वाढविण्याचा तर हव्यास मोठा ! आणि दगदग तर करावयास नको, अशी त्याची स्थिति होती. त्यामुळें मोंगलावर स्वाऱ्या करून त्याचे मुलुख जिकण्याचे काम त्यांनीं आपल्या सरदारावर सोंपविले !......कोणीं सरदाराने एखादा प्रांत जिकला म्हणजे तोच त्याच्या फौजेच्या खर्चास सरंजाम म्हणून नेमून द्यावा आणि हुजूर खर्चाकरिता काही नियमित रक्कम त्याजपासून घेत जावी असा शाहूमहाराजानी प्रथमपासून प्रघात ठेविला होता. यायोगे सरदार लोकास व कार्यकर्त्या पुरुषास अधिकाधिक उत्तेजन येऊन ते राज्य वाढवीत सुटले. शाहूमहाराज नुसते 'महाराष्ट्रवादी' नसून आपल्या पूर्वजांप्रमाणे 'महत्तर राष्ट्रवादी' होते, तो त्याचा हेतु वर सांगितल्याप्रमाणें उत्तम प्रकारे सिद्धीस गेला ! ते गादीवर बसले तेव्हां भीमा व कृष्णा या नद्यामधला मुलुख देखील धडपणे त्याच्या ताब्यात नव्हता. पण मरणसमयीं त्याच्या नावाचा शिक्का काशीपासून रामेश्वरापर्यंत चालत होता ! पण हें लक्ष्यांत ठेविले पाहिजे की, हें सारें राज्य सरदारांनी मिळविले असून ते त्याच्या पूर्ण ताब्यांत होतें. "

"महाराजाच्या ज्या सरदारानी एवढे अवाढव्य नवीन राज्य संपादिलें ते प्रतिनिधि, दाभाडे, गायकवाड, भोसले[१] व पेशवे हे होत. या सर्वांत पेशव्यांचे प्राबल्य विशेष होते. किंबहुना बाकीच्या सरदारानी जेवढे राज्य मिळविले त्याच्या जवळ जवळ तितके एकट्या पेशव्यानी मिळविले होते. आपल्या अभ्युदयाचा उगम महाराजाच्या कृपेपासून[२] आहे हे ओळखून हे सर्व सरदार महाराजाशी नम्रपणाने व आज्ञाधारकपणाने वागत, ते त्यांचें वर्तन सर्वथा औपचारिक होतें असे वाटत नाही त्यात भक्तीचा[३] व कृतज्ञतेचा अंशही अर्थात् असला पाहिजे. एवढ्यावरून राज्यातले हे व दुसरे सरदार शाहूमहाराजाशी जसे वागत होते तसेच ते रामराजाशी[४] वागतील असा काही नेम नव्हता! स्वत: रामराजात काही 'राम' नव्हता. त्या अर्थी नुसत्या पोकळ छत्रपतिपदास कोण जुमानणार? शाहूमहाराजाचे तेज, दरारा, सारे त्याचे त्याच्याबरोबरच! त्याशी इमानेइतबारे वागण्याबद्दल सरदारानीं घेतलेल्या आणा शपथा रामराजाशी पाळण्यास हे सरदार बांधले गेले नव्हते! याचें कारण आम्हा पौरस्त्य लोकाचे राजकीय कारभार संस्थाप्रधान नसून ते प्राय: व्यक्तिप्रधान असतात. शपथ घेणारा व घेवविणारा या दोहोतून एक मेला की दुसरा वाटेल ते करण्यास मोकळा झाला!" ......
"आपण मेल्यानतर आपल्या इच्छेप्रमाणे सर्व व्यवस्था पुढे सुरळीतपणे चालवील व राज्य संभाळील असा कोणी सरदार सर्व राज्याचा

१. नागपूरकर रघोजी भोंसले. २ महाराजाच्या आज्ञेवाचून स्वारीसाठीं लागणारा फौजफांटा जमविण्यास व मुलुखगिरी करिताना येणारे अडथळे नाहींसे झाले नसते, हा सत्तेच्या पाठबळाचा उपयोग. ३. बाळाजी बाजीराव शाहूमहाराजास पत्रोपत्री 'तीर्थरूप' लिहीत व त्याच्या मरणोत्तर ते त्याच्या-महाराजान्या-पादुकांची नेहमी पूजा करीत हें प्रसिद्ध आहे ४. कोल्हापूर घराण्यातून सातारकर शाहूमहाराजानीं घेतलेला दत्तक.

शास्ता व नेता म्हणून नेमिला पाहिजे; तसें न करावें तर राज्यांतले बलाढ्य सरदार रामराजास गुंडाळून ठेवून यादवी माजवितील व राज्याचा नाश करितील हें त्यास स्पष्ट दिसत होतें. ह्या नेतृत्वाचा अधिकार कोणास द्यावा या विवंचनेंत ते ( शाहूमहाराज ) पडले होते. संभाजी-[1]महाराज व फत्तेसिंग भोसले[2] यास हे काम झेंपण्यासारखे नव्हतें. दाभाडे, गायकवाड, नागपूरकर भोंसले यापैकी कोणाच्या हवालीं हे काम करावे तर त्या तिघास महाराजानी मरणापूर्वी वारंवार निकडीचीं पत्रे पाठविलीं असतांही कोणी सातार्‍यास आले नाहीत. शेवटी निरुपाय होऊन त्यांनी नानासाहेब पेशव्याच्या हाती राज्याचा मुख्य अधिकार सोंपविला. राज्याची नांवाची मालकी मात्र आपल्या वंशजाकडे, आखत्यारी आपापल्या मुलखापुरती ज्या त्या सरदाराकडे आणि सर्व राज्याची ' वडीलकी ' मात्र पेशव्याकडे अशी ही महाराजांची योजना होती. पेशव्यानी सर्व राज्य संभाळावे व तें संभाळण्याचें कामी व वृद्धिंगत करण्याच्या कामीं योग्य दिसेल ती व्यवस्था करावी व सर्व सरदारांस आपल्या कह्यात वागवावे असे या वडीलकीच्या अधिकाराचें स्वरूप होते. पण एवढ्यावरून केवळ अनियंत्रित सत्ता चालविण्याची सनद त्यांस शाहूमहाराजांकडून मिळाली असे मात्र कोणीं समजूं नये. ”

शाहूमहाराजांच्या ज्या सनदेनें पेशव्यास अधिकार मिळाला त्याच सनदेने मराठी राज्यात आपापल्या क्षेत्रापुरते असंख्य पेशवे निर्माण झाले ! राज्यकाभाराचें सर्व चातुर्य काय ते 'जुनें मोडू नये, नवे करूं नये' या वाक्यद्वयांत समाविष्ट होऊन बसलें ! महाराजाच्या वेळचे सरंजाम तैनाता अधिकार या सर्वांस मिरासदारीचा हक्क प्राप्त झाला. पेशव्यांस एखादा किल्ला पाहिजे असला तरी त्यास किल्लेदाराचा मिराशी हक्क आडवा येऊं लागला ! कारण की, सरकारचे धान्य, खजिना व बंदिवान् हें सर्व

१. कोल्हापूरकर. २ अक्कलकोटकर.

हवाली करून घेऊन राखणे व परचक्र आलें तर त्याशी लढाई करणें हें जेथपर्यंत आपण करीत आहोत, जेथपर्यंत आपण राज्याशीं हरामखोरी केली नाही तेथपर्यंत आपणास काढण्याचा पेशव्यांस अधिकार नाही हें किल्लेकऱ्यांस माहीत होते ! एखाद्या १०० स्वाराच्या पथक्यास 'तू स्वारांचें पथक मोडून पायदळाचे पथक तयार कर' असे पेशव्यानीं सांगितलें तर तो पथक्या म्हणणार की, "महाराजांच्या वेळेस जसा सरंजाम होता तसा बाळगून मी चाकरी करीत आहे. त्याबाहेरची गोष्ट मला करावयास सांगण्याचा तुम्हांस अधिकार नाही !" यद्यपि एखादा पथक्या कबूल झाला तरी त्याचे कारभारी, मुजुमदार, फडणीस, स्वारसुद्धां असली गोष्ट कबूल करावयाचे नव्हत ! कारण, तेही सारे मिरासदारच ! या मिरासदारीमुळे सरदारांस भय नाहींसें झाले. कशीबशी चाकरी करून दिवस काढण्याची चाल पडली. आणि त्यामुळें राज्याची वाढ खुंटली. राज्यातल्या फौजा गोळा करून पेशव्यांनी परमुलुखी स्वाऱ्या करून महाराष्ट्रांत दौलत आणावी, राज्य वाढवावे व त्यांतले तेज व उत्साह कायम रखावा अशी शाहूमहाराजांची मनीषा होती.

परंतु सातारकर छत्रपति व शिवशाहींत अंतर्भाव पावणारे पण, स्वतः पुरते स्वतंत्र असे करवीरकर छत्रपति हे वरिष्ठ–धनीच–होते. नागपूरकर व अक्कलकोटकर भोसले, गायकवाड, प्रतिनिधि, सचिव, आंग्रे व वाडीकर सावंत, हे बरोबरीचे सरदार; यांपैकी कांही जणांस लष्करी चाकरी करावी लागे, तर आंग्रे, सचिव व सावंत यास लष्करी

१. कारण, या स्वाराचें वर्णन मोठें गमतीचें आहे हजेरी कारकून, घोड्याचे चार पाय व स्वाराचे दोन पाय असे सहा पाय दिसले कीं हजेरी लावी. असले प्रकार लांचलुचपतीनें चालत. स्वार म्हणजे स्वार व घोडें म्हणजे घोडें ! डागास डाग झाला कीं पुरे ! ! अशी लष्करी चाकरी करणाराची स्थिति झाली होती. ('मराठे व इंग्रज' उपोद्घात पृ १३.)

चाकरीचे कलमच लागू नव्हते. आसपास कोठे जुजबी काम पडले तर तितक्यापुरती त्यास चाकरी करावयाची असे इतकेंच ! ! तसेंच, पाटणकर, घोरपडे वगैरे हुजुरातीचे मानकरी पेशव्याच्या बरोबरीचेच होते. त्यात कित्येक मातबर तर कित्येक पाच दहा स्वाराचे धनी व त्यांसाठी एखादें खेडेच सरंजामास असलेले ! ! यासुद्धा सारे मानकरी फक्त लष्करी नोकरी करणारे होते. इतक्याशी येणारे वरिष्ठ व बरोबरीचे नाते संभाळून शिवाय, पेशव्यानी स्वत: निर्माण केलेल्या सरदाऱ्या उपभोगणारे शिंदे, होळकर, रास्ते, पटवर्धन, विंचूरकर वगैरे असंख्य होते. त्याच्यावर वचक चालवून पेशव्यास त्याजकडून चाकरी घ्यावी लागे असले हे अगडबब स्वरूप या संयुक्त-संस्थानिक-मंडळाचें होते. ह्यावरून आता वाचकाचे ध्यानी येईल की, इतकी तोंडे संभाळून मिळती राखणे ही किती बिकट जबाबदारी पेशव्यावर पडली होती.

साताऱ्याच्या महाराजास नामधारी बाहुले बनवून पेशव्यांनी राज्याधिकार भोगिला असे म्हणण्याची प्रवृत्ति काही लोकांत दिसते. परंतु काही एक दगदग न पडता पेशव्याच्या जिवावर राज्यविलास उपभोगणाऱ्या महाराजांपेक्षा वरील जबाबदारी पार पाडीत असता पेशवे काय सुख पावले असतील याचा वाचकानी आपल्याशीच विचार करावा. हे संयुक्त-संस्थान-मंडळ किंवा ज्याच्या पुण्यस्मृतीस हा ग्रंथ-इचलकरंजी संस्थानचा इतिहास-अर्पण केला आहे ते रा. सा. रानडे ज्यास 'मराठा-कॉन्फिडरेसी' म्हणत असत त्याचे स्वरूप नीट लक्ष्यात यावें म्हणून

---

1. Rise of the Maratha Power, Chapter X, Pp. 210–218. शास्त्रिबुवांचें वरील विवेचन काहीसे ह्यासच पुरवणीसारखें आहे. ' मराठे व इंग्रज ' ह्याच्या उपोद्घातातहि हा मुद्दा त्यानी मांडिला आहे. प्रो. हरिभाऊ लिमये आपल्या लेखात ( वि. ज्ञा वि. स. १९१८ च्या १०।११ अंकांत ) ह्मणतात कीं, 'मराठा कान्फिडरेसी' सारखी कांहीं संस्था अस्तित्वांतच नव्हती!!

या विषयावरील शास्त्रीबुवांचे विवेचन येथें एवढया विस्तारानें दिलें आहे. शिवाय, "पेशवाईंतील मुत्सद्दी व सरदार याच्या कृत्याविषयीं, अमक्यानें अमुक केलें असते तर अमुक झालें असते असे पुष्कळ टीकाकार बोलत व लिहीत असतात; परंतु पेशवाईची घटना कशी होती आणि तिचे अधिकारी कोणत्या बंधनांनी बांधले गेले होते हें माहीत नसल्यामुळें ही टीका अप्रयोजकपणाची असते हें समजून आपल्या देशाच्या इतिहासाचें यथार्थ ज्ञान वाचकास व्हावें या बुद्धीने हे विचार प्रदर्शित केले आहेत" असे या विवेचनासंबंधी स्वतः शास्त्रीबुवांनींहि स्पष्टीकरण केलेले आहे. इचलकरंजी संस्थानचा इतिहास या ग्रंथापैकी उपर्युक्त मजकूर हा खरेशास्त्री याच्या एकंदर संशोधनाचाच एक सर्व-सामान्य महत्त्वाचा भाग असल्याने तो ऐ. ले. संग्रह या प्रकरणाखालीं देणेच योग्य वाटल्यावरून आम्ही तसे केले आहे.

## ऐ. ले. सं. च्या १२ भागांचा समारोप

ऐ. ले. संग्रहाच्या बाराहि भागात आलेल्या सर्व प्रकरणाची तपशीलवार यादी परिशिष्टरूपानें पुढें दिली आहे, ती वाचकानी एकवार अवश्य वाचून पाहावी. म्हणजे त्या नानाविध प्रकरण—समूहावरून त्याच्या ध्यानी येईल की, पानिपतानंतरच्या ४० वर्षांत मराठी सत्तेस सभोंवार पसरलेल्या स्वजातीय व परकीय सत्ताधाऱ्यांबरोबर नित्य झगडावें लागलें निजाम, हैदर व टिपू, कोल्हापूरकर आणि इंग्रज, याखेरीज म्हैसूरचें राज्य व मराठ्याचा मुलुख याच्या सरहद्दीवरील पाळेगार पुंड, बेरड आणि धोंडजी वाघासारखे उपटसुंभ यांचे उपद्रव दक्षिणेत होत. जाट, रोहिले दिल्लीकर वगैरेशी कटकटीचे प्रसंग उत्तरेत येत. आणि नागपूरकर भोसले राघोबादादा व त्याचे दोस्त इंग्रज आणि अखेर अखेर शिंदे व होळकर इतके हे मध्यवर्ती मराठी सत्तेचे अगदी घरचेच विरोधक!

निदान थोरल्या बाजीरावांपासून थोरल्या माधवरावांअखेर चालू असलेले राजकीय धोरणच पुढें चालविणाऱ्या नाना फडनवीसप्रभृति पुण्यांतील प्रमुख कारभाऱ्यांच्या धोरणास तरी हा विरोध पदोपदी बाधक झाला, असे म्हटल्यावांचून गत्यंतर नाही. त्यांत दक्षिणेंत एकट्या पटवर्धनांनी मात्र निजाम, हैदर व टिपू आणि कोल्हापूरकर इत्यादीपासून अभेद्य तटबंदीप्रमाणे मध्यवर्ती मराठेशाहीचे सरक्षण केले व त्या कामीं त्यानीं कधी जीवित-वित्ताचीदेखील क्षिति बाळगिली नाहीं. थोरले माधवराव साहेब आणखी ५।१० वर्षें जगते तर कदाचित् मराठी इतिहास वेगळाच झाला असता ! तथापि सातारकर महाराज नामधारी सर्व राज्याचा भार मुख्यतः पेशव्यांच्या शिरावर, त्याच्या घरात कलह व पेशवे सवाई माधवराव केवळ लहान मूल ! अशा स्थितीत २०।२५ वर्षें नानांनी, फडके व पटवर्धन याच्या तरवारीच्या मदतीने आपले राजकार्यकौशल्य प्रकट करून तोल जाऊ न देता राज्य संभाळिलें, ह्याची तारीफ कोठवर करावी !! इ. स. १८०० मध्ये नाना वारले त्यासमयी कर्नल पामर साहेब म्हणाले, " **नाना मेले व त्यांबरोबर मराठेशाहींतील शहाणपणा व बेतबातही गेला !** " त्यावेळचे ग. ज. लॉर्ड वेलस्ली साहेबांनी दुसरे बाजीराव पेशवे यांस पाठविलेल्या सात्वनपर पत्रात त्यानी नानांच्या अंगच्या टापटीप, नेमस्तपणा, सचोटी व चातुर्य इत्यादि गुणांची अतिशय प्रशंसा केलेली आहे. अर्थात् नानाचे हें यश तसें पोवाडे गाण्याजोगेंच होतें, हे कोण अमान्य करील ? पटवर्धनांनीं तर कमीत कमी १५।२० पुरुष स्वामिकार्यार्थ अर्पण केले !! आणि उत्तरेंत पाटीलबावानीं दिल्लीस ' किंग मेकर ' सारखी कामगिरी करून तीनशें वर्षें बादशाही भोगीत असलेलें इस्लामी राजसिंहासन पेशव्यांच्या हातचे खेळणें बनवून टाकिलें ! पाटीलबावांच्या अंगच्या बुद्धि-चातुर्याची व त्याच्या

१. त्या वेळीं पुण्यात असलेले इंग्रज रेसिडेंट.

हातच्या तरवारीची ही करामत प्रशंसनीय नाही असे कोण म्हणेल ? महादजीचा यशोदुंदुभी त्या काळांत दिगंत गाजला ! तसेच स्वत: अप्रसिद्ध राहून राज्याच्या कल्याणार्थ कलमबहादर नाना व करवाल-बहादर शिंदे याचे हात एकांत एक घालून देणाऱ्या चतुर हरिपंत फडक्यांचे महनीय यश कोण बरें गाणार नाहीं ? हरिपंताचे नानावरील प्रेम अद्वितीय खरे !

तथापि, एकदरीत पडता काळ; पानिपतास गमाविलेलें कीर्तिवैभव परत प्रस्थापित करितात न करितात तोच थोरले माधवाराव वारले ! पेशव्यांच्या घरात प्रत्यक्ष चुलतीच्या हातून पेशवेपदस्थ पुतण्याचा वध झाला !! ही गोष्ट अत्यंत तिरस्करणीय व निंद्य झाली. तरी असल्याहि अरिष्टांतून कारभाऱ्यानी पेशवाई सत्ता शीरसलामत शाबूद राखिली. व स.१७९५मधील खर्ड्याच्या लढाईनें फिरून एकवार मराठयाचे यश उज्ज्वलित केले. पण पुढे—पुढें काय ? शिंदे व हरिपंत दोघेहि सेना-नायक यापूर्वीच इहलोक सोडून गेले होते ! श्रीमंत सवाई रावसाहेब यांनी आत्महत्या केली ! ! परशुरामभाऊंस काय दुर्बुद्धि सुचली कोणास ठाऊक ? त्यानीं याच संधीस नानांचा पक्ष सोडिला; पंतप्रधान पेशवे ह्यांच्याशिवाय, 'मराठी राज्य राखावे' ही सद्भावना राजमंडळांतील अष्टाधिकाऱ्याच्या मनातून यापूर्वी कितीतरी वर्षे निर्मूल झालेली होती. आणि ते स्वतंत्रपणे आपले पद व जहागीर संभाळून राहू लागले होते, सातारकर हे करवीरकराचे मुळी कोणी नव्हेतच अशी स्थिति झाल्यालाहि बहुत वर्षें लोटलीं होती. तसेच नागपूरकर भोंसले, गायकवाड, शिंदे, होळकर हे उत्तरेकडील मराठे सरदार हळु हळु स्वतंत्र होत होते व त्यांच्यांतसुद्धा गृहकलह माजलेले होते! अशातच रावबाजीची कार-कीर्द सुरू झाली. त्यांनी नानांस कैदेत घातले ! पण त्यांच्या मसलतीची जरूर भासूं लागली, तेव्हां रावबाजीनी त्याना कारभारावर घेतले. पुढें

सन १७९९त पट्टणकुडीच्या लढाईंत परशुरामभाऊ मारले गेले! सहा महिन्यांनीं नानाहि वारले. मग काय, " छिद्रेष्वनर्था बहुली भवंति." जिकडे तिकडे अनवस्था, फाटाफूट, चीरफाट, झाल्याकारणानें धूर्त इंग्रजांनी सहजीच या परिस्थितीचा फायदा घेऊन आपले हित साधून घेतले. या ४० वर्षांच्या इतिहासापैकी हा शेवटचा भाग कितीहि उद्वेगजनक असला तरी व त्याच्या वाचनाने मन क्षोभ होण्याचा कितीहि संभव असला तरी तो आपले दोष दाखविणारा व म्हणून एक प्रकारें अत्यंत बोधप्रद असल्यामुळे आत्मसुधारणेचा धडा त्यापासून मिळण्यासारखा आहे. आणि, पडत्या काळात पडता पडतां देखील, निराश न होतां अधिक उत्साहानें डोके वर काढून स्वाभिमानाने जगण्यासाठीं किंवा ' मरण पुरवले पण अपयश नको ' या भावनेने अगदी अखेरची धडपड करणाऱ्या—शत्रूबरोबर लढता लढतां मरणाऱ्या—कैक वीरमणीची चरित्रे चकित करून सोडणारी आहेत, ह्यात तिळप्राय संदेह नाहीं.

शास्त्रीबुवांनी या सर्व हकीकती, अतिशय परिश्रमाने जुन्या कागदपत्रांतून त्यांनीं शोधून काढिलेल्या माहितीच्या आधारें लिहिलेल्या आहेत. ४० वर्षांचा इतिहास सांगण्यास प्रत्येकी पांचसहाशे पृष्ठांच्या १२।१४ खंडाची आवश्यकता काय असें कोणास वाटण्याचा संभव आहे. पण गेल्या महायुद्धाच्या पाच वर्षांच्या मुदतीतल्या वृत्तान्ताचे ह्यांहून मोठाले असे पंधरा वीस खंड छापिले गेले आहेत असे ऐकिले म्हणजे वरील गोष्टीचें आश्चर्य मुळीच वाटेनासें होतें. ही सर्व माहिती जशी विपुल तशीच ती प्रत्यंतर प्रमाणाशीं ताडून पाहून शक्य तितकी यथार्थ—निर्भेळ सत्य सांगणारी—आहे असेंच त्यांच्या संशोधनलेखनासंबंधे अभिप्राय देणाऱ्या विद्वानांचे एकमतानें म्हणणें आहे. " ते तोलून लिहितात." " मोठ्या पायावर लहान इमारत रचितात." " साऱ्याप्रमाणे विवेचक बुद्धि ठेवून लिहितात " " ते विकार रहित इतिहास लेखक ( Sober

Historian ) होते." "त्यांची विधानें जशीच्या तशीं उचलून घेण्यांत धोका वाटत नाहीं" वगैरे अभिप्रायोक्ती वरील विधानास पुष्टि देण्यास पुरेशा आहेत. त्यांची माहिती किती विविध प्रकारची असते ही गोष्ट, तंट्यांचे[1] निकाल, बाजारभाव, काशीयात्रा व लग्नकार्यासंबंधी जमाखर्चाची टिपणें, पागेकडील माहिती, शिक्षा, ग्रामण्यें, इत्यादि विषयांचे कागदपत्र ऐ. ले. संग्रहांत त्यांनी प्रसिद्ध केले आहेत त्यांवरून स्पष्ट होते. ह्या बाबतीत त्यांनी पाश्चात्यांची इतिहास--लेखनाची शास्त्रीय दृष्टि अंगीकारिली असून राजकारणाबरोबर तत्कालीन सामाजिक, धार्मिक, व्यापारविषयक व इतर अनेक व्यावहारिक बाबीचे थोडे बहुत तरी ज्ञान होईलसे त्यांनीं केलें आहे. हे सर्व लिहिणे मनोरंजक, विनोदी, साध्या, सरळ, जोरदार पण सोप्या भाषेत आहे. त्यांची ही लिहिण्याची धाटणी इतराहून निराळी—ओळखितां येईल अशी स्वतंत्र—आहे. आणि खुलाशाच्या भरपूर टिपा देऊन त्यांनीं आपले जुन्या कागदपत्रांचे प्रकाशन वाचकांस अत्यंत सुबोध व सुलभ करून ठेविले आहे. यापेक्षां गुरुवर्य खरेशास्त्रीबुवा यांच्या योग्यतेस साजेसे अधिक प्रशंसापर लिहितां न आल्याबद्दल त्यांच्या चाहाल्या वाचकांची क्षमा मागून हें प्रकरण येथे संपवितो.



१. ह्यासंबंधींचा उल्लेख ऐ. ले. सं मासिक भाग १ अंक १ पृ. ४ वर आहे.

## परिशिष्ट १ लें

# ऐ. ले. सं.मधील पत्रांतील प्रकरणांची यादी[1]

**भाग १ ला**—स. १७६० जानेवारी ते १७६३ मेपर्यंत. नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दीची अखेर—मधवरावास पेशवाईची वस्त्रें—मोगलांची पुण्यावर स्वारी—लढाया व तह—माधवराव व दादासाहेब यामध्ये वितुष्ट—घोडनदीची लढाई—समेट—राघोबाची पटवर्धन वगैरे सरदारांवर गैरमर्जी—मिरजेचा वेढा—मोगलाची पुण्यावर दुसरी स्वारी—पुण्याचा विध्वंस—पेशव्याची मोगलाईवर स्वारी.

**भाग २ रा**—स. १७६३ मे ते स. १७६४ डिसेंबरापर्यंत. राक्षसभुवनची लढाई—मोगलांशी तह—हैदरअल्लीचे मनोवेधक चरित्र—पेशव्याची हैदरअल्लीवर पहिली स्वारी—रटेहळ्ळी, अनवटी, हावेरी येथील लढाया—सावनूरचे रक्षण—धारवाडचा वेढा.

**भाग ३ रा**—स. १७६४ डिसेंबर ते १७६९ आक्टोबरपर्यंत. अनतपूर व बिदनूर येथील लढाया—हैदरअल्लीशी तह—भोसल्यावर पहिली स्वारी-तोतया प्रकरणाचा उद्भव-राघोबाची गोहद वगैरे उत्तरप्रांती स्वारी-पेशव्यांची हैदरअल्लीवर दुसरी स्वारी—शिरें-मदगिरी, चेनरायदुर्ग येथील लढाया—तह—माधवराव व राघोबा यांची आनंदवल्लीस भेट—धोडपची स्वारी व राघोबास कैद—भोसल्यावर दुसरी स्वारी.

**भाग ४ था:**—स. १७६९ ऑक्टोबर ते १७७३ ऑगस्टपर्यंत. भोसल्याशी तह—हैदरअल्लीवर तिसरी स्वारी—कोल्हार, बाळापूर, नंदिदुर्ग वगैरे ठिकाणी लढाया—हैदराचा गोपाळरावावर छापा—निजगलचा वेढा—पेशवे देशी येतात—गोपाळरावांचा मृत्यु—त्रिंबकराव मामाचे पराक्रम—

---

१ रा. यशवंतराव खरे यानीं तयार केलेल्या ऐ.ले.स.च्या विषयानुक्रमावरून.

मोतीतलावाची लढाई–श्रीरंगपट्टणाचा वेढा–तह–ब्रिनीवाल्यांची फत्तर-गडावर स्वारी–जाटांशीं लढाई–बादशाहाची स्थापना–दिल्लीची लढाई–रोहिल्यांवर सूड–पेशव्यांचा आजार व त्यांतील अनेक हृदयद्रावक प्रसंग–मृत्यु–रमाबाईचे सहगमन–नारायणरावाची पेशवाईवर स्थापना–छोटी कारकीर्द व खून.

**भाग ५ वा:**—स. १७७३ ऑगस्ट ते १७७५जुलईपर्यंत. बारभाईचे कारस्थान–निजामअलीशी लढाई व भेट–गंगाबाईची स्थापना–कांसेगावची लढाई–राघोबाचा पाठलाग–समेटाची खटपट–राघोबाचें पलायन गुजराथची मोहीम–इंग्रजाशीं लढाया–पुरंदरचा तह–कोळ्याचा दंगा–प्रतिनिधीचा दगा–कोल्हापूरकराशी लढाया–तोतयाच्या बंडाची सुरुवात.

**भाग ६ वा** —स. १७७६ ऑगस्ट ते स. १७७८ एप्रिलपर्यंत. तोतयाच्या बंडाचा बीमोड-परशुरामभाऊंची कोल्हापुरावर मोहीम-पांडुरंग-रावाची धारवाडप्रांतीं स्वारी–सांवशीची लढाई व सैन्याची वाताहत–परशुरामभाऊ कुमकेस जातात–त्याच्या गनीमी हालचाली–पाळेगारांचे पारिपत्य–भाऊ व हरिपंत यांची धारवाडप्रांतो छावणी–हैदरअलीवर पाचवी स्वारी—महादजी शिंद्याची कोल्हापुरावर स्वारी–मोरोबादादांचे कारस्थान–उभारणी व चलती–कर्नाटकच्या फौजा देशी येतात.

**भाग ७ वा:**–स. १७७८एप्रिल ते स १७८४एप्रिलपर्यंत. मोरोबा-दादांचे कारस्थान ( उत्तरार्ध )व पारिपत्य–दरबारची डडमळ–परशुराम-भाऊ स्वारीस निघतात-बेरड बंडखोरांचा दंगा-भाऊंची सुरापुरावर स्वारी-इंग्रजांची पुण्यावर स्वारी–पराभव व वडगावचा तह–करवीरकरांचा बंदोबस्त-कित्तूरकराचें पारिपत्य–इंग्रजांशी तिसरा बिघाड–इंग्रज गुजराथ व्यापितात–वसई व कल्याण घेतात–पुण्यावर चालून येतात–पट-वर्धनांशीं निकराने लढतात–रसदेची लूट व पीछेहाट–साल्बाईचा तह–स्वस्थतेचीं दोन वर्षे--काशीयात्रा--करवीरकराचा पुन्हां बंदोबस्त व तह.

**भाग ८ वा :** --स. १७८४ मे पासून स. १७९१ फेब्रुवारीपर्यंत. मराठे व मोगल यांच्या यादगीर येथे भेटी-टिपूचा नरगुंदास वेढा-नरगुंदकरांची मर्दुमी-परशुरामभाऊ कुमकेस येतात-झटापटी-तह-टिपू दंगा करून नरगुंद व कित्तूर घेतो-टिपूवर पहिली मोहीम-होळकर व बेहरे कित्तूरप्रांतीं येतात-मराठे व मोंगल यांच्या पुन्हां-भेटी बदामी-आदवानी-टिपू, मराठे व मोगल यांस छापे घालून हैराण करितो-तह-स्वस्थतेची पुन्हा तीन वर्षें-पेशवे नाशिकास जातात-परभू ग्रामण्यप्रकरण पुन्हां उद्भवते-सोनार व वेदोक्त-टिपूवर दुसरी मोहिम--मराठे, मोंगल व इंग्रज एकत्र होतात-परशुरामभाऊंचा धारवाडास वेढा-निकराच्या लढाया-इंग्रजांची मर्दुमी-बातेच्या, पेठ, रेवणी व खंदक यांजवर हल्ले.

**भाग ९ वा** --स १७९१ मार्च ते स. १७९६ नोव्हेंबरपर्यंत-धारवाड काबीज होतें-म्हैसूरच्या राज्यावर स्वारी-बांकी नबाबाचा पराजय-इंग्रजाची श्रीरंगपट्टाणावर स्वारी व पीछेहाट-इंग्रज व मराठी लष्करांच्या भेटी-इंग्रजांचा पट्टणास वेढा-घाशीराम कोतवाल-पाटीलबाबा देशीं येतात-श्रीमंताची कृष्णास्नानार्थ स्वारी-सातान्यास महाराजांची भेट-टिपूशीं तह-पाटीलबावांचा पुण्यास मुक्काम-वकील मुतलखी-नानांशीं वैमनस्य-सचिवप्रकरण-गायकवाडांची सरदारी-पाटीलबावांचा मृत्यु-अळत्याची लढाई-करवीरकरांवर मोहीम-खडर्याची लढाई-सवाई रावसाहेबांचा मृत्यु-बाजीरावसाहेब पुण्यास येतात-शिंद्यांचें प्राबल्य-नाना सातान्यास जातात-शेणवी कारभारी व पटवर्धन सरदार यांचा मिलाफ-चिमाजी आप्पाची स्थापना व छोटी कारकीर्द-नाना वांईस जातात-महाडाकडे पळतात-महाडचें कारस्थान-शेणवी व पटवर्धन याचा पाडाव-परशुरामभाऊंस कैद.

**भाग १० वा :**--स. १७९६ डिसेंबर ते स. १७९८ डिसेंबरअखेर बाजीराव साहेबांची स्थापना-नबाब, भोंसले, शिंदे, होळकर याच्या

लष्करांचा पुण्यास मुक्काम–पेशवे व शिंदे यांजविषयी नानाचा बेभरंवसा–शिंद्यांकडून नानांच्या द्रव्यहरणाची सुरुवात–नबाब शिंदे व भोसले यांचे लढे व समजूत–काशीराव होळकरास सरदारीची वस्त्रे–खुन्या मुरलीधर-मल्हारराव होळकरावर छापा व त्याचा मृत्यु--नाना व शिंदे यात द्रव्य-मूलक वितुष्ट–मुर्कीराची (१) दगलबाजी–नानांचा कारागृहवास–घाटगे-शाहीच्या राक्षसी लीला—अब्रूदार धनिकांचा अमानुषछळ-शेणवी सरदारावर साडेसाती–शिंदे-बायाचें बंड उद्भवते–बड जोरावते–घाटग्याचा अमृतरावावर छापा–पेशवे व शिंदे यात बेबनाव–सातारकर महाराजाचा दंगा–रास्त्यांची त्रेधा–परशुरामभाऊंची सुटका–नानाची सुटका–भाऊंच्या सातारकरांशी लढाया–साताऱ्यावर हल्ला व लूट–महाराजांचा बंदोबस्त–पेशव्यांकडून नानाची पायधरणी–नाना पुन्हा कारभारी होतात–परशु-रामभाऊंची शेवटची स्वारी–पुरापूरची खंडणी–कर्नाटकची मुलुखगिरी.

**भाग ११ वा :**—स. १७९८ सप्टेंबर ते स. १८०० फेब्रुवारी मागच्या दोन प्रकरणांची अधिक तपशीलवार माहिती—चतुरसिंगाचा रास्त्याच्या लष्करावर छापा–रास्ते चतुरसिंगाचे बंड मोडतात– विश्राम-बाग राजवाडा – शितोळे व निपाणीकर--पंढरपुरी डुकरीचे कौतुक–दक्षिणप्रांतीं बायाच्या फौजेचा दंगा–बाया व करवीरकर याचा मिलाफ–

---

१ मुर्कीर हें नाव मिचेल, मायकेल, असे काही असावे. नाना फडनविसाच्या जुन्या चरित्रात पृ. २१४।१५ वर 'कर्नल मिचेल फिलोज' असें या दगल-बाजाचें नाव आढळते! हा जातीने फ्रेंच होता. नवे चरित्र पृ. २०४

२. चंद्रभागेंत स्नान करून पुंडलिकाच्या देवळास प्रदक्षिणा घालून प्राण सोडणाऱ्या डुकरीची गोष्ट ही त्या वेळची धार्मिक भावनेची दर्शक आहे. नानास तपकीर लागे; व परशुरामभाऊ चहा कॉफी घेत, त्याची चहादाणी चांदीची होती, इत्यादि गमतीच्या गोष्टी ह्या भागात आहेत. राजकारणाखेरीज इतर बाबींसबंधी हकीकतींचीं पत्रें दुसऱ्या भागातून अशीच मधून मधून आहेत

पेशवाईंतले नामांकित वैद्य-बाळोबातात्यांची सुटका व पुन्हां कारभारावर स्थापना-पेशव्यांकडून परशुरामभाऊंस सरंजामाची मोकळीक,—बहुमान व धारवाडचा किल्ला मिळतो-नाना, भाऊ व बाळोबा याचा मिलाफ-बाळोबांच्या मध्यस्थीने बायांची समजूत-भाऊ करवीरच्या बाजूस येतात-गोकाक, हुकेरी व चिकोडी वगैरे ठाणी घेतात—भाऊंवर जारण-मारणाचा प्रयोग व त्यामुळें शरीराची हैराणगत-सातारच्या संस्थाना-करितां चतुरसिंगाचा आणखी प्रयत्न-इंग्रज टिपूचे राज्य घेतात-वाघाच्या बंडाची सुरुवात-भाऊ व करवीरकर याच्या हालचाली-पट्टण-कुडीची लढाई-भाऊचा मृत्यु व त्याच्या सैन्याची वाताहत-पुणें दरबार कह्यात आणण्याविषयीं इंग्रजांचा कावा-घाटग्याची सुटका-घाटग्या, शिंदे-बायांवर मारेकरी घालतो-रामचंद्र परशुराम करवीरराज्यावर स्वारी करितात-पुण्याहून फौज व पलटणे कुमकेस आणितात-शिरोळ काबीज करितात-करवीरच्या फौजेवर छापा घालून नासधूस करितात-करवीरावर चालून जातात-करवीरची लढाई.

**भाग १२ वा:**—स १८०० मार्च ते डिसेंबरपर्यंत—करवीरचा वेढा-हल्ले-प्रतिहल्ले-तोफांचा भडिमार—पलटणवाल्याची दगाबाजी—वेढा उठतो-मराठी फौजेची पांगापांग—नाना फडनवीस यांचा मृत्यु-—बाळोबा तात्यास पुन्हा कैद—सर्जेरावाची राक्षसी लीला--जुन्या मुत्सद्यावर सक्रांत-पुण्यांत आरब रोहिल्यांचा सुळसुळाट--शिंदे बायांची मर्दुमकी--हिंदुस्थानांतील राजकारण- शिंदे कपूची आवाडाव--सातारकर छत्रपति, यशोदाबाई, पंतप्रतिनिधि यांजवर गहजब-धोंडजी वाघाचे बंड वाघाचे धाडस आणि गनीमी कावा-इंग्रजांची ताराबळ-वाघाच्या बंडाचा शेवट-जुन्या राजिकाचा नाश-शेणवी सरदार व मुत्सद्दी यांचा संहार-श्रीमंतांचें कारस्थान-लोचटपणाबद्दल इंग्रजास प्रायश्चित्त-श्रीमंताचें स्वभाव-वैचित्र्य—शिंद्यांचे हिंदुस्थानात प्रयाण.

# परिशिष्ट २ रें

# ऐ. ले. संग्रहासंबंधीं विद्वानांचे अभिप्राय

**१. कै. प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर, एम्. ए. (स. १८९९).**

"या मासिक पुस्तकाची टापटीप व वेळेवर प्रसिद्ध होण्याची कमाल आहे! ह्यास मदत करणे म्हणजे सर्वभक्षक काळाच्या तडाक्यांतून वांचलेली आपल्या पूर्वजाची आपणासाठीं मागे ठेवलेली दौलत राखणेच होय. मागे एका अंकांत वर्णिलेल्या रा. रा. राजवाडे यांच्या वेडाप्रमाणे हे शास्त्रीबुवांचे वेड आहे. अशा लोकांस देशसेवा करता करतां कर्जाच्या काळजीने झुरून मरण्याचे प्रसंग महाराष्ट्र येऊं देईल काय?"[१]

**२. श्रीयुत दे. भ. तात्यासाहेब केळकर संपादक 'केसरी,'**

"[२]रा. खरे यांचे लेखांत साऱ्यांप्रमाणेच विवेचकता व नेमस्तपणा असून जमविलेल्या ऐतिहासिक सामग्रीवरून संगतवार इतिहास-प्रबंध लिहिण्यास तेच फार योग्य आहेत."

"[३]इतिहासाने जुने-नवे बेमालुमरीतीनें सांधले जाते. व कालाच्या ओघाबरोबर मानवी भावनांचा ओघहि अखंड वाहात असल्याचे प्रत्ययास येते. व हाच इतिहासाचा खरा उपयोग! तो खरेशास्त्र्यांच्या प्रस्तुतसारख्या ग्रंथानी चांगला साधतो."

"[४]जुन्या-पुराण्या पत्रांच्या भाराभर गळाठ्यातून नेमकी महत्त्वाचीं पत्रें निवडून काढणे, व मग त्यातला वेचक भाग वाचकापुढे व्यवस्थितपणें

---

१. ग्रंथ-माला वर्ष ६ अंक ८ नवबर १८९९. कै. विजापूरकर संपादक होते.
२. इतिहास विहार पृ. १२९. ३. इतिहास विहार पृ २०. ४. खरे-मृत्युलेख, केसरी, ता. १७ जून स. १९२४.

मांडणें ह्यामुळें त्यांचें ऐतिहासिक संशोधनकार्य भरीव व इतकें सुव्यवस्थित झालें आहे की, कोणाहि आंग्लविद्याविभूषित पदवीधराला ते शोभेसे आहे. त्यांचे अंगीं कोणत्याहि युनिव्हर्सिटीचे उच्च पदवीधर अगर फर्डा वकील किंवा बॅरिस्टर होण्याच्या योग्यतेची बुद्धिमत्ता होती. पारसनिसां-प्रमाणे साधनानुकूलता व राजवाड्यांप्रमाणे संचार-स्वातंत्र्य नसताहि शास्त्रीबुवांचें संशोधनकार्य सूत्रबद्ध व व्यवस्थित झाले. पारसनिसाचा संग्रह मौल्यवान् व मातब्बर असेल आणि राजवाडे यांची कल्पनेची भरारी व शीघ्र ग्रहणशक्ति त्यांचे ठिकाणी नसेल. तथापि, खरेशास्त्री यांचे अंगी या उभयतापेक्षा निर्कोप अशी विवेचक बुद्धि होती, इतकेंच नव्हे तर त्याच्या ग्रंथप्रसिद्धीमध्यें जी सारासार बुद्धि, प्रमाणबद्धता, शिस्त, पद्धत व वाचकाना आपल्याशी समरस करण्याची हातोटी होती ती खरोखरच अवर्णनीय होय. पारसनिसांचा ऐतिहासिक संग्रह पाहून मनुष्यास हेवा वाटेल आणि राजवाड्यांची संशोधकीय आतषबाजी पाहून मनुष्य क्षणभर आश्चर्यचकित होऊं शकेल ! ! ! परंतु ऐतिहासिक चिकित्सक बुद्धीला रुचकर सहज पचणारे व कायमची पुष्टि देणारे खाद्य खरेशास्त्री यांच्या ग्रंथांत जसें मिळतें तसें इतरत्र क्वचितच मिळेल. मोठ्या पायावर लहान इमारत ते रचीत ह्यामुळे त्याचीं अनुमाने सहसा अबाधित राहात व आपल्या ऐतिहासिक माहितीचा ते कधीहि ‘ मीनाबझार’ करून मांडीत नसल्यामुळें त्याच्या निबंधप्रबधातील प्रमेये आपल्या अवांक्यांतील आहेत असेच सर्वांस वाटे. त्याच्या लिहिण्यांत सुबकपणा, सुव्यवस्थितपणा व उपयुक्तता दिसून येते. खेदाची गोष्ट ही कीं, ज्या घराण्यांचा लौकिक वाङ्मयद्वारां चिरंतन करण्याचे श्रेय खरेशास्त्री यांनी घेतलें, त्या घराण्यांतील संस्थानिकांनीं त्यांस भरपूर सहाय्य केलें नाही. उपास-तपास करून पायानें मजला मारीत ! प्रहरानुप्रहर दप्तरे चिवडून हातानें नकला करून, पुढच्या ग्रंथाच्या विक्रीनें मागच्या ग्रंथाचे

छापखान्याचें कर्ज फेडीत ! ! ते चतुरस्र, निरलस, मार्मिक व निष्ठावंत संशोधक होते." इत्यादि.

**३ श्री. गोविंद सखाराम सरदेसाई रियासतकार,(सं १९२६)**

"रा. राजवाड्यांव्यतिरिक्त दुसरा विवेचक ग्रंथकार सांगू म्हटले तर कै. खऱ्यांचें नांव पुढे येते. खऱ्यानी पटवर्धनी दप्तरांतील महत्त्वाचे कागद छापण्याचें काम स्वीकारून मुख्यत: पानिपतोत्तरकालीन इतिहासाची संगति जुळवून दिली आहे. विशेषत: पेशव्याच्या राज्यकारभाराचे स्वरूप समजून घेण्यास खऱ्याच्या लेखाचाच आपणास विशेष उपयोग होतो. शे दोनशे पत्राचे प्रकरण हातीं घेऊन त्याचा मतलब आरंभी दिल्याने पुढील पत्रें सुगम होतात तशी गोष्ट राजवाड्यानी केलेली नाही. तथापि, ऐतिहासिक महत्त्वाची व तात्त्विक बोधसरणीची राजवाड्यांची कल्पकता खऱ्यांचे लेखांत आढळत नाही." ... . "राजवाडे तात्त्विक, पारसनीस व्यावहारिक व खरे सुटसुटीत, असे म्हणता येईल. मराठ्याच्या इतिहासाचा सांगाडा राजवाडे यानीं रचून तयार केला; पारसनिसानी त्यास रक्तमांसाची भर घालून त्याची मूर्ति सुबक दिसेल अशी केली; आणि खऱ्यांनी त्याच्या एका भागाची प्राणप्रतिष्ठा केली."

"[2] स्वतंत्र इतिहास लिहिण्याचे काम त्यास ( खरे शास्त्रीबुवास ) अंगावर घेता आले नाही. पटवर्धन—दप्तरातच ( त्याचा ) सर्व वेळ गेला. दक्षिणहिंदुस्थानांतील पेशवाईच्या घडामोडीचे त्यांचें ज्ञान व मनन अगाध होते परंतु उत्तरेतील माहिती जी अलीकडे थोडी थोडी बाहेर येत आहे ती त्यांचे डोळ्यापुढे नव्हती म्हणून नाना फडनविसांचे कारभारांतील शिंदे, होळकर वगैरे सरदारासंबंधीचें त्यांचें विवेचन, मला वाटते, आतां कांहीसे बदलावें लागेल."

---

१. हा उतारा मासिक मनोरंजन सप्टेंबर १९२६ मधील लेखातून घेतला आहे.
२. श्री. सरदेसाई यांजकडून आलेल्या पत्रावरून. ( पत्र, ता. ५।१।२८.)

**४ श्री. रा. त्र्यंबक शंकर शेजवलकर, बी. ए, ( सं[1] १९२४ )**

" मराठी इतिहासास कै. शास्त्रीबुवांच्या गाढ संशोधनाची जोड मिळाली आहे. प्रारब्धकार्य पेशवाईच्या शेवटास नेण्याची त्यांना तळमळ लागली होती. साने, पारसनीस, राजवाडे, भावे, खरे, हे इतिहाससंशोधन-पंचायतन ' होते. ह्यांत अत्यत व्यवस्थेशीर व अभ्यासक्रमास सोयीचें असें काम शास्त्रीबुवाचें आहे. ' इतिहास शहाणपणा शिकवितो ' या बेकन्‌च्या वचनाप्रमाणें मिळणारें मार्मिक ज्ञान व खोल शहाणपण शास्त्रीबुवांचे अंगी मुरलेलें होते. भाषाप्रभुत्व, रसिकता, विनोद, हे त्याच्या वाङ्मयांतले गुण ( विशेष ) होत."

**५. प्रो. पोतदार व श्री. रा दत्तात्रेय विष्णु आपटे**, बी. ए.

" [2]कै. वासुदेवशास्त्री खरे यांची महाराष्ट्राची इतिहाससेवा फार थोर दर्जाची झालेली आहे. प्रतिकूल परिस्थितीशी विलक्षण झगडा करून करूनच हे इतिहाससंशोधनाचे महत्कार्य महाराष्ट्रांत वाढीस लागले आहे. कीर्तने, साने, राजवाडे, खरे किंवा पारसनीस यापैकीं कोणासहि त्यांचे उमेदीप्रमाणें अथवा योग्यतेप्रमाणे राष्ट्राने सहाय्य केले नाही ! या सर्व इतिहाससेवकांत राजवाडे यांची सर कोणासहि यावयाची नाही. इतके त्यांचे स्थान उंच व थोर आहे. रा. खरेशास्त्री यांचा कार्यारंभ राजवाडे यांचे आधी झाला. आणि ह्या पवित्र कार्यांतच त्यांचा अखेर अंत झाला ! गाजावजा करून जाहिराती देण्याची खोड शास्त्रीबुवाना नव्हती. आपले काम बाणेदारपणानें परंतु अगदीं व्यवस्थितपणें करावयाचें यासंबंधीं ते अतिशय दक्ष असत. सुदैवाने त्यांना मळेदप्तरासारखे एकगटी महत्त्वाचे साधन मिळाल्यानें त्यांना संशोधन-संचार फार करावा लागला नाही. परंतु एका जागी बैठक मारून त्यांनीं अशी चोख मेहेनत

---

१. खरे—मृत्युलेख, 'नवाकाळ' ता. १३ जून १९२४. २. उभयताकडून मुद्दाम मागाविलेला अभिप्राय. (पत्र, ता. २१।१२।२६.)

अंगीकृत कार्यांत केली कीं, त्यांचें नांव सकल महाराष्ट्रास वंद्य झालें. मराठ्याच्या पानिपतोत्तरकालीन इतिहासाबद्दल खरेशास्त्री यांच्या इतका सूक्ष्म माहितगार कोणीहि उभ्या महाराष्ट्रांत नव्हता. त्यांची बुद्धि कुशाग्र, स्मरणशक्ति प्रखर, त्यामुळे त्यांनी वाचलेल्या एकूण चार लक्षावर पत्रांतील वृत्त त्यांचे डोळ्यासमोर सारखे खेळत राही! राजवाड्यानीं एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणें 'खरेशास्त्री याच्या एवढा अवाढव्य माहितीचा माणूस एकाद्या राष्ट्रांत वारंवार उपजत नसतो[१]' त्यांना विपत्तीत दिवस काढावे लागले हे आमचें इतिहासप्रेम पुढील पिढ्याना कळेल त्या वेळीं त्याना काय वाटेल? ग्रंथ साक्षेपाने तयार करण्याची वासुदेवशास्त्र्याची पद्धति फारच लोकप्रिय व विद्वत्प्रियहि होती. तथापि, राष्ट्र जागरूक असतें, विद्यापीठें कार्यतत्पर असती, पूर्वजप्रीति देशात नांदत असती, तर शास्त्रीबुवांसारख्या मोहोऱ्याच्या हातून १०।१२च नव्हे तर खरोखर यांच्या दसपट खंड बाहेर पडले असते!! (शास्त्रीबुवा जसे संस्कृत पंडित होते तसेच ते मोठे रसिक व मार्मिक कवि, टीकाकार व नाटककारहि होते.) त्यांच्या इतका विनोदी कथाकथक तर आम्हीं पाहिलाच नाही शास्त्रीबुवाची कामगिरी संस्मरणीय झाली आहे. त्याची योग्यता यापुढें अधिक प्रतीत होईल!!!"

६ महाराष्ट्रीय ज्ञानकोश—

"त्यानीं दोन (अडीच) तपे जे संशोधनाचे भरीव व सुव्यवस्थित आणि सूत्रबद्ध काम केलें ते कोणत्याही उच्च प्रतीच्या विद्वानाला शोभण्यासारखे व अभिमानास्पद होतें. त्यांची विवेचक व सारग्राही बुद्धि अत्यंत प्रखर होती" ......"अशा अडचणींतही त्यानीं श्रेष्ठ इतिहाससंशाधक व उत्तम ग्रंथकार म्हणून नांव कमाविले हें त्यांच्या बुद्धिमत्तेचें व ध्येयनिष्ठेचें लक्षण होय."

१. विभाग १२ वा पृ.(ख) ५९, 'खरे' वासुदेव वामन शास्त्री, पहा.

**७ श्री. शंकर श्रीकृष्ण देव** बा ए., एल्एल्. बी (सं. १९२६)

"कै. वासुदेशास्त्री यांनी महराष्ट्राची बहुमोल सेवा केली आहे. आम्ही, त्यांचे अवशिष्ट काम त्यांचें चिरंजीव रा. यशवतराव यांचे हातून पार पडो असे इच्छितो."

**९ श्री. रा. यशवंत नरसिंह केळकर** (सं[२] १९२६)

"लैकिक जगांत मनुष्य जिवंत असेल तोंपर्यंतच त्याला महत्त्व! पण, इतिहास कालाच्या चितेत दग्ध झाला म्हणजे त्याच्या ज्या अस्थि शिल्लक उरतात त्यांसच अकल्पित महत्त्व प्राप्त होत असतें ऐतिहासिक कागदपत्राच्या बिंडोळ्याच्या जीर्ण अस्थि गोळा करणे, त्या जेथल्या तेथे साधणें–जोडणे, आणि शेवटीं अस्थींपासून बनविलेल्या वज्राप्रमाणे त्यातून सजीव, सगतवार इतिहास निर्माण करणे ही गोष्ट परार्थाभिलाषा-शिवाय शक्य नाहीं. कै. वासुदेवशास्त्री खरे हे अशा लोकांत अग्रेसर होते. सबध आयुष्यभर हे इतिहाससशोधनाचें काम त्यांनी केलेच, पण, या कार्याचा त्यांचा व्याप एवढा मोठा होता व त्यांनी जमविलेल्या अस्सल ऐतिहासिक कागदपत्रांचा संग्रह एवढा विपुल आहे की, तो प्रसिद्ध करण्याला त्याचा जन्महि त्यांना पुरा पडला नाही! आणि पेशवाईच्या अखेरीपर्यंत इतिहास तडीस नेण्याची त्यांची कल्पना तशीच अर्धवट राहिली. त्यांनी आरंभिलेले हे कार्य बाणपुत्राप्रमाणें अधिकारी अशा त्यांच्या पुत्रानें उचलून धरून चागल्या तऱ्हेने पुढे चालविले. हे रा. रा. यशवतराव खरे यांचे यश विशेष आहे!"

**समाप्त.**

---

१. ऐ. ले. सं भाग १३ व्या वरील अभिप्राय. २. केसरी ता. ३१-८-२६ ऐ. ले. सग्रह, भाग १३ यावरील अभिप्रायामधून हा मजकूर घेतला.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| पुरस्कार, २. | २ | आनुषषिक | आनुषगिक |
| दोन शब्द, १. | १० | आजरामर | अजरामर |
| ,, ,, २ | २३ | अदवाद | अपवाद |
| जन्मपात्रिका. | १४ | चरित्र या | चरित्र व या |

## चरित्र-( पूर्वार्ध )

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १२ | ११ | विजयानगरचे | विजयनगरचे |
| १७ | १४ | उर्जित | ऊर्जित |
| २१ | ८ | म्हणतात, | म्हणतात ) |
| ३० | ११ | अजापुत्रो | अजापुत्रं |
| ३३ | ६ | दुग | दुर्ग |
| ४० | ३ | ब्रम्हावर्तास | ब्रह्मावर्तास |
| ४० | ४ | यान्या | त्याच्या |
| ४६ | १८ | परिच्छेदाना मथळा — | पुण्यास प्रयाण— |
| ६५ | १५ | मनस्थितीस | मन स्थितीस |
| ७० | १४ | महति | महती |
| ८८ | २० | बालकर्वाच्या | या बालकवींच्या |
| ८७ | ३ | खरनखर विद्रावितमहा | खरनखरविद्रावितमहा |
| ९० | १४ | मान | मानि |
| ९५ | २० | कवितसे | कवि तसे |
| ९८ | २३ | शारीर | शरीर |
| ११० | २१ | परिच्छेदाचा मथळा — | या प्रकरणी दोन महत्त्वाचे उतारे— |
| ११९ | १ | आठव्य | आठव्या |
| १२१ | २२ | चर्पाने ककाची | चपलेने ककार्चा |
| १२९ | १९ | तारताम्य | तारतम्य |
| १३३ | २३ | सिद्रन्त | सिद्धान्त |
| १७७ | ५ | पथा | पथो |
| १८३ | २३ | केल्यांचिणा | केल्याविण |

## ग्रंथपरिचय-( उत्तरार्ध )

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | २१ | धनबस्त्वें | धनवस्त्वें |
| २ | २३ | गिराशि | गिरिश |
| २ | २३ | तू | तू गा ! |
| ५ | १० | [२]बळा | [२] बळी |
| ५ | १३ | पळे | पळे |
| १२ | ७ | राजाचळचे | राजा जवळचे |
| २२ | ११ | उत्तारे | उतारे |
| २९ | ६ | सत्कुलवत | सत्कुलवत |
| ३० | १५ | कतव्य | कर्तव्य |
| ३३ | १३ | सखे | सुखें |
| ४४ | २ | सार | सारे |
| ४८ | १५ | शास्त्र | शस्त्र |
| ४७ | १० | कनुकरण | अनुकरण |
| ६७ | १० | राष्ट्च्या | राष्ट्राच्या |
| ७७ | २३ | आला | आला. |
| ९४ | ८ | विसायत | विलायत |
| १०५ | १८ | यासमोगलाच्या | यास मोगलाच्या |
| १०७ | ५ | टाकिल्याद्दल | टाकिल्याबद्दल |
| १२४ | ६ | चालवावा | चालावा |
| १४६ | २२ | महाठाकडे | महाडाकडे |
| १४९ | १० | नात्यमाहेब | तात्यासाहेब |
| १४९ | १४ | इतिहसानें | इतिहासानें |

काना, मात्रा, वेलांटी, अनुस्वार, वगैरे कमी जास्ती होऊन झालेल्या आणखी कांही चुका ह्या शुद्धिपत्रात दिलेल्या नाहीत